**अर्धमांडीदंड**—पु. दंडाचा एक प्रकार. यांत दंड काढल्यावर एका मागून एक पाय जवळ घेऊन अर्धी मांडी घालावयाची असते. -व्याज्ञा ४.४९. [ अर्ध+मांडी+दंड ]

**अर्धोदकीं येणें**—अर्धवट स्थिति होणें; धड इकडची तड नाहीं धड तिकडची तड नाहीं, याप्रमाणें जणूं काय नदीच्या पात्रांत कमरेइतक्या पाण्यांत अडून राहणें; अर्धवट आधार तुटणें. 'क्षेपनिक्षेप तरी बोलत नाहीं. रेवातीरींहि राहूं देत नाहींत. असें अर्धोदकीं आलो आहों' -रा १२. १०९. [ अर्ध+उदक ]

**अर्फअ**—वि. उच्च तर-तम. -मुधो. [ अर. ]

**अर्बईन**—वि. चाळीस. -मुधो. [ अर. ]

**अर्वाचिणें**—अक्रि. अर्वाचीन रूप देणें; वर्तमान काळास अनुसरून भाषेचें स्वरूप बदलणें. 'प्राचीन मराठी वाङ्मय सामान्य जनतेला सुबोध करण्याच्या काळांत अर्वाचिलें जाण्याचा संभव आहे. वेदवाङ्मयांत सुद्धां फार प्राचीन काळीं असें मिश्रण व अर्वाचीकरण झालें होतें.' -मसाप ६३. २६०. [ सं. ]

**अर्शाद**—पु. उत्तम मार्गदर्शक; सुमार्गगामी. [ अर. ]

**अर्हत**—पु. १ जैन यति. २ बौद्ध साधु. [ सं. ]

**अलखगीर, अलखनामी**—पु. बिकानेर येथील एका चांभारानें स्थापिलेला पंथ. हा मूर्तिपूजेविरुद्ध होता. -ॲइंको. [ सं. अलक्ष्य+फा.+गीर ]

**अलगटबलगट**—न. आळ; तोहमत; बालंट; विघ्न; संकट. [ बालंट; बलगट द्वि. ]

**अलंगधुपार्ती**—स्त्री. निशाण व धुपार्ती ( दाखविणें ); फसविणें; चकविणें. [ अलंग=निशाण+धूपारति ]

**अलंटपू**—वि. ( कु. ) उडाणटप्पू; उनाड; व्रात्य; बेकार. 'प्वार अलंटपू निपजला' -मसाप ४.४२.८. [ असं+टप्पू ]

**अलमस्त**—वि. दांडगा; धटिंगण; बळकट; मत्त. 'इथले साधू चार महिन्यांत असे कांहीं लालबुंद आणि अलमस्त होतात कीं' -हिप्र १८०. [ अल+मस्त ]

**अलक्ष**—न. दुर्लक्ष्य; हयगय; आळस; टाळाटाळ; चुकवाचुकव. अलक्ष्य पहा. 'कोणा एका यक्षें केलें अलक्ष अपुल्या कामीं' -मेघदूत. [ सं. अ+लक्ष्य ]

**अला व अदना**—श्रेष्ठकनिष्ठ; लहानमोठा. 'अला व अदना खावंदापाशीं बराबर' -रा ५.४. [ अर. ]

**अलात अवदात**—न. ( नाविक. ) गलबताचें सामान-सुमान. [ अर. अलत्=हत्यार द्वि. ]

**अलादियाशाही व्यवहार**—पु. बिनहिशोबी कारभार; येईल ती जमा व होईल तो खर्च आणि राहील ती शिल्लक असा व्यवहार. -सयाजीराव ( तिसरे ) चरित्र १.३४७. अलीज.ही पहा.

**अलायदा**—वि. (कु.) अलाहिदा पहा.

**अलाला**—ना. जुन्या पौराणिक नाटकांस संज्ञा. कारण त्यांत राक्षस पार्टी अललल डुर्र असा शब्द करीत. यास अललडुर्र नाटकें असेंहि म्हणतात. [ ध्व. ]

**अलावह, अलावा**—शअ. शिवाय; वेगळें; निराळें. 'अलावा टपाल हंशील' -के १३.२.३९. [ अर. अलावा= शिवाय; अधिक ]

**अलीय्यह**—वि. उच्च. -मुधो. [ अर. ]

**अलोचना प्रत्यालोचना**—स्त्री. चौकशी; विचार-विनिमय. 'लोक यांचे संबंधानें नाना प्रकारें अलोचनाप्रत्या-लोचना करूं लागले.' -गौरांग २९८. [ सं. ]

**अल्कारस**—पु. अशरक नांवाचें झाड; मरुन्माला; पिशुना. —अमर. [ सं. ]

**अल्ताफ**—स्त्री. कृपा; प्रसाद. -आफ. [ अर. लुत्फ= कृपा अवे. ]

**अल्फ**—वि. हजार. -आफ. [ अर. अल्फ ]

**अल्यक**—वि. सर्वांत योग्य. -आफ. [ अर. अहलियार= योग्यता ]

**अल्लखणें**—अक्रि. अलगणें ४ पहा.

**अल्लाम**—वि. सर्वसाक्षी. -आफ. [अर. अल्लाम=सर्वद्रष्टा]

**अल्हक**—क्रिवि. खरोखरी. -मुधो. [ अर. ]

**अल्हिदह**—वि. निराळें. -मुधो. [ अर. ]

**अवकर**—पु. कंटाळा; तिरस्कार. 'हिंवाचा करितां उपचारू। परिचारिकांचा घेत अवकरू। म्हणे हा नव्हे चंद्रु-चंदन कापुरू। मारू पंचाग्नीचा ॥'-नरुस्व ५६०. [ सं. अव+कृ ]

**अवकाट**—वि. तमाम; सर्व. 'त्याउपर महाराजानी अवकाट फौजास हुकूम केला' -रा १६३. [ ? ]

**अवकाशीं बसणें**—शौचास जाणें, बसणें. 'उमाई अवकासां गेलीं होतीं: मानुस अवकासां बैसलें होतें तेंयासी कींव ( कृमि ) पडलीः' -लीच. पू. १२.

**अवकाळ**—क्रिवि. ( कों. ) अलीकडे; आतांशीं; हल्लीं; गेल्या थोड्या दिवसांत. 'पूर्वी बहुतेक येई, अवकाळ नाहीं आढळत.' [ सं. अव+काल ]

**अवक्कल**—पु. संकोच. -राव्य ८३३. [ अर. ]

**अवखाद**—वि. अवघड; अडचणीची; कठिण. ' गवत रानामध्यें बहुत जागा अवखाद ' -पेद ३३.३३४. [ सं. अव+खात ]

**अवगळा**—पु. ( महानु. ) १ शेताच्या कोपऱ्यावर थोडी खोलगट पडीत जमीन, येथें शेतीचें सामान ठेवतात. २ (ल.) मायेच्या स्वरूपांत असें स्थान आहे कीं, त्या ठिकाणीं सुखदुःखरहित जीवांस ठेवतात. ' देवता अवगळा ठेवीः '

**अवघात**—क्रिवि. अकस्मात्; एकाएकीं ( कोसळणें, उडी घेणें, पडणें इ. ). [ सं. अप-अव+घात ]

**अवचटणें**—अक्रि. बेभान होणें; चित्त ठिकाणावर नसणें; अनवधानी होणें. ' राजा म्हणे कटकटा । कैसेनि ही अवचटली बरवंटा । ' -भारा बाल ८.९७. [ सं. अव+चित्त ]

**अवचिता भात**—न (कु.) भाताची, सालीची एक जात.

**अवज**—पु. १ ऐवज; द्रव्य. २ बदल. -आफ. मुधो. [ अर. इवज ]

**अवडाण**—न. ( कु. ) उठाणूं; गळूं. अवठाणूं पहा. [ सं. अव+स्थान ]

**अवढणा**—पु. वीट; शिसारी; तिटकारा; नकोसें होणें. अवढणणें पहा.

**अवतार संपण**—कर्तृत्वशक्ति संपुष्टांत येणें; सद्दी संपणें; पराक्रमाचा अंत होणें. -पुरु. जुलै ३९.

**अवथ**—पु. अवाई; धाक; भीति. ' सदाशिव रड्डी जमियतमुद्धां शहरावर येणार याच्या अवथामुळें रात्रंदिवस हुशारी व ताकीद ज्यारी आहे. ' -रा ५.११५.

**अवदरवद**—वि. येणारे जाणारे. ' बकाल व्यापारी व अवदरवद यांस ' -ऐप. [ फा. आवर्दन ]

**अवदांडा**—वि. दांड; दांडगा; मस्त.

**अवदांडो**—वि. ( चि. कु. ) मोठा जोराचा पाऊस व वारा.

**अवदान**—न. फार मोठी भरती; उधान पहा.

**अवध**—पु. अयोध्या प्रांत.

**अवधंडा**—वि. पु. फार जोराचा वारा व पाऊस. अवदांडो पहा. -वि. भांडखोर; निर्लज्ज; गैरवर्तनी; मारकट; मुसंडी देणारें ( जनावर ).

**अवधांडो**—पु. ( कु. ) भयंकर पाऊस. अवधंडा पहा.

**अवाधि**—स्त्री. कालमर्यादा. [ सं. ] **०अरवार**-न. मुदत गहाण; व्याजाकरितां ठरलेल्या मुदतीपर्यंत जमिनीचा उपभोग घेण्याच्या करारानें ठेवलेलें गहाण. भोगवट्यास दिलेलें ताबें गहाण. **०क्रय**-पु. ठरलेल्या मुदतींत रकम परत केली नाहीं तर गहाण जमीन खरेदी समजावयाची असा गहाणाचा प्रकार,

**अवधी**—स्त्री. अयोध्या प्रांताची भाषा. औधि असेंहि म्हणतात. एक हिंदी भाषेचा प्रकार. [ सं. अयोध्या-औध-अवध ]

**अवध्यास**—पु. हव्यास; सतत विचार; मनांत एकसारखी बाळगलेली इच्छा, विचार, ' तोचि अवध्यास वागवी । मानस मैथुनातें जागवी । मग जीवालागीं भोगवी । इंद्रियद्वारा ॥ ' -सिसं ४२.९७. [ सं. अव+ध्या-ध्यास ]

**अवयव-अवयवीभाव**—पु. मुख्य वस्तु व त्याचें अंग अथवा भाग यांचा संबंध; अंगांगी भाव. 'दुर्वास हें शंकराच्या बाणाचें ब्राह्मणस्वरूप असून अवयव अवयवी भावानें तो शंकरच होतो. ' -के १५.११.४२. [ सं. ]

**अवयोग**--पु. कुयोग; अशुभ वेळ. ' अवयोग बारा घटकांपर्यंत होता. त्याजमुळें त्रितीये प्रहरीं दरबारास गेलों ' -पेद २५.१०७. [ सं. अव+युज्-योग ]

**अवरतमाना**—स्त्री. बाई लोक; स्त्रिया; बायका. ' अवरतमाना चार जखमी केलिया आहेती ' -रा १६.१५. [ फा. औरत+माना ]

**अवरद**—' गंगापुत्र व येथील अवरद याजपाशी म्हणत नाहीं ' -प्रेम १.

**अवशात्**—क्रिवि. ( तंजा. ) अकस्मात; एकाएकीं. ' अवशात् निजामशहासही यदिलशहासही युद्धप्रसंग पडले ' -मऐशि ५.१४. [ सं. अवश पंचमी ]

**अंवशीं**—क्रि.वि. पूर्वरात्रीं; रात्र पडतांच. ' अंवशीं पहाटे पूर्वरात्रीं व उषःकालीं '. इतररूपें अंशिक ( कु. ), अंशीं, अंवशीं ( चि. ), अंशेक ( कु. ).

**अंवस**—स्त्री. अमावास्या. [ सं. अमावास्या ]. **अंसा**-क्रिवि. ( चि. ) अमावास्येस.

**अवसणें**—अक्रि. भोंवणें; अंगांत येणें. ' तेथें अवसली गिरिजा । सिद्धि पावेचि काजा । म्हणोनि तपें दुजा । केला तपो वनीं ॥ ' -कालिका ५.४२. [ सं. आ+विश् ]

**अवसर**—पु. जागा; स्थान. [ सं. अव+आश्रय ]

**अवसर**—पु.स्त्री. ( तंजा. ) घाई; तातडी. [ सं. तामिळ -अवसरम्=घाई. सं. अवसर ]

**अवसान**—न. (चित्रकला. ) बैठक; अवस्थान; स्थिति; आसन ' नाना प्रकारचीं अवसानें सर्व बहुतेक एकांगी मात्र पण सर्व प्रकारचीं अवसानें माणसास काय जनावरास काय, देण्याची त्यांची मोठी खुबी असे. ' -प्रति आत्म ३३६. [ सं. अवस्थान ]

**अवस्थान**—न. (महानु.) एक, सहा, दहा महिने मुकाम. **महा अवस्थान**-न. एक ते बारा वर्षें मुकाम.

**अवाच्यवाद**—वि. बोलूं नये असें; न उच्चारण्यासारखें; असभ्य. 'ते समयीं त्याणींहि अवाच्यवाद भाषणें केली' -पेद १९.९२. [सं.]

**अवाटा**—पु. आवार. 'साळगोपाळ वादनिचे तळे आठि, अवाटातु राह नाहीं वाडिया' -नागांव शिला राग्रं. आवाड पहा.

**अवातिफ**—पु. प्रसाद. -आफ. युधो. [अर आफ अने.]

**अवाळें**—न. अवाळूं; उठाणू. 'काया सुंदर गौरवर्ण भाळीं अवाळें असे।' -सप्र २.१८७.३१. आवाळूं पहा.

**अविघ्नकलश**—पु. एक मृत्तिका पात्र पांढरा रंग देऊन आंत अक्षता सुपाऱ्या, हळकुंड घालून वर झांकण ठेवून त्यावर दोरा गुंडाळून देवकाच्या सुपाऱ्यांत ठेवतात त्यास म्हणतात. यांत अविघ्नप संज्ञक गणपतीचें अधिष्ठान असतें. [सं.]

**अविनाभाव**—पु. अद्वैत; एकमत; आपपरभावाचा अभाव. 'उभयपक्षीं अविनाभावें घरोबा चालत आहे यास्तव हें पत्रलेखन केलें आहे' -पेद २४.४. [सं. अ+विना+भाव]

**अविश्वासणें**—अक्रि. विश्वास न ठेवणें. 'जें हिंदुमत तें मीं अविश्वासलें होतें' -अरुणोदय १३. [अ+विश्वास]

**अविस्मर, आविस्मर**—वि. विस्मरण न होतां; स्मरणयुक्त; अविसर. 'आम्हांवरी ममता धरून वडिलपणें सांभाळ करावयासी आविस्मर आसावें' -पेद २७.२०७. [सं. अ+वि+स्मृ]

**अवेली**—क्रिवि. अव्वल पहा. प्रारंभीं; अगोदर; पुढें. 'सन १८१६ च्या एक लेख आला आहे' -एलच १.१९७. 'रजा मिळाली तर आम्ही मार्चच्या अवेलीस निघूं आणि जूनच्या अखेरीस यूरोपांत पोहोंचूं' -एलच १.१७.

**अवेवधान**—न. अव्यवधान; दुर्लक्ष; असावधपणा. 'देशकालवर्तमान। सर्वेहि अवेवधान। कोणतें विधिविधान।' -रामदास. [सं. अव्यवधान]

**अव्लाद**—स्त्री. अवलाद पहा.

**अव्वडचव्वड**—क्रिवि. भरमसाट; फोल. 'जातिनिर्णयाचा भंग करण्याची अव्वडचव्वड वचनें दिलीं' -त्रिकाळ १५.१०.३९. [चवड द्वि.]

**अव्हांटा**—वि.क्रिवि. आडमार्गाचा; वांकडया मार्गाचा; आडरस्त्यानें; आडमार्गानें. 'तेथ विधिमार्ग राहिला नीट। मग अवघाचि अव्हांटा वसवट। तेथ कर्माचा कसवट। लागती करूं।' -सिसं ४४.१२५. अव्हाटा पहाटा. ०**धर्म**-आडवाटा धर्म; उदा. लौकिक वाढविण्याकरितां तुलादान करणें. 'काम्य कर्में करून घेऊन मजुरी न देणें व तीहि भरपूर न देणें हा अव्हांटा धर्म होय.' -महावा इ २.४४८.

**अशआर**—माहिती. -मुधो. [अर. शआर अव.]

**अशरक**—पु. (गुज.) अल्कारस नांवाचें झाड; मरुन्माला; पिशुना. -अमर. [सं.]

**अशरणशरण**—न. निराश्रितांचें आश्रयस्थान; निराधारांचा आधार. [सं.]

**अशांत**—क्रिवि. इतक्यांत. 'ये अशांत सदनांत हरी तो।' -वामन नव ९९. [असें]

**अशीलबे तशीलबे**—एक मुलींचा खेळ. -मखे २८७. व्याज्ञा १.३८७.

**अशुद्ध**—न. १ हीण; मिश्रण; हीन प्रतीचा भाग काढून न टाकलेलें (सोनें, लोखंड वगैरे). २ चूक. 'तुझ्या लेखांत कितीतरी अशुद्धें राहिलीं आहेत.' [सं.]

**अशुरा**—पु. मोहरमचे दहा दिवस. [अर. अशर=दहा]

**अश्किया**—वि. १ दुर्दैवी. २ दुष्ट; घातकी. -आफ. [अर. शकी=दुर्दैवी अव.]

**अश्फाक**—स्त्री. कृपा; सहानुभूति. -आफ. [अर. शफक=दया अव.]

**अश्वाह**—वि. वगैरेरीचे; तुल्य -आफ. [अर. शबह=सारखेपणा, प्रतिमा. अव.]

**अश्वकुंत**—पु. भाल्याचा एक प्रकार. -प्रश १७. [सं.]

**अश्वचर्या**—स्त्री. घोडा फिरविण्याची क्रिया. 'कुस्तीशिवायचे खेळ व कसरतीचे प्रकार, म्हणजे रथचर्या, अश्वचर्या, तलवारीचें युद्ध व गदायुद्ध हे होत' -व्याज्ञा १.३६.

**अश्वत्थामा दुग्ध**—न. पाण्यांत पीठ कालवून केलेला दुधासारखा पातळ पदार्थ. [अश्वत्थाम्याम त्याच्या आईनें असें दूध दिलें होतें अशी महाभारतांत कथा आहे यावरून] [सं.]

**अश्वल**—कठिण काम. -आफ. [अर. अस्कल ?]

**अष्ट-०ग्रह**—पु. बुध, शुक्र, पृथ्वी, मंगल, गुरु, शनि, युरेनस व नेपच्यून. ०**बंध**-पु (महानु.) अष्टकुलाचलपर्वत. 'अष्टबंध पृथ्वीस'. 'अष्टकुलाचळे पर्वतें मेरुमेखला बंध' -प्रमेय. ०**भोग**-पु. सुगंध, वनिता, वस्त्र, गायन, तांबूल, भोजन, शय्या, द्रव्य. -व्यवको. ०**वर्ग**-पु. आपल्या कुलांतील आठ मनुष्यांचा सत्कार; विवाहसमयीं दांडाऱ्या वेली शेज (पहा) नंतर करतात. उपनयनांत मातृभोजनाचे वेळीं आठ मुंजे जेऊं घालतात. ०**विकृति**-(ऋग्वेदाच्या)-पद, क्रम, चजे, माला-शिखा, रेखा-ध्वज, दंडक्रम, रथक्रम, घन. [सं.]

**अष्टांग**—न. तरवारीचीं अष्टांगें.-१ अंग. २ रूप. ३ जाति. ४ नेत्र. ५ अरिष्ट. ६ भूमि. ७ ध्वनि. ८ परिमाण.

**अष्टांगशुद्धि**—स्त्री. भूमि, आसन, देह, प्राणायाम, वाक्, मन, आत्म, ब्रह्म यांची शुद्धि. ' याचिया विचारें अष्टांगशुद्धि। पाविजे प्राणायामाची साधनविधी। प्राणायामीं ऐक्यता जालिया सहज सिद्धी। आब्रह्म राज्य भोगिजे॥ '-स्त्रानु ९.५.९८.[सं.]

**असकाट**—न. ( कु. ) माजलेलें रान; झुडुपांची गर्दी. ' असकाट रानांत जांव नको ' -मसाप ४.४.२७९.

**असंपातीरेषा**—स्त्री. जी रेषा वाढविली असतां दुसऱ्या वक्ररेषेजवळ जवळ जाते पण अनंततेपर्यंत प्रत्यक्ष स्पर्श करीत नाहीं अशी. इं. असंप्टोट. [ सं. ]

**असलयो**—वि. ( कर. ) न सोललेला; असोल पहा.

**असल( ळ )का**—स्त्री. ( कुण. ) आश्लेषा नक्षत्र.

**असली-ळी**—स्त्री. हसळी पाहा.

**असह्यकारिता**—स्त्री. सहन न करणें; प्रत्यक्ष प्रतिबंध. ' वरिष्ठांचा असहकारितेचा उपदेश कनिष्ठांना असह्यकारितेला म्हणजे प्रत्यक्ष अडथळा करण्याला सहजच प्रवृत्त करील ' -के २१.३.३९. [ सं. ]

**असणेंउरे**—क्रि. ( महानु. ) असते; अस्ति. [ सं. अस् ]

**असाकिर**—पु.सैन्य. -मुधो [ अर. अस्कर-सैन्य अव.]

**असामी**—पु. ( काशी ) वांटेकरी; रयत. असामी पहा.

**असालतन**—वि. सुलतानी; शाही; पादशाही; सुलतानाच्या हातचें. ' मागून असालतन फ़र्मान पाठवितो म्हणून पातशहानी बहुत कृपायुक्त लिहिलें ' -पेद २५.१२७. [ अर. सुलतान ]

**असासह**—पु. पाया -मुधो. [ अर. असास ]

**असियुद्ध**—न. तलवारीची लढाई. ' त्यांत नियुद्धें, गदायुद्धें व असियुद्धेंहि वर्णिलीं आहेत. ' -व्याज्ञा १.३८.[सं.]

**असी**—वि. ऐशीं. ' असी सहस्त्रा राया खाल काढुनी। उफराटे टांगिले।' -कालिका २०.१०. [ सं. अशीति ]

**असीबचंत**—पु. एक झाड; किलासी; सिध्मल. -अमर. [ सं. ]

**असीर**—वि अरुंद. -ख्रिपु. [ अ+शिरणें ]

**असील**—स्त्री. स्वतंत्र असलेली दासी. याविरुद्ध लवंडी म्हणजे गुलाम स्त्री. ' दोन प्रहर दोन घटकांपर्यंत तीनवेळां नबाबाकडून शुके मिध्यें व असीलाबराबर आले. ' -रा १०. ३७१. [ अर. असील=दासी ]

**अंसुतोरे**—पु. ( ठगी. ) वळवाचा पाऊस. ( हा अशुभ मानतात व क़ार्यास निघालें असतां प्रथम दिवशीं असा पाऊस पडल्यास अशुभ शकुन समजून परत येऊन पुनः केव्हां तरी निघतात. ) [ सं. अश्रु-अंसु ]

**असुदी व अबादी**—स्त्री. लागवड व वस्ती; शांतता व वसाहत. ' त्यास तंवी करून मुलखाची असुदी व अबादी करावी. ' -दुबारो ५.१४३.१३६. [ अर. असूदा=शांत,पर्ण ]

**असुरसेन**—पु. एक दैत्य. याच्या पृष्ठावर गया क्षेत्रीं विष्णुपदावर पिंडदान होतें. ' -तुल. रामा ३७. [ सं. ]

**असूर्यस्पर्शा**—स्त्री.वि. जींत कधीं सूर्यकिरण येत नाहींत अशीं अंधारी ( खोली ). ( असूर्यंपश्य ' या धर्तीवर प्रयोग. ) [ सं. ]

**अंसे, अंसेक**—क्रिवि. ( कु ) अमावास्येच्या दिवशीं. [ सं. अमावास्या, म. अंवस ]

**असोलो**—वि. ( कु. ) असोला पहा.

**अस्कळविस्कळ**—स्त्री. घुसळाघुसळ; उलटापालट. -वि. विसकलेलें; अस्ताव्यस्त.

**अस्त**—अक्रि. आहे. -आफ. मुधो. [ फा. ]

**अस्तापदार्थ**—पु. जवळ असलेलें साहित्य; जें सामान उपलब्ध असेल तें. ' या प्रांती धारण अस्त्यापदार्थे वरीच आहे. ' -पेद ३७.२१९. [ म. असणें+पदार्थ ]

**अस्ताव**—पु. पाण्याची झारी. ' गोपाळभट तुलपुले अस्ताव ' -पेद १८.१८५. पुढें पहा.

**अस्तावा**—पु. भृंगारी. पाण्याची झारी; तोटीचें भांडें -राव्य ३.४. [ फा. आस्तावा ]

**अस्तिशतप्राण**—पु. केवळ प्राणधारण करणारें शरीर; जवळ जवळ मृतप्राय शरीर. ' कित्येक शिपाई लोक व आणीक गरीब बाजारी लोक व जनावरसुद्धां अस्तिगतप्राण जाहले ' -रा ३.१.

**अस्तुटेपणा**—पु. अतिलोभ; कधीं तृप्ति न होण्याचा स्वभाव. [ आस+तुटणें ]

**अस्तूद-त**—क्रिवि. अवस्तूक पहा. अकस्मात्; एकाएकीं; अचानक. [ सं. अवस्तृ ]

**अस्थिभार**—पु. ( तंजा. ) घराचा पाया. [ सं. अस्ति+भार ]

**अस्नेव**—पु. ( कुण. ) स्नेह; मैत्री; परिचय. [ सं. स्नेह ]

**अस्पी**—वि. घोड्यावरील; घोड्यासंबंधीं. [ फा. अस्प; सं. अश्व=घोडा ] **०नगारा**-पु. घोड्यावरील नगारा. ' स्वामीनी अस्पीनगारियाविसी आज्ञा केली होती त्यावरून नवे सजून जोडी येक पाठविली आहे. ' -पेद ९.६१.

**अस्मिता**—स्त्री. व्यक्तिमत्व; व्यक्तित्व; अहंभाव; अहंता. ' नुसता पांढरपेशा समाज जरी घेतला तरी अस्मिता आणि

त्यांच्या आकांक्षा यांचा आविष्कार हरीभाऊंच्या कादंबऱ्यांतून दृष्टीस पडतो.' -के ७.२.३१. [ सं. अस्-अस्मि+ता ]

**अस्य**—न. ( महानु. ) तोंड; मुख. 'देखिले तै यशोधा। अस्यामध्यें अगाधा॥'; 'अस्यामध्यें ढिसाळा प्रचुर गिरिशिळा भूतळा ब्रह्मगोळा' -गस्तो. [ सं. आस्य ]

**अस्ल**—वि. अस्सल पहा.

**अस्वल**—पु. ( ल. ) अस्वल जमीन उकरतें यावरून. मंदीवाला; बाजारांत सट्टे करून वायद्याचा करार कमी किंमतीच्या खरेदींतून पार पाडण्यासाठीं बाजारभाव उतरण्याची खटपट करणारा सट्टेवाला. याच्या उलट बैल. -व्यापारी उलाढाली. [ इं. बेअर ]

**अस्वल गुदगुल्या**—स्त्रीअव. [ अस्वल एखाद्या प्राण्यास मारण्यापूर्वी गुदगुल्या करतें अशी समजूत आहे त्यावरून ] बरपांगी गोड पण परिणामीं घातक प्रेम. 'मात्र हें हास्य अस्वल गुदगुल्या करीत असतां एकाद्यास ज्याप्रमाणें अनुभवतां येईल त्याच तोडीचें असणार' -के १.८.३.

**अस्वल वेत्रधारी**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३६५.

**अस्वाब**—पु. मार्ग. -मुधो. [ अर. सवाब अव. ]

**अहजार**—पु. उपस्थित लोक. [ अर. हजर अव. ]

**अहडणें**—अक्रि. पोंचणें; दाखल होणें. 'तुम्हास रोखा अडताच तुम्ही आपले तपियात गावाचा गाव ताकीद करून' -रा १५.२७६.

**अहंता**—स्त्री. ( महानु. ) १ तदात्मकता; व्यापकता. २ अभिमान. [ सं. ]

**अहद**—स्त्री. स्थान; ठाणें. -मुधो. [ अर. ]

**अह्द**—वि. एक. -मुधो [ अर. ]

**अहरार पक्ष**—पु. पंजाबमधील स्वातंत्र्यवादी पक्ष. [ अर. अहरार=श्रेष्ठ, स्वतंत्र. हूरचें अव. ]

**अहल**—पु. त्रास; उपसर्ग. 'नबाबानीं बहुत अहल सोसून यात्रा उत्तम प्रकारें आमची केली.' -पेद २.२. [अर.]

**अहल**—कुटुंब. -मुधो. [ अर. ]

**अहलेहादी**—पु. मुसलमानांतील अस्पृश्य. यांस मशिदींत व शाळांत मज्जाव असतो. याच्या उलट हमाफी. [ अर. ]

**अहल्या**—वि. निष्पाप; पवित्र. [ सं. ]

**अहंविशेष**—क्रिवि. अधिक चांगलें; अधिक बरें; जास्त चांगलें 'त्या संभाषणांत स्वतःचें प्रेम दुसऱ्यावर जडल्याची बतावणी यशस्वी रीतीनें करितां आली तर अहंविशेष' -श्रमसाफल्य २.२१. [ सं. अयंविशेषः ]

**अहशाम**—पु. प्यादे; शिपाई. -भाफ. [ अर. हशम= लोक अव. ]

**अहाड, अहाडु**—पु. स्थल; ठिकाण. 'आतां अहाड परियेसा मायापुर मळींद, महिकावती...नांदेड, वाराणसी एवं छत्तीस आहाड।' 'आतां हा प्रकारु अघवा। सोमवंशींचा अहाडु बरवा। तो श्रोते जनीं परिसावा। ऐक आतां॥' -कालिका ३१.७२.

**अहिवात**—न. अहेवपणा. -तुलरामा. [ सं. अविधवा ]

**अहुदह**—पु. स्थान; ठाणें; हुद्दा. -आफ. -मुधो. [अर.]

**अहुदहदार**-पु. हुद्देदार.

**अहुळी**—वि. ( व. ) अहेव; सौभाग्यवती; पतिवती. 'अहुळी नार मेली। घरीं शिंक्यावर दही। टाकून राजा बाई। जाते कशी दूर सई।' -वलो ८३. [ सं. अविधवा ]

**अहोपुरुषिका दाखविणें-करणें**—युद्धास आह्वान करणें. -राको ४८७.

**अळप, अळपणी**—स्त्री. रड; किरकिर; हाय; आयाय. अशक्त रोगग्रस्त वगैरे माणूस यांची एकसारखी ओरडण्याची क्रिया; रोगग्रस्त मांजर, कुत्रें वगैरेंची एकसारखें ओरडत राहण्याची क्रिया. [ सं. आलाप ]

**अळपणें**—अक्रि. किरकिर करणें; रडणें; ओरडणें; हाय-हाय करीत राहणें; लळा असलेल्या माणसाच्या भेटीसाठीं रडणें [ सं. आ+लप् ]

**अळमोजी**—पु. ( कों. ) गबाळया मनुष्य; गचाळ मनुष्य.

**अळमीं, अळिंबी**—न. अळबीं; भूईछत्र्या. [सं.आलिंब]

**अळसूद**—न. श्वासनलिकेंत कांहींतरी अडकल्यामुळें लागणारा ठसका.

**अळसूर**—पु. ( खान. ) अडसर. -ज्ञाप्र १७.२.३१.

**अळंक्षा**—वि. शून्य. [ सं. अलक्ष ]

**अळां**—न. ( कु. ) अळें पहा.

**अळाण्यावळाण्या**—स्त्री. समजुतीच्या गोष्टी. '...अशा अळाण्यावळण्या दाखवून त्या तिला समजावीत' -बहकलेली तरुणी १६. [ वळणें-वळाण्या द्वि. ]

**अळिंबें**—न. कुत्र्याची छत्री; भूछत्री. अळंबें पहा.

**अळीबळी**—पु. नागपूर प्रांतांत कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बली व त्याची पत्नी विंध्याबली यांचीं चित्रें काढून पूजा करतात. या शेणाच्या दोन उलट्यासुलट्या बाहुल्या अंगणांत करावयाच्या असतात. [ सं. बली द्वि. ]

**अळींव**—न. अहळींव पहा.

**अळुवार**—वि. हळुवार पहा. अरुवार पहा. १ नाजूक. २ हळव्या मनाचा.

**अळयाण**—न. ( कु. ) अळण; तांदुळाचें पीठ आमटींत घालतात तें. 'निस्त्याक अळयाण लाव.' [ म. आळणें ]

**अळयावळयाचों**—क्रिवि. (कु.) अळेंबळें; लटकेंच; मुद्दाम. 'मी अळयाबळयानी( चों ) तेचां नांव सांगलय' [बलेन द्वि.]

**अक्ष**—पु. आंस; कणा (गाडी, रथ, रहाट वगैरेचा ). [ सं.]

**अक्षण**—न. ( तंजा. ) औक्षण पहा.

**अक्षयसवाशीण, अक्षयसवाष्ण**—स्त्री. १ जिचा पति परागंदा होऊन गेल्यामुळें मुद्दापत्ता नाहीं असा बराच काळ गेला आहे, बहुधा येण्याचा संभव नाहीं अशी स्त्री. २ ( उप.ल.) वेश्या; कलावंतीण; नायकीण. [सं. अक्षय+सुवासिनी ]

**अक्षर वाङ्मय**—न. शाश्वत वाङ्मय. 'जें शाश्वत विकारांवर किंवा भावनांवर अधिष्ठित असतें व जें वाचीत असतां संवादी व विसंवादी तारांच्या अनुरणनाप्रमाणें मधुर सूर प्रेक्षकांच्या अंतःकरणांत उठवतें तें.' -महा. नोव्हें. १९३५.

**अक्षेपणी**—स्त्री. आक्षेप; क्षोभ; राग. 'कीं इथें पाइरउ जालां रुक्मिणी । कीं कुळदेवतेची अक्षेपणी । कीं दिठीची जाली झडपणी । अस्थर्नियें आंतु ।'-नरुस्व ४०१. [सं. आक्षेप ]

---

# आ

**आं**—तो, ती, तें. -आफ. [ अर. ]

**आइगलु**—न. लिंगायताची बाण ठेवण्याची डबी. [ का ]

**आइतखाऊ**—आइता, ऐता पहा.

**आइतोबा**—वि. आइतोजी पहा.

**आइन**—ऐन पहा. ॰**इशराकत**-भागीदारीच्या अटी; करार. ॰**दान**-कायदेबाज; कायदेपंडित; कायद्याच्या ज्ञानाचा फायदा घेऊन दुसऱ्यास फसविणारा. ॰**नतेन वतेन**-न. जमिनदारास इनामगांवच्या उत्पन्नांतून मिळणारी ठराविक विशेष बाब, रकम.

**आईत**—न. नाश; नासाडी; बिघाड; दुर्दशा; हैराणी. 'मुलकाचा आईत भारी जाला आहे' -रा १०.६१. [ सं. आपत्ति-आपत-आईत ? ]

**आईवर नाडा सोडणें**—( शिवी; शपथ ). मातृगमन करणें; मातेशीं व्यभिचार करणें; आईजवळ जाऊन विजारीचा नाडा सोडणें. 'बुगाजी नाइकानें आण घातली कीं मी आपले आईवर नाडा सोडीन तर आज येथें राहीन' -साब ३८.

**आईसासरा**—पु. ( तंजा. ) आजेसासरा. [ आई+सासरा ]

**आईसासू**—स्त्री. ( तंजा. ) आजेसासू. [ आई+सासू ]

**आउ**—स्त्री. ( महानु. ) माता; बाई; आई. 'आउ सर्वज्ञातें विनवा।' -उच. [ अव्वा ]

**आउर, आऊर**—नपु. पूर. और पहा. 'सुखाचें आऊर लोटलें' -ऋपूपु २.१२१.

**आउर्दन**—सक्रि. आणणें. -मुधो. [ फा. ]

**आउर्देह**—अ. आणून. -मुधो. [ फा. ]

**आउवा**—स्त्री. माता; आई; श्रेष्ठ स्त्री. 'सुकु म्हणे आइकैं परिक्षिता। रुक्मिणी आउवेचें रूप पांतां । व्यक्तीसी आली ॥' -नरुस्व ६८. [ अव्वा. म. आई, आउ ]

**आउसो**—न. जाड्या भाताची बिन वासाची एक जात. -चित्रकृषि २.६. [ ? ]

**आकट**—न. धान्यांतील खडा, माती, इत्यादी कचरा. [ ? ]

**आकटें**—न. ( हैद्रा. ) मुलांना निजविण्यासाठीं केलेला कपड्याचा झोळीसारखा पाळणा. [ ? ]

**आंकडिया**—वि. मराठ्यांच्या मुलुखगिरीच्या काळांत गायकवाडांत समाविष्ट झालेला संस्थानी ( गांव ). यास गायकवाडांस खंडणी द्यावी लागे. -सयाजी १.३४५. [ सं. अंकित ]

**आंकडी**—स्त्री. भाताची कोंवळी लोंब. ॰**वळणें**-भाताची लोंब दाणेदार झाली म्हणजे ती वजनानें खालीं लोंबते त्यास म्हणतात. [ आंकडा पहा ]

**आंकडी**—स्त्री. उभें राहून गवत गोळा करण्याकरितां पुढें आंकडा असलेली काठी. -चित्रकृषि २.

**आंकबंदी**—स्त्री. कुळानें खोतास, इजारदारास वगैरे द्यावयाचा सारा. [ सं. अंक+बन्ध ]

**आकरसणें**—अक्रि. १ शुष्क होणें; सुकणें ( गळा, जीभ ). २ अंगाला ओढ लागणें. ३ आर्द्रता नाहींशी होणें ( पान, फळ, जमीन वगैरे मधील ). ४ चरफडणें; रागावणें; रागानें ओरडणें; बोलणें; शापणें. [ सं. आ+कृप् ]

**आकह**—उअ. की. -आफ. [ अर. ]

**आकार**—पु. गोळाबेरीज; हिशोब; एकंदरी. [ सं. ]

**आकारी**—पु. गांवांत देवीची प्रथम स्थापना करणारा. -आदिमहा १४. [ आकार ]

**आकाशमंडळ**—न. आकाशांतील तारामंडळप्रमाणें दिसणारें दारुकाम; तारांगण. -पेशमहा ३६२. [ आकाश+मंडळ ]

**आकिफान**—वि. दक्ष; उत्साही; सज्जन. -मुधो. [ अर. ]

**आकिबात**—वि. अंदेशी; अन्तर्द्रष्टा; शेवटवर विचार करणारा. -मुधो. [ अर. ]

**आकृत, आक्रित**—वि. विलक्षण. -कविमि. [ अ+कृति; आकृत्य ? ]

**आंके**—अ. कडून. 'आंके सरकारीकडून बुजरुगापासून पंडित अजन बाजीराव' -थोमारो ६५.१६. [ अर. ]

**आक्रस्ताळेपणा**—पु. हटवादीपणा; त्रागा. 'यावरून हा आक्रस्ताळेपणा पैशाकरितां होता' -साम ६७. [ अक्रस्ताळा, अकनाळा पहा. ]

**आंख ओढणें**—१ खूण करणें. २ अनुमान करणें; भविष्य सांगणें. [ सं. अंकन ]

**आखंडल**—पु. इंद्र. 'आखंडल शरण आला । तोहि देखिला सकळिकीं ।' -ह नव २२५. [ सं. ]

**आंखणें**—अक्रि. १ ( विहीर, तळें, वगैरे खणण्याकरितां पाण्याची जागा ) ठरविणें, योजना करणें. २ तर्क करणें; अनुमान बांधणें; भविष्य सांगणें. ३ रेखाटणें; आकृति काढणें. [ सं. अंकन ]

**आखर, आंखर**—पु. आकर; दबाव; वजन; शह; सामर्थ्याची जाणीव. 'जरी येखादे स्थलीं या प्रांते स्वामीचा आंखर पडेल तरी बहुत कार्याची गोष्ट आहे' -पेद २४. ११४. 'आखर पडल्यावर सर्वही प्रांत स्वामीचा आज्ञांकित आहे' -पेद २४.११४. [ सं. आ+कृ ]

**आखरेख**—स्त्री. देखरेख; राखण; बंदोबस्त. **आखरेखणें**-अक्रि. बंदोबस्त करणें; आटोक्यांत ठेवणें, आणणें: आटोपणें ( गडगा, कुंपण, वगैरे घालून ). [ आखणें+रेखणें ]

**आखा**—पु. गोंधळ; फजिता. 'तिचा अगदीं आखा उडाला.' -वसंतसेना २४३. [ आखा=सर्व; पूर्ण; यावरून पुरा फज्जा ]

**आखाडा**—पु. १ पतिंगा; मोठें वल्हें. -किर्लो. जून १९३८. ९८१. २ अखाडा पहा.

**आखिर**—क्रिवि. शेवटचा. -आफ. [ अर. ]

**आखु**—पु. ( बे. ) कुत्रें. [ सं. आखु=मांजर. म. उंदीर ]

**आंखूडमांड्या**—वि. गणपतीचें पोट मोठें व मांड्या आंखूड आहेत त्यावरून त्यास पडलेलें नांव. 'गणेश बोले बहु आदरानें । उंदीर नेला बडे मांजरानें । आंखूडमांड्या मज चालवेना । विशाल दोंदो मज हालवेना ॥' -मंगलमूर्ति—स. के. फडकेकृत १४१.

**आखूर**—वि. ( खा. ) अधिक; अखोर.-ज्ञाप्र १७.२.३१. [ सं. अधिकतर ]

**आखोटा**—पु. अखोटा पहा.

**आख्यान लावणें**—१ कीर्तनांत एखादी कथा गाणें, सांगणें. २ ( ल. ) रडगाणें गाणें; लांबलचक कंटाळवाणी गोष्ट सांगणें. [ सं. आ+ख्या ]

**आगट**—पु. अगड पहा. चर; पाट; खोदलेला मार्ग. 'जुन्या आगटांतील गाळ वेळेवर न काढणें हें सध्यांच्या टंचाइचें एक प्रमुख कारण विशद केलें.' -ज्ञाप्र ८.४.४२.

**आंगठे धरणें**—अंगठा धरणें पहा.

**आगडबागड**—वि. कांहींतरी; आजूबाजूची वस्तु; थोडाफार लाभ; फायद्याची गोष्ट. 'सिवराम पंताचे कागदावरून कलो येईल की सिवरामपंत येथ आम्हापासी होते, त्यास ते राजश्री यादो रावजीचे संगतीस तरबियेत जालेत, त्यास आगडबागड पाहिजे. आम्हास तरी प्रमाण असलिया आमची शरम राहे' -पेद १५.३३. [ आगड द्वि. ]

**आंगती**—स्त्री. दंतकथा. -ज्योत्स्ना, सप्टें. १९३८.

**आगतें निगतें करणें**—जुनें नवें करणें; उदा., जुनीं झाडें काढून नवीं लावणें. 'सुपारीचें उत्पन्न आगतें निगतें करणें व खत देणें यावर अवलंबून असतें.' -ज्ञाको ११.१९७.

**आंगपतन**—न. नम्रता. 'दाऊनियां आंगपतन । पाषाण फोडील लोहघन ।' -ह नव २२१. [ सं. अंग+पतन ]

**आगपाणी एक करणें**—खवळणें; अतिशय संतापणें; रागानें चवताळणें; जोरानें बोलणें; आदळ आपट, शिवीगाळ, मारचोप, वगैरे धिंगाणा करणें.

**आगम-मु**—पु. प्रारंभ; जन्म; कुळ; वंश; उत्पत्ति. 'ऐसा राव लक्ष्मीचा पुसे जन्मु । मग वैशंपायन सांगे उत्तमु । तोचि श्रोतयातें मी आगमु । सांगतु असे ॥' -कालिका ४.२१. [ सं. ]

**आंगवण**—स्त्री. अंगवण पहा.

**आगवा-वो**—वि. पु. १ आगाऊ; लवकर होणारा; हळवा ( नाचणा, पीक इ. ). २ पुढारी; म्होरक्या; मुखर. [ सं. अग्र ]

**आगळा**—पु. ( कों. ) पेंढ्याचा मुडा. [ सं. अग्रल ]

**आगा**—पु. ( व. ) त्रास. **०काढणें**-त्रास सोसणें. 'आमच्या मुलाबाळांचा सारा आगा ती बाई काढते.' अगा घेणें पहा. [ अगा ]

**आगारी**—स्त्री. ( अहिराणी ) आहुती. 'श्राद्धपक्षाच्या दिवशीं स्वैंपाक झाल्यावर त्या चुलींतील अग्नीवरच अन्नाच्या आहुति देतात, याला आगारी म्हणतात.' -अहिराणी भाषा व संस्कृति ४२. [ सं. अग्नि; म. आग ]

**आगासुगा**—स्त्री. बातमी; शोध; सुगावा; थांग; पत्ता. [ आगा+सुगावा ]

**आगाह**—माहीत. -मुधो. [ अर. ]

**आगिनपासोडा-डी**—पु. एक मुलींचा खेळ. यांत पाळीपाळीनें मुली एका पासोडीखालीं लपतात व दुसऱ्या पक्षाच्या मुली त्यांस ओळखतात. -मखे २७३. इया [ म. अज्ञान+पार्श्व+पट ]

**आगीट**—स्त्री. आगटी; आग पहा.

**आंगेजणी-णें**—स्त्री. अंगेजणी पहा.

**आंगोऱ्या**—पु. अंगवस्त्र. -गुजा ११४. [ सं. अंग+वस्त्र ]

**आगोश**—न. आलिंगन. -आफ. [ फा. अर. ]

**आगोशी**—क्रिवि पाऊस पडण्यापूर्वी सुमारें एक महिना; उन्हाळ्या अखेर; आगोटीस. [ स. अग्र+वृष्टि ]

**आग्या बोंड**—स्त्रीन. खाजकुयली; खाज उत्पन्न करणारी वनस्पति. [ सं. अग्नि+म. बोंड ]

**आग्राळीं**—क्रिवि. अग्रावर; शेंड्यावर; अखेरीस; शेवटीं. 'एक खार आंब्याच्या आग्राळीं गेली. '-पाणकळा.[ सं. अग्र ]

**आघात्य**—न. (तंजा.) हेकेखोरपणा; हट्ट; दुराग्रह. [ सं आ+घात ]

**आघारणें**—अक्रि. आघार पहा. आघार होम नांवाच्या तुपाच्या आहुति स्थंडिलाच्या एका कोनापासून विरुद्ध कोनापर्यंत द्यावयाच्या असतात त्या देणें. 'ज्वलनाज्य आघारून। होमप्रधानमंत्रोक्त ॥' -भारा बाल १३.५३. [ सं. आ+घार ]

**आघोळी-घंगाळी गायन**—न. गाण्याचें अर्धवट शिक्षण घेतलेलें असतांना केलेलें गायन. [ अंघोळ+घंगाळ+गायन ]

**आचकण**—स्त्री. अचकन पहा. अंगरखा. 'राजेसाहेबांनीं एक ढिली विजार व आचकण असा अगदीं साधा पोषाक केला होता.' -किर्लो दिवाळी २४७.

**आंचद**—अ. जें कांहीं. [ अर. ]

**आचूकविचूक**—वि.क्रिवि. अचूकविचूक पहा.

**आजनुब**—वि. दक्षिणेकडील. -राव्य ९.२८. [ अर. जनुब=दक्षिण दिशा ]

**आजी**—स्त्री. प्रतिष्ठा; आब; अब्रू; इज्जत. 'तेव्हां राजे म्हणाले कीं, पेशवियानी व चिटनिसानी माझी आजी फोडली आणि मला धरावयासी जपतात' -पेद ६.५९.

**आजी**—वि. सांप्रतचा; सध्यांचा; हयात. 'आजी पुढाऱ्यांत एकहि धोरणी नाहीं.' -भाला. [ सं. अद्य-आज ]

**आजी**—क्रिवि. आजपर्यंत; अद्यापि; आजपावेतों. ( क्रि० करणें ) 'अन्यथा आजी करणें अंजनवेलीचा मनसबा विलेस लावून जंजिरे याचा पक्ष तोडला जाता' -पेद ३.६७. [ सं. अद्य ]

**आजीबाई-आजीबाई**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे २५९.

**आंजुम्लह**—वि. हें सर्व; वट्ट; एकूण. -आफ. [ अर. आं+जुम्लह=एकूण ]

**आजोश**—पु. (चि. कु.) आजोबा.

**आझाद**—वि. स्वतंत्र; मोकळा; एकाकी. [फा. आझाद ]

**आझादी**—स्त्री. स्वातंत्र्य; स्वतंत्रता; मोकळीक. 'राजकारणाचा देशाच्या आझादीचा प्रचंड व्यवसाय आपल्या तरुणांच्यां मनें खात होता.' -किर्लो नोव्हें. १९३९. [ फा. आझाद ]

**आटंक**—वि. भयंकर; मोठें. 'प्रधानादिक सभानायक। तिहीं घोर घातला धाक । रावणा लागली धुकधुक । आरिष्ट आटंक देखोनी।' -भारा बाल ७.१०. [ ? ]

**आटकमाटक**—न. एक मुलींचा खेळ. या मध्यें सर्वांचे हात पालथे ठेवून 'आटकमाटक चन्ने चाटक' असें गाणें म्हणतात व आळीपाळीनें प्रत्येक हातावर ओळीनें बुकी मारतात. शेवटचा शब्द ज्या हातावर येईल तो उजवला. -मखे ३२१.

**आटमाटक चंपा**—पु. वरीलप्रमाणेंच एक मुलांचा खेळ. -मखे ९५.

**आटणी, आटणूक**—स्त्री. छळ; जाच; जाचणूक; हाल अपेष्टा; कोंडमारा. [ आटणें ]

**आटफाटो-फांदो**—पु. (कु.) अडथळा; अडचण; हरकत; विघ्न; संकट. [ आड+फंद ]

**आटवली**—स्त्री. (महानु.) सांकड गुंफा; एक खणाची खोली. -तीर्थमा.

**आटाला**—पु. माचवा; एक झाड; क्षौम; अट्ट. -अमर. [ सं. ]

**आटासाटा**—पु. साटेंलोटें. 'ब्राह्मण जातीनें आटासाटा न करावा' -पेम ४०२. [ साटा द्वि. ]

**आटू**—पु. (महानु.) प्रतिशब्द; पडसाद. 'त्रिभुवना आटु भवंडिला' -संत राजी ऱ्हस्व १३.

**आटूळ**—स्त्री. अठळी पहा. १ फणसाच्या गऱ्यांतील बी. २ (ल.) लहान मुलाची आंडकुली.

**आठ**—पु. आटापिटा; पीडा; उपद्रव. 'या तर्फेचे मुलकांत वरातदार पाठवून रयतेचा आट करूं लागले' -पेद ३.५५. [ आटणें ]

**आठ कंठवाद्यें**—न.अव. पांवा, अलगूज, शिंग, कर्णा, शंख, शीळ, चंग व मुरली. -मुव्यको.

**आठलिखा**—स्त्री. माप=एक ऊ -मसाप ४.४.२६७.

**आठवडेकरी**—पु. आठवडकरी पहा. १ दर आठवड्यास येणारा-न्हावी, परीट, वारकरी, भिक्षेकरी, इ. २ दर आठवड्यास ज्वर येणारा मनुष्य; वरचेवर आजारी पडणारा मनुष्य.

**आठवणी**—स्त्री.अव. वर्ण्य मनुष्याशीं संबद्ध व स्मृतींत ठेवण्यासारखे प्रसंग; प्रसंगानुरोधानें वर्ण्य मनुष्याच्या तोंडून निघालेले उद्गार, विचार, इ. [आठवण पहा]

**आठाण**—न. एक वस्त्राचा प्रकार. 'आठाणे सुमार वीस व पागोटी दोन येकूण बावीस सनगे पावलियाचें उत्तर पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे.' -पेद २७.२०. [अर्ध+ठाण]

**आठुरणा**—पु. एक कांटेरी फळझाड.

**आठुवा**—पु. भुज; बाहु. 'समट संध्या रागाचें आंग। आठुवाचें जोडें हिरेलग। सर्वांगीं सैंभ श्लोकांचें बानलग। देवाचिये मुद्रे आंतुल॥' -नरुस्व १६५.

**आड**—न. पीच नांवाचें फळ.

**आड**—स्त्री. आडकाठी; अडचण; प्रतिबंध. 'मोठी आड त्याच ठिकाणीं पडली होती' -पेद २७.१०७. 'येक दोन आडी मशारनिलेनी मातबर घातल्या आहेत' -पेद ३५.६८. [आडणें]

**आड**—स्त्री. वरकस जमीन; डोंगराच्या उतारावरील गवताळ जमीन.

**आडखिळा-खुळा-मेळा**—पु. १ (ल.) प्रतिबंध; प्रतिबंधक गोष्ट, वस्तु (उदा अनिष्ट शिक; मांजर आडवें येणें; कामांत खो घालणें). २ विघ्न; अडचण (येणें, आणणें). [आड]

**आडगुण**—पु. अवगुण; दुर्वर्तन (धरणें; धेणें).

**आडताळणें**—अक्रि. अडथळा करणें; प्रतिबंध करणें; उपद्रव देणें; आड येणें. 'कसब्याची जमीन आडताळून पाडिली आहे' -पेद २०.१४१. [अढथळा]

**आडपेठ**—स्त्री. लहान शहर. -आडिमहा ९. [आड+पेठ]

**आडबाई आड**—एक मुलींचा खेळ. -मखे २८५.

**आडमुशी**—स्त्री. ओकारी; हगओकीची बाधा. [मोडशी ?]

**आडमुसणें**—अक्रि. ठेंचकळून पडणें; लचकून पडणें; घाबरणें.

**आडविहीर करून घेणें**—जीव देणें; आडांत किंवा विहिरींत स्वतःला लोटून देणें. 'असा भ्रष्टाकार करणाऱ्या लोकांत शामभट्टाचा जन्म झाला असता तर त्यानें आपल्याला आडविहीर करून घेतलें असतें.' -शामब.

**आडका**—पु. अडका पहा.

**आडकित्ता**—पु. १ अडकित्ता पहा. -राव्य ३.१७. २ एक मुलींचा खेळ. -मखे ३४०.

**आडंगी**—क्रिवि. आड; मागें; आडोशास. 'असा आडंगीं कां लपतोस सामने ये!' [आड+अंग]

**आडची तेरा**—क्रिवि. दर शेंकडा अडीच टक्के दरमहाप्रमाणें एक वर्षास तेरा महिन्यांचें व्याज आकारण्याचा करार. 'मुकाम औरंगाबाद कर्ज ३००० गुजारत भुचंडमल सावकार औरंगाबाद व्याज आडची तेराप्रमाणें' -बाबारो २.१६५. २६०. [अडीच+तेरा]

**आडतीड**—स्त्री. अडचण; नड; गुंता. 'मध्यंतरीची आडतीड निभावण्यासाठीं मृतात्म्यास अडथळा करणाऱ्या देवचारास कोंबडानारळ बळी देतात.' -ब्राह्मण मासिक १.५.७. [अडणें+तिडणें]

**आडधाया**—स्त्री. अडचण; नड; वाण. 'वरकड लोकांनीं हरयेक गोष्टीची आडधाये नसे' -पेद १६.४३. [आड+धा]

**आडबंद धोतर**—न. पुढें गांठ मारून नेसलेलें धोतर. [आड+बंद+धोतर]

**आडमुद्दे**—पु.अव. अटी; बांध्याच्या गोष्टी; ठरावयाच्या गोष्टी. 'तेव्हां राज्यानें आडमुद्दे घातले कीं ग्वालेर प्रांतीच्या' -समारो १६. [आड+मुद्दा]

**आडवण**—न. आडवा धागा. -ज्ञाप्र ९.१.३१. अडवण पहा.

**आडवळघूम पडवळघूम**—अडवळ पहा. एक मुलींचा खेळ. -मखे २३३.

**आडवळा**—पु. आडवा पहा. खांबाला आडवें गुंडाळतात तें वस्त्र. 'धैर्याचा स्तम्भनिर्धारीं। धर्माचे आडवळे तयावरी।' -भारा. बाल १५.२२. 'रामविवाह मंडप स्तंभ। चारी वेद झाले स्वयंभ। आडवळे धैर्याचे सलंब। वांसे निकोंभ विवेकाचे॥' -भारा बाल २३.२६. २ आडवट; आडवा वांसा; आडवादांडा. 'कन्या मंडपीं स्तम्भभावाचे। आडवळे शुद्ध सत्त्वाचे।' -भारा. बाल २३.११.

**आडवा**—पु. अडसर; अर्गला. [सं.]

**आडवाटा धर्म**—पु. काम्यकर्में करून घेऊन मजुरी न देणें; काम करून घेऊन आडमार्गानें जाणें; आड वाटेंत शिरणें; (ल.) तक्रार करणें. अव्हाटा पहा. [आड+वाटा+धर्म]

**आडस**—स्त्री. १ अडचण; अट; मर्यादा; मध्यंतरीं असलेली प्रतिबंधक गोष्ट, परिस्थिति, नियम, इ. २ (ल.) शिष्टाचार; उपचार. 'ज्या श्रीमंतांच्या लोकांनीं पातशहाची तगीरी बहाली केली आहे, त्यांच्या पत्रास इतकी आडस नाहीं. यांस कोण पुसतो' -देवी श्रीअहिल्याबाई २९४. ३ (व.) अडचण; मध्यस्त. 'रुसले भरतारा। समजावे नानारीती। घरांत नाहीं कोणी। आडस गणपती॥' -वलो ९०. [आड+स]

**आडसाली ऊंस**—पु. आडसाल्या पहा.

**आडसुडी**—पु. मदतनीस; साहाय्यक. 'आडसुड्या नसल्यानें थोडावेळ देखील फावत नाहीं.' अडसुडी पहा.

**आडहत्यारी**—पु. मिळेल तें हत्यार घेऊन सैन्यांत दाखल होणारे; आढाऊ. 'भालेकरी व आडहत्यारी' -थोमारो ३१९ २५. -पेद ५२०. [आड+हत्यार]

**आडळी**—स्त्री. लहान विळी.

**आडाडी**—स्त्री. आडाअडी पहा. 'सनकादिकांची आडाडी' -भारा बाल ५.७९.

**आडीगुडी**—स्त्री. (व.) अटी; कपट; कृत्रिमपणा. 'भाऊजी लक्ष्मना। काय पोटीं आडीगुडी। माहेरची वाटबाहू। पुसतां कां घडोघडी॥' -वलो १०. [आडी+गुडी]

**आडेकरी**—पु. तुलावाह. -राव्य ३.५.

**आडेपाठण**—न. नावेचा कणा. -आघइ ३७९.

**आढकपणा**—पु. हट्ट; ओढून धरणें; ओढाताण; अडवणूक. 'नबाब आढकपणा करतात हा स्वभाव आहे' -रा ५.१९०. [अडणें]

**आढाव**—पु. आढाऊ पहा. आडहत्यारी. 'लोक आढाव व बरकंदाज चांगले कसबी पाहून' -थोमारो २.३४६.१७.

**आण**—स्त्री. नजर; दृष्टि. 'मराठ्यांची आण दिल्लीवर फिरली' -हि प्र ११.१५२.

**आणा**—पु. १. १६४ मण वजन. 'माझ्या मित्राचा पडाव आठ आणे वजन उठविणारा असून तो राजिवड्याच्या खाडींत काम करीत होता...' -किर्लो १९३७. १४७.२. २. शंभर मण किंवा फराभर मीठ (मिठागरांत).

**आंत होणें**—अक्रि. अंकित होणें; मांडलिक बनणें. 'मोठेमोठे राजे ज्याचे आंत होऊन ज्यांस थरथरा कांपत होते तोच दैवानें एक झोला देतांच अफाट समुद्रांत जाऊन पडला' -नि ६४. [सं. अंतर]

**आतंक**—न. (कडप्पा मराठी) उत्सुकता; हौस. 'मला मराठी शिकण्याचें आतंक वाटतें' [आर्तिक्य ?]

**आतपणें**—अक्रि. तळपणें; चकाकणें; प्रकाशणें. 'नाट्याकाशांत सतत चाळीस वर्षें आतपत राहून आपल्या दिव्य कांतीनें जनतेचे मनःचक्षु दिपवून टाकणारा... आणि आपल्या केवळ दर्शनानें तिचें हृदय आनंदानें उचंबळतसे होणाऱ्या नट सूर्याचा उदय पुण्यास झाला तो अखेर मुंबईस त्याचा अस्त झाला.' -गणपतराव अंक ३ पृष्ठ ८०.

**आंतसवाई**—स्त्री. नुकसान; तोटा. मूळवस्तूची सवापट होऊन वाढ होण्याच्या ऐवजीं उलटा प्रकार. 'त्याचा नेहमी आंतसवाईचा धंदा' -खस्व १६५. [आंत+सवाई]

**आंता**—पु. (कों.) शेताची कड, मर्यादा, बांध. [सं. अंत]

**आतिफळ**—स्त्री. कृपा; प्रसाद. -आफ. मुधो. [अर.]

**आतिय्यान**—बक्षिसें. -मुधो. [अर. अतिय्यह अव. पहा]

**आतिशय**—न. अत्याचार; दांडगाई. 'हेंहि सर्वांनी आईकोन आतिशये करो लागले आहेत. -पेद २.१४. [सं. अतिशय पहा.]

**आतिस**—पु. आग आतश पहा. -ज्ञाप्र १७.२.३१. [फा.]

**आतुडणें**—अक्रि. (महानु.) सांपडणें; प्राप्त होणें. 'चाव्हनाचे पाये। मज आतुडती।' -अभंग.

**आतेबहिण-भाऊ**—स्त्री. पु. (तंजा.) तंजावरांत मातुलकन्या परिणय होतो म्हणून यांना मेहुणी, मेहुणा म्हणतात.

**आत्मखंडन**—न. स्वतःच आपल्या विरुद्ध बोलणें; प्रथमार्थाचें दुसऱ्या अर्थानें खंडन करणें; प्रथम एक विधान करून लागलीच त्याच्या विरुद्ध बोलणें. [सं.]

**आत्मत्व**—न. (महानु.) ममता; ममत्व (विचार). [सं.]

**आत्मनिरीक्षण**—न. स्वतःच्या वर्तनाची, गुणदोषांची चिकित्सा, सूक्ष्मपरीक्षा [सं.]

**आत्मप्रसाधन**—न. स्वतःचा मोठेपणा मिरविणें; स्वतःस भूषविणें. 'श्रीमंती व राज्याधिकार यामुळें मनुष्याचें आत्मप्रसाधन होण्याला कितीतरी पट अधिक साहाय मिळेल यांत काय संशय आहे.' -के ८.१२.३६. [सं.]

**आत्मानुभव**—पु. आत्मप्रतीति; योगप्राप्तसमाधि; प्रतिष्ठितप्रज्ञता; जीवन्मुक्ति. -गुजगो ९४६. [सं.]

**आत्मिक**—पु. विश्वासु मनुष्य; आपल्या पक्षाचा, आपला हितचिंतक मनुष्य. 'खबर द्यावयासी कारण जे आमचा आत्मिक राजपुरीस आहे त्यांहीं सांगोन पाठविलें. -पेद ३३.३३६. [सं.]

**आत्यंतिक**—वि. अखेरचें; शेवटचें; हीन दर्जाचें; सर्वांत खालच्या पायरीचें; निकृष्ट. 'किर्लोस्करी वाङ्मय आत्यंतिक असतें.' [ सं. अति+अंत ]

**आथापि**—उअ. तथापि; अद्यापि पहा. 'आथापि मुला-माजी मुली.' -नागेशलीलामृत.

**आद**—क्रिवि. आद्य; आधी. 'श्रोताची स्वभावता आद। ऐको येतो कवणही नाद । परि तयाचा अर्थ भेद । नाहींच तया ॥' -सिसं ३. [ सं. अ+द ]

**आदक**—पु. धाक; भीति. 'जैसी क्षैतिजे चंद्रकला। वरि राहोचा आदकु आगळा। कां लोणारी धार लोपे उन्हाळा। तेणेचि धाके मातंगा ॥' -नरुस्व ४६४. [ आ+धाक ]

**आदकव-काव, आदकावो**—वि. (कु.) अधिक; गरजेपेक्षां जास्त; शिलक राहिलेलें. [ सं. अधिक ]

**आदकुर-कर**—न. अर्ध; अर्धुक; अर्धाभाग. [ सं.अर्ध ]

**आदबअटि**—स्त्री. (मल्लखांब.) १ छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवणें. २ मल्लखांबाला हात ठेऊन मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.५५. [ अदब+अट ]

**आदमखोर**—पु. नरभक्षक; मनुष्यभक्षक. 'वाघाला एकदा मनुष्याच्या रक्तामांसाची चट लागली म्हणजे त्याला जनावरांच्या मांसरक्तानें समाधान होत नाहीं. मनुष्यच खावयाला मिळालें पाहिजे अशी त्याची धडपड चालू असते. अशा वाघाला आदमखोरा असें म्हणतात. ही आदमखोर वृत्ति नानांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली होती.' -खून कीं आत्महत्त्या ८३१. [ फा. आदमी=मनुष्य+खोर=खाणारा ]

**आदमोईन**—वि. नेमणुकी. '२० कापड आदमोईन' -बाबारो २.९३. [ अर. ]

**आदर**—पु. १ अगत्य. २ आवश्यक गोष्ट, वेळ, प्रसंग. 'ऐसास राजश्री मानाजी आंगरे याचेंहि पत्र आम्हांस आलें यावरून इलाज करावयास आदर जाहाले.' -पेद ३४.३२. [ सं ]

**आदरून**—क्रि.वि. अगत्यानें. 'आगपत्राबरोबर त्या पत्रादि साधनांचें विभक्तीकरण व एकीकरण पाहिजे असें द. वि. आपटे आदरून सांगतात.' -आघइ ५. [ आदर ]

**आदसून**—क्रिवि. हटकून. 'मला जें मनापासून नको तें तुम्हाला आदसून हवें!' [ आदर-आदरून ]

**आदा**—पु. अदा पहा. नखरा; डोळे मोडणें. 'गायिका त्याला आदाची जोड देतात.' -मनो मार्च १९३९.

**आदाण**—न. (कु.) आधण पहा.

**आदामसाला**—पु. भत्ता; प्रोसेस फी. 'आदा मसाला पडला तो देऊन सुटून आलों' -पेम ४८०. [ अर. आदा+मसाला ]

**आदावर्त**—न. नमस्कार; सलाम. 'त्या गाणारणीनें गज्जल संपविला आणि आदावर्त करून ती बाजूला झाली.' जोत्स्ना. आग १९३८. १५९. [ फा. आदाब अर्ज ? ]

**आदिभैरव**—पु. (महानु.) माया पराशक्ति चैतन्य.

**आदावल**—स्त्री. दोष; आळ; दोषारोप. 'सटाबटा करून आपला उलगडा करून आदावळ आम्हावरी घालून गेले.' -पेद ३.१०२. [ फा. अदावत पहा. अर. आदा; आदी-दुष्ट ]

**आदिलति**—स्त्री. दुर्लक्षण. -राव्य ८.९३.

**आदिवासी**—पु. मूळचा रहिवासी; भूम्या; प्राथमिक अवस्थेंतील लोक. 'ठाणें जिल्ह्यांतील मूळचे रहिवासी जे कातकरी त्यांस आदिवासी म्हणतात.' -सकाळ १५.३.४१.

**आदीद**—पेषण. -राव्य ९.३४.

**आध(धे)ला, आद(ध)ला**—पु. अधेला; निर्विष सर्प जातीय प्राणी. [ अधेला ]

**आधवडी**—अधोडी पहा. पशुचर्म. -राव्य ५.२७.

**आंधळा-तिरळा**—पु. एक विलायती खेळ. आंधळी कोशिंबीर. 'जेवल्यानंतर कारेलैनदान हिच्यासी आंधळे तिरळे खेळलों.' -राणीचें पुस्तक ८१. [ अंधळा+तिरळा ]

**आंधळा पहारेकरी**—पु. एक स्काउट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३१७.

**आंधी**—स्त्री. वावटळ; तुफान. अंधी पहा. [ सं. अंध ]

**आंधळे घोडे**—पु. एक स्काउट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३१७.

**आंधळें वासरूं**—न. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.१६३. आंधळी वासरें. असा प्रयोग.

**आधोले**—न. अधेला. एक साप. सं. मालुधान. -अमर ५१.

**आन**—सर्व. तो. -मुधो. [ अर ]

**आनमान**—क्रिवि. अनिश्चितपणें; संशयित; कुंठित. 'इंग्रज बहादर याचा बाजीरावसाहेब याची फौजेची नोकानोकी होऊन आपले जागी आनमान राहिले' -पेद ४१.१९६.

**आनह**—पु. आणे. -मुधो. [ अर. ]

**आनिकी**—स्त्री. द्वैत; भ्रम; भ्रांति. [ अनेक ]

**आनेग**—वि. अनेग पहा. अनेक. 'नानापरींचीं तीर्थे आनगें । दृष्टीस पाहे मनोवेगें ॥' -संतलीला २४५. [ सं. अनेक ]

**आनोजणें**—अक्रि. गांगरणें; बुचकळयांत पडणें. 'ऐसे बोलतां बोलतां कवीश्वर वास नावेक आनोजले' -वृद्धाचार २६. [ सं. अ+ज्ञान=अजाण ]

**आपअवसान**—न. आश्रय; स्थान; थारा. ' आपल्यास आपआवसान कोठें कांहीं लागेना ' -सनदापत्रें ७१. [ आप+अवसान ]

**आपखुद**—वि. स्वतंत्र; दुसऱ्याबर कोणत्याहि प्रकारें अवलंबून नसलेला. ' ते गृहस्थ आपखुद स्वतंत्र आहेत ' -पेद ४३.६३. [ आप+खुद ]

**आपच्छंद**—पु. स्वैराचार; स्वैरवर्तन. **आपच्छंदी**-वि. स्वैर; स्वच्छंदी; नादी. मनास येईल तसें वर्तन करणारा.

**आपडी थापडी**—एक मुलींचा खेळ. हा एकमेकींच्या हातावर थापटया मारून खेळतात व मुली परस्परांचे कान धरतात. -मखे ३२३.

**आपबळ**—न. स्वत:ची शक्ति; स्वसामर्थ्य; आपलें स्वतःचें बळ. [ आप+बळ ]

**आपमुटें**—वि. पूर्ण न बनलेलें; अर्धकच्चें. 'जैसे दूध होय अधमुरी। तैसे संपुष्टाचा उदरीं। मोतियें हाति आपमुटीं। साती दिसा।' -नरुस्व ५५५. [ आप+मुरणें ]

**आपाड**—पु. आधिक्य; मोठेपणा; महत्त्व. पाड पहा.

**आपान**—पु. मोक्ष.

**आपूरित**—वि. पूर्ण. ' तुझेनि यशें मही। आपूरित सुरां दिली।' -गस्तो ६५.७. [ सं. आ+पूर ]

**आपूर्ण**—वि. ( महानु. ) परिपूर्ण; भरलेलें. ' गमत जें आपूर्ण सर्वें रजे।' -गस्तो ९८. [ सं. ]

**आपृक्त**—वि. अविकृत; उपसर्गविरहित. ' या धातूंचें बीजपृथक्करण करून आपृक्त धातु म्हणून ठरविले व त्या त्या आपृक्त धातूचे अथवा बीजाचे अर्थहि त्यानें दिले.' -मसाप ६२.३. [ सं. ]

**आप्तमान्य**—वि. शिष्टसंमत; समाजांतील श्रेष्ठव्यक्तींनीं मान्य केलेलें. [ स. आप्त+मान्य ]

**आप्पा धोप्पा**—पु. एक मुलींचा खेळ. ' हा हातांवर व पायांवर टाळ्या मारून अंगणांत खेळतात. ' -मखे २७८.

**आप्लैच करून**—क्रिवि. अहमहमिकेनें; ईर्षेनें. ' परंतु लगटामुळे आप्लैच करून जालेस उत्तम नाहींतर शेंपन्नास माणूस जायां होईल ऐसा अर्थ आहे. ' -पेद १६.४६. [आपला]

**आफडे का नाफडे**—एक मुलींचा खेळ. -मखे ३४१.

**आफियत**—स्त्री. खुशाली. -मुधो. [ अर. ]

**आफीर**—वि. नामूष; बेजबाबदार; हांवभरी. ' आपले राज्यांतील माणूस आफीर होऊन परराज्यांत चाकरीस जाऊं देऊं नये. ' -शिदि १५६.. ' संभाजी राजे आफीर होऊन बदफैली वागतात. ' -शिदि २६८. [ ? ]

**आफेत**—स्त्री, आफत; संकट. ' याजमुळे आफेत पडली आहे ' -बाबारो ३.२१७. [ अर. आफत ]

**आफ्ताफिरती**—स्त्री. आपत्ति; आपदा; अनावृष्टि; नापीक. ' आफ्ताफिरती झाली ' -बाबारो २.२४१. [ अर. ]

**आफ्त**—स्त्री अनावृष्टि. -राव्य ८.५९. [अर.आफत्]

**आफ्रीन**—पु. उत्पन्न करणारा. -मुधो. [ अर. ]

**आबकदुबक**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे २६.

**आबका**—पु. अपका पहा. जोरानें मारलेलें पाणी; छिडकाव. ' पाण्याचा आबका ' [ आप=पाणी ]

**आंबट कण्या**—स्त्री. आंबील; तांदुळाच्या अथवा गव्हाच्या कण्या शिजवून ताक घालून केलेली कांजी.

**आंबड**—वि. ( कर. ) द्वाड; खाष्ट; आडदांड. ' आंबड पोरीच्या पुढें काय करावयाचें ? ' [ अ+बंड ]

**आबंड**—आभंड पहा.

**आबरणें, आबराबणें**—अक्रि. पुवळणें; पुवानें भरणें ( खरूज, गळू, जखम, इ. ); पू होणें.

**आंबवा**—पु. मिठाचें पाणी किंवा ताक शिंपून दाबून एक दीड दिवस ठेवलेला गुरांस घालावयाचा पाला ' -के ६. ११.३६. [ आंबवणें ]

**आंबवी**—वि. आंब्याच्या रंगाचें. ' तिवट आंबवी ' -समारो ४.१२०. [ सं. आम्र ]

**आबा**—पु. बाप. -मुधो. [ अर. अबुचें अब ]

**आंबा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे ६२५.

**आंब्याच्या बनीं चलग सई**—एक मुलींचा खेळ. -मखे २८८.

**आंबाडो**—पु. (गो.) १ एक आंबट फळ व त्याचें झाड. २ आंबा. ३ बायकांचा बुचडा. [ सं. आम्र ]

**आबादाणी, आबादाबी, आब्बादब्बा**—स्त्री. चिंध्यांच्या चेंडूनें खेळतात तो परस्परांस मारण्याचा खेळ. -मखे ५९.

**आबिल खेळूं कां तबिल खेळूं**—एक मुलींचा खेळ. -मखे २३५.

**आबी**—वि. कालव्याच्या पाण्यावरील ( शेती ). २ पाणथळ. -आफ. [ आब=पाणी ]

**आंबुट**—न. आबुट पहा. अभ्र. ' देखुनी स्वातीचीं आंबुटें। उल्हासती शुक्ति संपुटें।' -कालिका १५.२. [ सं. अभ्र ]

**आबुला का डाबुला**—पु.एक मुलांचा खेळ.-मखे ९९.

**आबुली**—स्त्री. ( महानु. ) स्त्री; बायको; पत्नी. ' तयाची आबुली लेंकरूवें जळत असति ' -आचार महाभाष्य १८३. अंबुली पहा.

**आंबुवा**—वि. आंबुव्या रंगाचा. आंबवी पहा. ‘ शेले आंबुवे ’ -समारो ४.१०६. [ सं. आम्र ]

**आंबेवर्णी**—वि. आंब्याच्या वर्णाचे; गोरे पान नव्हे; गोधूमवर्णी; ( ल. ) दहाजणींसारखे. ‘ कोठें पुरुषपार्टी चांगले तर स्त्रीपार्टी नाटकांत रंगले तरी आंबेवर्णी ’ -खेस्व १२८. [ सं. आम्रवर्ण ]

**आंबोडी-दांबोडी**—एक मुलींचा खेळ. -मखे ३१७.

**आंबोडा**—पु. ( तंजा. ) दह्यांत अथवा चिंचेच्या सारांत भिजविलेला वडा. [ सं. अम्ल+बटक. आंबणें+वडा ]

**आबोली**—स्त्री. कोरांटीच्या जातीचें शेंदरी फुलांचें एक झाड; सहा; कुमारी; तरणि. -अमर. [ सं. ]

**आब्दारखाना**—पु. जलस्थान. -राव्य ३.३. [ अर. ]

**आम**—न. पिकलेल्या फणसाचे गरे आठिळा काढून साठें घालण्याकरितां तयार केलेला रस. [ सं. अम्ल ]

**आमची लिमची**—एक मुलांचा खेळ. -मखे ९४.

**आमडणें**—सक्रि. हांकणें; घालवणें; हांकून देणें.

**आमदरफ्ती**—स्त्री. आम्द्रफ्ती पहा. येजा; रहदारी; चालूवहिवाट.

**आमदह**—वि. आलेला; येऊन बसलेला. -आफ. मुधो. [ अर. आमदन=येणें ]

**आमदाम**—एक मुलींचा खेळ. -मखे ३१९.

**आमदार**—पु. (कनिष्ठ ) कायदे मंडळाचा सभासद. ‘सरकारी आमदारांनीं देशाच्या हिताकडे लक्ष द्यावें.’ [ अर. आम=सर्व+दार ]

**आमन**—पु. मद. -राव्य ३.१२.

**आमरफ्ती**—स्त्री. अमदरफ्ती पहा. व्यापार; येजा; रहदारी. ‘ स्वामीनें त्यास आमरफ्ती करणें म्हणून लिहिले. आहे. ’ -शारो १.२०९. [ अर. आमदरफ्ती ]

**आमलाफैला**—पु. अमलाफैला पहा. अमल; अधिकार, ताबा, वगैरे, ‘ खैरखानाही आमलाफैला आमदरफ्ती रुजू करून आपले घरीं बैसलेत ’ -पेद २५.११३. [ अर. अमल+फैल ]

**आमाण**—उद्गा. सुरक्षित आहे; विश्वास आहे; रक्षण आहे. ‘ हें वर्तमान इंग्रजांस कळलियावरी आम्हांकडील कमावीसदारांस म्हणों लागले कीं, तुम्ही आमाण बोलून महाल सोडवून घेतले याचें कारण काय ?’ -रा १०.२३२. [ अर. अमान=सुरक्षितता, संरक्षण, दया ]

**आमानत**—क्रिवि. दूर; बरतर्फ; स्थगित. ‘ उगयाच तुफानी गोष्टी सांगून आम्हास कामावरून आमानत केले आहे ’ -पेद ४१.२७३. [ अर. अमानत ]

**आमाल**—पु. अमल; कामें. -मुधो. [ अर. अमल अव ]

**आमिरह**—स्त्री. अमीरी पहा.

**आमिलान**—पु. आमिल अव.

**आमिळ**—पु. अमल करणारा. ‘ आमिळांस आज्ञा केली ’ -बाबारो १.२०५. [ अर. ]

**आमीन**—वि. विश्वासु; प्रामाणिक. ‘ राजनीतीस कधीं शाश्वत असावी. आमीन असावे ’ -पेद २६.१४. [ अर. ]

**आमेरीर**—पु. बंदुका वगैरे हत्यारें नीट करणारा. [ इं. आर्मर=हत्यार ]

**आमेहरबान**—पु. सरकार. [ अर. ]

**आमोद-प्रमोद**—पु. प्रेमालाप; गुजगोष्टी; प्रेमकथा. ‘ती बाळंत होऊन आजारी पडण्यापूर्वी त्याला तिच्याशीं आमोदप्रमोद केल्याशिवाय एक दिवस देखील चैन पडलें नाहीं. ’ -वादविवाद.

**आमोरासमोर**—क्रिवि. समोरासमोर. -उसनानवरा [ समोर द्वि. ]

**आम्दन**—अक्रि. ( आम्दनबद्दल चुकीनें ) येणें. -आफ. [ अर. ]

**आम्नाय**—पु. १ वेद. ‘ चुंबुनि म्हणे शंभु बा तुजसम आम्नाय बोलका नाहीं. ’ -नव स्फु २५४. २ महानुभावपंथ. उदा० पारिमांडल्य आम्नाय. -के २७.६.३९. [ सं. ]

**आम्ल**—पु. अधिकारी वर्ग. [ अर. अमल ]

**आम्ल-इ-अहशाम**—पु. बंगालमधील देशी सरंजामी सैनीक.

**आम्ल-इ-नवारा**—पु. नाविक अधिकारी वर्ग आणि त्याचा खर्च, तनखा इ.

**आयकट्टु**—न. गांवच्या जमिनीच्या मोजमापाचें पत्रक.

**आयकल्लु**—न. सरकारी सारा.

**आयद**—स्त्री. वसूल. -आफ. [ अर. ]

**आयदान**—न. (कु. ) भांडें. -मसाप ४.४.२७९. [ सं. आयतन ]

**आयंदेचे मामलियत**—स्त्री. पुढील सालची मामलत. ‘ एकुण एक लाख देऊन साल आयंदेचे मामलियत सन मजकुरचे ’ -बाबारो ३.७. [ अर. आयंदा+मामलत ]

**आया**—पु. घराची जमिनीवरील आकृति; घराची रेषाकृति. ‘ त्याच्या घराचा सिंह आया आहे.’ ( इं. ) ग्राउंडप्लॅन. [ सं. आ+या ]

**आयन-इ-मह्सूम**—पु. रकम परत करावयाच्या गहाणवट वस्तु. [ अर. ]

**आयीद**—पु. साक्षी. -राव्य ८.१२. [ अर. ]

**आयीन**—पु. नियमपद्धति. -मुधो. [ अर. ]

**आरकटी**—वि. अर्काटी. 'अर्काटचे होन ते जमा नक्त आरकटी' -समारो ४.४६ [ अर्काट ]

**आरकाटी**—स्त्री. (अहिराणी.) शमीची एक जात. -अहिराणी भाषा व संस्कृति ३८.

**आरणा**—पु. गवा; रानरेडा; अरण्यमहिष. -अव.आरणे. 'श्रीमंत राजश्री माधवराव यांणीं मजला आज्ञा केली कीं, पंतास लिहून आरणे ४, उत्तम, लढावयासी योग्य असे आणून देणें.' -रा १.१३५. 'रानांतील जनावरें आरणे हाले बहुत करून आहेत.' -भारतवर्ष, सभारंजनी ३३.

**आरणी**—स्त्री (तंजा.) साडया; लुगडीं (रेशमी जरीचीं).

**आरती**—समाप्ति; कार्याची अखेर (क्रि० होणें). कीर्तनाच्या शेवटीं आरती करतात यावरून. 'नेलोर दंग्याची आरती' -के ३.१.४२.

**आरद**—क्रि. आणावे. -मुधो. [ अर. आउर्दन-आणणें ]

**आरबा**—पु. गोंधळ; गडबड; धांदल. 'तिचा अगदी आरबा उडल्यामुळें पुढची कांहींच व्यवस्था तिच्या ध्यानांत आली नाहीं' -चारुवसंत २४३. [अराबा ? ]

**आरमाणी**—वि. आर्मेनिया देशांतील. 'आरमाणी वैद्य' -पेम. [आर्मेनिया ]

**आरवा**—पु. (तंजा.) तामिळ स्मार्त ब्राह्मण. अरवा पहा. [ ते. अर्वा=तामिळ ]

**आरसा**—पु. (तंजा.) कांच. 'आरशाचा पेला, डोळयाचा आरसा.' [ सं. आदर्श ]

**आरळ**—पु. १ फुलें. २ फुलांचा मऊ बिछाना. 'मालती मोगरे चंपकीं । आरळ घातले हस्तकीं । पथिकातें पहुडावया॥' -मुक्ते हरिश्चंद्राख्यान १९४. अरळ पहा.

**आरा**—पु. रोख; बाजू; प्रदेश. 'आपले बुनगे थोरले बांकानेरचे आन्यास गेल्यानें त्यास फार जवळ पडेल' -पेद ३६.१३६. 'वासदचे आन्यास गेल्यानें मग कांहीं चिंता नाहीं' -पेद ३६.१३६. [ स. अरा ]

**आरा**—पु. चाकाच्या तुंब्यापासून धांवेपर्यंत असणारा उभा दांडा. [ सं अरा ]

**आरामगाह**—पु. आरामगृह. -मुधो. [ फा. ]

**आरामुख**—पु. बाणाचा एक प्रकार. -प्रश २०. [ सं. ]

**आरुच, आरूच**—स्त्री अरुचि; अप्रीति; नावड. 'त्यास तरी आमचे ठायीं आरुच पुढें मसलत कोनती करावी' -पेद २५.२७८. [सं. अ+रुचि ]

**आर्थिक दाब**—पु. बहिष्कारादि साधनांनीं अडवणूक करून आर्थिक नुकसान पोचविणें. 'मुसलमानांवर घातलेला नैर्बंधिक नि आर्थिक दाब तसाच चालू ठेवला पाहिजे.' -के ११.११.४१.

**आर्यसमाज**—पु. हिंदूंमधील एक वेदानुयायी पंथ. याची स्थापना दयानंद स्वामींनीं केली.

**आऱ्या**—क्रिवि. खालीं. **आऱ्या करणें**-खालीं सोडणें, ठेवणें.

**आर्युभाव**—पु. (आविर्भावाबद्दल चुकीनें). आविर्भाव; हूल; खोटा रोख. 'गोवलास आर्युभाव दाखवून अंजनवेलीचे दुचले काम कराव असे याचे मानस आहे' -पेद ३.८२. [ सं. आविर्भाव ]

**आलगट(ड) बलगट(ड)**—न. (कु.) बालंट; तोहमत; आळ; आरोप; कुभाड. [ बालंट अप. व द्वि. ]

**आलंगाबराकी**—अलंगबराकी पहा. 'आलंगाबराकीची व्यवस्था सुधारली.' -के २३.२.३७.

**आलमखाना**—पु. वाद्यशाला. -राव्य ५.४०. [अर.]

**आलात अवदात**—अलाद अवदात पहा.

**आलान**—भुजासः. -राव्य ५.४.

**आली**—वि. उंच; भव्य. -आफ. [ अर. ]

**आलीक**—वि. (महानु.) अज्ञात; अल्प; हीन. [ सं. अलीक=मिथ्या ]

**आलीगोल**—स्त्री. निझामच्या राज्यांतील बिनकवायती फौज. -के २३.२.३७.

**आलीमिकदार**—वि. उच्च; मोठया शक्तीचा. -मुधो. [ अर. ]

**आलीय्यह**—वि. उंच; उच्च. -मुधो. [ अर. ]

**आलेख**—पु. चित्र; आराखडा. 'दैनंदिनी आंदोलनाचा आलेख मात्र दर्शविणारी आहे.' -के २.५.३९. [ सं. ]

**आलें पात्र**—न. आलागेला; आलेला गृहस्थ; येणारी व्यक्ति. 'जे राजे गर्वें जाती । आल्या पात्रातें नोळखती। तयांचीं सर्वस्वें जातीं । सागरामाजीं ॥' -कालिका ८.६. [ येणें+पात्र ]

**आवईतवई**—स्त्री. अवाई तवाई पहा. संकट; हालअपेष्टा. 'आवयातवया भोगिला तो अकस्मात तिर्थरूप सिवापा निर्वतले' -रा १२.३३७.

**आवखादणें**—अक्रि. अवखादणें पहा. धास्ती घेणें; धीर सोडणें. 'विश्वासराव अंबारींत होते म्हणूनच टिपल्यासारखे मारले गेले आणि ते गेल्यावर फौजेनें आवखादला' -सकाळ २८.१०.३५.

**आवग**—पु. अहंकार. [ ? ]

**आवगणी**—स्त्री. वेष; सोंग. 'वराहाची घेऊन आवगणी। अंशें येके धरिली धरणी। तेथें कायीं वानूं श्रीचक्रपाणी॥ उद्धरिला गोवर्धनूं॥' -नरुस्व ३१५. [ सं. अव+गण ]

**आवग्र**—क्रि.वि. आरंभापासून अखेरपर्यंत; सतत; एकसारखा; अखंड; न थांबतां. 'तेथें तीन दिवस आवग्र रात्रंदिवस पाऊस लागला' -पेद २०.११८. [ सं. आ+अग्र ]

**आवड**—पु. ३ पाटग्यांचें एक पाटगें व २० पाटग्यांचा एक आवड; मोठा वाफा. 'मारी ललकारी। ढेलत्या बैला चालरे आवड हा भरला॥' -काके ६६. [ आवट ]

**आवंडा**—पु. अवंढा पहा. टप्पा नसतां न थांबता गांठलेली मजल. 'पुण्यांत गाडींत बसलों तों मध्ये खालीं कोठेंही पाय न टेकता एका आवंड्यात बंगलोरला जाऊन धडकलों.' -के.

**आंवण-णां-णें**—न. आंचवण.

**आवणो**—पु. (कु.) पंखा -मसाप ४.४.२७९. [ सं. व्यजन ]

**आवदाना**—पु. (कु.) अवधणा पहा. 'जांघेंत आवदाना उठला आहे.'

**आवध**—पु. अवधि; मुदत; काल. 'आमचें पत्र तुम्हांस पोंचल्यावर चार दिवस आवध करून चार दिवसांमध्यें आमचे सरंजाम, गल्ला वगैरे कुलजिन्नस दोनी महालांतून काढून घेऊन ...महाल त्याचे सुपूर्द करावे.' -रा ५.५८. [ सं. अवधि ]

**आवधी**—स्त्री. वेल; लता. 'चंदनाची आवधि कुवारी। बाणें कापिली राहे वरिच्यावरी। तैसी ते राजकुमरी। देवाचिया अवस्था।' -नरुस्व ३४४.

**आवय**—स्त्री. आवई; गप्प; भुमका. अवाई पहा.

**आवरन्द**—सक्रि. आणलें. -आफ. आरद पहा. [ फा. आवर्दन=आणणें ]

**आवल**—वि. प्रथम दर्जाचा; पहिला; अवल पहा. 'कोणे महाली गद्दी जमीन। त्याच्याहि तीन प्रती निवडून। पहिली आवल म्हणून। चांगली याहून इतर कर्मी।' -पैमाथेंदु.

**आवले**—पु.अव. आवळे. -समारो ४.७२.

**आवस, आव्स**—स्त्री. (कु.) आई. -मसाप ४.४. २७९.

**आवसवांकडे**—वि. वेडेवांकडे.

**आवळ**—वि. घट्ट; करकचलेलें; दाबलेलें; अडस; अडचलेला (भात). [ आवळणें ]

**आवातन**—न. (वांयदेशी) आंवतण; आमंत्रण. 'आवातन नाहीं तर जेवावयला कसा जाऊं?' [ सं. आमंत्रण ]

**आवान**—पु. वेळ. -मुधो. [ अर. ]

**आव्वा**—स्त्री. (कर.) व्यभिचारी स्त्री; रांड. 'त्यानें एक आव्वा ठेविली आहे.' [ का. अव्वा-आऊ-आवू ]

**आव्हानपत्र**—न. बोलावणें. समन्स यास प्रतिशब्द. [सं.]

**आशूब**—पु. तुफान; दुर्दैव. -मुधो. [ अर. ]

**आशौकतपन्हा**—पु. प्रतिष्ठापालक; थोरपणा राखणारे. 'त्यास हशीलाकरितां आशौकतपन्हांकडून मुजाहिम न व्हावे' -थोमा ९.२२०. [ अर. ]

**आश्नाव, आशनाव**—पु. स्नेह; सख्य. 'हिंदुस्थानचे पठाणाचाहि तो आशनाव नाही' -पेद २.७१. [ अर. आश्नाई=सख्य ]

**आश्रमा**—पु. आश्रय; आधार. 'याचा थोर आश्रमा घेऊन सुरतेचे बारियावर आरमार ठेऊन दंगेदारास तंगी पोहचवून आमदरफ्ती सुरळीत केली ऐसी तूर्त होऊन येईल' -पेद २४.१९३. [ आश्रय ]

**आश्विन आदितवार**—आश्विन महिन्यांतील रविवार. या दिवशीं सूर्योदयापूर्वी स्नान करून भुंवईच्यामध्यें बिब्याची रेघ ओढतात.

**आसन**—न. (महानु.) चार घटका बसणें.

**आसनकैद**—स्त्री. बसण्याची सक्ति; बसून रहाण्याची शिक्षा. 'ठराविक सांच्याचीं भाषणें ऐकण्याची आसनकैद सभासदांना कां म्हणून असावी?' -के १४.४ ३९. [ सं. आसन+अर. कैद ]

**आसनवेदी**—स्त्री. बैठकीचा ओटा. 'भविष्य काळांत हिंदु स्वातंत्र्य देवीच्या आसनवेदीवर हिंदु वीरांचीं नांवें कोरलीं जातील.' -के २.९ ४१

**आसनाई**—स्त्री. स्नेह; मैत्री. 'आमचे आसनाई पहिलेपासून होती याजकरितां आम्हापासी आले' -पेद १७.१७०. [ अर. आश्नाई=सख्य. तुल० स्नेह ]

**आसलूब**—पु. तऱ्हा; पद्धत; व्यवस्था. 'त्याची चाल, कशी ते समजत नाहीं. तेव्हां तकरारी कोणे प्रकारच्या व कशा याचा आसलूब काय तऱ्हेचा हे दुरंदेशीनें मनांत यावें' -रा ७.८२. [ अर. अस्लूब किंवा उस्लूब=तऱ्हा, पद्धत, रीत ]

**आसविल**—स्त्री. अस्वल 'तरि मी नच वाय आसविला।' -मोकर्ण ३३.४९.

**आसाद**—पु. ईषा; नांगराचा दांडा, ज्यास बैल जोडतात तो; इसाड. -राव्य ७.२५.

**आसामी**—पत्रम्. -राव्य ८.७१.

**आसार**—पु. १ चिन्ह; खूण; निशाणी. असर पहा. २ खोली. असर पहा. -आफ. -मुधो. [ अर. ]

**आसिफ**—पु. सालोमनचा प्रधान. -आफ. -मुधो.

**आसिफजाह**—वि. उच्चमानाचा. -मुधो. [ अर. ]

**आसिलमासील**—वि. कुलीन. ‘ एक चोपदाराचा मिर्धा व एक आसिलमासलातली आहे ’ -पेद १०.१०६. [ फा. आसिल द्वि. ]

**आसुदा, आसोदा**—वि. तयार; ताजातवाना. ‘ घोडी आसोदी करावयाबद्दल जीन लोकांनी उतरले होते ’ -पेद २०. ८६. [ फा. आसूदा ]

**आसुसणें**—अक्रि. हपापणें. ‘ सहानुभूति आणि प्रोत्साहन यांच्यासाठीं आसुसलेले साहित्यिक ’ -माचो. [सं. आशा]

**आसोड्या धुऊं कां पासोड्या धुऊं**—एक मुलींचा खेळ. -मखे २८६.

**आस्तावा**—पु. तोटीचें भांडें. ‘ त्यास त्याचे तोटीतून पाणी पडते त्याप्रमाणें रुप्याचा आस्तावा करून पाठवून द्यावा म्हणून आज्ञा झाली आहे ’ -पेद ३२.१३०. [ फा. ]

**आस्मान**—पु. आकाश. -मुधो. [ अर. ]

**आहदिया**—पु. करार; वचनप्रमाण; ठराव. ‘ कलकत्त्याहून पत्रें येत गेलीं. त्यांतहि हाच भाव कीं, राव पंतप्रधान यांसीं करार व आहदिया जाला तोच मंजूर ’ -रा १०.१९७. [ अर. अह्द=करार ]

**आहन्ना**—पु. हेतु. -मुधो. [ अर. ]

**आहश्मतपन्हा**—पु. सेवकांचा आश्रय. ‘ आंहश्मतपन्हा कडून सरकार तालुके यांत तसदी नव्हती ’ -थोमारो १.२२३. [ अर. ]

**आहारणें**—अक्रि. अहारणें पहा. खालीं पडणें; खचणें. ‘ बेलापुर येथील किल्ल्याचे बुरूज पडले. वृक्ष आहारले त्यांचे शेंडे मात्र राहिले ’ -पेद ४२.१. [ अर. ]

**आह्निक**—न. ऐक्य. ‘ आह्निकीं द्वैतपणाचा छेद जाला। तन्मय तदाकार। ’ -योगसं ९.४१. [सं. ऐक्य-अप. ]

**आहुर**—पु. और पहा. पूर.

**आळप**—न.(कों.) आलाप; गाणें. ‘ मग भगत एक गाणें म्हणतो त्यास आळप म्हणतात...याप्रमाणें सगळ्या देवांचीं नांवें घेऊन आळप म्हणण्यांत येते. ’ ( बसका विधि ). [ सं. आलाप ]

**आळप**—स्त्री. कुरकुर· रड; पिरपीर.

**आळपणें**—अक्रि. किरकिर करणें; रडत राहणें; दुःखानें ओरडत राहणें.

**आळागोळा**—क्रि.वि. गोल; वाटोळा. ‘ लाल कुसुंबी पागोटी बांधली आळागोळा । खुले मामाजीची निळा वाण सावळा शोभला ’ -वलो १०८. [ गोळा द्वि. ]

**आळी**—पु. आळ पहा. ‘ आळी कवणासी करू आतां ग । ’ -अभंग.

**आळुमाळु पातरट**—वि. ( महानु. ) आळमाळ पहा. अर्थ अर्थांतर न जाणणारा; केवळ मुखपाठी. वाहत्या पाण्याला पान, काडी, कचरा किंचित् आडवितात त्याप्रमाणें शास्त्रार्थांत आळमाळ आडवितो तो.

**आळोखा**—पु. आळुकापिळुका पहा. आळस देणें; अंगास आळेपिळे देणें. -ब्रँडीची बाटली १३१.

**आक्षेप**—पु. तक्रार; आशंका; हरकत. ‘ प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें ’ -समारो ३.१८४. [ सं. ]

---

# इ

**इकडंतिकडं**—न. इकडेतिकडे करणें; चुकविणें; भटकणें; विनाकारण खेपा घालणें. [ इकडे+तिकडे ]

**इकराम**—पु. कृपा; मेहरबानी; मानसन्मान. ‘ पथकी पण हकदक मानपान इनाम इकराम कानू कायदे सुद्धां सुदामत चालत आल्याप्रमाणें ’ -बाबारो २.६४. [ अर. इक्राम ]

**इकळी**—स्त्री. कुर्ली; खेंकडा या जातीचा एक प्राणी; हिच्या आंकड्याचा बरचा भाग बराच मोठा व लांब असतो.

**इकळत**—स्त्री. काकळूत; दया. [ सं. विकल ]

**इकामत**—स्त्री. राहणें; थांबणें. -मुधो. [ अर. ]

**इक्ता**—वि. इतका पहा. [ इतका याचा अपभ्रंश. ]

**इक्ताअ**—क्रि. बक्षीस देणें. -मुधो. [ अर. ]

**इक्तिरन**—क्रि. जवळ, युक्त असणें. -मुधो. [ अर. ]

**इक्बाल**—पु. दैव; सुदैव; अभ्युदय; सुख. -आफ. [ अर. ]

**इक्राम**—पु. मेहरबानी; परितोषिक; इनाम; इज्जत; आदर. इकराम पहा. -मुधो. [ अर. ]

**इक्रार**—पु. करार; प्रतिज्ञा; इकरार पहा. **इक्रारदाद**—करार केला. -आफ. [ अर. ]

**इक्लीम**—पु. १ देश. २ हवापाणी. [ अर. ]

**इखीत, ईखित**—वि. ईषत्; किंचित्; थोडेसें. ‘ गोसावी इखीत हास्य केलें ’ -लीच ३ पृ १६. ‘ गोसावी ईखित हास्य करीती ’ -लीच ३ पृ २७. [ सं. ईषत् ]

**इख्तियार**—पु. १ स्वीकार. २ प्रभुत्व; सामर्थ्य; अधिकार. -मुधो. [ अर. ]

**इख्तिसास**—पु. वैशिष्ट्य. -मुधो. [ अर. ]

**इखलास**—पु. विश्वास. इखलास पहा.

**इंगुळ**—पु. (व.) निखारा. इंगळ पहा. ‘ रुसले भरतारा । नाहीं म्हणावा आपला । शेजीच्या लावणीनं । लाल इंगुळ तापला ’ -वलो ९१. [ इंगळ ]

**इगूत**—स्त्री. ( कुण. कों. ) युक्ति. 'हुंबा हुंबा करूनी धराव तिजला । ये इगूत नामी मजला ।' -घुले -गुराखी. [ सं. युक्ति ]

**इंग्रजी दुःख**—न. पोटशूळ; आंत्रपुच्छदाह. ( इं. ) अपेंडिसायटिस. या रोगाचा शोध अलीकडे लागला, म्हणजे इंग्रजी वैद्यकाचा प्रचार झाल्यानंतर लागला, म्हणून त्यास इंग्रजी दुःख म्हणतात व त्यावर शस्त्रक्रिया हा एकच उपाय योजतात.

**इग्रति**—अ. अनन्तर. -राव्य ८.८१.

**इच्छापुरचे तालुकदार**—पु. श्रीमंतींत आळसांत वेळ घालविणारे व स्वेच्छेप्रमाणें वागणारे, ऐदी लोक. 'गंगामाइची कृपा व सपाट सुपीक भूमि आमचेकडे असती तर कदाचित आम्ही इच्छापुरचे तालुकदार बनून हातांत फुलांचे गजरे घालून हिंडलों असतों.' [ इच्छा+पुर ]

**इजहार**—क्रिवि. परिस्फुट; उघड; जाहीर; प्रसिद्ध. 'किले याचा मजकूर सविस्तर आज्ञापत्राप्रमाणें खलबतामध्यें नबाबाचे खजमतेस इजहार केला' -पेद २८.२२. [ फा. जाहीर ]

**इंजानिब**—पु. मी; आम्ही. 'इंजानिबास कौन्सिलांतून फर्माविलें आहे.' -विंचूइ.

**इजाफह, इजाफा**—स्त्री. वृद्धि; बढती; जास्त देणगी. [ अर. ]

**इजालतन**—वि. घाईचा. -मुधो. [ अर. ]

**इजितखत**—न अजितपत्र. यजितखत पहा. 'त्यांनीं आपले खुषरजावंदीने तुम्हास इजितखत लिहून दिले' -शारो १.१५७.

**इज्आन**—पु. पालन. -मुधो. [ अर. ]

**इज्तराब**—पु. अव्यवस्था. -मुधो. [ अर. ]

**इज्वा**—पु. फूस. -मुधो. [ अर. ]

**इझ्झ**—पु. मान; अब्रू (असणें). -आफ. -मुधो. [अर.]

**इझ्झत**—स्त्री. अभ्युत्थान; प्रतिष्ठा. इज्जत पहा. [अर.]

**इटा**—स्त्री. इष्टिका; विटा. -राव्य ७.२४. [ सं. इष्टका ]

**इंड**—स्त्री. ( कु. ) मासे पकडण्याचें चौकोनी लांबट जाळें.

**इडळणें**—अक्रि. फळ पिकून नासूं लागणें; अविकणें.

**इतलाक फौज**—स्त्री. कारणपरत्वें भरती केलेली अधिक फौज. 'याखेरीज इतलाक फौज दाहा हजारापासून पंचवीस हजारापर्यंत वाढविली जात असे' -विंचूइ ९१.

**इताअत**—स्त्री. बक्षीस. -मुधो. [ अर. ]

**इताअतगुजारी**—स्त्री. बक्षीस देणें. -मुधो. [ अर. ]

**इतिहासजमा**—वि. गतकालीन; स्मृतिशेष. 'पॅरीस शहराचें वैभव आतां इतिहासजमा झालें आहे.' -केद्द.१०.३५.

**इतिहासाची पुनरावृत्ति होणें**—तीच घटना स्थूलरूपानें पुन्हां घडून येणें.

**इत्तिफाक**—पु. मैत्री; जूट; सहमत. 'आपले सरकारचे दस्तुरप्रमाणें शपथपूर्वक इत्तिफाकनें राहून करारमदारास अंतर न करतां' -समारो १.३२८.

**इत्तिलाअ**—पु. माहिती; अनुमति. इतला पहा. -आफ. 'त्यास झाडीतील चार देसक जांबूर कमाविसदाराचे इतल्यांत आहेत' -समारो १.१७९. 'जमाबंदीचें वगैरे कामकाज यांचे इतल्यानें करीत जाणें' -समारो ३.६.

**इतमिनान**—पु. भरंवसा. -मुधो. [ अर. ]

**इत्यलम्**—उद्गा. शेवट; अखेर; समाप्ति. 'पण इत्यलंच्या आसपाससुद्धां केळकरांचें नांव नव्हतें.' [ सं. इति+अलम् ]

**इथलूक, इथलोक**—अ. ( खा. ) येथपर्यंत. -ज्ञाप्र १७.२.३८.

**इदंन्याय-यें**—याप्रमाणें. 'त्यापैकी आम्हाकडील जाब साल इदंन्याय झाला' -पेद ३.१३. [ सं. इदं+न्याय ]

**इदलशाही चावर**—पु. आदिलशाही मोजणीप्रमाणें एक चाहूर. 'श्रीस मौजे मजकूरपैकी जमिन इदलशाही चावर ।-पाव चावर जमिन द्यावयाचा करार करून' -समारो १.३२८.

**इदलिसहाझा**—स्त्री. शीड हाकारण्याची दोरी. -आंघइ ३७९.

**इद्रज**—पु. इत्यर्थ; सारांश. 'बाल पाटिलें कागद लिहून दिधला त्या कागदाचा इद्रज' -रा १८.१०.

**इंद्रधनुष्य**—न. इंद्रचाप पहा.

**इंद्रायेण**—न. कडु वृंदावनाचें फळ; कवंडळ. हें पिकलें म्हणजे दिसावयास सुंदर असतें परंतु आंतील गर काळा असून अत्यंत कडु असतो. **इद्रायेण फलवत् स्नेह**-वरून दिसावयास मैत्री पण आंतून वैर; कपटमैत्री; भोंदूपणाचा स्नेह. 'तेहि देवहत बुद्धिहत जाले आहेत. सिंयासी इंद्रायेण फलवत स्नेह होता अलिकडे बहुतच विटले आहे' -पेद ३६.३८५.

**इनाम इकराम**—इनाम वगैरे देणग्या.

**इनामात**—न. इनाम अनेक वचन. -आफ.

**इनायतनामा**—पु. कृपापत्र. -मुधो. [ अर. ]

**इन्तिकाल**—पु. मृत्यु; मरण. -मुधो. [ अर. ]

**इन्तिबा**—स्त्री. बातमी. -आफ. [ अर. ]

**इन्दलह**—परमेश्वराजवळ. -आफ.

**इन्दिराफ**—वि. विरुद्ध. -मुधो. [ अर. ]

**इन्बिसात**—स्त्री. आनंद. -मुधो. [ अर. ]

**इन्सान**—पु. मनुष्य. -आफ. [ अर. ]

**इंपळ**—स्त्री. ( उचले लोकभाषा ) भाकरी. -मज्ञा ३.४.

**इफ्तिखार**—पु. मान. -मुधो. [ अर. ]

**इप्पी**—( तंजा. ) मोहाचें झाड. [ ता. इलुंप; ते. का. इप्पे ]

**इंफळ**—न. इंपळ पहा. 'तथेच खारवट पोसणारीं हीं दळभद्रीं इंफळीचीं व चिपीचीं झाडें मातलीं आहेत' -सह्या पा ९४.

**इफ्फत**—स्त्री. पातिव्रत्य. -आफ. [ अर. ]

**इबरत**—स्त्री. प्रतिष्ठा; इब्रत पहा. दहशत; धाक; दरारा. 'मुजंगराऊ घोरपडे लढाईंत वारलियावर लष्करानें इबरत खादली'; 'याजवर इबरत पडली होती' -पेद २८.१००.

**इब्रत**—स्त्री. लाज. -आफ. [ अर. ]

**इमानदार**—वि. विश्वासू; प्रामाणिक. [ अर. ]

**इमानदारी**—स्त्री. निष्ठा; सचोटी; विश्वासुकता.

**इमामवाडा**—पु. १ इमामांच्या, धर्मगुरूंच्या सभा भरण्याची जागा. २ लखनौमधील एक प्रसिद्ध इमारत. 'इमाम वाड्यांत तबारा गायल्याबद्दल दोन शियांना अटक झाली.' -के १२.४.४०.

**इमारत**—स्त्री. अधिकार; वैभव; महानुभावित्व. -आफ. [ अर. ]

**इम्तितान**—स्त्री. उपकार. -आफ [ अर. ]

**इम्तियाझ**—पु. फरक. -मुधो. [ अर. ]

**इम्तिहान**—स्त्री. परीक्षा. -आफ. [ अर. ]

**इम्दाद**—क्रि. मदत करणें. -मुधो. [ अर. ]

**इम्साल**—वि. बरोबरीचा. -आफ. [ अर. ]

**इयाब**—पु. मध्य; आश्रय. -आफ. [ अर. ]

**इयालत**—स्त्री. महत्त्व. -आफ़. [ अर. ]

**इयुलें**—वि. ( महानु. ) इतुकें; एवढें. 'अनथत्व इयुलेहि नाहीं' -विमा १००.

**इरई**—स्त्री. इरय पहा.

**इरड**—स्त्री. ( कु. ) एक वेळ; दिवसाचा अर्धा भाग ( विशेषतः सकाळचा ).

**इरफ**—स्त्री. एकुणात. 'तेरीख फडनिसांनीं घालावी इरफ मजमदारांनीं बांधावी -बाबारो ३.१८१. [ अर. ]

**इरभळ**—क्रि. वि. इळभर पहा.

**इरय**—स्त्री. १ ईर्षा; चेव; स्फुरण. २ रुचीची पूर्तता, तीव्रता; लज्जत. 'या मिरचींत इरय नाहीं.' [ सं. वीर्य ]

**इराडें**—न. इरलें पहा. -चित्रकृषि २.६.

**इरादत**—स्त्री. इच्छा असण्याचा भाव; प्रवृत्ति. -मुधो. [ अर. ]

**इरेख**—स्त्री. वांकडी रेघ; वक्रलेखन. -राव्य ८.१०९.

**इरोदी**—स्त्री. स्त्रियच्या पायांतील एक लेणें. विरोदी पहा. -कविमि.

**इर्सालदारन्द**—पाठवावें. -आफ. [ अर. ]

**इलजाम**—पु. हरकत; अडथळा; प्रतिबंध. 'चाकरी मगदुराप्रमाणें करीत आहोत. पसंत करणार आपण आहेत. इलजाम येणार नाहीं. सर्व व्यवस्थित आहे' -रा १०.१२०. [ फा. लजाम=लगाम, निर्बंध ]

**इलतमस**—स्त्री. विनंति. इल्तिमास पहा. 'मग आपले बाहे देशमुख व देसकुलकर्णी यांनीं इलतमस केली कीं' -पेद ७.१४. [ अर. इल्तिमास=विनंति ]

**इलतवा**—थांबून रहाणें; बाजूस घेणें. -मुधो. [ अर. ]

**इलमति**—स्त्री. १ होड; पैज. 'माझा गुरु थोर तुझा लहान । ऐसे भांडती इलमति लाउन' -योसं १३.६५. २ बुद्धि. [ फा. इल्म=विद्या ]

**इलहाम**—पु. अन्तःस्फुरण. -मुधो. [ अर. ]

**इलाही**—पु. परमेश्वर -मुधो. [ अर. ]

**इलाही-ई बिघा**—अकबरी बिघा. 'जमीन इनाम इलाई बिघे'

**इल्काब**—पु. पदवी. अल्काब पहा. 'दसपटीचे मोकाशी, खोत इनामदार हा मोठा इल्काब मात्र कधीं कधीं'-लशिआ ५०२.

**इल्तिझाम**—पु. उपचार; अवश्य गोष्ट. -मुधो. [ अर. ]

**इल्तिफात**—स्त्री. १ लक्ष्य. २ मैत्री. -आफ. [ अर. ]

**इल्तिमास**—पु. स्त्री. विनंति. -मुधो. [ अर. ]

**इश्तिहार**—पु. जाहिरात. -मुधो. [ अर. ]

**इश्रीन**—वि. वीस. -आफ. [ अर. ]

**इसकील**—स्त्री. इस्कील पहा. हरकत. 'त्यांत तुम्ही इसकील करावी यांत कांहीं फायदा नाहीं' -पेद १०.१५. [ फा. ]

**इसमा**—पु. ( व. ) विसावा; विश्रांति. 'माहेराची जोत बाई ।बसीन पित्याच्या पाशीं । गोष्ट ऐकोन हिताची । देईल इसमा काशी ।' -वलो ९४. [ सं. विश्राम ]

**इसा**—पु. ख्रिस्त. [ येशु ]

**इसाई**—पु. ख्रिस्ती. इसवी पहा. [ येशु ]

**इसाप**—पु. इसाड पहा. नांगराचा दांडा. [ सं.लांगलदंड ]

**इस्मि**—पु. त्वेष. -वमो. [ फा. ]

**इस्की**—स्त्री. ऐट; झाकी. [ फा. ]

**इस्मा**—ऐकणें. -मुधो. [ अर. ]

**इस्तात**—स्त्री. सामग्री; सिद्धता. 'एशियास धारावीचा कोट बांधावयासी पाथरवट बेलदार इस्तात सर्व साहित्य करून

कोट होय ते करणार स्वामी समर्थ आहेत' -पेद १६.२७. [अर. इस्तिआद=सिद्धता. इस्तात पहा.]

**इस्तिअजाल**—घाई करणें. -मुधो. [अर]

**इस्तिकबाल**—इस्तकबाल पहा.

**इस्तिकामत**—स्त्री. शाश्वतता; कायमपणा. -मुधो. [अर.]

**इस्तिगासह**—तक्रार. -मुधो. [अर.]

**इस्तिज्हाद**—जाहीर. मुधो. [अर.]

**इस्तिफ्सार**—स्त्री. विचारणें; पृच्छा. -आफ [अर.]

**इस्तिश्हार**—स्त्री. साक्ष पुरावा घेणें. -आफ. [अर.]

**इस्त्री**—स्त्री. कोळपें दाबून धरण्याची काठी. -चित्रकृषि २.६.

**इस्ना, इस्ने**—वि. दोन. इसन्ने पहा.

**इस्म**—पु. नांव. -मुधो. [अर.]

**इस्मत**—स्त्री. पातिव्रत्य. [अर.]

**इस्मतियान**—स्त्री. पतिव्रता; इस्माती अव. -आफ. [अर.]

**इह्तिराम**—मान देणें. मुधो. [अर.]

**इहलाक**—पु. सत्य. -आफ. [अर.]

**इळ्ळ**—न. (तंजा.) इडलें.

**इळ्ळघाचें पात्र**—न. (तंजा.) इडलीं करावयाचें पात्र.

---

# ई

**ई**—हा-ही-हें. -आफ.

**ईजानीब, ईजानेब**—सना. आपण; आम्ही. 'किल्ले मतगड आमारत पन्हा तुळाजी आंग्रे सरखेल घेणार अजी सबब ईजानेबाकडे ठेविला' -थोमारो १.२२२. 'मेहरबान सलामत ईजानीबाची जहागीर बमोजीब फर्मान हूमायुन परगणे मजकुरचीं खेडीं पाउणशें' -पेद २८.२०८.

**ईजानेखास**—स्वतः; खुद्द. 'लेकिन बुजुर्गां बुजुर्गांही कां दिली घेतली नाहीं ते ईजानेखास मालूम' -थोमारो १.२३३. (ईजानेबासबद्दल चुकीनें वाचन).

**ईड**—अ. (तंजा.) बरोबर; समान; बद्दल; ऐवजीं. 'वरकडास अर्धा मुलुकाचा महसूल ईड करून दिले' -मऐशि १०२.४. [ता. ईडु]

**ईतवार**—पु. (खा.) आदितवार. -शाप्र १७.२.३१.

**ईतालकी बात-ईताल**—या शब्दाचा ताळा त्या शब्दास; बोलण्यांत बोलणें; शब्दामध्यें कायमपणा; वचनाचें धड असणें. 'खंडोजी माणकराची ईतालकी बात ईताल नाहीं' -पेद १६.१३९.

**ईन**—एतद्. -राव्य ८.२४.

**ईबाब**—स्त्री. ही बाब. -आफ.

**ईब्न**—पु. मुलगा. [अर. इब्न]

**ईर्षाद**—स्त्री. इच्छा; अनुमति; इरादा; संमति; हेतु. 'याजकरितां रावजीकडून राव पंतप्रधान यांस व मदारुल महाम यांस पत्रें लिहावावीं व आमचेतर्फेनहि ल्याहावें म्हणोन ईर्षाद केली' -रा ७.१९४. 'गोविंदराव, सेनासाहेब सुभा यांजकडील सांवतखान यांस मुलाजमतीकरितां घेऊन आले ईर्षाद यावी' -रा ७ -खलप १.१८. 'यासी जसी ईर्षाद त्याप्रमाणें फैसला होईल' -रा ७. -खलप १.२२.

**ईल**—स्त्री. हिल्ला; युक्ति. 'दहा पांच माणूस निशाण घेऊन चाकर म्हणवावे व ईल काढून घ्यावी' -पेद ३.२५.

**ईशान**—हे-ह्या-हीं. -मुधो. [अर.]

**ईश्वरदत्त भूमि**—स्त्री. परमेश्वरानें दिलेला देश; परमेश्वरप्राप्त प्रदेश. 'यहुद्यांना पॅलेस्टाईन ही ईश्वरदत्तभूमि वाटते' -ज्ञाको अ ३३०.

**ईश्वरप्रणीतता**—स्त्री. अपौरुषेयत्व; अस्मरणीय पुरातनत्व' -के २५.१०.४०.

---

# उ

**उकळ्या-ळ्या**—वि. धान्य पैसा वगैरे विगर हक्क घेणारा; लुबाडणारा. [उकळणें]

**उकाल**—पु. हट्ट; नाद. 'परंतु यांनी उकालच घेतला. शेवट आम्हास येऊन बाजीरावांनीं पुसिलें' -पेद ६.८६. [सं. तत्+कल्]

**उकाल**—वि.क्रिवि. अवचित; आकस्मिक; बेअंदाजी; उडती. 'तेथें खंडोजी निंबालकर यास दूर उभे होतो तेथें उकाल गोळी येऊन गुडघ्यावर लागली' -पेद २८.१६२. [सं. अव+काल]

**उक्कड**—वि. (तंजा.) उकिडवा.

**उक्थ, उक्थ्य**—न. १ ईश्वरस्तुतिपर सूक्त. यज्ञाच्या वेळीं आहुती देतांना जे मंत्र म्हणतात त्यांत परमेश्वराची स्तुति असते ते ॐ सहित म्हटले म्हणजे मननपर होतात. यांस उक्थ म्हणतात. २ एक सोमयागाचा प्रकार; एक सोमसंस्था. [सं.]

**उखरें**—न. लेणें; गुहा. 'वनें तपोवनें शैलशिखरें। परम पावन जें जें उखरें।' -भारा बाल ७.२५. [सं. उत्+कृ-कीर्ण]

**उखलणें**—अक्रि. उठणें. 'जाधवरायास उखलू दिले नवतेच'-पेद १.१. उखळणें पहा.

**उखळ**—न. एक मुलींचा खेळ. -मखे ३४४.

**उखळ काढणें**—दोषांचा पाढा वाचणें; मागील सर्व गुन्हे, चुका वगैरे उकरून काढून पुढें मांडणें; फटफजीती करणें. [उखळणें]

**उखळी**—स्त्री. ज्यांत बाराचें पीठ भरून गजानें ठोकून बार उडवितात तो लोखंडाचा ठोकळा किंवा नळी. [उखळ]

**उखार**—वि. बिन पाण्याचें धापडवट शेत; वरकस जमीन. उखर पहा. [सं. ऊषर]

**उख्खड**—स्त्री. कुस्तीगिरानें प्रतिपक्ष्यास वर अलगत उचलून खालीं पाडणें. -के १३.१२.३८.

**उख्वत**—स्त्री. भाईपण. -मुधो. [अर.]

**उगतभान्या**—पु. (खा.) कानबाई देवीच्या रोटाचा एक प्रकार. याबद्दल नवस केला असतां शनिवारी गहूं दळून मोठया पहाटे उठून स्वयंपाक करतात व देवीला नैवेद्य दाखवून भानु उगवण्याच्या आंत खाऊन संपवितात. -संशोधक पृ. २४३. [उगळणें]

**उगम**—क्रिवि. उगा; शांत; स्तब्ध; स्वस्थ; हालचाल न करतां. 'उदवास दोन महिने उगमच ठेवाल आणि पुढें साहित्य कराल तरी परिणाम लागेल' -पेद २६.७५.

**उगला, उगळा**—पुढें उगळा पहा. 'हे इकडे आले तरी तुमचा उगला तिकडे असावा म्हणजे मुजाउतदौला तुम्हासीं नीट बोलतील' -रा १.२००.

**उगवणें**—अक्रि. स्पष्ट होणें; स्पष्ट उल्लेख असणें; प्रकट होणें. 'याउपर जैसी मर्जी आसल तैसी आज्ञा उगऊन आल्यास आज्ञेप्रमाणें होईल म्हणौन विनंती लिहिली होती त्यांची उत्तरें अद्याप आलीं नाहींत.' -पेद ३९.७३. 'तरी याची आज्ञा उगऊन लिहावी' -पेद ३९.७३. [सं. उद्+गम]

**उगवणें**—स्त्री. १ (केंस) विंचरणें; २ राग काढणें; रागावणें; शिवीगाळ करणें, मारणें, कुदलणें; ३ डोंगर चढणें.

**उगळणें**—अक्रि. १ पीळ निघून पदर सुटणें; उलगडणें (दोर, वेणी इ.). २ शिवणींतून कापड सुटणें. ३ उडवणें; उधळणें. [सं. उद्+गल्]

**उगळवणी**—न. पाझरून निघालेलें पाणी. 'चांदिणे याच्या पाण्हावनी। चंद्रकांत दुभती अदुभणी। तैसे भूमी निगे उगळवणी। तें आणिती सखियां।' -नरुस्वं ५६९. [सं. उद्+गल्]

**उगळा**—पु. नेट; निकड; तसदी; ससेमिरा; सूत्र; त्वष्ट. 'अंतर्वेदींतून तुम्हांकडून उगळा असावा' -रा १.२२२. 'तुम्ही तिकडून गनीमी तऱ्हेनें उगळा लावावा' -रा १.२६०. [उगाळणें]

**उगळीक**—स्त्री. गोपनस्फोट; चवचव; बभ्रा; बोभाटा. [उगळणें]

**उगानिगा**—स्त्री. निरवानिरव.

**उगाल्दानबर्दार**—पु. कलाची धारक; तस्त धरणारा. -राव्य ५.१९.

**उगावा-वो**—पु. १ पूर्तता; समाप्ति (कामाची) (होणें, पडणें). २ वसूल (येण्यादेण्याचा). [उगवणें]

**उग्रमणें**—अक्रि. दिसूं लागणें; प्रादुर्भूत होणें; सुचणें; मनांत येणें. [उद्+गम्]

**उग्रवेलोपासक चळवळ**—स्त्री. अत्याचारी चळवळ.

**उग्रादित्य**—न. (महानु.) सूर्याचें देऊळ; सूर्यप्रतिमा; 'उग्रादित्यी अवस्थान' -श्रीचच.

**उघड जमाबंदी**—स्त्री. कायमधाऱ्याची पद्धति. -के २१.१०.१९३८.

**उघडभावई**—स्त्री. स्वैर स्त्री; वेश्या; निर्लज्य स्त्री.

**उघडी**—स्त्री. दार; कालव्यांतून पाणी बाहेर सोडण्याकरितां ठेवलेलें झांपड. 'आम्हास अकरा उघडया ओलांडाव्या लागल्या.' -राणीचें पुस्तक ५९. [उघडणें]

**उघाण**—(तंजा.) कोठी; सामान सुमान ठेवण्याची जागा.

**उचलणी**—स्त्री. उचला; कौल घेण्याचा दगड (कौल इष्ट असल्यास हा हलका येतो व अनिष्ट असल्यास जड येतो असें म्हणतात). [उचलणें]

**उचटणें**—न. (तंजा.) उलथणें.

**उचलून पाणी**—न. उंसाला किंवा एखाद्या पिकाला दुसऱ्या ठिकाणाहून वरून पाणी देण्याचा प्रकार.

**उचाडपछाड**—स्त्री. उलथापालथ; भानगड; घोंटाळा. 'विलायत सरकारचे सपाटयांत आमचे सरंजाम बहाल होऊन माघारे आले तस्मात् आतां आमचे सरंजामाची उचाड पछाड होणार नाहीं' -इना ४४.

**उच्छ्रय**—पु. उंची. 'त्या तबकडीवर उच्छ्रयदर्शक आंकडे घातलेले असतात' -ज्ञाको २१.२७२. [सं.]

**उजकरणी**—स्त्री. उपक्रम; उठाव; उठावणी. 'आवधी काम करावयाची व घ्यावयाची उजकरणी वेदमूर्तींनी केली असे' -पेद २२.३७८. [उजगारी]

**उजगार**—पु. भरभराट; उठाव; उजगारी पहा. -कविमि.

**उजरावा**—पु. प्रसिद्धि; लौकिक; कीर्ति; बोलबाला. 'येणे करून सरकारची किफायेत असे व दिगांतरकीर्त उजरावा प्रांती होऊन येईल' -पेद २४.१८३. [ सं. उर्ज ]

**उजरें**—क्रिवि. प्रकटपणें; उघडपणें. 'भेंडयानें वही केली वारेयानें उडोन गेली तदन्याये कोट सिद्ध केला आहे आणि आम्ही तेथें जाऊन उजरें रहावे बरे बाईट म्हणावे ते सारे जन आम्हास हसेल' -पेद ३३.१८५. 'मग शाहासाहेब निमाज-पढलियावर ऊजरियांत जेथें बसतात तेथें घेऊन गेले।' -रा १.१०७. उजरा पहा.

**उजवणें**—सक्रि. तेजस्वी करणें; प्रकाशित करणें; तेवणें; 'शेणवी मोगरकर तीन साली त्रिपुर ऊजवूं देत नाहीं' -आदिमहा १४८. [ सं. उज्जलन ]

**उजवा पक्ष**—पु. १ सरळपक्ष; शुक्लपक्ष; सामान्यतः अधिकारांतील पक्ष; परंपरागतपक्ष; सनदशीरपक्ष. २ विधिमंडळांत अधिकारारूढ पक्ष अध्यक्षाच्या उजव्या हातास बसतो, यावरून अधिकारारूढ अथवा सरकारीपक्ष.

**उजा**—वि. (खा.) पांढरा. -ज्ञाप्र १७.२.३१. [उज्ज्वल]

**उजूबाईगजू**—एक मुलींचा खेळ. -मखे २.८९.

**उजूहात**—स्त्री. वजा करावयास योग्य अशा गोष्टी. -मुधो. [ अर. ]

**उज्मा**—वि. भव्य. -आफ. -मुधो. [ अर. अजिमचे अव ]

**उज्र**—पु. अडथळा. उजूर पहा. -आफ. [ अर. ]

**उज्लत**—स्त्री. घाई. -मुधो. [ अर. ]

**उझ्म**—पु. इरादा; हेतु. -मुधो. [ अर. ]

**उटउट**—स्त्री. रुखरुख; किंतु. 'त्यास राव शिंदे तर गेले परंतु माझ्या मनांतील उटउट गेली नाहीं. ही गोष्ट नबाबाचे पसंदीस येत नाहीं' -रा ७.१९७. [ ध्व. ]

**उंटप्रवेश**—पु. चंचुप्रवेश; थोडासा शिरकाव. 'हिंदुस्थानांत कापडाच्या धंद्यांत गिरण्यांचा उंटप्रवेश होण्यापूर्वी कसब या दृष्टीनें हा धंदा पराकोटीस पोचला होता' -के १५.८.४१. [ एका गृहस्थानें बाहेर पाऊस पडत होता म्हणून उंटास तंबूंत थोडीशी मान ठेवण्यापुरती जागा दिली. हळूहळू उंट थोडा थोडा पुढें सरकत पूर्णपणें तंबूच्या आंत आला. पाऊस थांबल्यावर उंट बाहेर जाईना व जरूर तर मालकानें बाहेर जावें असें म्हणूं लागला या गोष्टीवरून. ]

**उंटभर सुया कबूल करणें**—कांहींतरी भलतीच व जी बहुधा करावयाची नाहीं अशी गोष्ट कबूल करणें; एखाद्याची समजूत करण्याकरितां वेळेपुरती अशक्य अटहि मान्य करणें. 'यांनीं उंटभर सुया कबूल करून शेवटीं......हा तंटा कसा तरी मिटला' -प्रति आत्म ४८८.

**उटाळें**—न. १ खांबाच्या खालीं व वर द्यावयाची भर; खालचा दगड व वरचें भरतीचें आडवें लांकूड. २ गुरांचें तोंड उघडून दोन्ही जांभाडांमध्यें ठेवावयाचें हात जाण्याजोगें भोंक असलेलें आडवें वांक. [ उठणें ]

**उटाळें**—न. ( हेंद्रा. ) दरवाजावरील पुढें आलेला बांध कामाचा भाग. [ उठणें ]

**उटिंगण**—न. आधार; टेंकू. म्हण—'सोन्याच्या ताटाला कुडाचें उटिंगण.' [ उठणें ]

**उट्ट(ट्टू)ट**—पु. उचाट ध्यास.

**उट्ट(ट्टू)ट**—न. उट्टें: सूड. ॰**काढणें-उगवणें**-सूड उगविणें; उट्टें काढणें.

**उठकळ—ळा**—स्त्री. कंटाळा; त्रास; दगदग; टेंकीस येणें: मेटाकुटीस येणें. [ उठणें+कळा ]

**उठकळणें**—अक्रि. एकसारखें काम करून अंग खुडकणें; थकवा येणें, वाटणें; दमणें; कंटाळणें.

**उठती बसती सुवासिनी**—स्त्री. नवरात्रांत घट बसतात त्या दिवशीं व नवरात्र उठतें त्या दिवशीं सांगावयाची सुवासिनी. -पेंघ १६१.

**उठाबशी**—स्त्री. आपल्या घरीं आलेल्याचा उठून सत्कार करणें; आदरातिथ्य.

**उठाळें**—न. उटाळें पहा.

**उठिंगर-ळ**—उठाणूं; आपटल्यानें आलेली सूज, गळूं वगैरे.

**उठी का बठी**—एक मुलींचा खेळ. -मखे २७६.

**उड**—न. नक्षत्र. उडुगण पहा. 'शशी पोळला...श्याम काया उडें...जेवि लाह्या।' -मुरा मुंकां ५८.

**उडगा**—पु. समुद्रकांठीं उथळ पाण्यांत खडकांत राहणारा खेकडा.

**उडत कोंबडा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे २१९. -व्याज्ञा १.३८३. [ उडणें+कोंबडा ]

**उडतपगडा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे ३७१. [ उडणें+पगडा ]

**उडता नाच**—पु. गोव्यांतील हलक्या बायकांचा नाच. -विविधवृत्त १२.२.३९. [ उडणें ]

**उडतीपाटी**—स्त्री. चांभारपाटी. [ उडणें ]

**उडतें साल**—न. एक वर्षाआडचें वर्ष. [ उडणें ]

**उडवार्ता**—स्त्री. उडत बातमी; अफवा; उडतउडत आलेली हकीकत; जनवार्ता. 'दुसरी उडवार्ता ऐकली कीं,

राजश्री मल्हारबा होळकर फौजसुद्धां झांसीस दाखल जाले' -रा १.८. [ उडणें+वार्ता ]

**उडवून घेणें**—मोरयाविधि पहा. 'भिल्ल लोकांतील वाङ्‌निश्चयानंतरचा एक विधि. यांत नवरानवरीस एका कमरे इतक्या अधांतरीं उंच धरलेल्या फळीवर बसवून गाणें गात तालावर वर उडवितात व पुन्हां फळीवर झेलतात.' -के १. १२.३६.

**उडाण**—न. १ उठाणूं; गळूं. २ (ल.) बंड; उठवलेलें काहूर; उठावणी. 'रोज उठवण्या आणावें म्हणजे या मावल्याचें उडाण फुटेल' -पेद ६.१४७. [ उडणें ]

**उडाफा**—पु. १ एका ठिकाणीं थोडें, त्यापुढें कांहीं अंतरावर थोडें असें असण्याची स्थिति ( विशेषतः जमिनी संबंधीं ); निरनिराळ्या ठिकाणीं एकाच मालकाची असलेली जमीन; अंतराअंतरावर असलेले जमीनीचे लहानलहान तुकडे; कांहीं जमीन एका गांवांत व त्याच खातेदाराची किंवा इनामदाराची कांहीं जमीन दुसऱ्या गांवांत असली म्हणजे जी दुसऱ्या गांवांत असते तीस उडाफा म्हणतात. २ पंक्तींत पानें वगळून बसणें; अधेंमधें बसणें ( बैठकींत वगैरे ). ३ कळपांतील गुरें इकडे तिकडे पुंजक्यांनीं पसरलेलीं असणें.

**उडालें**—न. उडत बातमी; अफवा; ऐकीव बातमी. 'परंतु उडालें आहे कीं खंडागळा मोडून लुटला दोघे लेक धरले ऐसे वर्तमान उडालें आहे.' -पेद ३८.१८५. [ उडणें ]

**उडीदमुहुर्त**—पु. १ विवाहपूर्व दिवशीं करावयाचें एक देवकार्य. यावेळीं गणपतीप्रीत्यर्थ उडीद दळण्यांत येतात. २ (ल.) विवाहसमारंभाचा आरंभ. [ सं. ]

**उड्डाण**—न. लकडीच्या खेळांतील घोट्यावरील वार चुकविण्याकरितां बचावाची पद्धत. -व्यायाम ४.३९८.

**उड्डाणबैठक**—स्त्री. बैठक मारून वर उठतांना उडी मारावयाची व नंतर पुन्हा खालीं बसावयाचें. -व्यायाम ४.५९.

**उणारणें**—सक्रि. ( व. ) उडविणें; वर फेकणें; उधळणें. 'रामाची राणी सीता। कशी रावणान नेली। गळयांत रत्नहार। मोती उणारीत गेली।' -वलो १५. [ सं. उन्नत+कृ ]

**उणें**—वि. वजा करावयाचा, कमी करावयाचा भाग, अंश; ऋणांश. ०**चिन्ह**-न. एका रकमेंतून दुसरी रकम वजा करावयाची असतां या दुसऱ्या रकमेमागें जें आडव्या रेघेचें – असें चिन्ह करतात तें; ऋणचिन्ह.

**उतक**—स्त्री. चूल.

**उतरण**—स्त्री. पानवेलीचे वेल जोरास चढावे म्हणून वर्षांतून एकदां पुन्हां गुंडाळून पुरतात ती क्रिया. [ उतरणें ]

**उतरणावळ**—स्त्री. १ नक्कल करण्याची मजूरी. २ गलबत, होडी, गाडी वगैरेंतून ओझें उतरून दुसरीकडे नेऊन ठेवल्याबद्दल द्यावयाचें द्रव्य. ३ तरींतून पलीकडे नेण्याबद्दलचें द्रव्य. ४ मुक्काम केल्याबद्दलचें भाडें. ५ झाडावरून फळें अलगत काढण्याबद्दल द्यावयाची मजूरी.

**उतरणें**—अक्रि. पान्हवणें; पान्हा सोडणें ( गाई-म्हशीनें ). 'आमच्या म्हशीला पाजतांना कोंडा पुढें ठेवावा लागतो त्याशिवाय ती उतरत नाहीं' -खेस्व १७१. [ सं. उत्+तृ ]

**उतव**—पु. ऊत पहा. १ कढ; फसफस; उकळी; फसफसून बाहेर येणें ( दूध, कढी, भात, आमटी, इ. ). २ ऊत; चेव; उन्माद; भर.

**उतवणें**—अक्रि. १ उकळी येऊन बाहेर पडणें ( दूध, वगैरे ). २ उडया मारणें; चेवणें; उन्मादणें.

**उतळी**—स्त्री. शिबडें.

**उताणे रांगा**—पु. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्यायाम १.३११.

**उतारा**—पु. उतरण्याची जागा; जानोसा. 'जुन्या सरकार वाडयासमोरील हल्लीं बडोदा बँक असलेल्या वाडयांत खानदेशच्या मंडळीना उतारा दिला होता.' -सयाजी १.१५७.

**उती**—स्त्री. उक्ति; वचन. 'ऐसी वसिष्ठादिकांची उती। अयोद्धप्रती असे पै।' -भारा बाल २.१०४. [ सं. वच्-उक्ति ]

**उत्कटासन**—न. ( मलखांब ) बोंडावर ढुंगण ठेवून पाय मलखांबाच्या बाजूस लावून केलेलें आसन. -व्यायाम ३. २३१.

**उत्क्रांति**—स्त्री. १ बदल. २ ( उप. ) अपकर्ष. 'श्रीमंतींतून गरिबींत जेव्हां उत्क्रांति होते तेव्हां प्रथम दागिने नाहींसे होतात.' -मानाप ५.

**उत्खनन**—न. जमिनींतील अवशेष शोधून काढण्याकरितां चालविलेली खोदाई. ( इं. ) एक्सकॅव्हेशन. 'सिंध प्रांतांत उत्खननाचें काम चालू आहे.'

**उत्तती**—स्त्री. ( तंजा. ) खारीक. उतती पहा. [ का. उत्तती=खारीक ]

**उत्तरडी**—स्त्री. ( तंजा. ) १ उतरंड. २ धान्य ठेवण्याची खोली; कोठी.

**उत्तरविधान**—न. उत्तरक्रिया; और्ध्वदेहिक. 'तिघासी देवोनि दहन। उत्तरविधान करविलें रायें।' -भारा बाल १. ७०.

**उत्तराधान-ना**—न.स्त्री. मुख्य पूजेनंतरची पुन्हां करावयाची पूजा, प्रार्थना. याच्या उलट पूर्वाराधन-ना. [ सं.उत्तर+आराधन ]

**उत्तरायण**—न. ( श. को. पहा. अधिक अर्थ. ) सूर्य उत्तरगोलार्धांत असतो तो काल. वसंत संपातापासून शरत्संपातापर्यंतचा काल. २१ मार्च ते २१ सप्टेंबरपर्यंतचा काल. [ सं. ]

**उत्तराशा**—स्त्री. उत्तर दिशा. 'जन कथिति घेनु कुरूंनीं वळिल्या येऊनि उत्तराशेला।' -मोविराट नव ३०५. [ सं. उत्तरा+आशा ]

**उत्तोल**—पु. शरीराचा हातांवर वगैरे सांभाळलेला तोल. 'उत्तोल सांभाळण्याची क्रिया जर चांगली साधली तरच त्याचे हातून कामें होण्याची आशा असते.' -व्याज्ञा ३.२८१.

**उत्फत**—स्त्री. कृपा. -आफ. [ अर. ]

**उत्रवाट**—न. उत्तरीय. 'बांधिले गुंफामठ । वस्त्रें कमंडलू योगवट । पाटसूताचें उत्रवाट । सामग्री देतसे ॥' -कालिका १७.७९. [ सं. उत्तरीय+पट ]

**उत्रात**—स्त्री. ( खा. ) संक्रान्त. 'आवननी उत्रात गधडावर बसेलशे' ( यंदांची संक्रांत गाढवावर बसली आहे. ) -संशोधन, ऐलेच २५६, २६६. [ सं. उत्तरायण ]

**उत्बह**—पु. उंबरठा. -मुधो. [ अर. ]

**उत्स**—मैत्री. -आफ. [ अर. ]

**उत्सेध**—पु. बंध. -राव्य ७.२०.

**उथारा**—पु. त्रास; कटकट. 'तूं आठवे अवतारीं । भेणें पळसी समुद्रमाझारीं । दैत्यांचिया उथाराथरी । सीणसी तुं ॥' -कालिका ४.१३१. [ ? ]

**उदक घेणें**—( महानु. ) अल्पाहार करणें. 'उदक घ्या.'

**उदकुंभ**—पु. ( चुकीनें मृत्कुंभाबद्दल ). मातीचा घट; मडकें. पाण्याचा घट. 'त्याणीं उदकुंभाची प्रार्थना केली आहे. तांब्याचें भांडें न मिले याप्रमाणें लोकांनीं कारभार केला आहे' -पेद ३८.९८. [ सं. ]

**उदग्रह**—पु. उद्गार; शब्द. 'श्रीमंतानी येकांती उदग्रह काढिले कीं, नानावर यख्तियार टाकिला त्यामुले गर्व फार जाला' -पेद ३९.६४. [ सं. उद्+ग्रह ]

**उदयोन्मुख**—वि. दिसूं लागणारी; प्रथम प्रादुर्भूत होणारी. 'उदयोन्मुख परम सहिष्णुतेंत व कार्यैकदृष्टित्वांतच पंडीतजाच्या भावी यशाचें बीज आहे.' -स्वभा २८. [ सं. ]

**उदाणी, उदाणें**—स्त्री.न. ऊद जाळण्याचें भांडें; धूपदाणी; ऊददाणी. '-माभू २८. [ ऊद+दाणी ]

**उंदीर मांजर**—न. एक मुलींचा खेळ. -मखे २३८. -व्याज्ञा १.३८५.

**उदो**—पु. ( महानु. ) उत्साह; उल्हास. 'मन उदो नाही' -गस्तो १०६. [ सं. उदय ]

**उद्यां**—क्रिवि. ( खा. ) काल. -ज्ञाप्र १७.२.३१.

**उद्वसु**—वि. उदास. 'स्त्रीविण उद्वसु । घर काइसे।' -कालिका १४.१५०. [ सं. ]

**उधवणें**—अक्रि. ( महानु. ) पेटणें. -वटी.

**उधवत**—अ. जळत.

**उधसणें**—सक्रि. १ उकरून काढणें; उसकटणें; उसकणें; 'हें प्रकरणपुन्हां उधसवूं नका' २ -अक्रि. वर येणें; उसळणें. 'सर्वांचेंच दुबळेपण उधसून वर आलें' -उपेअं १९. [ सं. उद्+हस् ]

**उधळमाख**—स्त्री. उधळपट्टी; उधळमाधळ. 'आम्ही पैशाची अशी उधळमाख करतों.' -विविध १८.८.३६, ( १५ ). [ उधळणें ]

**उधळवावलीं**—क्रिवि. ( महानु. ) आल्यापायीं परत; मागल्यापायीं माघारें. 'उधळवावलीं जावें कीं' -पैठणच १४३. [ उद्वलन ? ]

**उधा**—वि. उधळया.

**उधाणी**—स्त्री. ( महानु. ) वाद; चर्चा. 'भेटीसरसीचि उधाणी प्रवर्तली । जियेचीं वाक्यें कर्श्वाश्वरबासीं उद्धारिलीं।' -लर २०. [ सं. उद्+वाणी ]

**उधाय**—( महानु. ) वोसंडे. 'घवघवीत दैवी । चहुकडे उधाय।' -ऋ.

**उधार**—पु ( प्र. उद्धार ) अवतरण; उतरून घेतलेला मजकूर; सारांशरूपानें घेतलेला लेख. 'मुधोजी भोसले यांचे तहनाम्याचा दाखला आहे त्यांत पहिले यांचे तहनाम्याचा उधार आहे' -रा ७.२२३. [ सं. उद्धार ]

**उधासणें**—अक्रि. उफाळणें; क्षुब्ध होणें. उधसणें पहा. 'बेडकानें उडी मारल्यामुळें सागराचें पाणी उधासेल काय ?' -स्यूत २३८. [ सं. ऊद्+हस् ]

**उन्चह**—जें कांहीं. -मुधो.

**उन्वाह**—पु. मुखपृष्ठ; मथळा. -आफ. [ अर. ]

**उन्हारी**—स्त्री. रबी; वसंत ऋतूंतील पीक; वसंत हंगाम. 'जलद आलिय'पुढें उन्हारीची जोतपात होईल. नाहींतर उन्हारी पडेल. -पेद २९.२५. [ उन्ह ]

**उपगळा**—पु. मानेजवळचा भाग. [ उप+गळा ]

**उपगळि(ये)**—क्रिवि. मानेखालीं. 'गोसावी पहुडल असती । उपगळिये घेऊन उठविले' -लीच १.६. 'गोसावी उपगळिए घेऊन उठविलीं' -लीच १.१६. [ उप+गळा ]

**उपंगळीं**—क्रिवि. पाठकुळीं; मानेच्या मागील बाजूस; पाठीवर. 'मग उपंगळिए घेऊन गांवातु नेलें' -वृद्धाचार १९. [ उप+गळा ]

**उपजरणें**—अक्रि. उजगरणें; अंग धरणें; पुष्ट होणें; भरास येणें. [सं. उप+जॄ]

**उपजरा**—पु. पुष्टि. 'पागेंत नेहमीं घोडयांचे पायास आजार होऊन घोडीं जायबंदी होतात. घोडी उपजऱ्यास येत नाहींत.' –आडि महा ११४. [सं. उप+जॄ]

**उपट आसन**—न. (महानु.) अर्धासन; गरुडासन. एक गुडघा उभा व एक गुडघा पाडून बसणें; उपट बसणें. [सं. उत्+पत्+आसन]

**उपटणें**—अक्रि. (तंजा.) टांकी लावणें. [सं. उत्+पट]

**उपट्या भूईमूग**—पु. ज्याचें झाड उपटलें असतां झाडाबरोबर उपटून आलेल्या शेंगा वेंचतां येतात अशा जातीचा भूईमूग; धुंगऱ्या भूईमूग.

**उपड**—स्त्री. अडचण; नड; उणीव; कमताई. 'आंतील आंत खायास व पाणी पायच्या माणसांस उपड आहे असें असोन कडव्या माणसांवांचून होतच नाही म्हणऊन लिहितां' –रा १०.१५६.

**उपदेष्टणें**—सक्रि. सांगणें; उपदेश करणें. 'जे मी आपणांस विश्वासानें सांगेन किंवा उपदेश्टीन त्याचा आपण अपमान करावयाचे नाहींत.' –पद ४२.४५. [सं. उप+दिश्]

**उपद्रव**—पु. (व.) १ उंदरांचा त्रास. २ (ल.) उंदीर. 'तुमच्या घरांत उपद्रव आहे? आमच्या घरांत फार आहे.' [सं.]

**उपद्रवणें**—सक्रि. (महानु.) मारणें; त्रास देणें. 'उपद्रवावें' –उच २५७. [सं.]

**उपद्वाम**—पु, उपव्याप; गडबड; खटपट. 'नबाबाकडील मनुष्य येऊन तद होतो तेव्हां आपण नसतां उपद्वाम करुन उपयोग काय?' –पेद ३.६६. [उपद्व्याप बद्दल चुकीनें]

**उपनाणें**—न. उपचलन. जें नाणें कायदेशीर किंमती-पेक्षां कमी असतें, वाटेल त्यास टांकसाळींतून पाडून मिळत नाहीं, दुसऱ्या नाण्याच्या अमुक पटीनें किंवा हिश्शानें मानलें जातें व देवघेवींत विशिष्ट मर्यादेपर्यंतच कायदेशीर रीतीनें वापरतां येतें असें नाणें; दर्शनी नाणें. (इं. टोकन कॉइन) [उप+नाणक]

**उपपात्ति**—स्त्री. प्रकार; तऱ्हा. 'ऐशा कित्येक उपपत्येनें बोलोन' –ऐसं २.१७. [सं. उपपत्ति]

**उपभोजन**—न. (महानु.) अल्पाहार; उदक घेणें. [सं.]

**उपमा**—पु. (तंजा.) तिखट मिठाचा सांजा. कानडींत 'उप्पिट्टु' म्हणतात. [का. उप्पु=मीठ]

**उपरसाळी, उपरसीळी**—स्त्री. एक औषधी वेल; गोपी; श्यामा; शारिवा; अनंता. –अमर. उपळसरी पहा. [सं.]

**उपराज्यसत्ता**—स्त्री. दुय्यम सत्ता; वसाहतीचें स्वराज्य. (इं. डोमिनियन स्टेटस) [सं. उप+राज्य+सत्ता]

**उपराष्ट्रीय**—प्रांतिक. [सं. उप+राष्ट्र]

**उपराळो**—पु. (कु.) प्राप्ति. उपराळा पहा. –मसाप ४. ४.२८०.

**उपलगु**—वि. उपरी; तात्पुरता. 'अलीकडे उपलगु खोत पांच सात झाले नेहमी खोत वतनदार नाहीं' –आठइति ६६. [सं. उप+लग्]

**उपलक्षणात्मक**—वि. औपचारिक; दिग्दर्शक; निमित्त मात्र; प्रत्यक्ष कृति न करतां हेतु उघड करण्याइतकीच कृति करण्यापुरता. 'उपलक्षणात्मक सत्याग्रह करणारांची मुक्तता करण्यास हरकत नाहीं.' –के ८.१२.४१. [सं.]

**उपला**—पु. नवा पाक्षिक वायदा. उपेता पहा.

**उपलां**—क्रि. (कु.) पेरलें. –मसाप ४.४.२७९.

**उपवधू**—पु. विवाहयोग्य तरुण; (उपवर याच्या उलट नवाशब्द). 'जस्टिस शहांचा एखादा मुलगा उपवधू असेल.' –दौ ११.

**उपहसित**—न. नाक फुगणें, कुटिल दृष्टि, स्पष्ट शब्द व मान हलणें यांहीं युक्त असें हंसणें. [सं.]

**उपहुड**—पु. जागृति; उदय. 'ऐसा उदयाचळिचा उपरवाळां। उपहुडु जाला चंद्रमंडळा। जैसी रात्री जाली गगनाचा खळा। चाकोरा पीकांची।' –नरुस्व ४९१. [उद्+पहुडणें]

**उपळण**—न. तोडगा; मंत्रतंत्र. 'मग रामभाऊकडे जाऊन उपळण टाका, त्याचा हटकून गुण येतो.' –खेस्व १७१.

**उपाकरण**—न. साधन; उपक्रम; उपाय. 'त्यांत त्यांचें उपाकरण हें असें कीं त्या योगानें भाऊरावांची एकेक कळा ग्रासली जात असे.' –भाकोच. [सं.]

**उपाधवंत**—वि. (महानु.) स्थूल; उपाधियुक्त. 'उपाधवंत शरीर आहे.' 'उपधवंत आहेत.' [सं. उपाधिवत्]

**उपालिंग**—न. अनिष्ट दृश्य; उपालिंग; भेसूर आकृति. 'रुक्मिणीचीं पाहुनी सर्वांगें। जरी देवांचीं बरव सोंगें। तरी तिथें हातातोंडाचीं उपालिंगें। विवसिये सारखीं॥' –नरुस्व १९७. [सं. उप+लिंग]

**उपासमातगा**—वि. अविचारी; प्रत्यक्ष घरांत खावयास नसल्यामुळें उपासाची पाळी आलेली असली तरी वरुन

उद्दामपणाची वागणूक करणारा; कुवत नसतां मुजोरी करणारा; वरून खोटा दिमाख दाखविणारा. 'विचारें करून पाहतां येथील कारभार उपासमातगा आहे.' -पेद २०.१३८. [उपास+मातणें]

**उपेता**—पु. पाक्षिक वायदा. 'प्रामिसरी नोट आज एकदां ९५८६ रु. पर्यंत गडगडली. उपेता ऊर्फ नवा पाक्षिक वायदा तर रु. ९५८२ पर्यंत पडला.' -के २७.१.३८.पृ १६.

**उपेंद्र**—न. उत्पन्न. 'येथील प्रासादाचें वास्तुशांतीचें उपेंद्र आम्ही गुंजवणेकर पुरोहित यांनीं शके १५८५ मध्यें घेतलें आहे. तुम्हास संबंध नाहीं.' -ऐसं सा १.३०. 'गांवकीच्या वृत्ति म्हणजे कसालियाच्या आणि उपेंद्र थोडिका आणि देशपांडे यांचेथील उपेंद्र विशेष आणि कसाला नाहीं' -रा २१.१११. [सं. उत्पन्न]

**उप्पीठ**—न. (तंजा.) आंबट सोजी; उपमा; तिखट-मिठाचा सांजा. [का. उप्पु=मीठ+हिट्टु=पीठ]

**उप्रांतिक**—क्रिवि. यानंतर; यापुढें. 'उप्रांतिक तीर्थरूपां-समागमें स्वार होऊन आपले भेटीस राजपुरीं येऊन विदित जाले पाहिजे.' -पेद ३.९५. [सं. उपर+अंतिक]

**उप्राळ**—उपराळा पहा.

**उफाट**—वि. १ स्पष्ट; फटफटीत. 'त्याची सून अगदीं उफाट गोरी आहे हो.' -खेस्त्र ६०. २ वाजवीपेक्षां जास्त. [सं. उत्+स्पष्ट]

**उफाल**—वि. उफाळ पाहा. 'बेहडे यांस उफाल ऐवज राहील तो तुम्ही रदकर्जी घेत जाणें.' -समारो ३.१६४.

**उफालगा**—वि. फालतु; जरूर नसलेला. -कविमि.

**उफावणें**—अक्रि. वर येणें. 'ईश्वरकृपेनें तो पाषाण कमरेपासून सुटला त्याचे योगानें तो वर उफावला.' -स्त्रीच २.११३. [सं. उत्+स्फाल]

**उफ्तादह**—वि. पडलेला; पालथा; पडून. -मुधो. [अर.]

**उबडणें**—सक्रि. उपडें करणें; पालथें करणें; सांडणें. 'यशोदा मायबाई। कृष्णाला या सांग कांहीं। गवळ्याच्या राधिकेचं। टाके उबडूनि दहीं।' -वलो. [सं. उत्पतन]

**उबर, उबार**—पु. आधार; दम; बाकी. 'सेरीकर बहुत जबून जाले आहेत. काहीं उबर राहिला नाही.' -पेद ३१. ४३. 'खासगीच्या महालांत उपद्रव दिला म्हणजे उबार राहणार नाहीं' -पेद २०.१३. [उबार महा]

**उबूर**—तरून जाणें. -मुधो. [अर.]

**उब्हत्**—स्त्री. मोठेपणा; थोरवी. -आफ. [अर.]

**उभा खोखो**—पु. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३१५.

**उभार**—पु. उभा धागा. -ज्ञाप्र ९.१.३१.

**उभे सैर**—क्रिवि. उभ्यानें. 'नादाचेनि घर्घरीं। बैसलीं वीरांचीं दांतिरीं। किरकिरोनि वाजी कुंजरीं। उभे सैरीं उसां-डला।' -भारा बाल २०.०८.

**उमथणें**—अक्रि. (महानु.) उलटणें; लोटणें. 'काळ लोहाचा डोंगरू उमथला.' -जांस्व २६१. [सं. उत्+मथ्]

**उमरा**—पु. एक जातीचा कापूस; उमरावतीकडील कापूस; आंखूड धाग्याचा कापूस. -के २६.१२.१९४१. [उमरावती]

**उमळणें**—अक्रि. (व.) आळ घेणें; हट्ट करणें. 'उमळतें अर्ध्या रातीं। मागे बाई चंद्र हातीं।' -वलो ८८. [सं. उन्मद]

**उमळवटी**—स्त्री. ओकारी; कंटाळा. 'पहिल्या पहिल्यांदा तांदूळ किती घ्यायचे, डाळ किती घ्यायची, तिखटमीठ किती घालायचं वगैरे माहिती विचारून मी आईला उमळवटी आणली.' -वत्सला १३९. [सं. उद्+मल]

**उमाइणें**—अक्रि. कोमेजणें; म्लान होणें. 'आणि गौरा-इसें आली: कोमाइली: उमाइली: ऐसीं गोसावी देखीलीं:' -लीच ३. पृ. ४७. [कोमाइणें द्वि.]

**उमूर**—पु. खाणें. -मुधो. [अर]

**उमेरा चक्री भोंवरा**—पु. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९८.

**उम्दह**—पु. आधार. -आफ. मुधो. [अर.]

**उम्मीदवार**—पु. आशाधारी. -मुधो. [अर.]

**उम्रा**—पु. अमीर अव. -आफ. -मुधो. [अर.]

**उयशी**—स्त्री. (व., कुण.) (प्र.) उशी; डोक्याखालीं ठेवण्याची लहान गिर्दी. 'सीतेला वनवास। बाळ दोन्ही डाव्या कुशीं। केली गोष्टाची उयशी। लागे झोप रोज कशी।' -वलो ११०. [उशी]

**उरफी**—वि. जाणलेली; ज्ञात.

**उरमडणें**—अक्रि. भरीस पडणें; गर्विष्ठ होणें; उर्मट होणें. 'जरी भलते गोष्टीस त्याणी उरमडून गोष्ट सांगितली तर पारपत्य करतील' -पेद ६.१४१.

**उरावरचा दगड**—पु. जबाबदारी; भार. [ऊर+दगड]

**उरावरचा हात**—पु. उपरी; वरील अधिकारी. [ऊर]

**उरासा**—पु. (खा.) पडसें. -ज्ञाप्र १७.२.३१.

**उरुमाळ**—स्त्री. मांड्यापर्यंत पोहोंचणारी माळ. [सं. ऊरु=मांडी+माला]

**उरोध**—पु. स्पर्धा; चढाओढ; विरोध. 'सिंहपुरीचा चित्रायुधु। दधीचा, कोसल प्रसिद्धु। जे काळेसी करीती उरोधु। समर संहारीं।' -नरुस्व २१६. [सं. उद्+रोध]

**उर्मी**—वि. वर्मी; गुप्त; गूढ; सांकेतिक. 'त्यास हालींहि पत्रें आलीं त्यास गुह्य लिहिलें. आम्हीं मराठे, उर्मी काय जाणों; प्रगट त्याहावें म्हणजे समजण्यांत येईल. -रा १०. ९६. [सं. वर्म ?]

**उलग**—वि. उदासीन; तटस्थ; स्वस्थ. 'आतां त्यांणीं उलग नसावें हें उचित असे' -रा १.२०४. [सं. उत्+लग्]

**उलगडणें**—अक्रि. उजवणें; लग्न लावणें. 'त्या संतूबाईस उलगडावे, जवाहीर नगवज घ्यावे हा विचार त्याचा आहे' -पेद ६.६६

**उलगाड**—वि. उजाड; उध्वस्त. 'अगदीं उसाची थळें उलगाड झालीं' -पेद ९.४४. [उलगडणें]

**उलटी जनेऊं**—पु. उजव्या खांद्यावरून डाव्या कमरे-पर्यंत केलेला वार. -मवि ९.११. [उलटें जानवें]

**उलटा सूरमासा**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३६२.

**उलटी पकडापकडी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५६.

**उलथणें**—अक्रि. मरणें; नाहींसें होणें; काळें करणें; उल-थून जाणें पहा. 'कां छळतोस मेल्या? उलथत कां नाहीं एकदां' -श्रुति ९८.

**उलदंड**—पु. वज्र मुष्टीचा व्यायाम. प्रथम साधा दंड काढून नंतर शरीर उलट क्रमानें मागें नेऊन पूर्व स्थितीवर येणें. -व्याज्ञा ४.१०४.

**उलबक**—स्त्री. उपेक्षा; उवक; आबाळ. 'वागलों गोडेनें सर्वासी। न करतां उलबक कवणासी। परि ते न मने विषम जे त्यांसी। भलते आयासीं घालिती॥' -नागेश लीलामृत.

**उलबण, उलबाण**—न. उपद्रव; संकट; अरिष्ट; उलबण. उल्बाण पहा. 'उलबाण एक गेलें तर एक उभे राहते' -पेद ४२.३१. 'रायगड प्रांतीं तांब्रांचें उलबण जाहलें' -रा ६. पृ १३०.

**उलसन**—न. फोड; स्पष्टता; उलगडा. 'याकरितां अवघ्याच गोष्टीचें उलसन करून लिहिलें आहे.' -पेद १६. ८१. [सं. उल्हसन]

**उलहाण**—न. उत्थान; उठवणी; भानगड; गोंधळ; कारस्थान. 'यापूर्वीहि कितेक उलहाणें जाहलीं तीं पुण्यप्रतापें करून लयास गेलीं' -पेद २०.८८. [सं. उत्+स्था]

**उलाल**—वि. उलाड; उलार पहा. गाडींत मागील बाजूस ओझें अधिक झाल्यामुळें ती तिरपी होते ती स्थिति.

**उलिय्यह**—वि. उंच. -आफ. [अर.]

**उलुव्व**—वि. १ उच; मोठी. २ हिंमत. -मुधो. [अर.]

**उलुसें**—वि. थोडें; अल्प. [सं. अल्पीयस्]

**उल्हाटणें**—सक्रि. (महानु.) उलटणें; लोटणें; ढकलणें. 'तयाचि विघ्नें उल्हाटिलीं' -आचार भाष्य. 'तयाचेनि उल्हा-टली ऐसें होवावें कीं' -आचार भाष्य. [सं. उत्+लुट् ?]

**उल्हाणें**—न. गाऱ्हाणें. 'राजश्रीनीं त्याजवळ कारभाराचे उल्हाणें दिलें कीं कारभार करा म्हणत असतां कोणी रुसतात कोणी घरीं बसतात' -पेद ६.४२. [सं. उत्+व्हल्=बोलणें]

**उव्हाला**—पु. आळस. 'उव्हाळा ठाऊक नाहीं.' -पेद ३९.६४.

**उशनसी**—स्त्री. (महानु.) शुक्रनीति (ग्रंथ). 'बोधिला निजवैडुरी उशनसी।' -गस्तो ६४.

**उशिंगळ**—न. (कों.) पुढें पाय पसरले असतां मुलास बसावयास मांडीवर जागा होते ती.

**उशीरी**—स्त्री. उसर; उसरी पहा. केळीं, रताळी, सुरण वगैरे पदार्थांचे उन्हांत वाळविलेले काप. [सं. ऊषर]

**उश्याशीं कटकट**—एकसारखी सन्निध चाललेली कुर-बुर; जवळ असून नित्याची तक्रार; रोजची कुरकुर; नित्य चाललेलीं बारीक सारीक भांडणें (जवळ असणाऱ्या माणसांतच चालल्यामुळें बंद करण्यास कठिण). 'उश्याशी कटकट असा प्रकार दिसण्यांत दिसतें, त्याचे घरचे दुसरे ठिकाणीं जातील तर बरें' -पेद ३६.३३६.

**उष्टावणी**—स्त्री. रुखवताचे पदार्थ खाऊन झाल्यावर नवरदेवानें उष्टें काढण्यासाठीं द्यावयाची देणगीची वस्तु. 'उष्टावणी रघुकुळ टिळका। रामनाम निजमुद्रिका। ठायीं देखा ठेविली।' -भारा बाल २३.१२७.

**उष्ट्रिकास्त्र**—न. विहीरींत टाकलेलें लिंबू बंदुकीच्या गोळीनें वर काढणें. -पुरु. जाने १९३९.

**उष्ट्रखाना**—पु. उंट बांधण्याची जागा. उष्टरखाना पहा. 'दिमत उष्ट्रखाना' -समारो ३.२९९.

**उष्णमाळी**—पु. सूर्य. 'तृणासारखे......उष्णमाळी' -मुरा किष्कि ४७.

**उसवा**—पु. नदीच्या पुराबरोबर वाहून आलेलीं लांकडें, गवत वगैरे काठांवर लागतात तो. [सं. उत्+सु]

**उसाली**—स्त्री. उसळी. उसाळी पहा. 'हरकोठें उसाळी खाऊन जातील तर जाऊं न देणें म्हणोन आज्ञा' -पेद २८. १५७.

**उसासणें**—अक्रि. (महानु.) मारणें; भोसकणें. 'कां हो मज उसासिलें?' 'कोणयासी उसासिजली' -ए उगी १११, चेंडुफळी.

**उसिसी**—स्त्री. उशी. ' चंपक परागाची उसिसी । तेथ भीमकी बैसविली कैसी । नवल भूतली चंद्रिका जैसी । मृगी कुंकुमाची । ' -नरुस्व ४५७. उशी पहा.

**उसें, उसें पोट**—न. बेंबीखालचा पोटाचा भाग.

**उस्तभविणें**—सक्रि. (महानु.) भर देणें; उठविणें; उद्युक्त करणें; प्रवृत्त करणें. ' दादोसी महदाइसां उस्तभवीले; द्वारावतीए जावें ऐसें ' -लीच ३. पृ ५२. [ सं. उत्+स्तभ् ]

**उस्तर**—पु. उष्ट्र; उंट. -राव्य ५.३९. [ सं. उष्ट्र ]

**उस्तरखाना**—पु. उष्ट्रखाना; उंटखातें; उंटांची पागा. -मइमं ७. [ सं. उष्ट्र ]

**उस्तरपलाण**—न. उष्ट्रपल्याण; उंटावरील खोगीर; उंटावरील आसन. -राव्य ५.४९. [ सं. उष्ट्र+पल्याण ]

---

# ऊ

**ऊ**—सना. तो. -आफ. -मुधो. [ अर. ]

**ऊ**—स्त्री. एक माप. ८ उवा=१ यव. -मसाप ४.४.२६७.

**ऊं**—उद्गा. धिक्कारदर्शक, तुच्छतादर्शक उद्गार. त्यांत विशेष काय ? याअर्थी.

**ऊचा चौफेर**—पु. घोड्याची एक चाल. -छच ९९.

**ऊत**—पु. (तंजा.) उपळ; उपळण.

**ऊदान**—पु. (महानु.) सन्निपात. ' ऊदानाच्या मुकाळीं बडबड जवळीं ' -गस्तो ५०.

**ऊनाशाही**—वि. माळव्यांतील ऊना गांवीं तयार होणारी (तलवार). -प्रश ३०.

**ऊनोक्ति**—स्त्री. १ अर्थाच्या रास्त वजनापेक्षां कमी वजनाचे शब्द वापरणें. -हास्यवि २७४.५. २ हीनतादर्शक, लघुतादर्शक शब्द योजना. [ सं. ]

**ऊरपुटी**—स्त्री. (महानु.) पाठीकडे हात वळवून बांधणें. ' बांधौनि ऊरपुटी मागधु पाडिला ' -गस्तो. [ सं. उरस्+पट ]

**ऊरपूर**—स्त्री. शिल्लक; शेष; पुरून उरलेलें. ' ऊरपूर म्हणून वल्लभभाईचा विनोद सदा सज्ज असतो. ' -स्वभा ४२. [ उरणें+पुरणें ]

**ऊर्ध्वस्कंध**—पु. (शिंपी.) काखखोलीच्या समपातळींत कण्यापासून तसेंच खांद्यावरून काखेच्या पुढील दुबेळक्यापर्यंत घेतलेलें माप. ' ऊर्ध्वस्कंधाच्या मापांतून पाठीचें अंतर वजा करा. ' [ सं. ]

**ऊला**—वि. पहिली. -मुधो. [ अर. ]

**ऊशान**—सना. ते, त्या, तीं. -मुधो. [ अर. ]

**ऊंस रंगणें**—उंसाचा गाभा लाल पडणें; उंसावरील एक रोग. -शाको ऊ ३०. [ सं. इक्षु+रंज ]

---

# ऋ

**ऋणकरी**—पु. (ल.) एखाद्या गोष्टीबद्दल हटून बसणारा; हट्टी; आग्रही; घेतल्यावांचून न जाणारा. [ सं. ऋण+कृ ]

**ऋणानुबंधी**—वि. स्नेही; मित्र; घसट असलेला; लागाबांधा असलेला. [ सं. ]

**ऋतुचर्या**—स्त्री. निरनिराळ्या ऋतुंतील राहणी. -व्याज्ञा ५.३६. [ सं. ]

---

# ए

**एकं**—न. १ संख्यास्थानांतील पहिलें स्थान. २ (इं.) युनिट.

**एकओढी**—येकवोढी पहा.

**एककट्टा**—क्रिवि. एकमतानें. ' मंडलिकाच्या बाजूनें एककट्टा राहिलेल्या या मतदारांच्या ' -के ३१.१०.१९३९. ' शिस्तीनें बुरुज बांधून एककट्टा होऊन लढणाऱ्या इंग्रजांच्या ' -भूभ्र २७. [ एक+कट ]

**एककार**—पु. सरमिसळ; जातिभेद नाहीं अशी स्थिति; संकर. [ सं. एक+कृ ]

**एकजड**—क्रिवि. एकत्र; एका ठिकाणीं; संघटितपणें. ' ते आल्यावर सर्व जमाव एकजड करून बेदरावर रवाना करणार ' -रा ५.१२७. [ एक+जड ]

**एकजदी**—वि. एका ठिकाणीं असलेलें; एकत्र; समायीक. ' त्यांनीं एकजदी भाऊ निमे कुलकर्णीचें विभागी म्हणोन कलह मांडला ' -समारो ३.१२३. [ सं. एक+फा. जदी ]

**एकटप्पी**—क्रिवि. एकाटप्प्यांत; न थांबता; एकाच पल्ल्यांत, न थांबतां करावयाचा प्रवास, इ. [ एक+टप्पा ]

**एकतीस पाव**—वि. पावणेआठ; नपुंसक. [ पुरा मासा नाहीं, एक गुंज कमी ]

**एकदंडी**—क्रिवि. एका हप्त्यांत; एका दमांत; एकाच वेळीं; एकठायीं. ' जे लोक कादंबऱ्या संपूर्ण लिहून झाल्यानंतर एकदंडीच प्रकाशित करतात. ' [ एक+दंड ]

**एकधार**—क्रिवि. सतत; सारखा; न थांबतां; अविरत. 'पाऊस एकधार लागला होता' -राणीचें पुस्तक ६५. [ सं. एक+धारा ]

**एक नंबरचा**—वि. अव्वल दर्जाचा; पहिल्या प्रतीचा.

**एकपादशिरासन**—न. ( मल्लखांब. ) बोंडावर बसून डावा पाय मानेवर ठेऊन हात जोडणें. -व्याज्ञा ३.२३४. [ सं. ]

**एकपिकी**—वि. ज्या जमिनींत एकच पीक काढतात ती ( जमीन ). [ एक+पीक ]

**एकपुत्र**—पु. एकच मुलगा असलेला. [ सं. ]

**एकबर्दा**—पु. (ठगी.) तेली; तेल विकणारा. (ठग लोक यास अशुभसूचक मानीत ).

**एकबेरजी**—वि. ज्या हिशेबांत प्रत्येक खात्याची केवळ एकुणात अथवा बेरीज एकाच आंकड्यानें (तपशिलाशिवाय) दाखविली जाते असा हिशोब. [ एक+बेरीज ]

**एकबेरजी दप्तर**—न. निरनिराळया खात्यांचे हिशोब आल्यावर त्यांच्या एकुणातींची नोंद करणारें दप्तर.

**एकभोग**—वि. जो एकाच मनुष्याच्या मालकीचा असून त्यांत हिस्सेदार नाहींत असा ( गांव ). [ एक+भोग ]

**एकमुस्त**—क्रिवि. एकमुठी; एकदम; एकरकमी. 'सर्व रकम एकमुस्त पाठविली असती तर पेटीच्या मालकांसहि अंदेशा आल्यावांचून राहिला नसता. ' -श्रमसाफल्य ५.३. [ एक+मुस्त ]

**एकलासी**—स्त्री. दिलजमाई; मैत्री; सलोखा. 'राजश्री चतुरसिंग भोसले व रास्ते यांची एकलासी होऊन ' -ख १४. ७५५४. इखलास पहा. [ अर. इखलास ]

**एकवीरा वृत्ति**—स्त्री. एकावलंबित्व; कुटुंबांत कर्ता पुरुष असला कीं तो मरेपर्यंत सर्व त्याच्यावर अवलंबून असून त्यास मदत करण्याची अगर त्याचें काम पुढें चालविण्याची प्रवृत्ति नसणें. -नवाकाळ २८.१०.३३. [ सं. एक+वीर+वृत्ति ]

**एकशी**—वि. एकत्र केलेली; एकवटलेली. 'कमजादा पावतीचा हिशोब करून बरोबर एकशी पावती करावी' -थोमारो २.१४३. [ एक+सा ]

**एकश्रुति**—वि. एकाच स्वरांतील; एकसुरी. 'नाहींपेक्षां या एकश्रुति संगीतांत त्यांना इतकी गोडी वाटली नसती' -हिप्र १५०. [ सं. ]

**एकसंस्थ**—वि. एकठिकाणीं असणारा; एकत्रस्थित; एकस्थानगत. 'कर्तबगारी व उंची एकसंस्थ झाल्याचें अब्राहाम लिंकनचें उदाहरण ' -विविध १८.२.१९४०. [ सं. एक+सम्+स्था-स्थित ]

**एकसूत्रमणी**—पु. अव. एका माळेचे मणी; म्हणजे सर्व सारखेच. 'रांगडे एकसूत्रमणि '-पेद २.४८. [ एक+सूत्र+मणि ]

**एकहस्त भुजासन**—न. ( मल्लखांब. ) बोंडावर बसून डाव्या हातावर डावा पाय घेऊन हात मागें मानेवर ठेवणें. -व्याज्ञा ३.२३४. [ सं. एक+हस्त+भुज+आसन ]

**एकहात फुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३७७. [ एक+हात+फुगडी ]

**एकांकिका**—स्त्री. एकप्रवेशात्मक नाटक; एकांकी नाटक. [ सं. एक+अंक ]

**एकाडा**—पु. मराठी न्हावी लोकांची पंचायत. -ज्ञाको १७.

**एकांतिकपणा**—पु. एकाच गोष्टीची अतिशयितता; अतिशयोक्ति. 'एकांतिकपणा हा विनोदांत हृद्य असला तरी तो शास्त्रांत हृद्य न होतां उद्वेगजनक होतो. ' -के १४.५.४०. [ सं. एक+अन्त+क+पणा ]

**एकांतिक राज्यघटना**—स्त्री. मध्यवर्ति कायदेमंडळाचा सार्वभौम अधिकार व तदितर गौण विभागांस अधिकाराचा अभाव; सार्वभौमाधिकार अविभक्त असून मध्यवर्ती संस्थेखेरीज इतर कोणालाहि कायदे करण्याचा अधिकार नसणें. ( इं. सेंट्रलाईझ्ड गव्हर्मेंट ). -के १२.१०.१९३७. [ सं. ]

**एकादशनी**—स्त्री. कोणत्याहि मंत्राचें अकरा वेळां आवर्तन; विशेषतः रुद्राचीं अकरा आवर्तनें. यांत नमक अकरा वेळां व चमक एक वेळां म्हणतात. (विरू.) एकादसणी. [ सं. एकादश ]

**एकाधिकार**—पु. कुलमक्ता; एखाद्या बाबतींत एकाच व्यक्तीस सर्व अधिकार देऊन इतरांस मना करणें; पूर्ण ठेका. ( इं. ) मोनापली. 'नवीन मनूंत कै. गणपतराव यांच्या इतका वाकबगार नट एकहि नसल्याकारणानें त्यांच्या नाटकांचा एकाधिकार म्हणजे मोनापली नसतांहि त्यांचीं नाटकें कोणीच करण्यास धजत नसत. ' -गणपतराव जोशी, पृ २०९. [ सं. एक+अधिकार ]

**एकामतीं एकाजतीं**—क्रिवि. करार करणाऱ्या सर्व व्यक्तींवर व्यक्तिशः व सामुदायिक रीतीनें बंधनकारक होईल अशा रितीनें. [ सं. एक+मत+एक+जत ]

**एकामेकीं**—क्रिवि. एकदम; तडकपणें. 'भावजय वहिनी बाई। नको बोलूंस एकामेकीं । चंद्रे कोमेजला एकाएकीं। ' -सह्याद्रि फेब्रु. १९३६. [ एक+मेक ]

**एकारणी**—स्त्री. पहिली नांगरणी. 'आठ रुपये एकारणीला लागले. ' [ सं. एक ]

**एकार्णव**—पु. एकजमाव; एक घोळ; अनेक लोकांचा जमलेला समूह, ज्यामध्यें जातगोत वगैरे भेद करतां येत नाहीं असा. [ सं. एक+अर्णव=समुद्र ]

**एकावळी**—स्त्री. एकसर; एकेरी मण्यांची अथवा मोत्यांची माळ. -के ९.१२.१९४१. [सं. एक+आवली]

**एकाहार**—क्रिवि. १ एकीकडे; अलग; पृथक् (होणें, असणें). २ एकाजवळ (अनेकांपैकीं असणें); एकाच्या ताब्यांत. [सं. एक+हार]

**एकाहारठीं एकाहारसून**—क्रिवि. (चि.) (कु.) एकीकडून; एका शेवटाकडून; एका बाजूनें. [सं. एकहार]

**एकिंदा**—पु. एकी; ऐक्य; एकता; सख्य; मैत्री; जूट. 'मुख्यांचा एकिंदा साबित आहे विलग पडणार नाहीं' -रा १०.१२१. [सं. एकता; फा. यकिंदा]

**एकूक**—वि. क्रिवि. (कु.) प्रत्येक; सर्वांपैकीं प्रत्येक वेळीं एक याप्रमाणें. [सं. एक+एक]

**एकोता**—पु. (खा.) एक कुळचार. हा विधि एक रात्रींत उरकावयाचा असतो. यांत पूजा करणारास 'भगत'; स्त्रियांस 'गवरणी'; जेवणास 'भोजन भरणें'; हरभऱ्याच्या डाळीच्या केलेल्या मुटकुळयास 'नारळें'; व भातास 'मोगरा' म्हणतात. महाएकोता असा याचा एक आणखी प्रकार आहे. -संशोधन -ऐलच २५६. [सं. एक]

**एकोत्तिष्ठता**—स्त्री. एकोद्दिष्ट श्राद्ध; प्रेतनिवृत्त्यर्थ करावयाचें एक श्राद्ध. 'सरस्वतीबाईची एकोत्तिष्ठता बाजीराव पेशवे यांनीं केली.' [सं. एकोद्दिष्ट+ता]

**एक्कल काजा**—पु. मुलांचा गोटयांचा खेळ. एक या अंकाबद्दल म्हणतात. -मखे १४१. [एक]

**एक्का**—पु. मेणबत्तीचा स्टँड; वालशीट. [एक]

**एक्का**—पु. हातावर तोलून धरण्याचा लांकडी मलखांब. -व्याज्ञा ४.१९९. [एक]

**एटक**—न. युक्ति; खुबी; तंत्र. यटक पहा. 'ज्याला माहीत नाहीं हें एटक त्यानें गाडी उलटविली म्हणून समजा!' -खेस्व १७१.

**एठाठी**—क्रिवि. (चि.) येथून [सं. इतः+इतः]

**एडीरे**—न. चिर. -राव्य ५.२९.

**एंथ**—न. (ठगी.) १ रुपये, पैसे वगैरे. २ स्त्री.

**एर, एरी**—पु. एक जातीचा मासा. हा भरलेल्या पोत्याच्या आकाराचा असून पाण्यांत कोलांटया घेत फिरतो. त्याची एकच बाजू पाण्यावर दिसते. -सह्या ४.३६. [येर]

**एरखाई**—स्त्री. एक मुलींचा सागरगोटयांचा खेळ. -मखे ३३१. [एक]

**एरंड**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.२६१.

**एलकडी**—वि. एकेरी; एककडीचा. 'घोडयांचे लगाम बहुधा एकेरी किंवा एलकडी असतात' -भूभ्र ३९. [एक+कडी]

**एलिफंट घांस**—न. एक प्रकारचें गवत. याच्या काडया जोंधळयासरख्या असतात व पात जोंधळयापेक्षां लांब असते. याचा गुरांस चारा होतो. -के २५.९.१९३६. [इं. एलिफंट+सं. ग्रास]

**एलु**—पु. (ठगी.) ठगाशिवाय एखादा मनुष्य. [येरू]

**एल्हावणें**—अक्रि. (ना.) ढोंग करणें. -महा ८.२. १९३१.

**एहतियात**—स्त्री. १ सूचना. २ (ल.) दूरदृष्टि; काळजी 'करनूल संस्थान इकडील व तिकडील सालाबाद पेषकषीचे, याजकरितां येयाची एहतियात करणें आवल म्हणोन बोलिले. -रा ७.३७. [अर. इहतियात=पूर्वसूचना; दूरंदेशी]

**एळु**—पु. (व.) वेळु; वांबू. 'बैलाचा बाई बारा कोठा मोठा एळवाचा। बावाजीचा माहा बाई नांदे कुणबी। दैवाचा।' -वलो ९५. [वेळ]

---

# ऐ

**ऐकटपत्र**—न. दोघांच्या संमतीचा कागद; समेटपत्र. 'आमच्या दोघांच्या सहीचें ऐकटपत्र लिहून मागीतलें.' -माभू २८८. [सं. एक+पत्र]

**ऐकभट्टी**—वि. ऐकींव; केवळ कानावर आलेली (जनवार्ता, अफवा, बातमी). बहुधा निंदागर्भप्रयोग. [ऐकणें+भट्टी]

**ऐकीव पुरावा**—पु. प्रत्यक्ष पाहिलेली हकीगत न सांगतां केवळ ऐकलेली गोष्ट सांगणें; सांगोवांगी गोष्ट. -ज्ञाको १७. १५०. [ऐकणें+पुरावा]

**ऐजन**—वि.क्रिवि. सदर. -मुधो. [अर.]

**ऐंडा-ढा**—पु. आयंडा पहा. भात झोडण्यासाठीं हातांत घेतलेली कवळी.

**ऐंडी**—स्त्री. ऐंडा पहा.

**ऐतार**—वि. श्रेष्ठ; अधिकतर; उच्चतर. 'सौंदर्य देखोनि ऐतार। श्रीमूर्ती वेधले मुनीश्वर। तिहीं लोकींचिया रिगोंपाति घर। परी तो स्वीकारीना।' -नहस्व ३३८. [सं. उच्चतर]

**ऐन**—न. मुसलमानी राज्यांत सनदेवर बझीर हा अरबी 'ऐन' अक्षर घालून दस्तुर करीत असें त्यास म्हणतात. [अर. ऐन]

**ऐन कमाविशी जमा**—स्त्री. शेतसाऱ्याशिवाय ज्य इतर उत्पन्नाच्या बाबी पूर्वीपासून चालत आलेल्या असतील त्या. [अर. ऐन+कमावीस+जमा]

**ऐन जमा**—स्त्री. इतर बाबी वगळून ठरलेला नक्त सारा असल जमा. [अर. ऐन+जमा]

**ऐन जमाबंदी**—स्त्री. साऱ्याची आकारणी. [ अर. एन+जमा+बंदी ]

**ऐन जिनसी विनिमय**—पु. प्रत्यक्ष वस्तूंची अदलाबदल; वस्तुविनिमय; वस्तुमोबदला; वस्तूंची देवाणघेवाण. -चपइ ३. [ अर. ऐन+जिन्स+सं. विनिमय ]

**ऐन तनखा**—पु. दक्षिणेंतील मूळ ठराविक सारा.

**ऐन तरम**—स्त्री. जमीनीच्या वर्गवारीप्रमाणें बसविलेला मूळ धारा, सारा. (विशेषतः मद्रास प्रांतात). [ अर.ऐन+ता. तरम=वर्ग, जात ]

**ऐन तैनात**—स्त्री. मुख्य तैनात. तैनातींतील मुख्य रक्कम.

**ऐन दानी**—वि. उदार मनाचा. [ अर. ऐन+दाना ]

**ऐन बाबती**—स्त्री. सरकारास द्यावयाचा मुख्य कर. राजास द्यावयाचा चतुर्थांश. [ अर. ऐन+बाबत ]

**ऐन बेरीज**—स्त्री. प्रत्यक्ष किंवा प्रमाण मानलेला धारा, सारा. [ अर. ऐन+बेरीज ]

**ऐन मुलकी**—स्त्री. मूळ धारा, वसूल, सारा. [ अर. ऐन+मुलुक ]

**ऐन शिबंदी**—स्त्री. मूळ, ठराविक सैन्याची संख्या; मूळ सरंजामी फौज. [ अर. ऐन+शिबंदी ]

**ऐनत्**—स्त्री. उधार दिलेला माल (अधिक किंमत आकारून); रक्कम व्याजी देण्याच्या ऐवजीं उधार दिलेल्या मालावरच अधिक किंमत आकारून देणें. [ अर. ऐन ]

**ऐनाति**—स्त्री. प्रमाणसारा; मूळ ठराविक सारा; नियमाप्रमाणें ठरविलेला मूळ सारा. [ अर. ऐन ]

**ऐम, ऐमा**—स्त्री मुसलमानी राज्यांत धार्मिक किंवा विद्वान् मुसलमान लोकांस दिलेल्या इनाम जमिनी. या ब्रिटिश सरकारनें इनाम, तबदिली हक्कासुद्धां मान्य केल्या. [ अर. ]

**ऐमदार**—पु. मुसलमानी राज्यांतील धार्मिक इनाम धारण करणारा. [ अर ऐम+दार ]

**ऐमबक्ष-याफ्त**—स्त्री. प्रथम देणगी दिलेल्या पण पुढें खालसा झालेल्या किंवा सारा बसविलेल्या जमिनी. [ अर. ]

**ऐमबाझी जमीन**—स्त्री. धार्मिक इनाम म्हणून धारण केलेली जमीन. [ अर. ]

**ऐममौझा**—पु. धार्मिक इनाम गांव. [ अर. ]

**ऐवज आकरम्**—न. रास उत्पन्न. [ अर. ]

**ऐवजु**—वि. मोबदल्याचा; बदलचा. [ अर. इवज ]

**ऐवार**—न. रानांतील गुरांचा वाडा.

**ऐश**—स्त्री. चैन. -मुधो. [ अर. ]

**ऐश-आरा**—पु. चैनीची सजावट करणारा. -मुधो. [ अर. ]

---

# ओ

**ओच्या नांवानें वषट्कार**-कांहीं लिहितां वाचतां न येणें. ओम्पैकीं ओ अक्षरसुद्धां न येणें. [ वषट्कार=लोप ]

**ओकणें**—अक्रि. १ पाटांतून पाणी बाहेर फेकणें-जाणें; ओक पहा. २ ओकाबोकी नांवाच्या सोंगट्यांच्या खेळांत कटावर सोंगटी नसलेलें दान पडलें असतां सोंगटी परत करणें. ओकबोक पहा. [ म. ओकणें पहा ]

**ओकाद**—न. (कु.) औषध. ओखद पहा. [ सं. औषध ]

**ओकारवाणा**—वि. अमंगळ; ज्याच्याकडे पाहिलें असतां ओकारी येईल असा घाणेरडा. 'ओकारवाणा मुखभाग दावी। जे जे वदे गोष्टिहि ते वदावी।' -वामन रुक्मि ११५. [ ओकणें+वाण ]

**ओखट पांखरूं**—न. (तंजा.) घुबड. [ ओखट=वाईट+पांखरूं ]

**ओग्राण**—न. (तंजा.) कोठी; सामानसुमान ठेवण्याची खोली. उग्राण पहा.

**ओघळ**—स्त्री. ओहोळ; खळगा; नाल्याचा खोलगा; दरी. 'तीन प्रसिद्ध दरोडेखोर कोठेंतरी ओघळींत भुयार करून दडून राहिले होते.' -के ९.४ १९४०. [ सं. वह्=वाहणें. ओघ=प्रवाह ]

**ओचकारणें**—अक्रि. बोचकारणें; ओरबाडणें; नखांनीं बोचकारे काढणें.

**ओजळचा गरबा**—पु. गुजराथेंतील गरब्याचा एक प्रकार. -व्याज्ञा १.४१३. [ ओजळ=बुरखा ]

**ओझील**—वि. भार सहन करणारा; जबाबदारी पतकरून पार पाडणारा; कोणतीहि मोठी गोष्ट अंगावर घेणारा. 'या कार्यास मोठें ओझील मनुष्य पाहिजे. तो ऐवज तर कोणांत नाहीं.' -रा ५ ७८. [ ओझें ]

**ओटाळी**—स्त्री. ओठाळी पहा. घोडयाच्या ओंठास, तोंडास बांधावयाचा दोरीचा फास (त्यास नेण्याकरितां); (कुण.) व्हटाळी. 'त्याला ओटाळी घातली आणि त्यावर स्वार होऊन पुढचें गांव लागेपर्यंत प्रवास केला.' -छच ३१.

**ओंठ निपटणें**—अक्रि. प्रसूतीनंतर मुलाच्या ओंठावरून मालीस करणें. 'मला वाटतें सुइणीनें तिचे ओंठ नीट निपटले नसतील.' -खेस्व ६०.

**ओठंबा**—पु. आधार. [ सं. उत्स्तम्भ् ]

**ओठवणें**—अक्रि. बोलून दाखविणें; हिणावणें; ओठांनीं उच्चार करून दाखविणें. [ इतर रूपें–ओटावणें; ( कु. ) ओठयणां; ( चि. ) ओठायणां ]

**ओठाळें**—न. उठाळें १ पहा.

**ओडणां, ओडाणां, ओडणें**—न. ( चि. ) १ विकारामुळें येणारा वीट; नापसंती; तिरस्कार. २ उद्योगाविषयीं, एखाद्या कामाविषयीं तिरस्कार, उद्वेग. अवढणा–णें पहा.

**ओडर**—स्त्री. जास्वंद; जपा. –मसाप ४५.३. [ सं. ओड्र पुष्प ]

**ओडवन**—न. ( महानु. ) प्राप्ति; लाभ; मिळविणें. 'देवता चेतनाची ओडवन मेळवीत असे'. 'परदेवता ओडवन मेळवी हें न घडे' –आभा १५. [ ओढणें–ओढवणें ]

**ओंडा**—पु. ग्रामदेवतेपुढें होळीच्या सणांत नाचविण्यांत येणारा पोफळीचा दांडा; शीत. हा ओंडा होळीच्या नेमावर पुरावयाचा असतो. –आडिमहा ३७. [ ओंडका पहा ]

**ओढ**—स्त्री. सलग खोली; अरुंद लांब खोली. 'ओसरीला लागून एक दहा खणांची लांबच्या लांब ओढ होती. तिला आम्ही कणंगीची खोली म्हणत असूं.' –आभाळाची सावली ७३. [ ओढणें ]

**ओढणी**—स्त्री. स्मरणी; माळ; त्या माळेंतील एक एक मणी ओढावयाचा असतो यावरून. 'त्या स्फटिक मण्यांना एकत्र गोवून त्यांची कवीनें ओढणी किंवा स्मरणी बनविली होती.' –के २२.१२.१९१९. [ ओढणें ]

**ओढा**—पु. राशींतून जेवढा कवेंत मावेल तेवढा गठ्ठा ओढून घेण्याचा कुलकर्ण्याचा हक्क. [ ओढणें ]

**ओढ्या, वढ्या**—पु. ओढयाच्या कांठावरील गुराख्यांचा देव. –आडिमहा ७. [ ओढा ]

**ओतवणी**—न. भाकरीचें पीठ नीट वळतां यावें म्हणून त्यांत घालावयाचें आधणाचें पाणी. [ ओतणें+वणी=पाणी ]

**ओथरणें**—सक्रि. देणें. [ सं. उद्+तृ–तर ]

**ओंध–द**—स्त्री. ( कों. ) रागानें, दुःखानें, काळजीनें वगैरे किंवा कांहीं अनिष्ट घडल्यामुळें कोणाशीं कांहीं न बोलतां व कांहीं न करतां ढोंपरांत मान घालून खिन्नपणें बसण्याची स्थिति. होंद असाहि शब्द रूढ आहे. [ ओंड=खोल ? ]

**ओप**—स्त्री. किंचित् उष्णता ( पदार्थाला देणें ); किंचित् तापविणें. [ का. ओप=तेज ]

**ओपणी**—स्त्री. १ समर्पण; सुपूर्त करणें. २ वधूपिता वर पित्याच्या व वधूमाता वरमातेच्या मांडीवर वधूस बसवितात तो विधि. [ ओपणें ]

**ओपणें**—सक्रि. पूर्ण करणें; संपविणें; व्रतादिकांचें उद्यापन करणें.

**ओपला**—स्त्री. तलवारीच्या धारेचा एक प्रकार. –प्रश ५४. [ ? ]

**ओपावणें**—सक्रि. खालचा आधार सुटून वर तरंगणें ( पाण्यांत पाय, जमिनींतील रहू किंवा लावणीचीं रोपें ). [ सं. उत्+प्लवन ]

**ओंब्या**—स्त्री. पाटील, कुलकर्णी वगैरेंचा शेतांतील ओंब्या घेण्याचा हक्क. [ ओंबी ]

**ओलवण–न**—न. १ पाण्याचा शिडकाव; गहूं, वरी वगैरेंना लावण्याचें थोडें पाणी. २ ओलेतें; लवकर किंवा थोड्या पाण्यांत स्नान होण्यासाठीं आड घ्यावयाचें, नेसावयाचें लहान ओलें वस्त्र. ३ ओला चारा; ओलें गवत. ( विशेषतः उन्हाळ्यांतलें ). [ ओला ]

**ओलीपाती**—स्त्री. नव्या दाण्याच्या पहिल्या विक्रीच्या वेळीं महारणीस द्यावयाचे दाणे. –अस्पृप्र ३८. [ ओली+पाती ]

**ओलीबोली**—स्त्री. जेऊन खाऊन वर पगार घेण्याचा करार. 'मी एका खानावळींत ओल्या बोलीनें कामास होतों.' –वळवाचे पाऊस. याच्या उलट सुकीबोली किंवा कोरडा पगार– म्हणजे जेवण वगैरे न देतां केवळ पैसे देणें. [ ओली+बोलणें ]

**ओली सुकी करणें**—अक्रि. चीतपट; खेळावयास सुरुवात करतांना प्रथम कोणीं खेळावयाचें हें ठरविणें. एक खापरी घेऊन तीवर एका बाजूस थुंकी लावून ती वर फेकावयाची असते, व 'ओली कीं सुकी बाजू' असें एका पक्षानें मागावयाचें असतें. त्याच्या मागणीप्रमाणें बाजू वर पडल्यास त्याचा डाव ठरतो. 'उन्हाळी पावसाळी' असेंहि म्हणतात. 'ओली सुकी करून डाव कोणी घ्यावा तें ठरवावें' –व्याज्ञा १. १३६. [ ओला+सुका ]

**ओले**—पु.अव. गारा. 'स्वैपाकांत फार वेळ घालवूं नका आतां ओले पडतील' –हिप्र १७९. [ ओला=गार ]

**ओषिक**—वि. ओसाड [ सं. ऊषिर ]

**ओसाडी**—स्त्री. एक प्रकारची वनस्पति. हिच्यामुळें खाज सुटते. [ ओसाड ]

**ओसाडी**—स्त्री. पाण्याची लाट; ( होडीवर, बांधावर ) आपटून उडणारें पाणी. [ सं. उत्+श्वस्+ड ]

**ओस्णावणें, ओस्णेवणें**—अक्रि. ( कु. ) स्वप्नांत बरळणें; झोपेंत बडबडणें. [ सं. उत्+स्वप् ]

**ओही**—स्त्री. ( तंजा. ) वारूळ; बीळ. 'मुंगी म्हणाली माझ्या ओहींत बोट ठेवलं तर सोडीन का ?' –मवि ९.६. १९०.

**ओळंग**—पु. ओघळ. 'माझे गोरे गाल इतके लालबुंद होत असत कीं, त्यावरून रक्ताचे ओळंग वाहूं लागतात कीं काय असें वाटे.' -बहत ५. [ओघळ]

**ओळा**—पु. वळण; शिक्षण; संवय. 'पोरीच्या जातीला कामाचा ओळा अवश्य हवा.' -कुस ८. [ओळ]

**ओळिंबें**—न. शिंकें. 'पक्षांच्या घरांतील जागा स्वच्छ राखण्यासाठीं अंड्रीसबाबा एक शिपतरासारखें ओळिंबें बांधीत.' -स्यूतस्यौ १२२. [सं. अव+लंब्]

# औ

**औकत**—स्त्री. सामर्थ्य; शक्ति; पात्रता. 'वाघिणीच्या औकतीपेक्षां तींत जास्त माल आहे असें आढळून आल्यास' [अर. औकात=परिस्थिति]

**औकाफ**—स्त्री. मुसलमानी धार्मिक संस्था. -सिंश. [अर. वक्फ अव.]

**औगत**—स्त्री. प्रसूतीनंतरच्या पहिल्या दहा दिवसांत मृत झालेली बाळंतीण. ही सामान्यतः पिशाच्च होते अशी समजूत आहे. [सं. अव किंवा आ+गत]

**औगात, औघात**—क्रिवि. (कु.) अकस्मात्; एकाएकीं (येणें, ओढवणें). २ अल्लाद; न लागतां (ओलांडून जाणें, उडी मारणें). [अव+घात]

**औचाट**—वि. अवजड (ओझें); कठिण (काम); न समजणारें (भाषण). [अवचाट; अचाट ?]

**औचितां**—वि. (चि.) हळवें; लवकर पिकणारें (भात). [अवचित]

**औचूत**—क्रिवि. (कु.) अकस्मात्; एकाएकीं. [सं. अव+स्यूत; अवचित]

**औटघडी**—वि.क्रिवि. अल्पकाळचें; थोडावेळ टिकणारें. [औट+घटि]

**औटाण**—न. गैरवेळ; अवेळ; गैरहंगाम. [अव+स्थान]

**औटी**—पु. वजन मापांवर देखरेख करणारा अधिकारी. अवटी पहा.

**औटिक, औटीक**—वि. क्रिवि. चमत्कारिक; कौतुकास्पद; नवल वाटण्याजोगें (बोलणें).

**औठाण**—न. उठाणूं; गळूं; टेंगूळ. उठाणूं पहा.

**औदक**—वि. पाण्यांतील जंजिरा; पाणकिल्ला. -ज्ञाकोक ४९. [सं. उदक]

**औदांडो, औधांडो**—पु. (कु.) १ मोठा जोराचा पाऊस व वारा. २ मोठा पूर. -वि. अति द्वाड; उर्मट; हालमस्त. [सं. अव+दण्ड]

**औपनिवेशिक स्वराज्य**—न. वसाहतीचें स्वराज्य. (इं. कलोनियल गव्हनमेंट). [सं.]

**औदुंबरपंचमी**—स्त्री. माघ वद्य पंचमी.

**औलियाई**—वि. उच्च. -मुधो. [अर.]

**औष**—पु. अंश पहा. -पेम. [सं. अंश]

**औसत**—वि. मधील; सरासरी. [फा.]

# क

**कइक**—वि. कैक; कित्येक; पुष्कळ. [कई+एक. कतिपयः एकः]

[**कइ(ई)ड, कइ(ई)फ, कइची** इत्यादि शब्द कै मध्यें पहा. **कउ(ऊ)ठ** इत्यादि कौठ किंवा कवठमध्यें पहा.]

**ककरी**—स्त्री. कंकर पहा. बारीक खडे; दगडाच्या बारीक चिपा.

**कंकणा**—पु. पवित्र्याचा एक प्रकार. -प्रश १६. [सं.]

**कंकणीप्रेम**—न. जबरजस्तीचें प्रेम; अघोरी प्रेम. (गडकरी यांच्या पुण्यप्रभाव नाटकांतील कंकण यानें वसुंधरेबद्दल दाखविलेल्या प्रेमाप्रमाणें.) 'जपान चीनवर करीत असलेलें कंकणी स्वरूपाचें प्रेम फार उत्तम म्हणावयाचें!' -जका. [कंकण एक नाट्यपात्र+प्रेम]

**ककही**—स्त्री. ऱ्हस्वचिकणी; गांगेरुकी; नागबला. -मसाप ४५.४. [सं.]

**कंकाळी**—स्त्री. डाकिनी; शाकिनी; क्षुद्रदेवता. 'राक्षस रुधिराच्या कल्लोळीं। तृप्ती कंकाळी करूं आजी॥' -भावार्थरा बाल ५. [सं.]

**कंगणी**—स्त्री. तलवारीच्या मुठीची मोगऱ्याखालची वाटोळी खोबण. -प्रश ५५. [सं. कंकण]

**कंगरी, कांगरी**—स्त्री. शेगडी. -काश्मीप्र.

**कचक**—स्त्री. लगाम, कंबरपट्टा वगैरेस लावावयाची कडी 'सोन्याच्या कडया तीन व कचक येक केली' -दुबारो ११.

**कचकट**—वि. कच् असलेलें (धान्य, पदार्थ); रेव असलेली (भाकरी, पोळी, उसळ इ.). [कच्+कट ध्व.]

**कचाला**—पु. (कों.) चुरा; तुकडे. 'निष्ठुर पाषाणी धन्यानें सर्व मातीचीं भांडीं फोडून केलेला कचाला चुलीकडेच पडला होता.' -महाशा सप्टें १९३६. [कच]

**कची**—स्त्री. बांधणी; रचना; मांडणी. 'त्यांची विचारांची कची आचार्यांच्या सारखीच आहे.' -उपेअंत १६३.

**कची**—स्त्री. एक प्रकारचें गलबत: (बहुधा कच्छी). 'दोन गलबतें अर्नाळ्याजवळच पकडलीं त्यापैकीं एक कची होती' [ कच्छ ]

**कचोळे**—पु. पाठारे प्रभूंतील एक पोटजात. -ज्ञाको १७.२४८. [कचोळें; कांचोळी ?]

**कच्चीकारी**—स्त्री. नक्षी 'घुमटांत कच्चीकारी केली आहे.' -ज्ञाको २०.१९१. [ ? ]

**कच्छार**—न. पाणथळ जमीन; दलदल. 'जाटाची फौज दरोबस्त माहाव्याचे कच्छारावर पडली आहे.' -पेद २.८६. [ सं. कच्छ ]

**कच्छी**—स्त्री. कच्छकडील लहान गलबत. 'फेम नांवाच्या कच्छीशिवाय दोन बॉम्बकच्छा आणि खेरीज ४८ गलबतें असा सरंजाम होता.' -ऐपो २.५५१. [ कच्छ ]

**कच्छेलक**—पु. खड्गाचा एक प्रकार. -प्रश १७. [सं.]

**कजा**—स्त्री. १ मृत्यु. २ हुकूम; आज्ञा. -आफ. -मुधो. [ अर. कझा ]

**कंजाळ**—न. गवत. [ ? ]

**कजियेरजिये**—पु.अने. भांडणतंटे; कलह. 'धरणीपारणी कजियेरजिये जितके करावयाचे तितके सोलाहि संस्कार जाले' -पेद २०.१२५. [ कज्जा द्वि ]

**कज्जलपात्र**—न. तलवारीचा एक प्रकार. -प्रश १५. [ सं. ]

**कट**—न. गवत; तृण. कटाग्नि पहा. [ सं. ]

**कंटक**—पु. ( फज्यो. ) केन्द्र; कोणत्याहि ग्रहापासून ४, ७, १० हीं स्थानें.

**कटकंजन**—न. कटंजन पहा.

**कटकरोहिणी**—स्त्री. कटुकरोहिणी पहा.

**कटकी**—वि. कटक येथील. 'इ. स. ११६७ कटकी शक १६८१; सन ११७१ कटकी शक १६८५' [ कटक शहर ]

**कटकीची चोळी**—स्त्री. स्तन उन्नत दिसतील अशा रीतीनं कापड कापून शिवलेली चोळी. पूर्ण खण न घेतां कटकीखण(=पाउण खण) घेऊन शिवलेली चोळी. [ कटका=तुकडा ]

**कंटकी वन**—न. कांटेरी रान. 'वाढविलें कंटकी वन।' -रावि नव २१८. [ सं. कंटक=कांटा+वन ]

**कटकै**—न. ( महानु. ) सेनाप्रयाण; सैन्याचें कूच. 'कीं कटकै मांडिलें' -नरुस्व १९.५; 'कटकै करोनि आलें' -ऋ. 'मग कटकै विचारी दोओराओ' -ऋ. [ सं. कटक=सैन्य ]

**कटवा**—पु ( राजा. ) गडवा; तांब्या. -आडिमहा ९.

**कटाकटी**—क्रिवि. जेमतेम; कसेंबसें. [ कटणें-काटणें ]

**कटाडी**—पु. कठडा. 'जिकडे तिकडे कटाडी खिडक्या जाळ्यावरी' -ऐपो २.१५१. [ सं. कटि ]

**कटारा**—पु. गलबताचा सांगाडा; माल काढून घेतलेलें गलबत; खटारा. 'तुम्ही लिहिलें कीं गलबताचा जिन्नस घेऊन कटारा सोडून दिला' -पेद २४.१८४. [ खटारा पहा ]

**कटिबंध**—पु. ( मल्लखांब. ) वेताच्या मल्लखांबाची अढी कमरे भोंवतीं बसवून मारण्याची उडी. -व्याज्ञा ३ ३.२९. [ सं. ]

**कटीची जागा**—स्त्री. [सोंगट्यांच्या खेळांत कट ( फुली असलेलें घर ) ही महत्त्वाची जागा असते; कारण त्या जागीं असलेली सोंगटी मरत नाहीं यावरून ] नाकें; महत्त्वाची जागा; मोक्याची जागा. 'संख्येनें थोडें असलें तरी हिंदी लोक हेच ब्रह्मदेशांतील आर्थिक जीवनांतील कटीच्या जागा व्यापून बसले आहेत.' -के ९.९.३८. [ सं. कटि ]

**कटुक**—कटुकी पहा. एक झाड. 'कटुक, तान्या, अंजन, कुंबा, हेळ वगैरे इमारतीचे उपयोगी झाडें ठिकठिकाणीं आहेत.' -खेया.

**कटोकटीं**—क्रिवि. सरासरी; कसेंबसें; जेमतेम; मोठ्या मुष्किलीनें ( एखादी गोष्ट होणें; माप भरणें, इ. )

**कटोरी**—स्त्री. ५कांचोळीचा ( स्तनावरील ) भाग. 'परंतु तिच्या कटोऱ्या आणखी कांठ हे जरीचे होते' -धर्मा १५७.

**कट्टाकट्टी**—क्रिवि. कटाकटीनें पहा. जेमतेम; कसाबसा. 'बनारसहून निघालों त्यावेळीं कट्टाकट्टी झांशीपर्यंत भाड्यापुरते पैसे माझ्याजवळ शिल्लक होते.' -माभू ९०. [ कट ]

**कट्याळ**—न. अरिष्ट; कट्याळ; कवटाळ पहा.

**कठडा**—पु. कटारा पहा. 'ते माल खेरीज करून कठडे बमेय सरंजाम असेल त्याप्रमाणें' -योमा ९.२३८.

**कंठवर्त**—पु. ( युद्ध. ) पवित्र्याचा एक प्रकार. -प्रश १६. [ सं. ]

**कंठाळी**—स्त्री. गोधडी; कंथा; खिचडी. 'शाचें नाटक म्हणजे अनेक विचित्र व विस्मयजनक प्रसंगांची कंठाळी होय.' -रचले २१५. [ सं. कंथा ]

**कंठाळी**—स्त्री. ओरड; गडबड; गलबला. 'परोत्कर्षासहिष्णु स्वभावाच्या मंडळींनीं जी कंठाळी उठविली.' [ सं. कंठ ]

**कंठी**—स्त्री. पोपटाच्या गळ्याभोंवती दिसणारी रंगीत रेघ; कंठवलय. [ कंठ ]

**कंठी**—स्त्री. तलवारीच्या मुठीचा हातांत धरण्याच्या जागेचा कंगोऱ्या सारखा खोल भाग. ( कटोरी व जनेऊ यांमधील ). -प्रश ५५. [ कंठ ]

**कठीया**—पु. (महानु.) पुजारी; गुरव. 'देवतेचा कठिया' -दृष्टान्त.

**कडक**—पु. (लाठी.) १ गुढग्यावरील मार. २ फरीगदका यामधील गुढग्यावरील वार. -व्याज्ञा ४.३८७.

**कडगंची**—वि. अस्सल. 'सायंदेवाच्या घराण्यांतील कडगंची प्रतींत जे १७५ श्लोक आढळले तेवढीच गुरुगीता प्रमाणभूत मानली.' -के १.३.३८.

**कडचा**—पु. पातडें; टिपणी; दैनंदिनी. 'प्रभुची जशी दशा होत होती ती सर्व स्वरूप दामोदर आपले कडचामध्यें लिहित असत.' -गौरांग ५५५.

**कडतर**—न. (महानु.) पोथीचा तुंडा; फाटकी पोथी. 'दोनचार कडतर पाहिलें.'

**कढतरून**—क्रिवि. (महानु.) अंतर्बाह्य; झरकन; स्पर्शून. 'स्वरूप कडतरुनि व्यापिलें.' -प्रमेय.

**कडता**—पु. वचपा. 'कामाच्या दगदगीमुळें जितके जितके दिवस बायकोशीं मनमोकळेपणानें गप्पाविनोद करतां आला नाहीं त्याचा कडता काढावयाचा.' -सह्या सप्टें १९३८.

**कडधन**—न. कडधान्य; कडदण पहा. 'दीड बिघा अडीच पांड जमिन गिलावस (गिमवस) कडधन' -समारो ४.६०. [सं. कठ+धान्य]

**कडप**—न. हिणकस सोनें; तांबें मिश्रित सोनें. [?]

**कडपाळें**—न. लगाम. 'अंकुश कडपाळें लेखणी। इतुके वोपी माझ्या पाणीं॥' -मुक्ते नव ८९.

**कडबाड**—न १ (महानु.) कडबा; ज्वारीचा धांडा. २ (ल.) देह; शरीर. 'देशाचा शेवटी कडबाड पाडावे'; 'देशाचा शेवटी झाडातळीं मुळा घालावी' -प्रमेय.

**कडभोग**—पु. प्रसाद. [?]

**कंडरा**—स्त्री. मोठा स्नायु. [सं.]

**कडलग**—पु. (महानु.) शिडी. 'प्रेमाचा कडलग। टाको कैवल्या दुर्ग।'

**कडवर**—क्रिवि. कडेपर्यंत; शेवटपर्यंत. [कडा+वर]

**कडा**—स्त्री. कड पहा. कांठ; किनारा; शेवट; अखेर; पदर; तीर.

**कडा**—पु. भृगु. -राव्य ७.२.

**कडाणी**—स्त्री. कडण पहा. दरड; कडा; कपारी; घळ. 'गायकवाडाचे बुणगे गडाच्या कडाणीस गेले' -रा ६. पृ ६४. [कडा]

**कडावळ**—स्त्री. (इंदूरी.) चांदी कडीरूपांत. -के १.९. ३६. कडिवळें पहा.

**कडी**—स्त्री. छाप; वरचष्मा; जरब. 'येकाद किला देतील तर न कले कडी बसेल तेहि सर्व तप कोण्ही वेंचील तर घडेल की न घडे.' -पेद ३३.३०९. 'यांस खर्चाचे आनुकूल असल्यावर कडी बसेल' -पेद ३३.३२८.

**कडीति**—स्त्री. भोवर. -राव्य ५.८.

**कडीवळ**—पु. सहाय्यक; मदतनीस; कडवळ. 'बाईः जाडि वाहावेनाः तरिः एकू कडीवळ कां खडानाः' -लीच ३ पृ ७०.

**कडेकरी**—पु. पाषाणवाहक. -राव्य ७.१४.

**कडेलोट**—पु. कड्यावरून लोटून देऊन मारण्याची शिक्षा. भृगुपात. -राव्य ७.२. [कडा+लोटणें]

**कडे वेंघविणें**—कमर ढिली करणें; कमरेचा कांटा मोडणें. 'दोन तीनसे राऊत आणिले होते ते दोन तीन मजलीवर आले आहेत. मारून कडे वेंघवितो. (त्यांनीं) काय करणें आहे म्हणोन लाहाने तोंडे थोर घास घेऊ लागले आहेत' -पेद ६.८५. [सं. कटि+वेंघविणें]

**कंडोळ**—न. एक फळझाड. फळ लिंबाएवढें असतें. कवंडल. कडु वृंदावन असावें. [सं. कटुवृंदावन]

**कड्या(ड्यो)नाग**—पु. बिरंबोळयासारखी एक वेल व तिचा कंद. हा बिरंबोळयासारखाच पण त्यापेक्षां वाटोळा असतो. हा कंद फार विषारी आहे. पावसाळयांत कुंपण, गडगे, झुडपें यांच्या आश्रयानें हे वेल वाढतात. [कडें+नाग]

**कढई**—स्त्री. स्वयंपाक; रसोई. (कढईमध्यें स्वयंपाक करतात यावरून लक्षणेनें). 'नर्मदा प्रदक्षिणावासी मंदिरासमोर असलेल्या पटांगणावर उतरतात तेथें नर्मदेची कढई करितात' -के ६.७.३७. [सं. क्वथ्]

**कढिवा**—स्त्री. कटि; नितंब. 'उदरीं त्रिवळीचे लक्षण। कवण माजाचें मोटकेपण। घणवट कढिवा करिताए माजवण। मदन सुखासी॥' -नरुस्व ३२२. 'कढिवां लेकरूं' -बल्हो १०५. [सं. कटि; म. कड]

**कणकणीत**—वि. थोडा ताप असलेलें (अंग). [कण-कणणें]

**कतरणी**—स्त्री. १ कातरा; चुरा. 'डेक्कन साबणाच्या कतरणी पिशव्या' -त्रिकाळ १५.१०.३२. २ कापणी; कातरण्याची क्रिया. [सं. कर्तन]

**कतरणें**—सक्रि कातरणें; चुरा करणें. [सं. कर्तरी]

**कत्तर खाणें-देणें**—अक्रि. भोंवऱ्याच्या खेळांत भोवरा उभा सरळ न फिरतां तिरपा कडेवर फिरणें. -व्याज्ञा १.१५९. [सं. कर्तरी]

**कत्ल**—स्त्री. कत्तल पहा. [अर.]

**कथावस्तु**—स्त्री. कथानक. **०निर्मितिशक्ति**-स्त्री. कथानकाची कल्पकता. ( इं. क्रिएटिव्ह जीनिअस ).

**कदंबसूत्रीय भोग**—पु. नक्षत्राचें एका विशिष्ट स्थिर बिंदूपासून अंशात्मक अंतर; नक्षत्राचे अंश. [ सं. ]

**कदम कसती**—स्त्री. पायांनीं चालणें;पायांनीं श्रम करणें. ' उभयतां कदम कसतीनी जागा चालून उभयतां बंधूंच्या भेटी जाहल्यानंतर खंडया कुत्र्याच्या पालखीपुढें जिलीब, शाहजणें नगारे निशाणें चाललीं ' -शाहूब भारतवर्ष ५४. [ फा. कद्म कस्ती ]

**कदम चस्पी**—स्त्री. पादस्पर्श. -राव्य ८.३६. [ अर. ]

**कदमी**—स्त्री. मध्यस्थी; कोणत्याहि कामांत पाऊल टाकण्याबद्दलची बिदागी; भलाई करण्याबद्दल शुल्क. ' पेशव्यांनीं निमे रुपये कदमी घेतली आहे ' -रा ६ पृ २२.

**कंदराकंदल**—न. गवताची एक जात. -चित्रकृषि २.६.

**कदियान**—पु. मुसलमान धर्मांतील एक पंथ. [ ? ]

**कंदी पेढे-बर्फी**—पु. खवा भाजून पक्का करून साखरेच्या पाकांत मळून तयार केलेले पेढे, इ. [ कंद=खंड=साखर ]

**कद्गन**—स्त्री. ताकीद. -आफ. [ अर. ]

**कद्र**—स्त्री. कदर पहा. -आफ.

**कनकट-ड, कनकाट-ड**—न. ( कु. ) चढावयाकरितां उपयोगांत आणावयाचा बांबू, कळक. [ ? ]

**कनकावळा**—पु. शेतांतील बुजगावणें; बुजकणें पहा. -आनंद, नोव्हेंबर १९४१. १४०.

**कनत**—स्त्री. कळ; अडचण; कष्टदशा. ' घडीभर कनत काढ ' -श्रृना १०१.

**कनाटा**—पु. पाठीचा कणा. ' कनाटयावर गोळी लागली तर जागच्या जागीं वाघ जायबंदी होतो पण मरत नाही ' -किर्लो नोव्हें १९३५.

**कनाळ**—स्त्री. डोंगर माथ्यावर जी दाट झाडीची जागा असते ती. ' गाया येंघती कनाळ ' -बाळेश्वरीचीं गाणीं. -मसाप ६.१११.

**कनीस**—न. ( महानु. ) १ कणीस. २ ( ल. ) देह; शरीर. ' हे जे करीत होता तेणें याचें कनीयेसु जातें ' -उच २९.

**कन्नडिग**—पु. कानडी भाषा बोलणारे लोक. [ सं. कर्नाटक=कन्नड ]

**कन्युरह**—पु. कंगोरा. -मुधो. [ अर. ]

**कपट**—न. केळीचें सोपट. [ ? ]

**कपला**—पु. तुकडा. कपळी पहा.

**कपळी**—स्त्री. खपली; बारीकसा तुकडा. [ कर्पर ]

**कपाटवक्ष**—वि. ज्याची छाती दरवाजाप्रमाणें रुंद व भक्कम आहे असा. ' वृषस्कंध व कपाटवक्ष असेंहि वर्णन नेहमीं येतें. ' -व्याज्ञा १.४५. [ सं कपाट+वक्षस् ]

**कपायी**—स्त्री. मल्लमार्जनी. -राव्य ५.३३. [ फा. ]

**कपाली**—स्त्री. एक मुसलमानांची जात. वस्ती मही-कांठा भागांत; अल्लाउद्दीन यानें १३०० च्या सुमारास यांस बाटविलें. हे मूळ कनोजी ब्राह्मण. [ सं. कपाल ]

**कपाळ अढी**—स्त्री. ( मल्लखांब. ) मल्लखांबापासून थोडें दूर उभे राहून मल्लखांबावर कपाळ टेकून मारलेली उडी. ' -व्याज्ञा ३.६५. [ सं. कपाल+अड=अढी ]

**कपाळ धुवून घेणें**—मनुष्याचें भाग्य ललाटलेखांवर अवलंबून असतें अशी समजूत आहे; तीवरून कपाळ धुवून घेणें म्हणजे एखाद्याचें भाग्य हिरावून घेणें; नशीबांत असेल तें घेणें; प्राक्तनांत लिहिलेलें हिरावून घेणें; ' कपाळाचें कातडें नेणें 'असेंहि म्हणतात. ; ' आमचे कांहीं कपाळ धुवून नेत नाहींत हर कोठें दहा पाच हजार रुपये मेलवून अबरूनें व विश्वासानें पोटा भरूं ' -पुद १.२७५.

**कपाळपाटी**—स्त्री. आटयापाटयांच्या खेळांतील अगदीं पहिली पाटी; चांभार पाटी. -व्याज्ञा १.२२०. [सं. कपाल+पट ]

**कपी**—पु. ( सांकेतिक. ) [ कपि म्हणजे वानर. इंग्रज हे लाल तोंडाचे म्हणून त्यांस वानर, कपि असे शब्द संकेतानें लावीत. सीतेनें वर दिल्यामुळें हे हिंदुस्थानचें राज्य भोगणार आहेत अशी समजूत अनेक ठिकाणीं व्यक्त केलेली आढळते. ] इंग्रज लोक. ' इकडील वर्तमान कपी सुरतेस आले. पुढें श्रीमंत दादासाहेबहि सुरतेस आले ' -भारतवर्ष पत्रें यादी ७४.

**कपिलभस्मा**—स्त्री. एक वनस्पति; कर्कश; कापिल्य. -मसाप ४५.५. [ सं. ]

**कपिलासंगम**—पु. भीमा व कृष्णा यांचा संगम. हा गांव रायचूरच्या उत्तरेस आठ कोसांवर आहे. ' मनसुकदासबाबा यांचे नातु यांनी कपिलासंगम श्रीकृष्णातीर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं ' -रा १.५१. [ सं. ]

**कपुतपण**—न. कुपुत्रता. ' सर्व राज्यांत कनिष्ठास विभाग देऊन आपल्या अंगी कपुतपण व नामर्दी कशी घेवते ' -पेद २.११. [ सं. कु+पुत्र ]

**कपोलक**—न. खड्गाचा एक प्रकार. -प्रश १७. [ सं. ]

**कप्रत**—स्त्री. तंटा बखेडा. कफारत पहा. ' सालसी प्रान्तावर कप्रत घालून बदनक्षा करून आपण जिर्वांनसी गेला. ' -पेद ३६.३१३. [ अर. कुफ्रात ]

**कफबदोज**—पु. पादरक्षाकारक. –राव्य १०.१४. [अर.]

**कफा**—पु. अशुद्ध अफूचा पातळ रस एका मडक्याच्या तोंडावर फडकें ठेवून गाळतात व तें फडकें वाळवितात, त्यास कफा म्हणतात. –ज्ञाको अ ५५९. [अर.]

**कबजा**—पु. तेनाळ; तलवारीच्या म्यानाच्या तोंडाशीं बसविलेला धातूचा नक्षीदार तुकडा. –प्रश ६८. [फा. कब्ज]

**कंबरबार**—करवनुली कारकून.

**कबरांबर**—न. वेणीवरचा पदर. 'परतता कबरांबर नावरे। पदरही हृदयावरि वावरे।' –नृसिंहा नव १३०. [सं. कबरी=वेणी+अंबर=वस्त्र]

**कबायिल**—काबीलचें अनेकवचन. –मुधो. [अर.]

**कबिशी**—स्त्री. दोन्ही टोकें अणुकुचीदार असलेला लोखंडी खिळा; सुरखा. (दोन फळ्या जोडण्याच्या कामीं उपयोगी.) [?]

**कबी**—क्रिवि. कधीं; कधींहि; केव्हां. [फा.]

**कबूतर**—न. लहान मुलांच्या दस्ता पिंजर या खेळांतील संज्ञा. चार ही संख्या. –व्याज्ञा १.१४२.

**कबूलदारम**—क्रि. कबूल करतो. –आफ. [अर.]

**कब्ज**—पु. कबजा; ताबा; हस्तगत होणें; पावती. –आफ. –मुधो. [अर.]

**कमन्द**—स्त्री. जाळें. –मुधो. [अर.] **०अंदाज**–पु. जाळें टाकणारा शिकारी. –मुधो. [अर.]

**कमपेश-बेश**—वि. कंपेश पहा. जवळजवळ; कमी अधिक. 'कमलबंदीच्या यादी कमपेश केल्या असतील त्या रद्द असोत.' –थोमारो ९.२२३. 'कमबेश मामिलत ठहरून उभयपक्षी वाट धरितील' –पेद २१.२७. 'याजवेगळे मऱ्हाटे तो कमबेश लाख फौज आहे.' –पेद १.४.

**कमर**—स्त्री. डाव्या उजव्या कमरेवर केलेला वार. –मवि ९.११. –व्याज्ञा ४.३८४.

**कमरखोडा**—पु. (कुस्ती.) कमरस्वारी; प्रतिपक्षाच्या कमरेस घातलेला विळखा. [कमर+खोडा]

**कमरंद**—न. कमरक पहा. एक झाड. –पेम.

**कमसखुनी**—वि. मितभाषी; थोडें बोलणारा; संकोची. 'बेरमर्द आणि कमसखुनी भले माणूस नेकजाद दाऊद खानाचा वाका जालियावरी तवाईखाली आले.' –पेद १७.१७०. [अर. कम=थोडें+सखून=शब्द]

**कमसेरा**—वि. स्वस्त; कमी रोजाचा; कमी मजुरीचा. 'कमसेरा परन्तु चांगले गाडदी मिळाले तर ठेऊन त्यास पाठवून तेथें आहेत ते तुम्ही आपले जवळ आणावे' –पेद २८.१९९. [कम=थोडा+शेर=रोजमुरा]

**कमान**—स्त्री. पतगास लावलेली कंसाकार कांबटी. –व्याज्ञा १.१६१. [फा.]

**कमानचक्र**—न. एकसारख्या चक्राप्रमाणें कमानी टाकण्याची कसरत. –व्याज्ञा ३.४२६. [फा कमान+सं. चक्र]

**कमालखानी सवाल**—पु. निरुत्तर करणारा प्रश्न; बिनतोड प्रश्न. 'रसिक टीकाकारांची मुस्कटदाबी करणारा बिनतोड कमालखानी सवाल करणाऱ्या केशवसुताकडे' –सह्याद्रि सप्टें. १९४०.७४५. [कमालखान नांवावरून बनविलेला शब्द; यास ऐतिहासिक आधार नाहीं]

**कम्तरीन**—वि. नीचतम. [फा.]

**कयामत**—स्त्री. प्रलय; जगाचा अंत; सर्व नाश. 'यजमानाचें विपरीत वर्तमान आम्हांस कयामतशी भासली, अत्यंत फिकरीत होतो' –रा ३.३७२. [अर. कियामत=अनर्थ; प्रलय; जगताचा अखेरचा दिवस]

**करकरीत**—वि. कच्चा; हिरवा. 'एकें हिरवीं करकरितें। येकें बहुबीजें बुचबुचितें।' –भारा. किष्कां १५.९१. [ध्व.]

**करंजणें, करंदणें**—अक्रि. कंटाळणें; त्रासणें; वैतागणें; थकणें; हताश होणें; मेटाकुटीस येणें. (गरिबी, दगदग वगैरे-मुळें) [?]

**करंज्यावाघ**—पु. वाघाची लहान जात. –किर्लो. नोव्हें १९३५. [?]

**करडी**—स्त्री. एक प्रकारचें पांढुरकें, आखूड, बारीक व निपाती गवत. [?]

**करंडी**—स्त्री. कंडी पहा. वेळूची उभी टोपली. हींत मनुष्यास बसवून पाठीवर घेतात.

**करंतणें, करांतणें**—अक्रि. (कु.) करंजणें पहा.

**करदान बस्तान**—न. कर्दन बस्तन पहा. –पेम.

**करन्यास**—पु. अंगुष्ठ, तर्जनी, मध्यमा, अनामिका, कनिष्ठिका व करतल यांस अनुक्रमें समंत्रक स्पर्श करणें. [सं. कर+न्यस्–न्यास]

**करम**—स्त्री. कृपा; औदार्य. –आफ. [अर.]

**करमणां-णें**—न. १ चटणी. २ आंबट (पदार्थ) फळें मिठाच्या खारांत ठेऊन खारवून केलेलें तोंडी लावणें. करंबट पहा.

**करयात**—स्त्री. कर्यात; करियात पहा. कांहीं खेड्यांचा महाल. 'मीठ बंदर पेठ शिवापूर कर्यात नेवरें सुभा प्रांत राजापूर' –बाबारो २.६३. [अर.]

**करल**—न. चुनखडी. करळ पहा. 'धारावीचें ठाणें बांध याकरितां चुन्याच्या भट्टया लावून उरनचा करल नेऊन काम सुरू केलें' -वसमो.

**करवडे**—न. अव. हत्तीचीं पिलें. 'मारोनि गज करवडे। ऋषी आश्रमीं टाकी मडें।' -भारा किष्कं १०.१३२. [ सं. करभ ]

**करवती मगरी**—स्त्री. एक तलवारीचा प्रकार. -प्रश ३१. [ करवत ]

**करवा**—पु. गडवा; तांब्या. कटवा पहा. -आडिमहा प्र ९.

**करळ**—पु. ( सोनारी ) फुलांचा ठसा. [ ? ]

**करा**—पु. मणि. 'बारिक करे' -बाबारो ३.१६९. [करक]

**करारति**—स्त्री. करद्रव्य. -राव्य ८.८९.

**करिहारी**—स्त्री. काकलावी; लांगलिकी; अग्निशिखा; एक वनस्पति. -मसाप ४५.४.

**करीन**—अ. जवळ; युक्त. -मुधो. [ अर. ]

**करुणाष्टक**—न. करुणरसांत देवास आळविणारा आठ श्लोकांचा गट. [ सं. करुण+अष्टक ]

**करूब**—पु. देवदूत. [ इं. चेरब ]

**करे**—एकवचन करा पहा.

**करेंज**—पु. भूम्यन्तर्गत पाण्याचा पाट. -मुमुशा.

**करेबु**—पु. स्त्री. गंडिनी; भाषा; कलंबी; एक वनस्पति. -मसाप. ४५.५.

**करोडरज्जू**—पु. पृष्ठवंश रज्जू. पाठीचा कणा. 'मल्लखांबाचे मेहनतीनें पाठीच्या करोडरज्जूस उत्तमप्रकारें व्यायाम होतो' -व्याज्ञा ३.३९. [ करोडरज्जू ]

**करोल**—वि. भक्कम; दृढ; अढळ. 'करोल पुरावा.'; 'अधिवेशन भरविण्याचा करोल निश्चय पाहून त्यांना अटक केली.' -के २६.१२.४१. [ अर. करावुल ]

**कर्कटा**—स्त्री. चित्रा; गवाक्षा; गोडंबा; एक वनस्पति. -मसाप ४५.५.

**कर्कटी**—स्त्री. काकडी. [ सं. कर्कटिका ]

**कर्छा**—पु. जवन. -राव्य ५.३३. [ अर. ]

**कर्जबातरीक**—क्रिवि. कर्ज म्हणून; कर्जासारखें; ऋणरूपी; ऋणमिषानें. 'चार लक्ष रुपये आज पाहिजेत नाहींतर परिछिन्न जीव वाचत नाहीं. कर्जबातरिक घ्यावे' -पेद २०.१८९. [ फा. कर्ज़+बा+तरीक ]

**कर्ज लवाद मंडळ**—न. सावकार व रिणको यांच्यामधील कर्जासंबंधीं तडजोडीनें निकाल करणारी समिति.' -के २६.६.३६. [ कर्ज+लवाद+मंडळ ]

**कर्जहसना**—स्त्री. ऋणग्रहण; बिनव्याजी कर्ज; इच्छेस येईल तेव्हा परत करावयाचें कर्ज. -राव्य ८.१०. [ अर. ]

**कर्णपीडनासन**—न. उताणें निजून दोन्ही हातपाय मागें नेऊन गुडघ्यांत वाकवून कानांस लावतात, असें व्यायामाचें एक आसन. -व्याज्ञा ४.५०४. [ सं. ]

**कर्णफोड**—पु. कानांत होणारा फोड. यास गोसावी असें म्हणतात. [ सं. कर्ण+स्फोट ]

**कार्णिक**—पु बाणाचा एक प्रकार. -प्रश १९. [ सं. ]

**कर्तर**—पु. कर्ता; कारभारी; सर्वाधिकारी; ( म्हैसूरकडील संज्ञा ). 'म्हणाले जे सकाल तुम्हास बोलाऊं पाठवून कर्तराची भेट करतो' -पेद ४०.११६. [ सं. कर्ता ]

**कर्द**—क्रि. केला; केलें. -आफ. -मुधो. [ अर. ]

**कर्दह**—अ. करून.

**कर्दहअन्द**—केलेले आहेत.

**कर्दानीदह**—अ. करवून. -आफ.

**कर्नात** ( कमानीची )—स्त्री. वज्रमुष्टीचा व्यायाम. उभे राहून बैठक घेऊन उठून एक एक पाय कमानें गुडघ्यांत मोडून वर घेऊन फिरकी मारावयाची. -व्याज्ञा ४.९५.

**कर्नाटक कलह**—पु. अल्प कारणावरून भांडणतंटा; झोंबाझोंबी; क्षुल्लक कारणावरून मोठमोठ्यानें शब्द निघून होणारा कलह. [ कर्नाटक+कलह ]

**कर्मसिद्धान्त**—पु. कर्मविपाक; मनुष्यास त्याच्या कर्माप्रमाणें गति प्राप्त होते व पूर्वसंचिताप्रमाणें त्यास या लोकांत स्थान मिळतें व त्याच्या हातून कृति होते हा सिद्धान्त. [ सं. कर्म+सिद्धान्त ]

**कर्मेंद्रियपंचक**—न. कर्मेंद्रिय पहा.

**कर्मऱ्हाट, कर्मऱ्हाटी**—स्त्री. ( महानु. ) कार्मिकवर्ग; प्रवृत्तिमार्ग. [ कर्म+रहाटी ]

**कर्मवर्म**—न. छिद्र; दोष; कच्चेपणा; उणेपणा. 'मोर्चेबंदी करणें तेव्हां गोवलकोटची कर्मेवर्मे मनास आणून मोर्चे घालावे लागतात.' -पेद ३.११६. [ सं. कर्म+वर्म ]

**कर्रा**—पु. खरखरीत मोजा. -१.१६२.

**कर्वती**—स्त्री. पाणी ठेवण्याची झारी. कऱ्हा पहा. 'तथा कर्वति' -प्रसे ९४. 'कर्वतीतील पाणी' -स्मृति.

**कर्वळ-ळी**—स्त्री. टाळी. 'कर्वळ पिटती आनंदती पोरे। अजा पुत्र भक्षावया।' -योसं. [ सं. करवलय; करतल ]

**कर्वांद**—स्त्री. १ कटकट; दगदग; त्रास; पिरपिर. २ चरफड; त्रागा. [ ध्व. ]

**कर्वांदणें**—अक्रि. १ चरफडणें ( रागानें ). २ गांजले जाणें ( कर्ज, भूक, दारिद्र्य इ.नें ). ३ छळणें; शापणें.

**कऱ्हान**—न. (खा.) गाडीला जोडण्यापूर्वीं बैलाला शिकविण्यासाठीं एका विनचाकी वहानाला जोडतात तें वाहन; खटारा. [ ध्व. ]

**कऱ्हेरी**—पु. चवरी धरणारा.

**कऱ्हेरिनी**—स्त्री. चवरी धरणारी दासी. 'छत्र सुकासिनी। चामर कऱ्हेरिनी' -ऋ अभं ११५.

**कल**—पु. उतार. 'आम्ही शरणपुरास आल्यानंतर दनूला बराच कल पडला.' -स्मृतिचित्रें. [ कलणें ]

**कल**—पु. कच. 'पुढें लस्करानें कल खादला असे.' -पेद ३.५४. [ कलणें ]

**कलई**—स्त्री. कोपर व मनगट यांमधील भाग. 'दंड कलईपेक्षां वीस टक्के मोठा असावा' -के २६.१.१९३७. [ अर. ]

**कलक**—वि. काळा (कबूतराचा डोळा).

**कलक**—पु. एक जात. [ ? ]

**कलतर**—न. पिकाचा अंदाज करून बसविलेला धारा. -सयाजी १.३३९.

**कलंदरवृत्ति**—स्त्री. उदासीनवृत्ति (फकिरीच्या वृत्तिप्रमाणें); बेछूटवृत्ति; भ्रमणवृत्ति. 'भागलपूर प्रकरणांत कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें आपली कलंदरवृत्ति प्रकट केली' -ज्ञाप्र ४.१.४२. [ कलंदर=फकीर ]

**कलंद्री**—स्त्री. मध्यमंडप. -राव्य ३.२८.

**कलम**—पु. लेख; लिखित; लिहिलेला कागद; हुकूम; आज्ञा. 'बायकोनें बदअमल केला. तुम्ही अर्ज केला आम्हांस कलम द्यावे.' -आंग्रे ३१८. [ अर. कलम=लेखणी ]

**कलमी**—वि. रेघांचें. 'तिवट कलमी हिरवे, दुपटा कलमी हिरवा' -समारो १.२०६. [ अर. कलम ]

**कलमी माळा**—स्त्री. तलवारीवरील तिरपी रेघ. -प्रश ४५. [ अर. कलम; सं. माळा ]

**कलशारोपण**—न. कळस चढविणें; समाप्ति; अखेरी; पूर्णता. 'येवढे महद्यश संपादिलें त्याचे कलशारोपण आपणच करावे.' -पेद ३.४३. [ सं. ]

**कलकारस**—पु. अशरक; महमंगला; पिशुना; एक वनस्पति. -मसाप ४५.४. [ सं. ]

**कलान**—वि. मोठा. -मुधो. [ अर. ]

**कलाप**—पु. कटाक्ष; नेट. 'थोरले मातुश्रीचा कलाप विशेष आहे. तुमचे येणें सत्वर झाले तरी उत्तम नाहीतर मूल तुम्हास येईल यैसे दिसतें.' -पेद १८.८८. [ सं. कल्प ? ]

**कलाम**—पु. व्याख्यान. -मुधो. [ अर. कलिमह अव. ]

**कलील**—वि. थोडा. -आफ. [ अर. ]

**कल्पवास**—पु. दीर्घकाल वास. 'आपल्यास महिन्याभराचा कल्पवास करतां येत नसला तरी त्याच्या विशेष दिवशीं तरी मौज व आनंद लुटतां येतो.' -ज्ञाप्र २८.१.४२. [ सं. कल्प+वास ]

**कल्याण**—न. कलीचें राज्य; कलियुग. 'कालांतरानें सत्ययुग संपून जिकडेतिकडे कल्याण झालें.' -भूभ्र ३१७. [ सं. कलि+आयान ]

**कल्हई करणें**—अक्रि. तंटा; अनमान; कलह; विरोध; प्रतिबंध. 'शंकराजी केशव यांनीं सरकारचें उगवणी पत्रक दिलें होतें त्याजवर कृष्णशहानें कल्हई केली ते समयीं त्याचा मुलुख सरकारांत जप्त केला' -बावारो ३.१५९. [ सं. कलह ]

**कल्हा**—पु. कलह; तंटा; भांडण. 'हे न करितां कल्हा करितील तर त्याही गोष्टीस आम्ही सिद्धच आहों' -रा ३.५. [ कलह ]

**कवकवा**—पु. ऐंद्रलुप्तक; एक वनस्पति. -मसाप ४५.६. अमर.

**कवचा**—पु. कलथा; उलथणें. 'भाकर उलथावयास कवचा घे, पळीनें तें काम भागणार नाहीं.' [ कलछा, कलथा ]

**कवचाट**—न. कचाट ४ पहा. १ मोठा आरोप; आळ; कुभांड; हानिकारक गोष्ट. २ भुताटकी उठविणें; जादूटोणा. ३ गोत्यांत आणण्यासारखा व्यूह; लचांड; कड्याळ.

**कवडीकहान**—न. एक नाणें. -हि. ज. जोशी

**कवतुळरता**—वि. (महानु.) कवतुकी; कुतुहल करणारा; मनोरंजन करणारा. 'पादांत कवतुळरता निश्चिता वेधमूर्ति' -गस्तो १४१.

**कवतुळी**—वि. (महानु.) कवतुकी; मनोरंजक. 'कवतुळा नरलोका ताळिका वातु होते' -गस्तो २४५. [ सं. कौतुक ]

**कवला-लो**—पु. एक प्रकारची वनस्पति. ही बहुधा आखूड असून जमिनींत अति दाट अशी रुजते.

**कवा**—पु. कव पहा. वेंघ.

**कवापून, कव्हापून**—क्रिवि. केव्हांपासून.

**कवायद**—पु. काअदह; कायदा अनेकवचन. -आफ [ अर. ]

**कवी**—न. कोहळा.

**कव्हळ सुतवून घेणें**—(शब्दशः कोहळयाला सूत गुंडाळणें) (ल.) मुलीला पदरांत घेणें; उजवणें.

**कशीद**—अक्रि. ओढलें. -मुधो. [ अर. ]

**कशीदह**—पु. प्रकरण; काव्य. -मुधो. [ अर. ]

**कशील**—पु. (ठाकरी) मक्यासारखें एक झाड. याचें फळ हरभऱ्या एवढें असतें.

**कस**—पु. (कुस्ती) एक पेंच. प्रतिपक्षाच्या बगलेंतून हात घालून मानेवर हात ठेवून त्याचा हात डोक्याकडे दाबणें. [कसणें]

**कसणी**—स्त्री. शेतीची मशागत; जमीन नांगरणें, वाहणें. इ. [सं. कृष्]

**कसणें**—अक्रि. जमिनीची मशागत करणें; नांगरणें. [सं. कृष्, कर्ष]

**कसरणें**—अक्रि. निघणें; बाहेर पडणें. 'भ्रमांतुनि कसराल आदि पुरुषाला अनुसराल हो' –सोहि स्फुटपदें नव ४४९. [सं. किंचित्+सृ=सरणें]

**कसरूड**—न. सुरवंट; घुला. [सं. कुश?]

**कसवट**—स्त्री. कृषि; कसण्याचा व्यापार; शेतीची मशागत. 'तेथ विधीमार्गे राहिला नीट। मग' अवघा अव्हांट बसवट। तेथ कर्मांचा कसवट। लागती करूं॥' –सिसं ४४. कसवटी पहा. [सं. कृष्, कर्ष]

**कसवा, खसवा**—पु. नदींतील किंवा ओढयांतील बारीक वाळुमिश्रित माती. 'दौंड व भांबुर्डा येथील विटांत कसवा फार मिसळतात.' –सुवाशा ५.

**कसीदह**—पु. काव्य. –आफ. [अर.]

**कसीस**—पु. तलवारींत जव्हेर, विष किती आहे हें पाहण्याची कृति. –प्रश ७९. [कस]

**कसूं**—न. कूस पहा. १ कुसळ. २ दाराच्या फळीचें खोबणींत अडकविण्याचें टोंक.

**कसेपरी**—क्रिवि. कसेंहि करून; कशाही रीतीनें. 'म्हणुनिया मथितार्थ कसेपरी। पतितपावन यो वदनीं हरी।' –वामन नामसुधा १७. [म. कसा+परी]

**कस्कारानें**—कच खाऊन. 'तेव्हां कस्कारानें माघारे तोफखान्यांत येऊन उभे राहिले' –भाब ११५.

**कस्तूरी**—स्त्री. शेतांतील काळी माती.

**कस्तूरी आणणें**—(खा.) राणादेवीच्या लग्नांत शेतांतून काळी माती आणतात त्यास म्हणतात. या कस्तूरींत गहूं पेरतात. –संशोधन ऐलेच २४४.

**कस्बह**—पु. कसबा पहा. –मुधो. [अर.]

**कस्रत**—स्त्री. फाजीलपणा; समृद्धि; रेलचेल. –मुधो. [अर.]

**कह**—उभअव्य. की. –आफ. [अर.]

**कहत**—पु. दुष्काळ. 'तरी येथील विचार पहातां चार सालापासून कहत पडला व रयत व ढोरं मरून गेलीं.' –पेद १७.७६. [?]

'**कहा**—पु. वर्चस्व; ताबा; अधिकार; सत्ता; स्वकथित. 'परंतु ते गोष्ट न ऐकतां आपलाच कहा करून किल्ला बांधतात' –पेशव्यांचा जुना वाडा, भारतवर्ष ३६. [सं. कक्षा?]

**कहाळा**—स्त्री. सनई.

**कहाळेकांड**—न. (महानु.) सनईची नळी. 'हारिपाय पडेना कहाळेकांड पडिलें।' –स्मृति.

**कळ**—स्त्री. माया; सहानुभूति. 'शिवाजीचे आपण वंशज म्हणून आपली कळ वाटून ते इंग्रज आपणांस सिंहासनावर शुद्ध मनानें, थोर बुद्धीनें बसवीत आहेत असें प्रतापसिंहास या वेळीं वाटलें' –मदरु २. [सं. कला]

**कळंजणें**—सक्रि. घरे पाडणें; व्यथित करणें, टोंचणें. 'पण त्या वाळत चाललेल्या धिप्पाड माणसाची मनाला कळंजून टाकणारी छाया माझ्याबरोबर सारखी येत होती.' –उपे अन्त ६८. [सं. कला-कळा?]

**कळदिवा**—पु. स्त्री. लामण दिवा; कळीचा दिवा. 'तो अधिकार्या कळदीवा लाउनी तेथ आला' –लीच १.३८. 'रामदरणा कळदीवा लावून तेथ आला.' –लीच १.५४. [कळ+दिवा]

**कळून सरणें**—अक्रि. समजणें; माहीत होणें; पूर्णपणें; आधींच ज्ञात होणें. 'हनुमंताची तीव्र व्यथा। कळों सरली श्री रघुनाथा।' –भारा १२.१६. [कळणें+सरणें]

**कळसो**—पु. (कु.) मोठी घागर. [सं. कलश]

**कळिसी**—स्त्री. कळशी पहा. लहान घागर. 'मंद सुयोधनदुर्मतिविषवल्ली सेकमूळ तूं कळिसी' –मोकर्ण ३०.८४. [सं. कलश]

**कळी**—क्रि. वाटे; कळे; भासतें. 'कळी हृदपद्माची उगवली कळी घेउनि कळी।' –नृसिंह नव १२४. [म. कळणें]

**कळेकाम**—न. कळ्यांची रचना. 'मुखश्र्याची खुटुनी पालवी। विजणें केलें सपल्लवीं बरींवानि ठेविली नवी। कळे कामाची।, –नरुस्व ५५२. [सं. कलिका+कर्म]

**कळंब**—पु. उमाळा; उकळी; पूर. 'रघोजी रुस्तुमराव जखमी तेथेच होता. त्यालाहि दुःखाचा कळंब आला.' –ऐपो १५. 'कळंब रघोजीला आला।' –ऐपो २.६७. [?]

**कळास काम**—न. १ कळाशीचें काम; किंचितहि फट राहूं न देतां जोडणी केलेलें काम; पक्कें बंद काम; कौशल्ययुक्त काम; सुंदर घडकाम. [सं. कौशल्यकर्म. कला+कर्म]

**कक्षाकेतु**—पु. ध्वजाचें टोंक, पदर. 'रणदक्षा स्वविपक्षा करि कक्षाकेतु खंडुनी त्वरित' –मोकर्ण नव ३४५. [सं.]

**कक्षावर्त**—पु. पवित्र्याचा एक प्रकार. –प्रश १६०. [सं.]

**काईत**—पु. कायस्थ; कारकून. 'हल्ली सवाईजीकडून एक काईत व आमचे तरफेनें मोरोपंत सैदाकडे रवाना झाले.' -पेद १३.१०. [सं. कायस्थ]

**काकटी**—स्त्री. पवित्र्याचा एक प्रकार. -प्रश १८. [सं.]

**काकड**—पु. खडकाळ भाग; खडबडीत, अडचणीची वाट; खोरें. 'जैपूरचा व बुंदीचा काकड आहे त्या मार्गातून इन्द्रगडावरून चंमेलचा घाट दहा कोस आहे तिकडे चालावें' -भारतवर्ष ७२. 'इतका भरपूर सरंजाम हा जैपूरच्या काकडावरून माघारा न्यावा' -भावपया ७२.

**कांकबाळ**—पु. (साब.) चोळीस कांखेखालीं लावावयाचा त्रिकोणी तुकडा. [ सं. कक्षा-काख+पल्लव=पदर ]

**काकर**—पु. मांग जातींतील एक पोट जात. (सोलापूर जिल्ह्यांतील). -अस्पृ ४७.

**काकला-लो**—पु. मावशीचा नवरा; मावसा.

**काकलावी**—स्त्री. करिहारी; लांगलिकी, अग्निशिखा; एक वनस्पति. -मसाप ४५.४. अमर. [सं.]

**काकुण्डप**—पु. बाणाचा एक प्रकार. -प्रश १९. [सं. ]

**काकुलपणें**—क्रिवि. वडीलपणें. 'तरी त्यास काकुलपणें सांगून पहावे आणि तुम्ही न जावें' -भाव १०५. काकला पहा.

**काकमा**—पु. उंटाच्या नरम चामड्यापासून केलेलें वस्त्र. -शिश. [पुश्तु]

**कागजी-दी**—पु. कागद करणाऱ्या लोकांची जात. [अर. कागद]

**कांगरी**—स्त्री. शेगडी.

**काचकिरडा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे २९९.

**काचला**—पु. (कुण.) कांचवा पहा.

**कांचापाणी**—न. एक मुलींचा खेळ. यांत कांचेचे बारीक बारीक तुकडे करून त्यांची एक रास करतात व तीवर फुंकर मारून वेगळे होणारे तुकडे दुसऱ्यास स्पर्श न करतां काढून घेतात. दुसऱ्या तुकड्यास स्पर्श झाल्यास डाव जातो. याप्रमाणें सर्व तुकडे संपेपर्यंत खेळ चालतो. -मखे ३६९. [काच+पाणी]

**काचियल**—स्त्री. कांचेची खेळण्याची गोटी. -व्याज्ञा. १.१५१. [काच]

**काज**—स्त्री. (गो. कों.) काजूच्या फळांतील अथवा बोंडातील चीक. (काजू खाल्ला असतां हा घशांत खवखवतो व खाजतो). [काजू]

**काजणें**—अक्रि. काजूचें बोंड खाल्ल्यावर घसा खवखवणें; घसा खाजणें. [काजू]

**कांजल, कांदळ, कांदळें**—न. प्राणप्रतिष्ठा करण्यापूर्वीची देवतामूर्ति. -आडिमहा प्र ९. [सं. कंदरस्थ इदम्]

**काजाणू**—न. (अधिक अर्थ) जुने मोडकळीस आलेलें लांकडी घर; खोपट; झोंपडें. 'तुम्हास कौल सादर केला आहे. भूम ठाव देखील झाडे परसु व तुम्ही आपली कमावीस करणें जुने काजाणू आहे ते रामभटास देणें. तुम्ही नवे बांधोन सुखरूप असणें.' -रा २१.४.

**कांजी कोठडी**—स्त्री. अंधार कोठडी. कांजी देण्याची शिक्षा झालेल्यास ज्या कोठडींत ठेवण्यांत येतें ती कोठडी. -डोंगरी २०. [कांजी+कोठडी]

**काजूच्या बिया**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे १२८.

**काट**—पु. काप; वार; कापण्याची क्रिया. [काढणें]

**काट**—पु. वरपगडा; वरचष्मा. 'इंग्रजांच्या कवायती कंपूवर मराठे स्वारांचा काट चालेनासा झाला.' -भूभ्र २९. [काटणें]

**काटकर**—पु. काठीकर; काठीनें मोजणारा. 'पाहणी करावयास काटकर काटी होनाजी वळकवडे याजकडून देविले.' -बाबा ३.२०४. [सं. काष्ठ]

**काटकोरणें**—न. कांटा काढावयाचें अणकुचीदार हत्यार 'इतक्यांत तिचा गुराखी मुलगा आपलें काटकोरणें घेऊन आला' जीवनकलह. [सं. कंटक+कोरणें]

**काटछाट**—स्त्री. पट्ट्यानें कापण्याची क्रिया. -व्यायाम जून १९३८. [काटणें+छाटणें]

**काटमाल**—पु. १ पडलेल्या इमारतीचें सामान. 'बंगला पडण्यास आला म्हणून त्याचा काटमाल त्यांनीं विकला.' -लढि आत्म ४२२. [काटणें+माल]

**कांटवळ**—स्त्री. डोंगर व पडजमीन यांत होणारें गवत. [सं. कंटक+वलय]

**काटी**—स्त्री. मोजण्याची काठी. वर पहा. [सं. काष्ठ]

**काटी**—स्त्री. कावळी वल्ली; वायसोळी; स्वादुरसा; वयस्था; एक वनस्पति. -मसाप ४५.५. [सं.]

**काटेकरंजी**—स्त्री. पूतिक; कलिमारक; एक वनस्पति. -मसाप ४५.३. [सं. कंटक+करंजी]

**काटेमारकांति**—स्त्री. अनुपमसौंदर्य. [सं. कंटक+मारणें+कांति]

**काटेल**—स्त्री. एक मधमाशी. ही उघड्या हवेंत रहाते व कमी मध गोळा करते.

**काठकाई**—स्त्री. माराभारी; दंगा. 'विजापूरकडे किरकोळ काठकाई झाली आहे.' -बागोप २१३. [काठी]

**काठदरी**—स्त्री. नदीच्या कांठावरील दरडी. 'खाडीच्या पलीकडील काठदरींत लोक मारित आले' -पेद ३.३८. [ कांठ+दरी ]

**काठपुरा, कांठापरा, कांठाप्रा**—पु. १ सांगाडा; आच्छादन विरहित उघडें घर वगैरे. ( कौलाशिवाय घर, कापडाशिवाय छत्री, पानाशिवाय इरलें इ. ). २ मांसविरहित शरीर. [ काष्ठ ]

**काठफेरा, काठमारा**—पु. खटारा; सांगाडा; गलबतांचें शीड, डोलकाठी व वरील माल नसलेला खोका. कटारा पहा. 'जर त्याणी काठमाराच नाथाला सोडिला तरी आम्ही तसाच देऊन' -पेद ३४.१०६. 'तुम्हांस पत्र दिल्हे कीं काटफेरा मात्र देणें.' -पेद ३४.११२.

**काठाडी**—पु. काठीवाला; रखवालदार. -प्रभात २५. ११.४१. [ काष्ठ ]

**कांठावर बसणें**—( ग्राम्य. ) ढुंगणावर बसणें. [ कांठ ]

**काठी**—पु. एक रजपूत जात. त्यांच्यावरून काठेवाड हें नांव पडलें.

**काठीखेच**—स्त्री. एक मुलांचा स्काऊटचा खेळ. -व्याज्ञा १.३१८. [ काठी+खेचणें ]

**काठीढकल**—स्त्री. एक मुलांचा स्काऊटचा खेळ. -व्याज्ञा १.३१९.

**काठीस लागणें**—गलबत फुटल्यानंतर किनाऱ्यास लागणें. 'पवार मजकूर याची बायको काठीस लागली ती तुम्हांस बक्षीस दिली' -आसे ३१७. [ कांठ ]

**काडवेल**—न. कडवळ चाऱ्याचें पीक. 'त्याशिवाय भूस, काडवेल पिकें व झाडें उत्पन्न होतात.' -के ५.४.३७.

**कांडारीव**—वि. ( महानु. ) खोदीव. 'पुढा मोहटीया सोडवीलिया चौपसी। कांडारीवा बाहळीवां अतिसयसी।' -नरुस्व १०३. [ सं. कांड ]

**काडीखेंच**—स्त्री. चकण्याचा प्रकार. 'एकानें एक काडीचें टोंक हातांत धरून दुसरें बाहेर ठेवावें. खेळणारांनीं हें बाहेरचें टोंक क्रमाक्रमानें अधिकाधिक बाहेर ओढावें. ज्याचे हातून काडी बाहेर पडेल तो चोर. राज्य घेण्याच्या या रितीस काडीखेंच म्हणतात.' -व्याज्ञा १.१३१. [ काडी+खेंचणें ]

**कांडेछेद**—पु. १ परस्परांसमोर उभे राहून परस्परांच्या प्रकोष्ठावर आघात करणें. -व्याज्ञा ४.१८१. २ ( आट्यापाट्या ) कांडे चिरणें पहा. सुरपाटी धरणारानें प्रारंभीं खेळास सुरुवात करताना प्रतिपक्षाच्या एका गड्याच्या हातावर टाळी देऊन पहिल्या पाटीस पायानें स्पर्श करून पुन्हा टाळी देणें. [ सं. कांडें+छेदणें ]

**काढ**—स्त्री. काटाकाट; काटकसर; कमी करणें. 'वाढीच्या वेळीं वाढण्यास त्याची आठवण रहात नाहीं झालीच तर ती सर्वांच्या मागून व्हावयाची काढीच्या वेळीं मात्र ती सर्वांच्या आधीं हटकून झाल्याविना रहावयाची नाहीं.' -के ७.११. ४१. [ काढणें ]

**काढणी**—स्त्री. १ ( दांडपट्टा ) वार मारून पायांचे मधून अगर उडी मारून पाया खालून पट्टा काढून घेण्याची रीत. २ चक्रांतून किंवा हातांतून शरीर काढून घेण्याची कसरत. -व्याज्ञा ३.४२२. [ काढणें ]

**कांढळ**—न. एक जातीचें गवत. याच्या काड्या जाड असून त्या विणण्यास उपयोगी पडतात.

**काढा काढणें**—पळ काढणें; रस्ता सुधारणें, निघून जाणें. 'सा घटिका दिवसास मातबर लढाई झाली. आपले लोकांनीं काढा काढिला. राऊत देखील पळाले' -पेद ३५. ७८. [ काढणें ]

**काढावा काढणें**—पळ काढणें; निसटणें. 'जेष्ठानीं काढावा काढून पिंपळनेराचे रोखे निघोन आले आहेत.' -पेद ३६.७७. [ काढणें ]

**कात टाकणें**—एक मुलांचा स्काऊटचा खेळ. -व्याज्ञा १.३०६. [ कात+टाकणें ]

**कातरें**—न. गोमंतकांतील प्रेमगीत. हें सुरेल तानांत म्हणतात व कानास फार गोड लागतें. उदा. 'भितर नाकां मोगा असा पापा घरां। माडा मुळांत बसोन खावया। तन्नी आड सारां।' -चित्रा दिवाळी १९३६.

**कातरपकड**—स्त्री. मलखांबास दोन्ही बाजूनी कातरीसारखे हात धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.५६. [ सं. कर्तरी+म. पकड ]

**कांतलोह**—न. पोलाद; तीक्ष्णायस; रुक्मलोह. -प्रश २३. [ सं. कम्-कांत+लोह ]

**कातवण**—न. उकिरड्यावरील गवत काड्या वगैरे केर कचरा. 'कुंभाराची सून कातवणावर येणारच' [ कातरणें ]

**कातळ**—पु. पापुदरा; पदर. 'तबाच्या मनाचे कातळ सहानुभूतिमुळें मला हळू हळू मोकळे करतां येऊं लागले.' -उपेअंत ७८. [ कातळा ]

**कातिल**—पु. कत्तल करणारा. -मुधो. [ अर. ]

**कांतिलोह**—पु. खड्गाचा एक प्रकार. -प्रश ९५. कांतलोह पहा,

**कासुर**—न. एक प्रकारचें गलबत.

**काथडी**—स्त्री. गोधडी; वाकळ. [ सं. कंथा ]

**कांदळ, कांदलें**—कांजळे पहा.

**कांदापोथी**—स्त्री. (व.) बारीकसारीक सटरफटर कामें. 'तुमची कांदापोथीच तर अद्यापि सरली नाहीं मग तुम्ही बाहेर फिरावयास केव्हां जाल.' [कांदा+पोथी]

**कान पाडणें**—कान मिटणें; न ऐकणें; दुर्लक्ष करणें. 'यशवंतरायानीहि फतेसिंगबावाचे कारभाराविसी कान पाडले आहेत.' -पेद ६.४३.

**कान**—स्त्री. खाण. -आफ. [फा.]

**कानकुशी, कानकूस**—स्त्री. कानाचा पुरळ किंवा खरूज हा विकार. [कान+कुसणें]

**कानगी**—स्त्री. लबाडी; कपट; चूक; दोष. 'राजश्री गंगाधरपंतांची काडीमात्र कानगी नाहीं.' -पेद २१.१६६.[?]

**कानटिनी**—स्त्री. कानपिचकी; थप्पड. 'कृतघ्नपणामुळें कानास कानटिन्या खाव्या लागतात.' -विविध ४.७.१९३७ ३०.

**कानपकड**—स्त्री. (मल्लखांब) दोन्ही हातांनीं दोन्ही कान धरून व बगलेंत मल्लखांब धरून मारावयाची उडी' -व्याज्ञा ३.५६. [म. कान+पकड]

**कानपाठी**—वि. केवळ ऐकून पाठ करणारा. 'कानपाठी माणसाची गोष्ट निराळी.' [सं. कर्ण+पठण]

**कानपिचकी**—स्त्री. ताकीद; सौम्य शिक्षा; कानास चिमटा घेणें. [कान+पिचकी=पिळणें]

**कानफोडी**—स्त्री. तिळवणी; बर्बरा; कबरी; तुंगी; खरपुष्पा; एक वनस्पति. -मसाप ४५ ४. [सं. कर्ण+स्फोट]

**कानबाई**—स्त्री. रुक्मिणी. **कानबाई खालचें लग्न**-अहिर लोकांत कृष्ण व रुक्मिणी यांच्या मूर्ति बसवून एकदम ५००-५०० लग्नें होतात. अशा प्रकारचें लग्न. -संशोधन.

**कानवडतें**—क्रिवि. एका कुशीवर; एका कानावर; बाजूवर आडवें.' कानवडा पहा. कानवडतें होणें, उठोन बसणें, रांगत जाणें, पाऊल टाकणें, अटकत चालणें, बाल्य भाषणें संकेतें कळवणें, धरून फिरणे, लुटलुट धांवणें, असें करितां घोडयावर बसणें कोठें जाणें येणेंहि कांहीं समजूं लागलें' -शामब. भारतवर्ष ८. [सं. कर्ण-कान]

**कानमात**—स्त्री. (महानु.) कानगोष्ट; गुप्तगोष्ट. 'हें तुम्हास कानमातेनें साधेल.' -उच ११५. [सं. कर्ण+मात]

**कानाडी**—वि. (महानु.) मुक्त; मोकाट.(?) 'पदार्थी रस रूप होय मग अभिमुख होय. तेथ स्त्रीयांचे दर्शन स्पर्शन भाषण करी तेयाची कानाडी मुकाटा जाणाविया' -आत्मभाष्य.

**कानोल्या**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे ३२४.

**कान्नी, कान्न्या**—स्त्री. कांजिण्या; एक देवींसारखा पण सौम्य रोग. [कांजिणी ?]

**काप**—स्त्री. कातळ; कातळासारखी टणक जमीन. [कापणें]

**कापखंड**—न. धनुष्य. 'बनकरीचे भाव जाईल गडे। ते चालते धनुकडे। आड वागौनि कापखंडे । लपविती कटाक्षांची।' -नरस्व ७४६. [कापखंडी]

**कापखंडी**—पु. (महानु.) अर्धचंद्राकृति फरश. 'रिपुघसे कापखंडी कुठारा' -गस्तो ५०. [काप+खंड]

**कापडगादी**—स्त्री. तलवारीस कापडाच्या घडीनें घासण्याची क्रिया. -प्रश ९६. [कापड+गादी]

**कापडमादनें**—न. (महानु.) वस्त्र ओलें करून पुसणें; वस्त्रें परिमार्जन. 'एका दिसाआड कापडमादनें' -पुजाव [सं. कर्पट+मर्दन]

**कापसावणें, कापसाळणें**—अकि. १ कापसाप्रमाणें तंतुमय जळमट होणें; बिघडणें (काकडी, भोपळा वगैरे फळ) बुरसणें. २ पू घट्ट होणें. (गळू वगैरे मधील] [कापूस]

**कापाकाप**—स्त्री. १ बऱ्याच मोठया प्रमाणावर अनेक दिवस चालणारी पिकांची, शेताची कापणी; झाडांची झुडपांची तोड; अनेक लाकडांची चिरण्याची क्रिया. २ कत्तल; तोडातोड; छाटाछाट. ३ कपडे शिवण्याकरितां अनेक प्रकारच्या कापडांची वगैरे कापणी. [कापणें]

**कापीतांव**—पु. (गो.) कप्तान; एक अधिकारी. (पोर्तु.) [इं. कॅप्टन]

**कापूरबाव**—स्त्री. वारसाहक्क. -के २४.३.१९३९.

**काफ(फि)रिस्तान**—पु. चित्रळ पेशावरच्या पश्चिमेचा प्रदेश. -सिंह. [फा. काफीर=अधर्मी]

**काबळा**—पु. (गो.) काथ्या; नारळावरचे तंतु.

**काबाडी**—स्त्री. मालाची गाडी.

**कामकस्तुरी**—स्त्री. सब्जाचें झाड. याचे बियास तुकुमराई म्हणतात. [सं.]

**कामठी**—वि. पोलादाचा एक प्रकार; कामठी येथें तयार होणारें. -प्रश २४.

**कामथपटी**—स्त्री. सरकारकामाकरितां कामगारास इनाम मिळालेल्या जमिनीवरील कर. 'तो राजश्री पंतसचिव याणी कामथपटी मुठेखोरे व मोसेखोरे या दोन्ही माहालीं घातली.' -रा १६.४. [कामथ पहा.]

**कामाचा राडा उपसणें**—अतिशय काम करणें. -मौनयौवना १६४.

**कामंदकी**—स्त्री. एक नीतिशास्त्र. 'बोधिला निजवैदुरी उशनसी कामंदकी जीवजा.' -गस्तो ६४.

**कामबक्षी**—स्त्री. वासना तृप्त होणें. -मुधो. [अर.]

**कामबख्शी**—स्त्री. इच्छापुर्ती, -आफ. [अर.]

**कामरानी**—स्त्री. प्राप्तकाम होणें. [फा.]

**कामिल**—वि. पूर्णता असलेला. -मुधो. [अर.]

**कामिलाह्**—वि. पूर्ण. -आफ. [अर.] कामिलचें स्त्रीलिंग,

**कायदे आझम**—पु. महात्मा; महानेता. [अर.]

**कायपुर, कायापुरी**—न. स्त्री. देह; शरीर. 'कायपुर नगरीचा पाटील.' -आत्मा [सं.]

**कायरा**—क्रिवि. (चि.) कोठेंतरी; कोठेंकोठें; माहीत नसलेल्या जागीं; एकीकडे सांधींत कोंधींत. हें अव्यय असलें तरी सर्वनामाप्रमाणें किंवा विशेषणाप्रमाणें लिंग वचनानुरूप याचीं रूपें बदलतात. उदा. कायरे (पु. अव.). कायरी (स्त्री. एव.) कायऱ्यो (स्त्री. अव.). कायरां (न. ए.). कायरीं (न. अव.).

**कायरेसें, कायरांसा**—क्रिवि. (चि.) कोठेसें; कोठें-तरी.

**कायाकुरवंडी**—स्त्री. आत्मदान; स्वयंबलिदान. 'काया कुरवंडीच्या बाबतींत सेनापति बापटांचें म्हणणें असें कीं' -के २५.७.१९३९. [काया+कुरवंडी]

**कार**—पु. काम. -मुधो. [अर.]

**कार-आझमा**—पु. वि. काम अजमविणारा; काम कर-णारा. [अर.]

**कारआंगाह्**—पु. अनुभवी. -आफ. [अर.]

**कारकारसई**—स्त्री. (कार+कारसई. कार=खंड. बागेच्या मालकास द्यावयाचा खंड. कारसई=कुळाकडून गवत, लाकडें वगैरे घ्यावयाचा हक्क). जमिनीचा खंड व इतर बाबी वसूल करण्याचा हक्क. 'त्याप्रमाणें तीन विभाग व वेठ बिगार व कारकारसई ब फरफरमास तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरं-परेनें अनुभवून सुखरूप रहाणें' -आठइति १४९.

**कारकुनान**—पु. कारकून अनेकवचन. -आफ. [अर.]

**कारखानदारी**—स्त्री. यांत्रिक उत्पादन. कच्चा मालाचा पक्का माल करण्याचा धंदा. [फा.]

**कारचोबी**—वि. कार्चोबी पहा. वेलबुट्टीदार. 'सनगें जरी बादली कारचोबी सोनेरी एकूण' -समारो ४.७२.

**कारट**—ब. कारिंट पहा.

**कारटाझ**—स्त्री. कार्ताझ पहा. दस्तक.

**कारड**—पु. कागदाचा करंडा; खोका; पेटी. 'सासें-बावीस रुपयांच्या (मोमबत्त्या) सुमारें ७३२ कारड सोळा भरून बराबर कुसाजी माली जासूद जथे भिकाजी नाईक पाठविल्या आहेत.' -पेद १८.१६५. [इं. कार्ड (बोर्ड)]

**कारपरदार**—पु. कारभारी. कार्पर्दाज पहा. 'कोन्हेर-राव यांच्या मनांत ध्यास हाच कीं बाबासाहेबांस पद मोठें मिळावें याजकरतां महाराजांचे कारपरदार मोठमोठी माणसें चिटणीस वगैरे यांचा स्नेह.' -नाभोका २.

**कारपर्दाझी**—स्त्री. कामांत गढणें. [अर.]

**कारफर्मा**—पु. काम फर्माविणारा. [अर.]

**कारमुलकी**—पु. अनेक देशांत अधिकार असलेला. [फा.]

**कारली**—स्त्री. शिमग्यांतील खेळांपैकीं एक प्रकार. सामान्य, नेहमीचा खेळ पुरा झाल्यावर यजमानाच्या लहान मुलास घेऊन मुरडत मुरडत गाणें व नाचणें. यावेळीं म्हणावयाचें गाणें 'कारली ये ग्ये कारली। कारलीच्या वेळा हो मांडवा गेला...' इत्यादि. हें गाणें झाल्यावर यजमानाचें बरें व्हावें म्हणून देवा-कडे गाऱ्हाणें करून नेहमीच्या बिदागीशिवाय नारळ गूळ वगैरे मिळाल्यावर त्या मुलास उतरतात.

**कारवल**—न. एक प्रकारचें गलबत.

**कारसाज**—कारसाई पहा.

**कारसकाऱ्या**—पु. एक मुलींचा खेळ. त्याच्या आरंभींचे शब्द. -मखे ३१३.

**कारागीर**—पु. न्हावी. 'मुंडनाचें पुण्य तो लोकांच्या पदरीं टाकून शिवाय गोडगोड बोलण्याचें कसब त्याच्याजवळ असतें म्हणून त्यास कारागीर म्हणतात.' -घूम ५५.

**कारागीर**—वि. कारीगर पहा. लागू; सफल. 'वार केला तो कारागीर होऊन.' -ज्ञाको ३२.४०.

**काराणी**—पु. कामगार; खलासी वगैरे. 'त्यावरील काराणी वगैरे माणसें अटकेस ठेऊन' -समारो ८.२२६.

**कार्दानी**—स्त्री. कार्यज्ञातृत्व; अनुभव; कौशल्य. -आफ. [फा.]

**कार्मीक**—पु. १ काम करणारे. 'कार्मीक पळती ते पाहुनी' -नागेशलीला. २ (महानु.) कर्मकुशल; कर्मकांडी गृहस्थ; कार्मिकीन स्त्रीलिंगीरूप.

**कार्यपर**—पु. काम करणारा; काम साधणारा; गरजू. 'कार्यपरें सर्वथा न लाजावें' -मोवन नव २७६.

**कालगत**—स्त्री. ढिलाई; दिरंगाई; उशीर. 'कोल्हापूरच्या वारसाची योजना झाली नसून कालगत होत आहे.' -के ५. ८.१९४१.

**कालगिरी**—य. खड्गाचा एक प्रकार. -प्रश १५. [सं.]

**कालकाला**—क्रिवि. कालेंकरून; पुढेंमागें. 'केव्हांतरी आपले पारिपत्य श्रीमंत कालकाला करितील हा निश्चये सम-

जोन मातुश्री व राजाराम आहेतच.' -पेद ६.१९०. [स. काल काल]

**कालखड्ग**—न. खड्गाचा एक प्रकार. -प्रश्न १५. [सं.]

**कालबोलिया, कालबोल्या**—वि. वेळ पडेल तसें बोलणारा; काळवेळ पाहून वाटेल तें मान्य करून पुढें त्याप्रमाणें न वागणारा; तोंडावर गोड बोलणारा. 'चित्त मेळवून घेईल. कालबोलिया आहे. चित्त मेळलियास हर एक संधी पाहून घात करील' -रा १०.१०२. [सं. काल+बोलणें]

**कालाकित्ता**—पु. (वासुदेव) लग्नांत मुलीच्या बापास द्यावयाचें धान्य (दाणे, गहूं, तांदूळ इ.). -मसाप ६.४४.

**काले(ळें)पांढरें करणें**—लेखीं करणें; लेखांकित करणें. 'तें बोलले कीं, श्रीमंत पंत प्रधानें या राजश्री रघोजी भोसले यांचे काम काळेपांढरे करून दिले हे कांहीं जया जात नाहीं.' -पेद ६.२६. [काळें+पांढरें करणें]

**काल्लुं**—न. (गो.) माशाची जात. कालव.

**काले**—पु. अने. (महानु.) टोचणी; आठवण. 'अखंड मनास काले देआवे.'

**कावड काढणें**—फजीती करणें.

**कावडली**—स्त्री. काकांगी; काकनासिका. एक वनस्पति. -मसाप ४५.४.

**कावणी**—स्त्री. राग; क्रोध. 'कावण्या कदरण्यास.' -निवाडे १०३.

**कावशी**—स्त्री. (व.) किळस; अन्नद्वेष; वीट. 'पहिल्यानं गरवार । बसे अन्नासि कावशी । भरतार तिचा हौशी । लावे अंगणी तुळशी ।' -वलो १००. [सं. क्लेश]

**कावळामोर**—पु. एक मुलांचा स्काऊटचा खेळ.

**कावळीवली**—स्त्री. कावरी पहा. -व्याज्ञा १.३०८.

**कावेशी**—स्त्री. १ तावडी; आटोका; पकड; पेंच. 'या यवनास कावेशींत आणोन शासन करावे'; 'अशी मराठी कावेशी लढविल्यावाचून ते मनुष्य हवालदील होणार नाहींं.' -शिवदि १५८,२०९. [कक्षा-कवा ?]

**काव्यमय**—वि. कविकल्पनेंतील; काल्पनिक; तर्कदुष्ट; अवाजवी. 'स्त्रियांच्या ठिकाणीं सद्गुणांची कल्पना करणें हें निव्वळ काव्यमय आहे.' -के ११.४.३६. [सं.]

**काष्ठप्रहार**—पु. लाठीमार. 'तिसी करुनि काष्ठप्रहार । अभाग्यें घातली बाहेर ।' -रावि नव २१८. [सं.]

**कास**—स्त्री. वर्ग, प्रत; वळ. 'लोहार, सुतार, महार व मांग यांस पहिली किंवा थोरली कास असें नांव आहे.' -ज्ञाको अ ५२७. [सं. कक्षा]

**कासव अढी**—स्त्री. (मल्लखांब.) पाठीमागून दोन्ही पायांतून वेताचा मल्लखांब काढून घेऊन मारावयाची अढी.' -व्याज्ञा ३.२४५.

**कासवफुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे २२०; -व्याज्ञा १.३७९.

**काहड**—न. लांकडें वगैरे जंगलांतील उत्पन्न. 'काहड चालेल तसें करूं आणि पोट भरूं' -समारो ६.१०७.

**काहवा**—पु. कॉफी. कव्हा पहा.

**काहवाखाना**—पु. कॉफी गृह; उपहार गृह.

**काहिरह, काहिरा**—वि. सामर्थ्यवान, -मुधो. [अर.]

**काहील**—वि. लाचार; निरुत्तर; दीन दुबळा. 'तेव्हां त्यानें काहील होऊन जावसाल केला कीं आपल्याच्यानें दाखला पुरवून देवत नाहीं' -थोमारो ७.१३८. [फा.]

**काळबोटा**—वि. (महानु.) चोरीचें न समजतां द्रव्य संपादणारा. मालकाचें चोरून मालकास परत देणारा, चोरून परत करणारा. 'हे घ्या; या तुमच्या काळबोटेयाचे कवडे. हें तुमचे चोरी मां तुम्हांसी दे' -उच ७७. म्हण. काळबोटा परी खोटा.

**काळवंडणें**—अक्रि. काळें पडणें. 'तिचें पाहतां मग वदन। काळवंडला रोहिणी रमण' -नव २३५. [काळें]

**काळवीट**—पु. चढीच्या भावानें विकण्याकरितां रोखे विकत घेणारे सट्टेवाले. [इं. स्टॅग याचें भाषांतर]

**काळापाणी**—न. (कैदी) 'साबरमती तुरुंगांतील छोटें चक्कर' -उत्तरे. भिंती. [सांकेतिक]

**काळीकावार**—स्त्री. पक्षीविशेष. सर्वांग काळें, पाठीवर शुभ्र, शेंपटी उभारलेली; आकार चिमणी एवढा. धायल; मागपाई; बुलबुल. [काळी+कावार]

**कीकीचें पान बाई किकि**—एक मुलींचा खेळ. त्यांतील म्हणावयाचे शब्द -व्याज्ञा १.३९०.

**काळीपांडे**—पु. काळ्या जमिनीचा पांड्या, पटवारी; ग्रामाधिकारी. याचे उलट पांढरी पांडे. [काळी+पांडे]

**काळीरेघ**—स्त्री. समुद्राचा पृष्ठभाग व आकाश ज्या ठिकाणीं मिळालेलीं दिसतात त्या ठिकाणीं समुद्राचें पाणी काळें शार दिसतें यावरून त्या भागास म्हणतात; क्षितिज. 'महाराज आपण सांगितल्याप्रमाणें समुद्रांत काळ्या रेघेपाशीं बुडविला' (प्रल्हादास). -दशावतार. -मसाप १४.

**काळीशार**—वि. काळीभोर; काळीकुट्ट. 'बाजरी काळीशार दिसते.' [काळें+शार]

**किंगण नाम संवत्सरे**—जीर्णपणाची कमाल झालेला; अत्यन्त जुना; प्राचीन काळचा.

**किचकिचो**—वि. (चि.) १ अपक्व; अर्धवट शिजलेला (भात वगैरे). २ कटकट करणारा; किरकिरा. [ध्व.]

**किचमिचकाला**—पु. घाण; चिवडाचिवड. -उसना-नवरा. [ध्व.]

**किटकिटणें**—अक्रि. १ कानांत गळूं किंवा फोड झाला असतां त्यांत पू होण्याच्या सुमारास कळा लागणें. २ घड्याळ वगैरेचा बारीक बारीक ध्वनि होणें. [ध्व.]

**किटकिटो**—वि. (चि.) किटकिट करणारा; पिरपिर लावणारा; त्रासदायक. [ध्व.]

**किडबिड्या**—पु. कुडबुड्या पहा.

**किडळ**—वि. (महानु.) घाण; मलिन; कुश्चल; हीन. 'याचा फार किडळ संस्कार आहे.' [सं. कीटक]

**किडाळ**—वि. (महानु.) मळ; किटाळ. 'नानें कमीचिये ठाई सकळ। अहंकाराचे किडाळ। जाळिता ऐसे गमे।'-जांस्व २६०. [सं. किटाळ]

**किड्डी**—स्त्री. तिरडी; किर्डी. 'मी सौभाग्याचें आंगडे बांधैनः कीड्डी करीनः खांदी रीगैनः घडा फोडीनः' -लीचपू १८.

**किणाला**—क्रिवि. (चि.) कशाला; कशासाठीं. 'किणाला बोलच ?' कशाला बोलतोस ? [सं. किम्]

**किण्हाला**—क्रिवि. (चि.) कशाला; कशासाठीं.

**कितअ**—पु. तुकडा. -आफ. [अर.]

**कितीशी, कितिसां, कितीसा**—सना. (चि.) किती.

**कित्त्या**—क्रिवि. (गो.) कां. [सं. किम्; कियत्]

**कित्याक**—क्रिवि. (गोचि.) कशाला. [सं. कियत]

**किन्ना**—पु. पतंगास उडविण्याकरितां बांधलेला प्रथमचा दुशाखी दोरा. -व्याज्ञा १.१६२.

**किन्नी खाणें**—अक्रि. पतंग झुकणें. -व्याज्ञा १.१६३.

**किबोकी**—पु. पाणघोडा; हिपोपोटेमस. [स्वाहिली]

**किब्लह**—पु. पवित्र; मोठा. -मुधो. [अर.]

**किमखाप**—पु. किनखाब पहा. -थोमारो ७.२२८.

**किमोनो**—पु. जपानी लांब पैरण. [जपानी]

**कियाम**—वि. शाश्वत. -मुधो. [अर.]

**कियामत**—स्त्री. शाश्वतता. -मुधो. [अर.]

**किरच**—स्त्री. तलवारीचा एक प्रकार. -प्रश ३१.

**किरचंड**—वि. किचकट; गुंतागुंतीचें; भानगडीचें. 'रोज अधिक लागले यास्तव धणी रागांस येतील. त्यासी काम किरचंड बहुत परन्तु स्वामी आज्ञेवरून रात्रीचा दिवस करून आटोपिलें' -पेद २५.२१७.

**किरमिष्टाण**—वि. कुरूप; बेढब. (स्त्री. वस्तु.) 'मेली आपण किरमिष्टाण आणि दुसऱ्याला नांवं ठेवायचं अनुष्ठान.' -आईची माया. १३.

**किराची**—स्त्री. कट्यार; बरची. 'तितक्यांत पुन्हां त्या स्वारानें राणी साहेबांच्या छातींत किराचीची हूण मारली' -राणी लक्ष्मीबाई चरित्र २४०.

**किराम**—वि. करीमचें अनेकवचन. उदार. -आफ. [अर.]

**किर्चण**—न. (चि.) चुरा. किरचण पहा.

**किडी**—पु. खडा. 'पाच किडी' -समारो ४.७१.

**किर्दार**—पु. काम. -आफ. [फा.]

**किर्पण**—वि. (चि.) कृपण. [सं. कृपण]

**किर्ली**—स्त्री. (चि.) नुकतीच धरलेली लहान कांकडी. किरली पहा.

**किल**—न. शिकारींत मारलेलें जनावर; पड. [इं.]

**किलअह**—पु. किल्ला पहा. [फा.]

**किलअह कुशा**—किल्ला उघडणारा. [फा.]

**किलत**—स्त्री. अल्पता; उणीव; चणचण; दुर्भिळता; तूट. किल्लत पहा. 'परंतु चाऱ्याची किलत फार व गल्ल्याची गिराणी आज हाद बेस्तर.' -भारतवर्ष. अखबार, दिनचर्या १४. [अर. किल्लत-अल्पता, उणीव]

**किलविलणें**—अक्रि. चलबिचल होणें; अस्थिर होणें; अधीर होणें. 'गडावर गडकरी किलविललेसे दिसतात.' -पेद ६.१२७. [ध्व. किलबिल]

**किलाप**—किलाफ पहा. किंतु; वैर. -भाब ८६.

**किल्लत**—वि. अल्पता; दुर्मिळता; चणचण. [अर.]

**किलीबिली**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखे १२४. [ध्व.]

**किलेफोड**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५९. [किल्ला+फोडणें]

**किलेहल्ला**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३६९. [किल्ला+हल्ला]

**किवि**—स्त्री. (महानु.) कीड; आळी. 'कीविया भरलें असें.' -दृष्टांत. [सं. कृमि]

**किश्तकार**—पु. शेतकरी. -आफ [फा.]

**किश्वरकुशाई**—स्त्री. देश उघडणें. -मुधो. [अर.]

**किसकूट; किस्कूट, किसकूटतिसकूट**—वि. (चि.) एकलकोंडा; चिडखोर; त्रासिक; लवकर रागावणारा.

**किसास**—सूड घेणें. -मुधो. [अर.]

**किस्तक**—न. शर्टचा आगापिछा जेथें मिळतो तेथें सांध्यावर खालच्या बाजूस जे तिकोनी तुकडे जोडतात तो.

**किस्ती**—स्त्री. लहान नाव. काश्मीरांत झेलम नदींत फिरण्यासाठीं, राहण्यासाठीं केलेली नाव. -काश्मीरप्रसयाजी.

**किस्वत**—पु. कपडा. -आफ. [फा.]

**कीकस**—स्त्री. वीट; तिटकारा. 'घरादाराची मला कीकस आली आहे.' -वेटिंगरूम.

**कीकस**—पु. ठिणगी; स्फुलिंग. 'लोहित देश मंडळाचा। सेनाधिपु दीव्य प्रशस्तिचा। जयातें कीकसू पडे हातिएराचा। मीषें प्रळयाग्निचेनि॥' -नरुस्व २२०.

**कीकीचें पान**—न. एक मुलींचा खेळ. -मखे २९८.

**कीर्तन**—वि. व्यापारी, विक्रीचा, किरकोळ जिन्नस. किरचण पहा. 'कालीकोटाहून बेपारी यांचा कीर्तन जिन्नस भरून जंजिरेस येत होता.' -आंघइ ४१०.

**कीर्तन म्हशी, जाशील कशी**—एक मुलींचा खेळ. 'कुरतन मिरची जाशील कशी' असेंहि म्हणतात. -मखे २८३.

**कीर्तिमंदिर**—न. बडोदें येथील एक स्मारक इमारत. -सयाजी १.११५१.

**कील-ला**—स्त्री. अग्निशिखा; ज्वाला. 'नयनाग्निकील नीलग्रीवाचा मीनकेतु वरि जैसा।' -मोकर्ण नव ३४५. 'ती बहु तीस दटावी कार्पासा काय दापिना कीला।' -मोद्रोण नव २८१. 'स्पर्शाया अंत्यजा न कीला भें।' -नव २८१. [सं.]

**कींव**—स्त्री. कृमि; कीड. 'उमाई अवकसां गेलीं होतीं: मानुस अवकसां बैसलें होतें: तेयासी कींव पडिली।' -लीच ३ पृ १२. [सं. कृमि]

**कीस बाई कीस**—एक मुलींचा खेळ. -मखे २९३.

**कुकडी माकडी**—स्त्री. कुंभारीण माशीएवढी एक हिरव्या रंगाची माशी.

**कुंकू**—न. एक मुलींचा खेळ. -मखे ३३८.

**कुक्कुटाग्नि**—पु. अत्यन्त प्रखर जठराग्नि. कोंबडा चुनखडीचे खडे खाऊन पचवतो यावरून. [सं. कुक्कुट+अग्नि]

**कुक्कुटासन**—पु. (मल्लखांब.) दोन्ही हात बोंडावर ठेवून पाय वर उचलून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२३४. [सं.]

**कुचले**—पु. अव. वाजंत्री लोक. 'तो भोग कुचले म्हणजे वाजंत्री लोक वांटून घेतात.' -मातीर्थ २.७७.

**कुचिंधन**—वि. (व.) कुश्चळ; घाणेरडा; मलिन. 'पाखरूं, राजहंस। पिता पाणी निचंतीनं। कावळया कुचिंधनं। दिलं तळं टहूळून।' -वलो ११९.

**कुचिंदर**—न. अडगळ; गर्दी; अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तू.

**कुचिधा**—पु. फंद; फितुर; भानगड. 'त्या कुचिधांत पडत नाहीं' -पेद ८.८४. [कुचिंदा.]

**कुची**—स्त्री, कपट; लबाडी; गडबड; चेष्टा. 'तुम्हीहि येथें तुम्हाकडील असतील त्यांस लिहोन त्यांचा अमल चाले आणि नालीस कुची न करीत ते गोष्टी करणें.' -पेद २८.१४.

**कुचेदार**—वि. लबाड; कपटी; शठ; ठक; फसवे. 'शामळ लोक परम कुचेदार, किल्ल्याचा बंदोबस्त ठेवून महाराजाचे लोकांशीं तोंड न देतां मुलुखास फार तसदी दिल्ही.' -शामब भारतवर्ष ५९. [कुची]

**कुंजावरी**—वि. भाजीपाल्याचें; केवटयाचें. 'पूर्वेस कुंजावरी बमय दुकानें होतीं.' -शेमारो २.१७२. [कुंजडा-कुंजरा=भाजीपाला विकणारा]

**कुंजीची उडी**—स्त्री. (मल्लखांब.) उजव्या हाताच्या बोटांनीं डाव्या हाताचीं बोटें धरून कुंजी मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.१०५.

**कुट**—न. (महानु. वऱ्हाडी.) १ पीठ. 'कुटीची गाडी कोठें आहे?' २ कूट; गूढ; गहन. 'कुटस्थ कुटवत् पिष्टति' -ऋ.

**कुट**—पु. एक झाड. (कुटकी, कुडा?) 'मंजरामल बकुल बिल्वकुट अशोक चंदन जाती।' -नरहरी गंगारत्न, नव ४३२.

**कुटकी बैठक**—स्त्री. बैठक मारून एक पाय क्रमानें वर करून पायांची अदलाबदल करणें. -व्याज्ञा ३६३.

**कुटीरक**—न. खड्गाचा एक प्रकार. -प्रश १५. [सं.]

**कुडतनमिरची**—स्त्री. एक मुलींचा खेळ. कीर्तन म्हशी पहा. -व्याज्ञा १.४०२.

**कुडतर**—न. रानकोंबडयाची एक जात. -चित्रकृषि २.६.

**कुंडमंडप**—पु. यज्ञ वगैरे विधी करावयाचा असतां जीं विशिष्ट मोजमापाचीं कुंडें करावयाचीं असतात व विशिष्ट आकाराचा व मापाचा मंडप बांधावयाचा असतो तो कसा करावयाचा यासंबंधीचें ज्ञान व तें प्राप्त होण्यापर्यंतचें अध्ययन. '(ते) सूत्रवृत्ति भाष्यांत निष्णात असून कुंडमंडपापर्यंत गति होती.' -माप्र ३. 'काम्यग्रहयज्ञ गृह्यपरिशिष्टोक्त सहस्रपक्ष कुंडमंडपासहित करावा असा ठराव झाला. सरकार वाडयाजवळ जागा पाहून तेथें विस्तीर्ण छाया मंडप टाकून कुंडें वेदी वगैरेची सर्व तयारी झाली.' -माप्र ५८.

**कुडीवसति**—स्त्री. (महानु.) एक रात्र व दोन दिवस मुक्काम.

**कुतप**—न. भारतीय वृंदसंगीत. -के ३०.६.१९३९.

**कुतरभोंक**—स्त्री. कुत्र्याचें भुंकणें. (ल.) भांडण; तंटा; कलह. 'परिणामीं विलक्षण असें वाग्युद्ध व कुतरभोंक मात्र जुंपते.' -विद्याभिवृद्धि ९८. [कुत्रें+भोंकणें]

**कुताब**—स्त्री. मशीदीस जोडलेली शाळा. [अर.]

**कुत्तेबाज**—पु. कुत्र्यांवर देखरेख करणारा; कुत्रीं शिकविणारा; कुत्र्यावरील अधिकारी. 'स्वामीची कुतरी पुण्यांत उत्तम पील झाले आहेत. ते राजश्री स्वामीचे कुत्तेबाजानी पाहिले.' –पेद ८.१५. [कुत्ता+बाझ]

**कुत्रा व ससा**—पु. एक मुलांचा खेळ.–व्याज्ञा १.३४२.

**कुल**—पु. उत्तर ध्रुव. –आफ. [फा.]

**कुथा**—स्त्री. झूल. –राव्य ५.३.

**कुथिली**—स्त्री. मर्कटी. एक वनस्पति. –मसाप ४५.३.

**कुदाईम**—वि. जुनें. कदीमचें अनेकवचन. [फा.]

**कुंदुस**—स्त्री. तोंडली;तुंडिकेरी; रक्तफला. –मसाप ४५.४.

**कुंदुमश**—त्याचें येणें. –आफ. [फा.]

**कुद्रह**—सार. –आफ. [फा.]

**कुधारणा**—स्त्री. सुधारणेच्या उलट स्थिति. 'आतां ५४ पैकीं अशा प्रकारचे फार झाले तर २७ गृहस्थ वरिष्ठ कायदे कौन्सिलांत जाणार. याला सुधारणा म्हणावयाची कीं कुधारणा म्हणावयाची ?' –टिच २.५.३६.

**कुनबाईकी**—स्त्री. (प्र.) कुणबीक; कुळंबाईकी. १ मान्यता. २ शहाणपणा. 'लांडी, लबाडी, अनुदारपणा हीं कुनबाईकीला शोभत नाहींत.' –संशोधन ७.१.२. ३ खर्चमुखीपणा; खर्चाचें काम. [कुणबी]

**कुपण-णा**—न.पु. दस्ता; हातांत धरावयाचा भाग. 'सर्जेरावाच्या मुसक्या बांधून बाजारांतून बंदूकीच्या कुपण्यानें मारीत पलटणींत निघून गेले.' –दुर्दैवी मोहरे.

**कुपिया**—वि. गुप्त; अंतस्थ. 'कुपियाने कांहीं करायाचे नाहीं.' –पेद २०.२५६. कुफिया पहा.

**कुपेंच**—पु. अडचण; संकट; कचाटा. 'परंतु आवघडोन कुपेंचीं पडले आहेत.' –पेद ५.६०. 'आपलेकडून कांहींएक गुंता नाहीं. गोष्ट कुपेची पडली आहे.' –रा १०.२३३. [सं. कु+पेंच]

**कुफिया**—वि. अंतस्थ; गुप्त. 'परंतु कुफिया वर्तमान सांगितलें कीं आम्हा रघोजी भोसले यांचा फार भरंवसा होता.' –पेद ६.१९. [अर.]

**कुंब**—(मद्रासी.) बाजरी. –के १२.९.१९३९.

**कुबटणें**—अकि. उष्णतेमुळें, उबेमुळें आंबणें; आंबून नासणें (अन्न, फळ, इ.); निस्तेज होणें (ज्वरामुळें).

**कुबटाचा कढी**—स्त्री. माशांची आमटी. (मच्छीमारी लोकांतील शब्द).

**कुब्रा**—वि. थोर. –आफ. [फा.]

**कुंभध्वनि**—पु.स्त्री. भुमका; अफवा; वार्ता. 'कांही कुंभध्वनि नाटवडेकर मोकाशि याचि निघाली होति.' –रा २१. २४२. [सं. कुंभ+ध्वनि]

**कुय**—स्त्री. कुई पहा. आरडाओरड; रडारड; कीच; बोंबाबोंब. [ध्व.]

**कुया**—स्त्री. (ठाकरी.) पावसाळ्यांत पाण्यांत राहिल्यामुळें पायांच्या बोटांचीं बेचकें कुजतात त्यास म्हणतात. [सं. कुह्=कुजणें]

**कुयें**—न. बैल बडविण्याची क्रिया. **०काढणें**-ठोकणें; मारणें; बडवणें.

**कुरमां-मे**—न. (चि.) १ अंगांत विकार मुरल्यामुळें येणारा थकवा. २ मुरलेलें पडसें. [?]

**कुरवा**—पु. मातीचा पेला, भांडें; कुल्ड. 'काशीस गेल्यावर दहीं वगैरे वस्तु मातीच्या कुरव्यांतून देण्याची वहिवाट आहे.' –आनंद मार्च १९३४.

**कुरसाकुरस**—स्त्री. कुरबुर; स्पर्धा; तेढ; मत्सर. 'याची त्याची अन्तरंग कुरसाकुरस वाढली.' –पेद २८.१५७. [ध्व.]

**कुरा**—स्त्री. (उचले.) भाजी. –ज्ञाको उ ४.

**कुरा**—पु. कुर्रा; नखरा; भानगड. 'तुरा शोभतो कुरा जयाची मोठी दहशत।' –ऐपो २.२६७. कुरी पहा.

**कुरांकुल**—पु. क्रौंच पक्षी. –मसाप ४५.५

**कुरुप**—स्त्री. अडचण; सांदकोंध; खांचखळगे. 'बसवाडा जागा भारी कुरुपाची होती तेथें जरबा देऊन ठाणें बसवावें.' –पेद २१.१७७.

**कुरुष**—पु. रोष; आठी; कुढावा. 'निजाम अल्ली खानाचे चित्तांत अद्यापि कुरुष आहे.' –विंचूइ ५२.

**कुर्कुटी**—स्त्री. वारीक हलका ताप; थंडीचा कांटा येऊन भरणारा ताप. [ध्व.]

**कुर्चा-र्चो**—पु. चिमटा; कातडी चिमटणें.

**कुर्ब**—पु. सन्निधि; जवळ असणें. –मुधो. [अर.]

**कुर्रह**—पु. थंडपणा. –आफ. [अर.]

**कुऱ्हें**—वि. कबरें; चित्रविचित्र (वस्त्र). 'गोगें कुऱ्हें पोफळें.' –प्रमा ७.

**कुलकुठी**—स्त्री. कुलकथा; कुळकट; कुळाची माहिती, परंपरा, इतिहास. [कुल+कथा]

**कुलकुला**—पु. सर्वाधिकारी. 'कुलकुला नारोजी व माणकोपंत आहेत.' –पेद ६.८६. [अर. कुलकुल्ला]

**कुलडौल**—पु. सर्व मुलूख; सर्व प्रांत. 'तुमच्या कुलडौलाची दिवाणगिरी रा. अच्युतराव गणेश यांस सांगितली.' –थोमा १.१४६.

**कुलपति**—पु. मूळ पुरुष. 'आब्राहाम, इसहाक, याकोब व त्याचे बारा पुत्र यांस यहुदी आपले कुलपति म्हणजे मूळ पुरुष मानतात.' ( इं. पॅट्रिआर्क ) [ सं. कुल+पति ]

**कुलपारपत्य**—न. सर्व अधिकार; सर्व सत्ता, अंमल. 'शहरांतील कुलपारपत्य त्यांचे स्वाधीन केलें.' -भाब ९१. [ फा. कुल्+सं. पारपत्य ]

**कुलाबा**—पु. मनसुबा; कारस्थान; कट; डाव. 'अंगारक आपण येक व्हावे आणि हवसियासी मैत्री करवावी म्हणजे सहजच गैर होतील. हा कुलाबा योजिला आहे.' -पेद ३३. ३१०. [ अर. कुलाब=पकड ]

**कुलारग**—स्त्री. कुळारग पहा. सर्व कुळें.

**कुलारगवार**—क्रिवि. कुळवार; प्रत्येक कुळाच्या अनुरोधानें. 'त्याचे जाबते कुलारगवार महालकरी यांनीं पाठविले.' -बाबारो ३.२६७.

**कुलाहपोष**—वि. टोपीवाले; टोप घालणारे. 'ते कुलाहपोषाची फौजेवरहि कित्येक फौज पाठवून खाशी फौजसुद्धां चालून जाऊन मारामारी करून जनरल बेलीचे फौजेस कतल आम केलें.' -रा १०.१८६. [ अर. ]

**कुलुपकिली**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे ३०५. -व्याज्ञा १.७०३.

**कुलुपबंदी**—स्त्री. तेढ; पेंचप्रसंग; कोंडी. 'कॉंग्रेस व यांमध्यें सध्या कुलुपबंदी निर्माण झाली आहे.' -के १०. ११.१९३९.

**कुल्फत**—स्त्री. त्रास. -मुधो. [ अर. ]

**कुल्फीमलाई**—स्त्री. एका भांड्यांत दूध बंद करून अशीं भांडीं बर्फ व मीठ यांत ठेऊन दूध गोठवून तयार केलेलें खाद्य; एक प्रकारचें आईसक्रीम, हिमदुग्ध. [ कुलूप+मलई ]

**कुल्लां**—वि. सर्व; पूर्ण. -आफ. [ कुल्=सर्व ]

**कुल्लीयात, कुलियात**—स्त्री. पूर्णपणा; सर्व. -मुधो. 'दोन्ही दौलती कुलियात तुम्ही आम्ही मिळून संभाळावी, यांत अंतर दिसूं नये, इकडे दृष्टि सर्वांनीं ठेवावी हें चांगलें' -रा ५.१४. [ अर. ]

**कुविद्या**—स्त्री. कपट; लपंडाव; लबाडी. 'दिल्लीस राहून स्वामींच्या कार्यास कांहीं कुविद्या करूं लागला तर पूर्वेस गेल्यावर सुजातदौल्यासच हातीं धरून पूर्वेकडील काम जैसे दृष्टीस पडेल तैसाच मनसबा धरून स्वामी कार्य केलें जाईल.' -पेद २.१९४. [ सं. ]

**कुवें**—न. डोलकाठी. 'सरईचें सामान जुनें सिडें व कुवें, दोर, नांगर सुकाणूं जें असेल तें' -समारो २.७८.

**कुवेभाग**—स्त्री. कुरीति; वाईट चाल. 'येथील शफतेचें प्रमाण वचनाचें प्रमाण एकंदर नाहीं. कुप्रथा, कुवेभाग पडली आहे.' -पेद १.५७. [ सं. कु+विभाग. कुडा+भाव ? ]

**कुशा**—पु. उघडणारा. -आफ. [ फा. ]

**कुशी खाजविणें-कांडुळणें**—अक्रि. रिकामें बसणें; निरुद्योगी असणें; माशा मारीत बसणें. 'आम्ही कुशी खाजविते तुम्ही तेथें आमचें नांवें तरी मजल प्रकृतीस कलून (संभाळून) करा.' -पुद १.२६०.

**कुशून**—पु. सैन्यविभाग; तुकडी; टोळी. 'त्याजवर टिपूनें कुशून पायेदल बारा व दोन रिसाले तंबीकरितां रवाना केले होते. त्यास मापिल्यांनी दोन कुशून व दोन रिसाले टिपुकडील लढाई करून गारत केले.' -रा ७.१२८. [ तुर्की. कशून=सैन्यविभाग, तुकडी ]

**कुश्चल**—वि. अमंगळ. 'कुश्चल अतीत वेश धरून' -शिवली नव २३३. [ कुश्चल पहा ]

**कुसकुरी, कुसकुयरी**—स्त्री. अगदीं कोंवळा फणस कुसून काळा होऊन पडतो तो. [ कुसलेली कुयरी ]

**कुसरी**—स्त्री. वटमोगरी; सप्तला; नवमालिका; एक वेल. -मसाप ४५.३.

**कुसवा**—पु. गर्भ. 'चवथ्या मासी कुसवा चडे । अन्न पाणी या लागेना गोड ।' -वासुदेवगीतें, मसाप ६.८६. [ सं. कुक्षी ]

**कुसुरुडा**—पु. कुसरुड; घुला; सुरवंट. -मसाप ४५.५. [ सं. कुश ]

**कुस्टमिस्ट**—न. कुश्चल; भानगड; उपद्रव. 'वरचीलहि गावगना कोठें कुस्टमिस्ट ये प्रसंगी मनास न आणावे.' -पेद १२.८. [ सं. कु+इष्ट द्वि. ]

**कुस्ती खाणें**—पेंच अंगावर उलटणें.

**कुहक**—न. ( महानु. ) माया.

**कुहकेश्वर**—पु. ( महानु. ) ईश्वर; लाघवी देव; शक्तिपति. 'नाना विचित्र वपुवेष धरूनि खेळे । काळे चतुर्युग बळे कुहकेश्वरू जो ।' -गस्तो २३६.

**कुळभरण**—न. जमीनींत शेतांत कुळें भरणें. वसाहत; लागवड. -के १२.११.१९३७. [ कुळ+भरण ]

**कुळवाची दुआरणी**—स्त्री. शेतांत दुसऱ्यानें कुळव चालविणें.

**कुळैवा**—वि. दिवा. 'नगरीं उजळैवे कुळैवे । ठाइं ठाइं अखंड लाखैवे । जैसीं निधानें चरति सदैवें । यादव प्रतापाची ॥' -नरुस्व ४८२. [ सं. कुलदीप ? कुळदिवा पहा. ]

**कुळोधारणी**—वि. कुलोद्धारक; कुलाचा उद्धार करणारा; कुलाची कीर्ति वाढविणारा; कुलास ऊर्जित दशेस आणणारा. 'त्याजवरून त्यांचे मातोश्रीनें उत्तर केलें कीं, बाई तुम्ही आमची कुळोधारणी ऋणी आहांत, तुमच्या योगानीं हे जीव वांचले.' -शामव भारतवर्ष १३.

**कूचक**—वि. धाकटा. -आफ. [ फा. ]

**कूटबाजी**—स्त्री. लबाडी; कपट. 'सजावारुद्दौलांनीं शेंपन्नास घोडीं आणिलीं होतीं तीं त्यांनीं कूटबाजी करून घोडीं सोडवून नेलीं.' -रा ५.२१२.

**कूपकाटीं**—क्रिवि. कांटयाच्या झुडपांत; कुंपणांत; काटयांत वगैरे. 'पळे हरिणी दुरून। कशी कूपकांटीं दडे।'

**कूर्निश**—कूरनिसात पहा. वांकून सलाम करणें. -मुधो. [ अर. ]

**कूर्मासन**—न. ( मल्लखांब. ) मल्लखांबावर आढी मारून हातांनीं पायांचे आंगठे धरून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२२९.

**कूस**—न. कुसळ. ( ल. अशिष्ट ) शष्प. 'माझें कूस देखील वाकडें होणार नाहीं.'

**कूळ ठेवणें**—( गो. ) शूद्रांतील देवकप्रतिष्ठा, देवदेवक बसविणें. -ब्राह्मण मासिक.

**कृष्णतेलडा**—स्त्री. तिगडी; भसूरविदला; अर्धचंद्रा. -मसाप ४५.४.

**कृष्णमुख**—न. काळें तोंड. [ सं. ]

**कृष्णमेचु**—पु. ( महानु. ) काळा संगमर्मर; सिरसाळ पाषाण. 'ऐसी कृष्णमेचुची उभवनी। सुदेवो देखताय नयनी।' -नरुस्व १०३८. [ सं. कृष्ण+मेचु ]

**केंडावणें**—अक्रि. वेडावणें; खट्टू करणें.

**केंडूस**—वि. बुरसलेलें; केंडशी आलेलें.

**केंडूसणें**—अक्रि. बुरसणें.

**केडूळ, केडोळ**—क्रिवि. केवढा वेळ; कितीतरी वेळ; फार वेळ. [ सं. कियत्‌वेला ]

**केण्या**—क्रिवि. ( चि. ) कोठून; कोणत्या वाटेनें, मार्गानें.

**केतकी वज्र**—न. खड्गाचा प्रकार. -प्रश १५. [ सं. ]

**केतकीचें पानबाई की की**—एक मुलींचा खेळ. -मखे २९०. -व्याज्ञा १.३८९.

**केदवळ, केदोळ**—क्रिवि. ( कु. ) किती वेळ; केवढा वेळ. [ सं. कियत्+वेला ]

**केदवळचो, केदोळचो**—क्रिवि. ( कु. ) केव्हांपासून तरी; किती वेळापासून. [ सं. कियत्+वेला ]

**केदवा**—क्रिवि. ( कु. ) केव्हां. [ सं. कियत् ]

**केदवेचो**—क्रिवि. ( कु. ) केदवळचो पहा.

**केदारी**—स्त्री. नैवेद्य. 'पिराचे केदारीस तांदूळ केळी.' -बाबारो २.१०१. [ कंदूरी ]

**केबिन**—स्त्री. आगबोटींतील प्रवाशांची खोली. [ इं. ]

**केवणी**—स्त्री. केवण पहा. १ मुरुड शेंग. २ ऋद्धि; सिद्धि; लक्ष्मी. -अमर.

**केवल**—वि. एकटा. [ सं. ]

**केशरी**—पु. सिंह. केसरी पहा. 'करी केशरी........ देहरायें' -मुरा, किंका ४६.

**केशरी करणें**—जोहार करणें. पूर्वी रजपुतांत अखेरच्या संग्रामाकरितां निघावयाच्या वेळीं सर्व स्त्रियांस अग्नींत लोटून केसरी पोषाख करून बाहेर पडत यावरून. 'त्यानें आपल्या बायकांची केशरी करून तानाजीशीं लढण्यास आला.' -मातीर्थ ४.४६१.

**केसक**—न. किंशुक; पळसाचें फूल. 'करतळें रंगें कालौनि केसकें। रांविती सुगंधें उदकें। निळयांचे धोटे नव्हेति ठाऊके। घसणी कटाक्षाचीए॥' -नरुस्व ८४५. [ सं. किंशुक ]

**केसरकी**—स्त्री. पुढील सालचे पिकाकरितां नांगरून ठेवलेली जमीन. -चित्रकृषि २.६. [ सं. कृषि ]

**कैकय**—पु. इराणी लोक.

**कैतालें**—न. ताडाच्या झाडावर चढण्याकरितां हातांत धरावयाकरितां दोरी घेतात ती. हीस एका बाजूस लांकडी मूठ व टोंकास पितळी कडी असते.' -उद्यम. जाने. १९३६.

**कैदाशिणीचें कोडें**—न. कधींहि न सुटणारें कोडें. -प्रतिभा ३.३.

**कैफत**—स्त्री. कलह; तंटा; भांडण. 'दरम्यानें रंभाजी नाईकवाडी कैफती करितो. आपणा खेरीज दुसरा नाईक ठाणा नाहीं म्हणोन गोतापासी येकदोनी वेले सांगितलें.' -पेद ३१. १७. [ अर. कफालत ]

**कैफर किर्दार**—वि. धारेची. -मुधो. [ अर. ]

**कैसर**—पु. रोमन बादशहा. -मत्तय २२.२२.

**कोक**—पु. दगडी कोळशांतील धूर उष्णता देऊन काढून टाकला म्हणजे राहणारा भाग. [ इं. ]

**कोंकणी, कोंकणा**—पु. खानदेशांत व नाशिक जिल्ह्याच्या उत्तरेस वस्ती असलेली एक अडाणी जात व तींतील मनुष्य. -के ६.३.५१९४२.

**कोकर**—स्त्री. कच्च्या लवंगा गळून पडतात त्या. 'ह्या कच्च्या गळतीस कोकर म्हणतात.' -के ४.४.३९.

**कोकलवार**—पु. ( सोलापुरी. ) मांगांतील एक पोट जात.

**कोंका, कोंक्या**—पु. कोंकणस्थ ब्राह्मणास इतर जाती कुचेष्टेनें म्हणतात.

**कोंकाटणें**—अक्रि. १ ओरडणें; मोठ्यानें हाक मारणें. २ हेल काढून रडणें. [ कोका ]

**कोकाटी**—स्त्री. केळफुलांच्या पाऱ्यांवरील आच्छादन. [ कोका ]

**कोकापकड**—स्त्री. ( मल्लखांब. ) मल्लखांबास दोन्ही बाजूंनीं तळहातांनीं धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.५४.

**कोकिलासन**—न. ( मल्लखांब. ) मल्लखांबाच्या बोंडावर पुढें वांकून बसणें. -व्याज्ञा ३.२३४.

**कोकिळ कोंबडा**—पु. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३०७.

**कोंगटें**—न. वस्त्र; पांघरूण. 'तेयावरी पासौडी पांगुरले: वरि जार्डीचे कोंगटें: ' -लीच॰ ३. पृ. ७८.

**कोंगी**—स्त्री. खड्गाचा एक प्रकार. -प्रश १७. [ सं. ]

**कोचणें**—सक्रि. भोंवऱ्याच्या खेळांत भोंवरा दुसऱ्याच्या भोंवऱ्यावर फिरता मारणें. -व्याज्ञा १.१५८.

**कोचिंदर**—न. घरांतील अगदीं लहान जागा; अडचणीची जागा; ज्या जागेंत वस्तू अस्ताव्यस्त पडल्यामुळें अडचण झाली आहे अशी जागा. कुचिंदर पहा.

**कोटापारची**—वि. तटा बाहेरची. 'अहमदाबाद येथील कोटापारची व मण्यारी व मोहतसदी छापा याची कमावीस.' -थोमारो १.२३.

**कोटी**—स्त्री. कोठी. 'शेग लावून कोटीच्या बैलांत शिरल्याप्रमाणें ' -मरारंग ८४.

**कोटी**—स्त्री. जात; जातिवंत. [ सं. ]

**कोठा**—पु. लकडीच्या खेळामधील बरगडीवरचा मार. -व्याज्ञा ४.३९८.

**कोठा, कोठिंबा**—पु. गलव्रताचा एक प्रकार.

**कोठी**—पु. कोठीवरचा कामगार; कोठीवाला. 'परंतु कोठी येऊन अद्याप तांदूल नेत नाही. याकरिता हे पत्र पाठविले आहे. तरी स्वामीनी कोठी लवकर पाठवून तांदूल नेले पाहिजे.' -पेद २७.१३०. [ कोठी ]

**कोठीवाले गवई**—पु. परंपरेनें चालत आलेल्या तेवढ्याच चिजा म्हणणारे गवई.' -सह्या. नोव्हें १९३७.

**कोड**—स्त्री. २१ नग; कोडी; कोटी. ( वास्तविक २० ). [ सं. कोटी ]

**कोडकी**—स्त्री. (ठाकरी. ) उडीचा एक प्रकार व खेळ. या खेळाचे तीन चार प्रकार आहेत. [ कुट्टी=उडी ]

**कोडबाड**—स्त्री. कोंडी; वेढा; गराडा. 'फिरंगी लोकांस कोडबाड झाली. येजीज जाहला.' -ऐपो २.५३. (चौलदप्तर)

**कोडमा**—पु. ( व. ) लाड; फाजील लोभ. 'लहानपणीं मुलाचा मोठा कोडमा होता त्याला.'

**कोंडी**—पु. खोंडा; दोन ओढ्यांमधील जमीनीचा भाग. [ सं. कुंड ]

**कोंड**—पु. ( ठाकरी. ) एक खेळ. वर्तुळांतील खेळयांना बाहेरचे गडी बाहेर काढूं पाहतात. ( वाघमेंढीप्रमाणें ). [ कोंड= वर्तुळ ]

**कोडळें**—न. कोडोळें पहा. थालीपीठ.

**कोंडी करणें**—कोंडणें; वेष्टणें; घेरणें. 'पहिल्या बाजीरावानें भोपाळवर कोंडी करून निजामाच्या घोड्यांना पळसाचा पाला खाण्याची पाळी आणली.' -के १९.३.१९४०.

**कोंढाळें**—कोंडाळें पहा. -चित्रकृषि २ ३.

**कोण**—पु. ( फलज्यो. ) लग्न, पंचम व नवम स्थान. [ सं. कोण; ग्रीक ? ]

**कोणच**—सना. कोणीतरी; कोणीहि.

**कोतरा, कोतारा**—पु. नदीच्या किनाऱ्याला प्रवाहामुळें पडलेले खोल खड्ड. -रत्नाकर जुलै १९२६. 'महीकाठा कोतारे भारी आणि अवघड ठिकाण पाहून वाटा रोखून बसले आहेत.' -पेद ३६.२५५. [ कोच-कोचरा-कोतरा ]

**कोतल अंदीशी**—स्त्री. अदूरदर्शित्व. -आफ. [ फा. ]

**कोतवाल**—पु. (ल. ) कायद्याचा बडगा. 'पुढाऱ्यांनीं त्यांच्यावर कोतवाल फिरविल्यानंतर.' -के ६.२.१९४०.

**कोतवाल पक्षी**—पु. एक पोपटाएवढा काळा पक्षी; यास कोळसा असेंहि म्हणतात. शेपटी दुभागलेली असते. हा लहान असून कावळा, घार, वगैरेसहि हांकून देतो.

**कोथांमेथां**—न. (चि. ) १ धने, हिंग, जिरें, मोहरी, इत्यादि फोडणीचें सामान. २ समुच्चयार्थी, किरकोळ धान्य.

**कोथी**—स्त्री. (ठाकरी ) लांकडी कुदळ.

**कोनां, कोनी, कोनें**—न. स्त्री.न. (चि. ) पेरें; हातापायांच्या नखांत मळ वगैरे शिरून तो भाग कुजल्यासारखा होतो, सुजतो व ठणका लागतो तो विकार. [ सं. कोण ]

**कोनासन**—न. एक हात वर उंच करून उभें राहून दुसऱ्या हातानें दूर टाकलेल्या दुसऱ्या पायाचा अंगठा धरणें. याप्रमाणें आलटून पालटून करणें. -व्याज्ञा ४.४९६. [ सं. कोण+आसन ]

**कोनी**—स्त्री. मासे धरण्याकरितां बांबूची निमूळती विणलेली नळकांडी; ही कोनासारखी असते म्हणून. [ सं. कोण ]

**कोपटिक**—पु. ( प्र. कॉप्टिक ) अबिसीनियांतील ख्रिस्ती धर्मपंथ. -के २०.१२.१९३५. [ इं. ]

**कोंवडा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे २२७.

**कोंबडा**—पु. राजगिऱ्याच्या वर्गांतलें एक फुलझाड. इं. कॉक्सकोंब.

**कोंबड्याची झुंज**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५९.

**कोमला रीति**—स्त्री. प्रसादगुणयुक्त शब्दरचना; हिला पांचाली रीति अथवा ग्राम्य रीति असेंहि म्हणतात. [ सं. ]

**कोमाणें**—अकि. (महानु.) कोमणें; कोमेजणें. 'जेवी कर्दळी कोमाती चंडवातें। ' -जांस्व २५४. कोमणें पहा.

**कोयताड**—न. मोठें कोयतीसारखें कणीस; मोठीं आंकडेदार चिंच, वगैरे. -चित्रकृषि २.३. [कोयता]

**कोय मारणूक, कोया**—एक मुलांचा खेळ. -मखे १३१.

**कोरटे**—पु. (ग्वाल्हेरी.) कारले तळ. -के ४.१२.१९३६.

**कोरडवाहतूक**—स्त्री. शुष्कता; कफल्लकपणा. 'ग्रामिक बहुसंख्य जनतेंत क्रमशः कोरडवाहतूक.' -के. शे. अ, प्र. ७. [ कोरडा+वाहतूक ]

**कोरणी**—स्त्री. दुकानच्या फळया काढघाल करण्यासाठीं खालच्या व वरच्या उंबरठ्यास खोबण पाडलेली असते ती सब रचना. [ कोरणें ]

**कोरम**—वि. १ कोरंब पहा. १ ( एखादें लांकूड किडयानें पोखरून पोकळ केलें म्हणजे त्यास कोरम म्हणतात त्यावरून लक्षणेनें ) पोकळ; पोखरलेलें. 'आंतून जीर्ण व कोरम झालेलें हें जुनें खोड.' -महादजीचरित्र १. २ क्षीण; दुर्बल; निःसत्त्व. 'वाढत्या खर्चाची धोंड आधींच कोरम झालेल्या शेतकऱ्यांवर पडतां कामा नये.' -के ७.१.१९४१. [ सं. कृमि ]

**कोरा चेक**—पु. सदर परवानगी; कोरा कागद. ( आंकडा घातल्याशिवाय सही करून दिलेला चेक. यावर वाटेल तो आंकडा घालण्याची मुभा घेणारास असते. )

**कोरें**—वि. बिन चुन्याचें; कच्चें. 'जंजिरे अरनालियाचे काम इमारतीचे पके करीन म्हटल्यास दिवसगती लागेल याकरितां कोरे काम करावे यैसे आमचा विचार आहे.' -पेद १६.३७. 'पश्चिमेकडील सवादोनसे हात फांज कोरी आहे.' -पेद ३९.१४९. [ फा. कोऱ्हा ]

**कोलकें**—न. वजन. -मइमं १८६.

**कोलदांडा**—पु. (ल.) पेंच; अडचण; कोडें. 'म्हणून आदि पुरुष कर्तृक म्हणजे ईश्वरकर्तृक असा कोलदांडा पडतो.' -के २५.१०.१९४०.

**कोलावण**—स्त्री. संरक्षणाबद्दलचा, राज्यांतून सुरक्षितपणें जाऊं देण्याबद्दलचा कर. 'इंग्रजांस कोलावण माफ करून त्यांशीं सख्य संपादावें.' -ब्रच ५२. [ कौल ]

**कोलिस्त**—न. सूक्ष्म शेष; तालिमखाना; इक्षुगंधा; कोकिलाक्ष; इक्षुर. -मसाप ४५.४.

**कोवा**—स्त्री. ( भिक्षुक लोकांत सांकेतिक ) विधवा.

**कोवा(व्हा-हा)ळो**—पु. ( चि. कु. ) कोहळा.

**कोव्हळें रासणें**—देवीप्रीत्यर्थ कोहळा कापणें. (पाठारे प्रभु लोकांत देवकस्थापनेच्या वेळीं कोहळा कापतात). [ गु. रासवूं ]

**कोशलगार-दार**—पु. कौन्सिलर. -पेम ३३७. [इं.]

**कोशिया**—पु. एक काळा लहानसा चकचकीत पक्षी. -उत्त. भिंति ६०.

**कोष्ठसंस्था**—स्त्री. आराखडा. 'मराठी व्याकरणाची कोष्ठसंस्था म्हणजे आराखडा आंग्ल भाषेस अनुसरून असावा.' -के १.१.१९३७. [ सं. ]

**कोस**—स्त्री. कूस; फायद्याची मर्यादा. 'कोणत्या कापडांत किती कोस आहे हें पाहून तसलें कापड येथें तयार करण्याची धडपड.' -जप्रशि १०२.

**कोहा**—पु. (ठाकरी. अव. कोहे.) पायाला पडणारी भेग. कुया पहा. [ अर. कोहे ]

**कोहिनूर**—पु. प्रसिद्ध हिरा. [ अर. कोह=पर्वत+इ=चा+नूर=तेज ]

**कोळवण**—न. कोळ्यांचा दंगा, पुंडावा. 'महीकाठी कोळवण जाले आहे. कागदपत्र निभावत नाहीं.' -पेद ३६. २११. [ कोळी+वन ]

**कोळीण**—स्त्री. ( नाशिक. ) नायकीण.

**कोळो**—पु. (चि. कु. ) १ मोठी माशी. ही गुरांना चावून रक्त खाते. २ लांबवर उडणारा निखारा ( जळती गंजी किंवा घर यांचा ).

**कौकब**—पु. तारा. -मुधो. [ अर. ]

**कौनी**—पु. (कुस्ती.) दस्त उतारावरील तोड. प्रतिपक्षाचा आपल्या मानेवरील हात आपल्या डाव्या हातानें खालीं दाबून मान वर उचलणें. -व्याज्ञा ४.१६८.

**कौलो**—पु. (चि. कु. ) एक प्रकारची आंखूड व दाट उगवणारी वनस्पति. ही बहुधा मळे जमीनींत फार होते.

**कौक्षेपक**—न. खड्गाचा एक प्रकार. -प्रश १५. [सं.]

**क्रिया**—स्त्री. उपकाराची जाणीव. 'आईच्या दुधाची क्रिया असलीच पाहिजे.' -संन्यासं ६०. [ सं. कृ ]

**क्रीत**—स्त्री. क्रिया; कृति. [ सं. कृति अप. ]

**क्रील**—न. ( विणकाम. ) सुतानें भरलेल्या बॉबिन्स बसविण्याची चौकट. [ इं. ]

# ख

**खंकशास्त्र**—न. समाजशाही; समाजसत्ता. (इं.) बोल्शेव्हिझम यास प्रतिशब्द. याच्या उलट संग्रहशास्त्र म्हणजे भांडवलशाही.

**खंग**—पु. (व.) भिकारी; निष्कांचन; कोरडा. ' दोघ्या नारींचा पुरुष। वाळून खंग जोगी। एकली राजभोगी।'-वलो ३४. [सं. ख=शून्य]

**खंग**—स्त्री. क्षय; झीज; क्षयरोग. ' मधन्याची व ज्वराची वेथा जाली. खंग लागली.' -रा ६. पृ १४. ' खंग लागली होती. तिने उठोन वारला असे' -रा ६. पृ ९१.

**खंगर**—पु. अग्नि; ऊन्ह; निखारा.' ऐशा जन्मल्या चार गायत्र्या......एक जन्मली खंगरीं।' -बदला ७४.

**खंगार**—पु. भाजतांना पक्की होऊन काळी पडलेली वीट; करपलेली वीट. आपली हलाखी दाखविण्याकरितां प्रतीक म्हणून ही पाठविण्याची चाल असे. ' येथील माळी रडत आला व गांवकरी यांनीहि खंगार पाठविला.' -पेद २९,२०९.

**खचखोल-ळ**—न. मोडक्या तोडक्या वस्तूंचा संग्रह. कचकोल पहा.

**खजमत**—स्त्री. खिजमत; खिदमत पहा. चाकरी; नोकरी; काम; कार्य. ' राजेयानी रावसाहेब आजलग खोटी करून ठेविले ते यखादि खजमत सांगावी म्हणौनच ठेविले आहे.' -पेद २५.२८.

**खजाना**—पु. तलवारीच्या पात्याच्या मुठीजवळील रुंद भाग. -प्रश ५३.

**खंजिरीचा गरबा**—पु. गुजरातेंतील गरब्याचा एक प्रकार. -व्याज्ञा १.४१५. [खंजिरी=डफरी]

**खंजुरीचा मासा**—पु. एक नदींतील मासा. हा खावयास फार चांगला लागतो. -बदला १३२.

**खजूरी बोऱ्या**—पु. जींत खजूर बांधून येतो ती हांतरी; चटई; बारदान. यांतील खजूर काढून घेतल्यावर तें नुसतें टाकाऊ होतें व त्यावर माशा घोंगावतात. यावरून पोकळ डोलारा; फटफजीती; हुर्रेवडी; पच्ची; वगैरे. ' त्यांचा तेथें कसा खजूरी बोऱ्या उडाला याची ज्यांना माहिती होती.' -विछ १२७.

**खजेली-ळी**—स्त्री. (कु.) कळः खुसपट; कुरापत. खजाळी पहा.

**खजेलो**—पु. (कु.) खजेली करणारा.

**खटकणें**—अक्रि. बोंचणें; टोंचणें; त्रासदायक होणें. ' किप्लिंग हे फार साम्राज्यवादी होते ही वस्तुस्थिति तुम्हा आम्हा हिंदवासीयांना खटकणारी होती हें खरें आहे.' -प्रति ४.२.

**खटकावणें**—सक्रि. रागावणें; खरडपट्टी काढणें.

**खटपटें**—न. खटपटीचें काम व त्याबद्दलचें वर्षासन, नेमणूक. ' धारपांच्या वंशाकडे असलेलें दरसाल दहा रुपयांचें खटपटें कर्वे यांच्या वंशाकडे सुरू केलें.' -आत्मवृत्त ४६.

**खटा**—पु. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २३.

**खटा, खटे**—वि. खट्टू; नाराज; नाखूष. ' तथापि ते आले याजमुळें मल्हारबा आमळसे खटे आहेत.' -पेद २.३६. ' तरी स्वामीने पदरचे लोक खटे केले न पाहिजे.' -रा २०. १८०. खट्टू पहा.

**खटाळभर**—वि. (कों.) पुष्कळ; अतिशय. -शामची आई.

**खट्टखट्ट**—एक ध्वनि, आवाज. ' दातीं शब्द खट्टखट्ट।' -नृसिंहा नव १२९. [ध्व.]

**खट्टेर**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २३.

**खडकलाट**—पु. ठंठंगोपाळ; कांहीं न मिळणें; ठणठणाट. लाट म्हणजे समृद्धि याच्या उलट. [खडखडाट किंवा खडक+लाट]

**खंडणी दंडणी**—स्त्री. खंडणी, कारभार, वगैरे. ' श्री दर्शन घेऊन मागती श्रीरंगपटण प्रांती येतील इकडून श्रीमंतहि जातील. ते समई खंडणी दंडणीचा ठराव होणें तो होईल.' -पेद ३७.२१९. [खंडणी द्वि.]

**खडतर अमावास्या**—स्त्री. आश्विन, पौष व फाल्गुन अमावास्या; या दिवशीं चोरी करावयास मुहूर्त चांगला असतो अशी समजूत आहे. यावरून हे दिवस चोरांस शुभ असतात. अर्थात् इतर लोकांस ते कष्टकर असतात यावरून.

**खडदूर**—न. किरकोळ सामान; अडगळ; निकामी जनावरें, सामान वगैरे. ' बरोबर तीन अंबाऱ्या, व रिकामे वोझ्याचे वगैरे हत्ती नव एकूण बारा हत्ती, व फिरंगी पांच सातसेपर्यंत व चार शेंभर आहेत व नेहमीं वोझीं शेंभर व हुजीर बेगारीची तीस व उंटेंतटें वगैरे खडदूर शेंपन्नास आहे.' -रा १०.१६७.

**खंडपलीरोई**—स्त्री. उत्पन्नाची एक बाब. ' परगणे मजकूर येथील आईना व सायेर व खंडपलीरोई या बाबेपैकीं निमे.' -समारो १.२२१.

**खडा**—पु. १ (कातोडी.) मळई(जाळया)ची बांबूची काडी. २ लेपाटी (पांखरें मारण्याचें साधन) यांतील टोंकदार बांबूची काडी.' -बदला १३२-१५६.

**खंडा**—पु. भंडी. ' आपण व्यवहार बोलतों आहों. काव्यांतले अर्थालंकार हुडकून काढण्याचे खंडे का लावीत आहों एकमेकांवर ? ' –के ८.१.१९३४.

**खंडाईत, खंडाऊ**—वि. १ खंडानें घेतलेली ( जमीन ); मक्त्यानें ठरविलेलें ( काम ). २ मक्ता घेतलेला; खंडणारा. [ सं. ]

**खडांगा**—स्त्री. भिंतींतील उभी वीट. भिंत रचतांना बहुतेक विटा आडव्या रचतात परंतु मध्येंच एक थर उभ्या विटांचा देतात त्यांतील वीट. [ खडें+अंग ]

**खडाचौफेर**—पु. घोडयाची एक चाल. –विछ ९९.

**खडीकुस्ती**—स्त्री. गुडघे न टेकतां पुरी होणारी कुस्ती; उभ्या उभ्यानेंच खेळलेली कुस्ती.

**खडीखडी**—वि. पोवाडाचा एक प्रकार. –प्रश २४.

**खडेगणती**—स्त्री. सैन्याची मैदानांत उभें करून केलेली मोजदाद; यावेळीं प्रत्येक सैनिकास समोर एक रांगेंत उभें करण्यांत येतें. व्यक्तिशः मोजदाद. ' राजश्री आऊबास पाचसात वेला खडेगणती जोहारास उभे राहून चौदाव्या स्वाराची दिल्ही. ' –पेद १५.४३. याच्या उलट गोट गणती. [ खडा+गणणें ]

**खड्गोदक**—न. सहा प्रकारचा रस. ' गांठिवना मालती मृणाळें । असोख बावनें बकुळें । खड्गोदक मकरंद जळें । देतां मुखीं पोळत ॥ ' –नरुस्व ५४१. [ सं. षट्+उदक ]

**खत**—स्त्री. ( अहिराणी ) खंत पहा.

**खतखोडी**—स्त्री. उणीव; दोष; व्यंग; न्यून. ' रहावयास गेलें कीं जागेंतील खतखोडी कळून येतात. ' –ज्योत्स्ना सप्टें. १९३७. [ खत ]

**खताखानत**—स्त्री. खताख्यानत पहा. ' निळनाक महार मान घेऊन शिवेनें चालला. त्यास कांहीं खताखानत जाली नाही. ' –रा.६ पृ ५११.

**खताख्यानत**—स्त्री. भावी गोष्टीची जबाबदारी. ' नेमाप्रमाणें वादी पार पडल्यास गांवचा विभाग आम्ही देऊं. खताख्यानत जातीकडे दुसरियाकडे जावसाल नाहीं. '–आठइति १४७. ' प्रतिदिवसी खताख्यानतेची उभयता वादीयाचे समक्ष चौकशी करून यादी लिहिली. ' –आठइति १४९. [ अर. खता=चूक; अपराध; दोष; गुन्हा. +खियानत्=विश्वासघात; अफरातफर ]

**खताशी**—स्त्री. सुताराचें रेघा कोरण्याचें हत्यार; फावडी. [ सं. क्षत ]

**खतीम**—अंगठी –आफ.

**खतूत**—पु. खतें; पत्रें. ' दिल्लीहून खतूत पाठविलीं. ' –समारो १.२१९. 'सरकारचे मदारुल महाम यांनीं खतूत मरसूल केलें. त्याचा दर जबाब कोसल कलान न कलकत्तेकर यांनीं निगारष केला. ' –रा १०.२३४. [अर. खतूत. खत याचें अने.]

**खत्रड**—न. स्त्री. जेथें घाण पडली आहे; कुजके पदार्थ पडले आहेत अशी जागा; कुजके, नासके पदार्थ; घाण. [खत]

**खत्रो**—पु. (चि. कु.) खतरूड...खातेरें पहा.

**खदवा**—पु. कटारीची जात. ' कटार खदवा बाबत दुप परज साधा. ' –बाबारो ३.१७.

**खनदान**—वि. हंसरें; हंसणारें. –आफ. [फा.]

**खनाख्यानत**—स्त्री. भावी आपत्तीची जबाबदारी. खताख्यानतबद्दल चुकीनें.

**खन्जर**—पु. खंजीर पहा. –मुधो. [ अर. ]

**खपाटणें**—उ. क्रि. १ पुष्कळ जेवणें; जेवणावर हात मारणें. २ मारणें; बडवणें. ३ मरणें.

**खपाटो**—पु. फार मोठी पेटी; हडपा. [ सं. कपाट ]

**खप्पा**—पु. ( कुस्ती. ) एक पेंच; गळखोडा; हातांच्या किंवा पायांच्या अडींत प्रतिपक्ष्याची मान धरून खालींवर हिसके मारून ताण भरणें व कंठमणि दाबणें; मानेवरचा कमरखोडा.

**खफीद**—वि. फजीत; ओशाळलेला; खजील; खफीफ पहा. ' बालाजीरायाचे वकिलानी मजला हुजरांत खफीद केलें. ' –पेद २.१३. [अर. खफीफ=अनीतिमान; अप्रतिष्ठित]

**खंब**—पु. श्रेणी. –राव्य १०१७.

**खबर**—वि. क्रिवि. सावध; खबरदार; हुशार; खबरदारीनें. ' सारे माणसांस सांगणें जे बहुत खबर राहाणें. ' –पेद २५.२७३. [अर.]

**खबाना**—पु. खण. ' उजव्या डाव्या हातास फळया लावून केलेले खबाने लागतात. ' –महाशारदा नोवें. १९३६.

**खंबारा**—पु. नुसती खांबावर छपर घालून केलेली इमारत. ' याजकरितां दुसरें घर हत्तीचे खंबाऱ्यासारिखे उंच मशारनिले सांगतील त्याप्रमाणें तयार करून देणे. ' –पेद ३९. १२६. [ खांब ]

**खबूस**—पु. कणिक आंबवून भट्टींत भाजून केलेली भाकरी. –मुमुमु. [ फा. ]

**खंबेरें**—न. कासाळूं. [ ? ]

**खमको**—वि. (चि. कु.) बळकट; मजबूत; दमदार; नेटदार; सपाटून जेवणारा; न डगमगणारा. [सं. क्षम]

**खमणें**—अक्रि. गमणें; करमणें; चैन पडणें. ' इजला त्याखेरीज खमेना, त्याजलाहि खमेना ' –रा ६. पृ. ३१. [सं. क्षम्]

**खमीद**—पु. वांकडेपणा; वक्रता; तेढ; आडमार्ग. ' हा खमीद आहे. नवाबानी करारमदार सोडून टाकाऊ चाल धरली त्याचा फळादेशही खड्यावर जाला. ' -रा ५.१७६. [ फा. खमीद=वांकडा ]

**खमीस**—स्त्री. गुरुवारची रात्र. -बदला २५५.

**खय, खय्यो**—पु. (चि. कु.) १ क्षय. २ फन्ना; फडशा; निकाल. [ सं. क्षय ]

**खंयचो**—वि. ( गो. ) कोठला. [ सं. कुत्र+स्थ ]

**खंयच्या**—वि. ( गो. ) कोणत्या. [ सं. कुत्र+स्था ]

**खंयपावत, खंयसर**—क्रिवि. कोठपर्यंत.

**खरकंकभ**—पु. कोंकण किनाऱ्याकडचे मासे खाऊन राहणारे खळ. -मरावाइ २.

**खरकटनिशी**—क्रिवि. झाडून; तुंबलेल्या कामासह; सर्वनिपट; बाकी राहूं न देतां. ' त्यास हुजुर त्याचे हातें खरकट-निशी काम काज घेत जावें. ' -पेद १९.९२. [ खरकटें ]

**खरकणें**—अक्रि. ( अहिराणी ) सरकणें पहा. -अहिराणी भाषा व संस्कृति.

**खरखशा**—पु. कलह; तंटा; भांडण. ' राजे माधोसिंग यासीं खरखशा प्रथम जाटानें केला. ' -पेद २९.१६२. [ ध्व. ]

**खरखरी**—वि. खरबडीत; निसरडी नव्हे अशी; खर-खरीत. ' दरवाजापुढील रेवणी खरखरी करवावी. ' -पेद २९. १५१. [ ध्व. ]

**खरखस्ता**-स्त्री. उपद्रव; त्रास. ' त्या गावासी खरखस्ता न करणे परंतु न आइकिले. ' -पेद २१.१६६.

**खरजुल्या, खरजूलतट्टू**—वि. खरजुडा पहा.

**खरडा खर्डो**—पु. (कु.) नुकतेंच उगवलेलें रानांतील गवत; गुरांना खाण्याजोगें बारीक रान. २ अनेकवार लिहिलेला कागद. [ खरडणें ]

**खरल**—स्त्री. दरड; कडा. ' बाबनाक परवारी किले लोहगड पर्जन्यकाली खरल कोसलोन ठार जाला त्यास तैनात रु. ५ होती. त्यापैकी निमे तैनात दर माहे रुपये अडीच करार.' -पेद २२.१३८.

**खरल खोचल**—वि. चढउताराची; अडचणीची. ' डोंगर अडसर, खरलखोचल खडक देखील नदीनाले मोजले. ' -रा ६ पृ २७. ' ते खरलखोचल जागा आहे. '-पेद २.११७.

**खरागलेपण**—न. ( महानु. ) रुक्षता; रखरख. ' देही खरागलपनें पदार्थ सेवनाची वासना उपजे. ' -आचारभाष्य. [ सं. खर=रुक्ष ]

**खराती**—स्त्री. कातण्याचें यंत्र. [ इं. लेथ ]

**खरामीदह**—वि. नखऱ्यानें चालणारा.

**खरुत-खरोती**—स्त्री. खरवत-ती पहा. एक खर-खरीत पानांचें झाड. ' खरुनी म्हणून एक वनस्पती आहे तिचीं पानें देखील अशीं असतात कीं, लोखंडावर जरी घांसलीं तरी त्याचा खीस निघतो. ' -प्रति. आत्म ३१४.

**खर्चपोतें**—न. व्ययस्थान. -राव्य ५.३.

**खर्चवर्ख**—पु. व्ययपत्र. -राव्य ८.७४. [ खर्च+वर्ख= कागद ]

**खर्ची खाणें**—घरचेंच शिलक असलेलें धन खर्चून राहणें; रिकामे राहणें; स्वस्थ खाऊन पिऊन असणें. ' प्रधान हे सर्व राजे खर्ची खात बसले आहेत. त्याना धनुष्याला गुण चढविण्याची विनंति करावी. ' -दशावतार मसाप २९.

**खर्डा**—पु. हलकें मोती. ' खर्डा १ एकूण लटकता नथ-णीस किंमत रुपये. ' -समारो ४.७२.

**खलकुल**—न. सर्वजग; सर्व लोक; अलमदुनिया. ' इति-फाकानें उमदीं कामें व्हावीं खलकुलास आराम व्हावा. तुम्हांस आम्हांस संतोष वाटावा. ' -रा ५.१९५. [ अर. खल्क= मानवजात; लोक+कुल=सर्व ]

**खलपाटणें**—खळपाटणें पहा.

**खलफ, खल्फ**--पु. मुलगा; वारस. -भाफ. [ अर ]

**खलवडे**—न. दोन तीन शेतांच्या दरम्यानची मोकळी जागा. ' तेथून खालता उभा बांद सेंधी ४ खिला १ खलवडे १ खिला खलवडिया खालता उभा बांद दगडाचा. '-रा १८.९. [ सं. कील+वट ]

**खलप, खलस**—पु. त्रास; अडथळा; इजा; हानि; संशय. ' तर्फेनचे जहाजांस दर्यातून येण्याजाण्याविषयीं परस्परें खलष न पोंहचावा. ' -समारो ६.२५.; ' यास्तव दिसता प्रकार येसा दिसतो कीं फिरून खलसाची जड कायेम होते. ' -पेद २.१०३. [ अर. खलिश् ]

**खलायक**—मनुष्यें; सृष्टि. -मुधो. [ अर. खल्क ]

**खलिता पोंचविणें**—न. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३४४.

**खव**—न. नारळाचा खवणीनें किसून काढलेला खीस. [ खवणें, खवला ]

**खवखव**—स्त्री. गडबड; बंडाळी; दंगाधोपा. ' आवदा याच्या मनात मालव्यात खवखव करावयाची फार आहे. ' -पेद १०.२७. [ ध्व. ]

**खवंदळी**—स्त्री. खवंडळी पहा. खोडी; कुरापत. ' ऐशि-यास अर्काटवर गेले म्हणजे त्रिचिनापल्लीशीं खवंदळी करतील ' -शारो १.२४३.

**खवाकीन**—पु, राजे. -आफ. [ अर. खाकान. अव. ]

**खश**—पु. आसामांतील लोक. [ सं. एक राष्ट्रजातिनाम ]

**खश मारणें**—दम देणें; दमदाटी करणें.

**खसका**—पु. मध्यम जातीच्या गवताची एक जात. -चित्रकृषि २६. [ ? ]

**खसखस कांठ**—पु. एक प्रकारची किनारी; अशा तऱ्हेचे कांठ धोतर जोडी, उपरणीं, लुगडीं वगैरेना असतात.

**खसखशी शेला**—पु. खसखशी कांठ असलेला शेला. 'देशमुख, देशपांडे यांनीं मिळोन खसखशी शेला दिल्हा असे' -रा ६. पृ. ३२.

**खसवा**—पु. नदींतील बारीक वाळू.

**खसारा**—पु. खिसारा पहा. ' लढाईचा प्रसंग असल्यास आम्हास फौजेचा खसारा पडेल याची काय वाट. ' -रा ५.७. [ फा. ]

**खळपाटणें**—न. १ जुनें, मोडकें, गंजलेलें हत्यार. २ २ मोड हत्यार.

**खळबळ**—स्त्री. खलबळ पहा. गडबड; गलबला; दंगा; त्रास. ' जेथ विपुल जल खळबळ तिळहि नसे वस्तु बहु समर्घ विके. ' -मोकर्ण २६.१५. [ ध्व. ]

**खळवट**—स्त्री. खळयावर धान्य मळून किंवा झोडून झाल्यावर त्याची केलेली रास. [ खळें ]

**खळवटणी**—स्त्री. खळयामध्यें धान्य मळणें, झोडणें, वारवणें, रास करणें वगैरे सर्व क्रियासमुच्चय. [ खळें ]

**खळाळा**—पु. हाहा:कार; खळबळ. ' देवळि जमा होणें म्हणून हुकूम केला. त्याजवर मुलकात खळाळा पडला. ' -साब ३३. [ ध्व. ]

**खळाळी**—स्त्री. नदी ओढा वगैरेच्या पाण्याच्या प्रवाहास असलेला जोर, ओढ. [ ध्व. ]

**खाइदवार**—वि. [ कर. ] कैदवार; शिस्तीचा; आज्ञाधारक. ' रमाबाईचीं मुलें खाइदवार आहेत. ' [ कैदवार अप ]

**खाकअढी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांब खाकेंत धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.७५. [ कक्षा-कांस+अढी ]

**खांकरणें**—अकि. खाकर होणें; जीर्ण होणें; नि:सत्व होणें; शुष्क होणें. ' वृक्ष खांकरले फळीं पानीं । आश्रमीं कोणी असेना । ' -भारा. बाल १४.१७.

**खाकसर-सार**—पु. अल्लामा मश्रिकी यानें स्थापन केलेली मुसलमानी स्वयंसेवकांची एक संघटना. हे बेलचा म्हणजे फावडयासारखें हत्यार वापरतात. [ अर. खाकसार= नम्र ]

**खाचणें**—सकि. खचणें ३ पहा.

**खांचना**—वि. तुच्छ; कमी प्रतीचा; हलक्या दर्जाचा; ' प्रबंधिचा झळके परिमळु तेथ खांचना होय मळयानिळु। सराउदे पदाचा टाळु। कामिनी कटाक्षांसी। ' -नरुस्व २३.

**खाजाळू**—वि. रग असलेला; हौशी; रंगेल; खाज असलेला. [ खाज+आलुच् ]

**खाजें**—न. पिकास, जित्रबास घालावयाचें मासळीचें खत, कुटी. [ सं. खाद्य ]

**खाटाबहार**—पु. अंबट बहार; पावसाळी बहार. -ज्ञाको अं ५१. [ खाटा=आंबट+बहार ]

**खाटारा**—पु. (ठा.) प्रेताची तिरडी; वग्वता. [ खटारा ]

**खांडव**—न. (गुहा) वठार; आळी; पाट; गांवाचा भाग. [ सं. खंड ]

**खांडाराणी**—स्त्री. ( पूर्वीं रजपूत राजे वगैरे आपल्या तरवारीशीं लग्न लावून कांहीं स्त्रिया करीत त्यांस म्हणत ) यावरून उपपत्नी; उपराज्ञी. ' हरकबाई ही मल्हाररावाची खांडाराणी ' मावशीबाई ' या नांवानें अहिल्याबाई जवळ राहात असे ' -मरिगु २.१८. [ खांडा=तरवार+राणी ]

**खांडे भडाड**—पु. (महानु.) खणखणाट; तरवारीवर तरवार आपटल्यानें होणारा आवाज. ' एकुखांडे भडाड केवळः पुरुषार्थिलें। ' -नरुख १०५७. [ खांडा=ध्वनि ]

**खाणेपोश-खानपोश**—पु. खाण्याच्या ताटावरचें आच्छादन वस्त्र. ' खाणेपोश डोईवर घेऊन रात्रीं निघाला ' -पेद २८. १०२.

**खातिम**—स्त्री. अंगठी; सीलाची अंगठी. -मुधो. [ अर. ]

**खातिर**—स्त्री. मन; कल; इच्छा; निवड. -मुधो. [अर.]

**खातिर जमाई**—स्त्री. मनस्तोष; संतोष; समाधान; खात्री. [ अर. ]

**खातून**—स्त्री. बेगम. -आफ. [ फा. ]

**खाद दळवी**—पु. भोजनभाऊ. ' तोतया धरला त्यामुळें कोकणांतील भोजनभाऊ वाचले ' -आंघइ २३४. [ खाणें+ दळवी ]

**खांद अढी**—स्त्री. (मलखांब) मल्लखांबास खांदा लावून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.७५. [ सं. स्कंध=खांदा+अढी]

**खांदी झिम्मा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे २२६. -व्याज्ञा १.३८१. [ खांदा ]

**खादीरभाई**—पु. आइतखाऊ; खाऊन फिरणारा. [ खादणें ]

**खांदेबदल**—स्त्री, पालट; फेरफार. ' राज्यकर्त्यांचे वारंवार होणारे खांदेबदल ' -पे. घ. [ खांदा ]

**खांदोसा**—पु. सहवास; साहचर्य; सांगड. 'या पौरोहित्याचा चक्रवर्तित्वाशीं सदा कांहींसा खांदोसा चालत आलेला आहे.' –विद्याभिवृद्धि १७०. [खांदा]

**खान**—पु. धर्मशाळा. 'एक सारासन पद्धतीचा खान आहे.' ज्ञाको. अ ८१. [फा. खानह्=घर; जागा; वास्तु]

**खानदान**—पु. कुल. –मुधो. [फा.]

**खानदानी**—वि. कुलीन. –मुधो. [फा.]

**खानविक्रम**—पु. खाण्यापिण्याच्या बाबतींतील पराक्रम; खाण्यांतील चातुर्य. 'कोणा विद्यार्थ्याचा हा खानविक्रम असावा बरें?' –जीवनकलह. [खाणें+विक्रम]

**खाना**—पु. १ प्रतिष्ठित थोर गृहस्थ. २ इष्टमित्र वगैरेस दिलेली मेजवानी. [हिं. खाना, सं. खाद]

**खापरी कौलें**—न अव. हातानें थापटून केलेलीं कौलें; नळीचीं नव्हेत अशीं थापट कौलें. [खापर]

**खांब**—वि. कायम; स्थूल. 'रुजू होऊन खांब वसूलाची मुकासबाब व जकाती' –बाबारो ३.१७१. [फा. खाम अमदनी=ठोकळ वसूल]

**खांबखांबाळया**—स्त्री. एक मुलींचा खेळ. 'यांत प्रत्येक मुलीनें खांबास धरून राहावयाचें असतें व खांबास न धरतां पकडलेल्या मुलीवर राज्य येतें' –मखे २७३. –व्याज्ञा १. ४०१. [खांब]

**खांबारी**—स्त्री. शिवणीचें झाड; श्रीपर्णी; भद्रपर्णी. –मसाप ४५.२. –अमर. [सं. स्तम्भ स्कम्भ]

**खायेजाखाये**—क्रिवि. खायेनखायेबद्दल चुकीचें वाचन. खालीं पहा. खामका पहा. 'हवुवत व नजर याची चौथाई सरदेशमुखी देत नाहींत ते खायेजाखाये करून घ्यावी.' –पुद १७७. 'उदेपुरचे ठाणे तो खायेजाखाये घ्यावेच.' –पुद १.७७.

**खायेनखाये**—क्रिवि. हटकून; खास; निश्चितपणें. 'त्याच्या मतें मुर्चे लावून महाड हस्तगत करावें. कार्य खायेन खाये होते.' –पेद ३.१७३. खामखा पहा.

**खार**—स्त्री. लहान मुलांच्या दस्तापिंजर या खेळांतील एक संज्ञा शब्द. तीन अंक. –व्याज्ञा १.१४२.

**खारका उडविणें**—हाताच्या बोटाच्या पेरांनीं डोक्यावर मारणें. 'ते कधीं कधीं शास्त्रीबोबांच्या डोक्यावर खारका उडवीत.' –ह. ना. आपटे चरित्र.

**खारटाण**—न. समुद्राच्या पाण्याचा उग्र वास. –किर्लो जून १९३८. ८०१.

**खासखेली**—स्त्री. सैनापत्य; सेनापतीचें पद, अधिकार. 'परगणे मजकूर हजरती साहेबाचे खासखेलीस मन्हामत जाहाले.' –रा २०.१०९. [फा.]

**खुर्ची देणें**—शाळेंत मुलास खुर्चीवर बसल्याप्रमाणें भिंतीशीं टेकून उभें करणें; एक शिक्षा.

**खुर्दसाल**—वि. कनिष्ठ; लहान; अप्रौढ; अल्पवयी; अननुभवी. 'ते खुर्दसाल या कामा योग्य नाहीं.' –पेद २५.७९. [अर. खुर्द]

**खुर्शीद जुहूर**—वि. सूर्याप्रमाणें स्पष्ट. –आफ. [फा.]

**खुलना**—मोकळें होणें; (मुसलमानांत) विवाहांत मिळालेलें द्रव्य; मेहेर वगैरे स्त्रीस देऊन मोकळें होणें. –के ६.१२.१९३८. १४.

**खुला घटस्फोट**—पु. ज्यावेळीं मुसलमान स्त्री आपण होऊन आपल्या मेहेरेपैकीं कांहीं भाग अथवा सर्व सोडून देऊन घटस्फोट घेते त्यास म्हणतात.

**खुलास**—वि. मोकळीक; सार. –मुधो. [फा.]

**खुलासह**—पु. सार. –मुधो. [फा.]

**खुल्द**—पु. वि. शाश्वत; स्वर्गोद्यान. –मुधो. [फा.]

**खुशामतगो**—वि. खुशामतीचें भाषण करणारे; तोंडपुजे; स्तुतिपाठक; गोड बोलणारे; हांजीहांजी खोर. 'नवाबाजवळ मुसाहेबांत कोण्ही मातबार नाहीं. अवघे खुशामतगो आहेत.' –पेद २५.८४. [अर.]

**खुशाल चेंडू**—वि. चैनी; रंगेल; गुलहौशी; खुशालचंद पहा.

**खुशालसीर**—क्रिवि. मजेनें; मौजेनें; चैनींत; आनंदानें. 'हा कालपर्यंत कांहीं या गोष्टीची चर्चा नाहीं. राजश्री स्वामी खुशालसीर खेळतात. खरें जें होईल तें पहावें.' –पेद ३०. २०७. [खुशाल+सीर]

**खुशाली**—स्त्री. चिरीमिरी; बक्षिसी; पोस्त. 'मुक्काम संपण्यापूर्वी खुशाली मागण्यासाठीं महिनाभर श्रांत झालेला भंगी आला.' –मा भू ३९६. 'दोन आणे खुशाली दिली तेव्हां तो प्रसन्न मुद्रेनें 'रामराम' करून चालता झाला.' –विउ १६८. [फा. खुश+हाल]

**खुशी-सी**—स्त्री. कुशल; खुशाली; प्रकृतिस्वास्थ्य; तबियत. 'तृतीय प्रहरीं बिलिमोर आले होते खुसी पुसोन गेले.' –मदरु २.३७. 'खुशी वगैरे बोलणे जालेनंतर काय मर्जी बोलले.' –मदरु २.३१. 'खुसी मिजाज आछी पुसिले' –मदरु २.३७. [फा.]

**खुष्कसाली**—स्त्री. अवर्षणाचें वर्ष; दुष्काळाचें वर्ष. 'सालमारी खुष्कसाली आहे त्यास रयतेस कांहीं सूट जागीरदार देतील.' –रा २२.९३. 'साल हालची चुकोती करून वसूल घ्यावा व सालमारी खुष्कसाली जाली आहे रयतीस कांहीं सूट देतील.' –रा २२.९४. [फा.]

**खुसबूस**—स्त्री. धुसफूस; कुरकुर. 'बायकांच्या कोत्या समजुतीप्रमाणें घरांत नेहमीं खुसबूस चालत असे.' -महादजी चरित्र ५६. [ध्व.]

**खुसूमत**—स्त्री. वैर; हेवादावा. 'आम्हाला कोणाच्या खुसूमतीनें भिरवणूक काढावयाची नाहीं.'-के १३.१२.१९३८. -आफ. [फा.]

**खुस्रवानह**—वि. पादशाही योग्यतेचा; राजकीय. -आफ. -मुधो. [अर.] **खुस्रवी**-वि. राजकीय.

**खुळखुळी**—स्त्री. थटी; घंटिका; शणपुष्पिका. एक वनस्पति. -मासाप ४५.४. अमर.

**खुळा मोडणें**—तंबाखूच्या ढिऱ्या खुडणें.

**खूत, कूत**—न. प्रकार; सदर. 'ही जमीन महाली हक्कदार खुतांतील आहे.' [फा.]

**खूद**—क्रिवि. स्वत.; स्वतःचें; खुद्द पहा. [फा.]

**खूनखणविया**—पु. खून वगैरे; खून खराबी. 'पेशजी कारकीर्दीस खूनखनबिया जालिया तरी दो महालीचे देशमुख हुजूर हजरती साहेबाचे बंदगीस आणून बदल निवाडा सीव मुनसफीदार पाठविले.' -रा १८.५.

**खूषखरेदी**—स्त्री. राजीखुषीनें केलेला व पूर्णपणें अनिर्बंध व अनिर्बंध असा खरेदीचा व्यवहार. 'सर्व मालमत्ता खूष-खरेदी विकत घ्यावयाची आहे.' -सकाळ १७.३.१९४२.

**खूर्दसालह**—वि. म्हातारा. -मुधो. [फा.]

**खुर्शीद**—पु. सूर्य. [फा.]

**खूश**—खुश पहा. [फा.]

**खूशवुदी**—सुखी करणें. [फा.]

**खूशी**—वि. सौख्य. [फा.]

**खूस्नदी**—स्त्री. सौख्य. [फा.]

**खूस्वक्त**—स्त्री. चांगली वेळ. [फा.]

**खेंच**—स्त्री. लाठी, फरीगदगा, भाला वगैरेमध्यें खोंच मारल्यानंतर हत्यार मागें ओढून घेण्याची क्रिया. -व्याज्ञा ४.४५९ [खेंचणें]

**खेंचकाम**—न. (मुद्रण) सरळ खिळे जुळविण्याचें काम. [खेंचणें]

**खेचाखेची**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा ३२.६; [खेचणें द्वि.]

**खेची**—पु. खेचीवाड्याचा राजा. 'किल्ले मदमुदन गड सन सितसबैनात खेचीनें घेतला आहे.' -समारो ४.१९. 'शिंयांचीं पत्रें खेचीस येतात...आम्हाकडील कारकुनापासीं खेची म्हणतो कीं.'-समारो ६.१७७.

**खेचीचा व्यायाम**—पु. आसनें व प्राणायाम यांचा व्यायाम. -के ३.११.१९३९.

**खेडणी**—स्त्री. (नाविक) गलबताच्या गतीला वारा अनुकूल नसून तिर्कस असेल तेव्हां तो साधून तिर्कस गतीनें गलबत नेण्यासाठीं तें लांबवर नेऊन व माथण मारून (शिड फिरवून) तो वारा साधून इष्ट स्थलीं जाण्याची योजना.

**खेडणें**—सक्रि. खेडणी करणें.

**खेदडा**—पु. म्हैसूरमधील हत्ती पकडण्याचा प्रकार. -सयाजी ३.८२२.

**खेपाटी**—स्त्री. कांख; बकोटी; बगल. 'त्याला खेपाटींत धरून घेऊन जाईल.' खपाटी पहा.

**खेवरडी**—वि. थेरडी.

**खेरखुवाह**—वि. खैरख्वाह पहा. हितचिंतक; हितेच्छु. 'आपण श्रीमंताचे दौलतीचे खेरखुवाह आपण वेगळें बोलणें बोलतां हें अप्रशस्त.' -देवी श्रीअहिल्याबाई १११. [फा. [खैरख्वाह]

**खेल**—पु. जात; जमात; पक्ष. 'सुलेमान खेलहि त्यांना मिळाल्यामुळें बंडाला विशेष महत्त्व प्राप्त झालें.'-सिंश. [फा.]

**खेला**—पु. (खेळ; खेळिया पहा) लबाड; अविश्वासी.

**खेव-वी**—स्त्री. मासे मारण्याची जागा. -के २४.७. १९३६.

**खेस**—स्त्री; (सिंधी) पलंगपोस. -सिंभू. [खेस पहा]

**खेळकरवृत्ति**—स्त्री. खिलाडूपणा; मनमोकळेपणा; क्रीडादाक्षिण्य; विनोदी व वेफिकिरी वृत्ति. [खेळणें+वृत्ति]

**खेळकें**—न. चेटूक उठविणें; भूत घालणें; घोरपड घालणें. -नवाकाळ १७.१२.१९३३. [खेळणें]

**खेळा**—पु. कोंडी; बाजारांतील एकादा जिन्नस सर्व खरेदी करून अडवून ठेवून किंमत वाढवून विकणें. 'उमरा जानेवारी वायद्यांत खेळा ऊर्फ कॉर्नर होणार.' -के २.१२.१९४१.

**खैर**—स्त्री. ठीक आहे. कांहीं हरकत नाहीं; बरें. [अर.]

**खैर अंदीश**—वि. हितविचारी: हितेच्छु; मित्र. [अर.]

**खैर ख्वाही**—स्त्री. सदिच्छा; मैत्री. -मुधो. [अर.]

**खैरा**—पु. शेणखळीच्या तळाशीं बसलेलें मातींत मिसळ-लेलें कुजलेलें शेण अगर शेणाचा भुगा. [?]

**खैस**—पलंगपोस. खेस पहा.

**खो**—स्त्री. डोंगर; गुहा. 'निरनिराळ्या खोमध्यें त्यांनीं वाघाच्या शिकारीसाठीं कायमची व्यवस्था करून ठेविली होती' -एशिआ ३५६. [अर. कोह]

**खोकाळा**—पु. गलबला. 'हपीसच्या तंबूत खूप खोकाळा चालला होता.' -अस्पृश. [ ध्व ]

**खोंच**—स्त्री. लाठी, फरीगदगा, भाला, पट्टा वगैरे मध्यें पुढें टोंचण्याकरितां प्रतिपक्षावर करावयाचा वार; आणी. -व्याज्ञा ४.४'५९. [ खोचणें ]

**खोंची**—स्त्री. तोंड; तोंडाचें बोळकें; तोंडाची खाच. 'वार्धक्य केवळ पाप। तेणें सर्वांगीं उठे कंप। भंगे खोंची हले लपलप। शब्दाचा पोचट प्रताप होय' -भारा बाल ९.६९. [ खोचणें ]

**खोज**—वाघाचे पंजे.

**खोजेबाजी**—स्त्री. अनैसर्गिक मैथुन; लवंडेबाजी. 'आंतून गुप्त रूपानें त्यांच्या दारूच्या आणि रंडीबाजी व खोजेबाजीच्या व्यसनासंबंधानें त्यानें रिपोर्ट केले' -प्रतिआत्म च १५१. [ खोजा+बाझ ]

**खोटखर्च**—पु. कोणत्याहि सामानांत येणारी तूट खर्च टाकणें. -ज्ञाको ख ७७.

**खोड**—न. (महानु.) शरीर; देह.

**खोडवळणें**—(महानु.) मरण पावणें. 'ते खोडवळले असती' -उच ३२.

**खोतपट्टा**—पु. खोतीवतनाबद्दलचा दाखला. [ खोत+पट्टा ]

**खोंदटणें**—अक्रि. रागानें किंवा हट्टानें ढोपरांत डोकें खुपसून बसणें.

**खोन**—स्त्री. मासे धरण्याचें साधन. -चित्रकृषि २.५.

**खोपी**—स्त्री. परंपरा; तालीम. 'बाळकृष्णबुवा पूर्वींच्या खोपींत तयार झाले होते.' -संशाक ८३. [ ? ]

**खोबडा-ळा**—पु. पट्ट्याची मूठ.

**खोबडी**—स्त्री. पशू रवंथ करण्यासाठीं चारा ज्या पोकळींत सांठवून ठेवतात ती -मनो. फे १९३७. [ खोपी ]

**खोमणें**—अक्रि. (महानु.) खोमा येणें; पोंचा येणें; खपली वगैरे पडणें; भंगणें. 'देवता खोमली असे.' -आचार भाष्य

**खोरण**—स्त्री. शिंप्यांचा चुना करण्याची भट्टी. [ ? ]

**खोरणें**—अक्रि. १ (महानु.) उकरणें; खुरपणें. 'विस्तु खोरून दिली.' [सं. क्षुर] २ तटणें; गुंतणें; अडून राहणें. 'ऐसा ऐवज चोकडील खोरला आहे.' -पेद १७.२९.

**खोरी**—स्त्री. पोफळीच्या विरीचा द्रोण. [ खोरें ]

**खोरेवाला**—पु. लुटारू; वाटमाऱ्या; खिंडीखोऱ्यांतील लोक. 'वाटा चालत नाहीं. खोरेवाले धडका माणसे मारितात -पेद २०.३४. [ खोरें=खिंड ]

**खोल**—न. कालें; केळीचा गाभा. 'खोल विकणारे श्रीधरांनीहि कोठूनसे पोहे आणून प्रभूना भेट अर्पण केले. -गौं प्रचउ २४ [ ? ]

**खोलगडणें**—अक्रि. दडपून जाणें; चेपलें जाणें; अगदीं खोल जाणें. 'सर्वभूत द्रव्यांची अनित्यता व त्यांचा नाशिवंत धर्म यांच्या विचारानें जर कोणाचें मन खोलगडून विभिन्न झालें असेल तर बोलतां बोलतां, त्याचें मत एपिक्टेटस प्रमाणें होईल.' -विद्याभिवृद्धि १६६. [ खोल+गडणें ]

**खोलपडा, खोलपडें, खोलपुढें**—वि.क्रिवि. (चि.) १ खोलगट आकाराचें (भांडें वगैरे); खोलपुडें. २ उपडें; खालीं तोंड करून (निजणें).

**खोलपी**—स्त्री. (गो.) १ एका पानाचा एक टांका देऊन केलेला द्रोण. २ (चि.) पानाची, पण खालचें टोंक दुमटलेली (ताक वगैरे पातळ पदार्थ घेऊन पिण्यासाठीं केलेली) पोकळ घडी.

**खोलावाव**—दत्तक. [ ? ]

**खोलून**—क्रिवि. खुलेपणानें; मोकळेपणानें. 'महाबत-जंगास खोलून लिहावें की रघोजीस सहसा येऊं देत नाहीं.' -पेद २.१०. [ खोलणें ]

**खोळ-ळी**—स्त्री. १ मृत पशूचें चामडें. २ मृत देह; मढें. 'हरिणीविण खोळी पडलीसे वोस। दशदिशा पाडस भ्रमताती॥' -नामगा.

**खौफ**—पु. भीति. -आफ. [ अर. ]

**ख्यातनाम**—वि. प्रसिद्ध. [ सं. ]

**ख्रिस्ती दीक्षित**—पु. ख्रिस्ती धर्माप्रमाणें ज्याचा बाप्तिस्मा झाला आहे असा. -नि ५१६.

**ख्वाजह**—पु. थोर, पवित्र मनुष्य; धनि. -मुधो. [फा.]

**ख्वाब**—स्त्री. झोंप. -मुधो. [ फा. तुल. सं. स्वप् ]

**ख्वाबगाह**—पु. शयनगृह; खाबगा पहा. 'येक दिवाणखानेयाचा व खलबतखाना ख्वाबगाह मिळोन डेरा यैसे दोन डेरे वेगळे उभे केले.' -पेद २५-५७. 'छ. २९ रोज गुरुवारी प्रहर दिवसा ख्वाबगामध्यें नबाब बरामद जाले.' -रा ७.२६६. [ फा. ]

**ख्वास्त**—अक्रि. इच्छिणें. -मुधो. [ फा. ]

**ख्वाद्याफ्त**—क्रि. मिळवील. -मुधो. [ फा. ]

**ख्वाहान**—पु. इच्छिणारे. -मुधो. [ फा. ]

# ग

**गंगापार**—वि. गंगानदीपलीकडे. 'रोहिले म्हणताती आमचा मुलुक गंगापार आहे तो तुम्ही रक्षा आम्ही वाट देतो.' -पेद २७ २४०. [सं. गंगा+पार-उत्तर-अपर]

**गंगावतरण**—न. ज्याप्रमाणें हिमालयांतून गंगा भरतखंडांत मोठ्या प्रयासानें आली त्याप्रमाणें अत्यंत परिश्रमानें घडून येणारी गोष्ट; दुःसाध्य गोष्ट. 'हिंदुस्थानच्या लष्करी करणाचें गंगावतरण लो. टिळकांच्या प्रयत्नामुळें आज हिंदुस्थानावर येत आहे.' -के १०.६.१९४१. [सं. गंगा+अवतरण]

**गंगावार**—वि. गंगानदीचे अलीकडे. 'अहमदखान बंगशाचा मुलुक गंगापार नाहीं, गंगावार आहे.' -पेद २७. २४०. [सं. गंगा+अवर]

**गचपच**—वि. (व.) दाटीचा; गर्दीचा; गडगंज भरलेला. 'भरल्या बाजारांत। मोठं दुकान कोणाचं। गचपच पसाऱ्याचं। किल्ली कुलुप सोन्याचं।' -वलो ४१. [गच्च ध्व.]

**गजका**—पु. हुंदका. [ध्व.]

**गजकुंत**—पु. भाला. -प्रश १७. [सं.]

**गजचर्या**—स्त्री. हत्तीवर बसण्याची विद्या; हत्ती चालविण्याचें कौशल्य. 'कुस्ती शिवायचे खेळ व कसरतीचे प्रकार म्हणजे रथचर्या, गजचर्या, अश्वचर्या, तलवारीचें युद्ध व गदायुद्ध होत.' -व्याज्ञा १.३६. [सं.]

**गजढाल**—वि. ढालगज पहा. 'त्यावरून आईसाहेब बोलली कीं, मी बायको गजढाल असे लोक म्हणतात.' -भारतवर्ष, आमात्य बावडेकर कैफियत १८.

**गजपथ क्षेत्र**—न. नाशिक. -के १९.८.१९४१. [सं.]

**गजबीड**—पु. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्षाच्या पाठीवर असतां दुसरा पट पायानें स्थानभ्रष्ट करणें. [सं. गज+भिडणें]

**गजवज्र**—न खड्ग; एक तरवारीचा प्रकार. -प्रश १५. [सं.]

**गजवेल**—स्त्री. आंबेमोहोर तांदुळाची एक जात. [?]

**गजांकुश**—पु. सराव्याची एक जात. -चित्रकृषि २.३. [सं. गज+अंकुश]

**गंजी**—स्त्री. अंधार कोठडी. 'सत्याग्रहींना गंजीमध्यें ठेवण्यांत आलें.' -के ९.३.१९३९. [?]

**गझावत**—स्त्री. पवित्र बुद्धि. [?]

**गटकी**—स्त्री. गंडा; चट्टा. 'चार उपद्व्यापी माणसें लोकांना गटकी घालून आपल्या मनाची हौस पुरवून घेतात.' -गोव्या १४६. [गटणें, गटविणें?]

**गटी**—स्त्री. गट्टी पहा. मैत्री; सलगी; जूट. 'काजी दाउदखान गटीत असतो.' -पेद ३४.१९.

**गट्ठा**—पु. जून झालेली चवारी सुपारी. [फा.]

**गठ्ठ्यांचा खेळ**—पु. चवारी सुपाऱ्यांनीं खेळणें. 'आमचे आवडीचे खेळ म्हणजे गठ्ठे व आटयापाटया.' -आत्मवृत्त ७२.

**गंडजोग्या**—वि. आळशी; मद्दड; बश्या; हेंगशा.

**गडत, गडद, गडता, गडदा**—पु. बंदुकीचा प्रकार. 'गडताचा मार सोसवत नाहीं.' -साब ४६. [ग्रेनेड]

**गडद**—स्त्री. अंधार कोठडी; भुयार. 'किल्ले लोहगड पायनाळयास सरकारचे कोठीची गडद आहे.' -बाबारो ३. १९८. 'गडदेंत सोनें; रुपें वगैरे ठेवलें होतें.' -समारो ६. १३९. [सं. गर्ता]

**गडदा**—पु. किरवीं पकडण्यासाठीं बांबूचा केलेले नळा. [?]

**गडदू**—पु. दगड; धोंडा. 'गांवचे उत्तरेस गडदू.' -आत्मवृत्त १४. [?]

**गंडरामी**—स्त्री. नेहमीं पुरुषांत वागणारी; पुरुषाप्रमाणें कारभार करणारी स्त्री. [?]

**गडसंधि**—स्त्री. रचना; ठेवण; व्यूह; स्थिति; मांडणी; स्थापना. 'रतबाचे आमचे दरम्यान येमाजीपंत यैसी गडसंधि आहे.' -पेद २६.७६. [गड+संधि]

**गडसा**—पु. कोयता. -के १३.१०.१९३६.

**गंडस्फाटण**—न. [चुकीनें गांड फाटणें] कपाळमोक्ष; कपाळ फुटणें. 'आमची पांचाची धारण बसली; गंडस्फाटणच जाले.' -पेद ३२.१९३. [गंड=कपाळ; स्फाटण-स्फोटण=भेद]

**गडीखेच**—स्त्री. एक मुलांचा स्काउट खेळ. -व्याज्ञे १.३९५

**गडी फू**—स्त्री. फारकत; ताटातूट; पृथकत्व. 'राजकारण व वाङ्मय यांची अजीबात गडीफू कशी होऊं शकेल.' -प्रतिभा ४.६. [गडी+फू]

**गडीलेप**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे ६२.

**गड्ड्याचा बाजार**—पु. सोलापुरास सिद्धेश्वराच्या विवाहानिमित्त संक्रांतीच्या आगेंमागें भरणारी जत्रा.' -अंगोसं १८१.

**गणपत**—पु. सापसुरळी; गौघार; गौघेर; गौधेय. –मसाप ४५.५. अमर.

**गणपति**—पु. (थट्टेनें) लट्टंभारती; ढेरपोट्या; बऱ्या. गणपतीचें पोट मोठें असतें यावरून थट्टेनें. [सं.]

**गणपतिपूजन**—पु. १ कोणत्याहि विधीचा प्रारंभ करतांना प्रथम गणपतिपूजन करतात यावरून कामाचा प्रारंभ. २ (ल.) गरोदर स्थिति.

**गद्‌बळणें**—अक्रि. गोंधळणें; गडबडणें; घोंटाळ्यांत पडणें, सांपडण्यासारखें नसणें. [ध्व.]

**गदाणा**—पु. कंदमय वनस्पति. जनावरांच्या सुजेवर लेप देतात. –चित्रकृषि २.६. [?]

**गदाळ्या**—वि. हेंदरट; खुळसट. [?]

**गद्धागद्धी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. –मखे १०२.

**गद्धारा**—पु. एक तरवारीचा प्रकार. –प्रश. [गदूर]

**गद्धेलोट**—पु. (कुस्ती) दोन्ही गड्यांनीं परस्परांस उताणें पाडणें. [गद्धा+लोटणें; किंवा गद्दा+लोटणें]

**गद्यकाव्य**—न. काव्यमय विचारांची व कल्पनांची गद्यांत केलेली मांडणी. [सं.]

**गद्यगीत**—न. भावना व कल्पना यांच्या साहाय्यानें मानसिक उद्रेकवेदनादि विकार व्यक्त करणारा एक वाङ्मय-प्रकार. [सं.]

**गन्जूर**—पु. वखार; खजीनायुक्त जागा. –मुधो. [फा.]

**गनूदन**—अक्रि. डुलकी घेणें; पेंगणें. [फा.]

**गबबा**—पु. जुन्या सुती कापडाचें शिवून फुलें वगैरे काढून केलेलें जाजम. –के ५.१२.१९४१

**गमखोरी**—स्त्री; गम खाणें; शांत राहणें; क्षमा करणें; सोसणें. 'आपणाकडील वसूल देतात व फौजदारी मनमोन तैसी घेऊन बेठे बिगार नाना प्रकारे रयतेस लावतात. तथापि इकडून गमखोरी कोणे प्रकारे जहाली आहे हे तुम्हास ठावकेच आहे ' –पेद २५.६. [अर. घम+खोरी]

**गमनपिण**—न. मात्रागमनीपणा; कपट, नीचपणा; 'वोडसेकर राजे हाटेसिंग सरदारानी स्थापिले होते त्यास अष्ट भया त्याचे भाऊबंद याणी गमनीपण करून राज्यास न दबता ग्रह भेदे करून हटेसिंग राजियास काढून देऊन वोडशाची जागा बलाविली आहे. ' –पेद २९.२३०. [गमनी पहा]

**गमासीस**—पु. डिंक येण्याचा रोग. पपनस, मोसंबी यांस होतो. उपाय क्रियोसोट व डांबर लावणें. –के ४.१२. १९३६. [इं. गम=डिंक]

**गरग**—स्त्री. एक जातीची लसूण. हीस दर्प कमी असतो.

**गरवें**—वि. उशीरा पिकणारें; महान. याच्या उलट हळवें (पीक वगैरे) [सं. गुरु]

**गराळ**—वि. गर असलेलें (फळ). उदा. रामफळ; फणस. ' ऋतूद्भव गराळ फळेंहि खावीं. ' –पुरु. नोव्हें ३९.

**गरीफदारी**—स्त्री. गुंता; बंधन; अडचण. 'या गरीफदारीत सा महिने गेले आणखी किती दिवस जातील पहावें. ' –पेद १८.८९. [अर. गीर पहा]

**गरीबगोर**—वि. हीन; अनाथ; गरीबगुरीब; निराश्रित; असहाय. 'औरंगाबाद सभोवते चोरराउतानी उपद्रव फार मांडिला आहे. गरीबगोर मारलें जातें. ' –पेद २२.१०. [गरीब द्वि.]

**गरुग**—स्त्री. लसणीची एक जात. हिचा वास किंवा दर्प मंद असतो. गरग पहा.

**गरुड**—पु. आखाडा; तालीमखाना ' कीं गगन चित्रें गरुडीं। घातलीं कर्पुर-चुरी चोखडी। सरावो यावया चहुबुडी। अनंगें आचार्य। ' –नरुस्व ४९५.

**गरुडझेप**—स्त्री. अचानक उडी; आकस्मिक उड्डाण; गरुड जसा आकाशांतून एकदम झेप घालतो त्याप्रमाणें आक्रमण. ' हिंदुत्वनिष्ठांच्या पक्षासारखा नवापक्ष पुढें येण्यास अशीच गरुडझेंप घ्यावयास पाहिजे होती. ' –के १२.१२. १९३९.

**गरुडझेपी विमान**—न. उंच उडून मध्येंच खालीं येऊन पुनः वर उडणारें विमान.

**गरुडासन**—न. (मल्लखांब) मल्लखांबाच्या बोंडावर एक पाय टेकून दुसरा पाय त्यावर आडवा घेऊन हात जोडून उभें राहणें. –व्याज्ञा ३.२४५.

**गरुड उडी**—स्त्री. (मल्लखांब) लांबून धांवत येऊन मारावयाची उडी. –व्याज्ञा ३.१०२.

**गरुडध्वनि**—पु. एक राग. [सं. गरुड+ध्वनि]

**गर्दनखेंच**—स्त्री. एक मुलांचा स्काऊट् खेळ. –व्याज्ञा २.३१८. [गर्दन+खेचणें]

**गर्दनस्वारी**—स्त्री. (कुस्ती) प्रतिपक्ष्याच्या मानेस विळखा घालणें. [गर्दन+स्वारी]

**गर्दानन्द**—व्हावें. –आफ. [फा.]

**गर्दून**—पु. आकाश. –आफ; [अर.]

**गर्दून असास**—पु. आकाश एवढा वाडा असणारा. –मुधो. [अर.]

**गर्भगुडी**—स्त्री. गाभारा. –सह्या. मे १९३८. [सं. गर्भ+कान. गुडी]

**गर्भासन**—न. (मल्लखांब) मल्लखांबास हाताची गोफण बांधून दोन्ही पाय लावून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२२९. [सं. गर्भ+आसन]

**गर्मरू**—वि. तप्त मुख; तप्त चेहरा असलेला. -मुधो. [अर. घर्म+रू]

**गलतनी**—स्त्री. तलवार म्यानास अडकविण्याचा गोफ. -प्रश ६९. [अर. गलता=तरवारीचें कातडी म्यान]

**गलथानपणा**—पु. गबाळेपणा; अव्यवस्थितपणा; बेसावधपणा; निष्काळजीपणा. 'नाटकाचा धंदा गलथानपणें केला कीं यासारखा पाताळांत नेणारा दुसरा नाहीं.' -माभू. [अर. गलतान=लोळणें; लडबडणें.]

**गलबत जलवाहा**—पु. एक प्रकारचें गलबत.

**गलबाय दादाद करणें**—अक्रि. गळा दाबून प्राण घेणें.

**गलाटा**—पु. गोंधळ; बिघाड; अस्ताव्यस्तपणा. गळहाटा पहा. 'येथील विसंच फौजेचा गलाटा' -पेद ५ ६०. 'समये रात्रीचा यास्तव थोडासा गलाटा जाहाला.' -पेद ३७.१९८. [गळहाटा पहा]

**गलूफी**—वि. बनावट. 'कागदपत्र दाखविला तो गलूफी दिसून आला.' -बाबारो २.१५. [अर. गिलाफ=झांकण, खोळ]

**गलोब**—पु. गळाठा; दुर्दशा. 'ते समई नाश जाला तो कोठवर ल्याहावा. सारांश वस्त्रहीन सर्व जाले. तेव्हां फार गलोब जाला' -वोघले बखर ३.३५४. [ध्व]

**गलोला**—पु. गोळा. 'अग्निचा गलोला दत्ताजीराव जाधव चालिला' -ऐपो २.२३ [सं. गोल]

**गलौघ**—पु. घटसर्प. [सं. गल+ओघ]

**गल्याढा**—स्त्री. गलांडा; गंडमाळा. 'ती. राजश्री शेषरावजीच्या गळयास गल्याढा जाला तेणे करून दोन मास हैराण जाले.' -पेद ४२.३२. [सं. गल+ग्रंथि ? आढी ?]

**गल्ली**—स्त्री. 'स्थानिक वायदे बाजारांत मार्गशीर्ष ते पौष वायद्यामध्यें तेज्या व गल्या लाविल्या.' -के ११.११. १९४१.

**गव**—स्त्री. वळसा; सभोवती चक्कर. 'तत्राप फौजेस गव घालून हरिपंत तात्या दादासाहेबांचे मार्गे लागले.' -भारतवर्ष पंतप्रधान दुसरी शकावली ६३. [सं. ग्रह-गृह् ?]

**गवछा**—पु. (प्रयाग) अंगोच्छा; अंगवस्त्र. -चित्र. आक्टो १९३५. [सं. अंग+वस्त्र]

**गवठ**—पु. अंगलट; अंगाची ठेवण. 'दोघी नोवऱ्यांमध्यें मिठो घाटगे याची मुली नेमस्त करावी यैसा विचार जाहला. दोहीमध्यें मुलीचा गवठ आणि सगूण हेच.' -पेद ३०.२२. [?]

**गवताचीं विडें**—नअव. गवताचीं रानें; शेतें.

**गवराई**—स्त्री. स्त्री; बायको. [गौर]

**गवला**—पु. गव्हला पहा. एक सुगंधी वनस्पति. कापूरचिनी; कोशफल. -मसाप ४५.६.

**गवशा**—वि. कांहींतरी मिळवावें या अपेक्षेनें आलेला; ग्रहणेच्छु; लाभेच्छु. -के १२.३.१९३७. [गवसणें]

**गवाडा, गवाड, गवडे, गवाडे**—पु. रुपयांचा तोडा बांधणारा मनुष्य. '५०० तोडा गुलाबसा साकरसा गवाडे परशुराम दिमत कृष्णापा नरसापा.'

**गवांदी**—स्त्री. (महानु.) हेटाळणी. 'मिळे मुनिची मांदी। एकमेकां उपजे गवांदी.'

**गवाही**—पु. गोही; साक्षीदार. -आफ. [फा.]

**गव्हाई**—स्त्री. पळापळ; पांगापांग. 'त्यावरी विलायती गव्हाई झाली.' -फडतरे चऱ्होलीकर महजर.

**गव्हाची माळ**—स्त्री. गव्हाच्या आकाराच्या सोन्याच्या मण्यांची स्त्रियांच्या गळयांत घालावयाची एक माळ, दागिना. [गहूं+माळ]

**गव्हाण मास्तर**—पु. -के २१.१.१९३६.

**गश्त**—वि. होऊन. --आफ. [फा.]

**गश्त**—क्रि. हिंडणें, होणें. -मुधो. [फा.]

**गश्तह**—होऊन. -मुधो. [फा.]

**गहरेपणा**—पु. दृढता; सांद्रता; 'तुमच्या दृष्टींत मला प्रेमळपणाचा ओलावा दिसे पण विषारी गहरेपणा कधींच दिसला नाहीं.' -कावळा आणि डापी. [गहिरा=दाट]

**गहिरणें**—अक्रि. (व.) गहिंवरणें; दुःखी होणें. 'माहा जीव गेला। कशी गहरे साऱ्या रात। भरजरीचा पदर। भिजला सवा हात।' -वलो ६८. [गहिंवरणें]

**गही**—स्त्री. (व.) छपराची खालची बाजू; वळचणीची गळी; पागोळी. 'माहाजीव गेला। जन बैसले कहीचे। वाट पाहातां कोणाची। वेळू उपसा गहीचे।' -वलो ६८.

**गळखोडा**—पु. (कुस्ती) प्रतिपक्ष्याच्या गळयाभोंवती पायांचा विळखा घालण्याचा डाव. -व्याज्ञा ३.८ [गळ+खोडा]

**गळगळी**—स्त्री. काकुळत; गयावया. 'गळगळीचा स्वर.' -श्रुति गु ८८. [ध्व]

**गळफांस**—पु. (कुस्ती) एक डाव. डाव्या हातानें मान धरून उजव्या हाताच्या बोटांनीं प्रतिपक्ष्याचें नरडें दाबणें. [गळ+फांस]

**गळमोडी**—स्त्री. (महानु.) मान मोडणें. 'आवर्तू गळमोडी मारुनि बका धात्री घडी पूजिली.' -गस्तो ७७. [गळा+मोडणें]

**गळसरी**—स्त्री- गरसळी पहा. १ सोन्याच्या किंवा कांचेच्या मण्यांत सोन्याचे मणी ओवलेला स्त्रियांचा एक दागिना. २ मंगळसूत्र. [गळा+सर]

**गळहोडी**—स्त्री. गळयाची शपथ; 'तुम्ही सप्त पूर्वजाचे सुकुर्त स्मरौन बोला म्हनौनु सेपथ वा गळहोड देवाचे घातले उपरि समस्त महाजन व सेवकवर्ग आपले सुकुर्त स्मरौन बोलिले जे' -रा २०.२१८. [गळा+होड]

**गळित**—वि गाळलेले; दुर्लक्ष केलेले; मागें टाकलेले. 'सारांश हे दोन्ही मतलब आमचे गळित करून दिल्हे.' -रा १०.१०३. [गाळणें]

**गाऊ**—(गु.) सव्वा मैल. -ज्ञाको २१.२७४. [ग्राम ?]

**गांगरपट्टी**—स्त्री. गडबड; धांदल; तारांबळ; घोटाळा. 'त्या सरशी ते अगदीं चकित होऊन गेले. त्यांची सोळा आणे गांगरपट्टी उडाली व त्यांची पुरी फजिती झाली.' -विद्याभिवृद्धि १६०. [गांगरणें+पट्टी]

**गाझा**—गरजा पहा.

**गांजलिडणें**—अक्रि. त्रासणें; दमणें; गळणें; दुःखी होणें. 'वैरण मिळत नाहीं, सालवण लागलें आहे. याजमुळें लोकांच्या घोडया गांजलिडतात.' -रा १०.६०. [गांजणें]

**गांठणें, गांठविणें**—उक्रि. एखादा दागिना वगैरे रेशमानें पटविणें. (पटवेकरी) [सं. ग्रथन]

**गाठा फोडणें**—वाघ्या मुरळयांचे लग्नांत गुरव एक कवडयांची माळ मुलीच्या गळयांत घालतो त्या माळेस गाठा व विधीस गाठा फोडणें म्हणतात.

**गांठाळलेपणा**—पु. संकुचित वृत्ति; जुने संस्कार. -परशु १३१. [सं. ग्रंथि-गांठ]

**गाठून बसणें**—डांबून बसणें; वेढून बसणें; ठाम बसणें. 'यास्तव गोवलचे कोटास गाठून बसलें.' -पेद३.१५. [गांठणें]

**गाड**—स्त्री. रोष; गैरमर्जी. 'आपणावरी फारसी गाड आहे.' -पेद २११. [?]

**गांड वांकडी करणें**—नामोहरम होणें; माघार घेणें; तोंड चुकविणें. 'राजमंडलच सर्व फिरले असले गमाजीपंत दोन अडीच हजार जमा होऊन आले तर मग आहे ते आयते वेलेस गांड वाकडी करावी अथवा फारासी थोडयानी जुझावे हे मसलत उचीत नाहीं.' -पुद १.३०६.

**गाडली**—पु.वि.संरक्षक; राखणदार; पहारेकरी. 'सबब माणसे गाडली ठेविली. कालपासून इकडे पेंढारी निा शिंदे याची आवई दाट उठली.' -रा १०.५१६. 'आपण जिनस दिला तो गाडलीवर घालून शनवारीं संध्याकाळ पो येऊन पोहचेल.' -रा १०.५१५. [इं. गार्ड=पहारेकरी]

**गांडर**—स्त्री. एक वनस्पति. वीरण; नीरतर. -मसाप ४५.५.

**गांडर दुर्वा**—स्त्री. एक वनस्पति; गंडीर; समष्ठिला; -मसाप ४१.४.

**गांडापूर**—न. गुदद्वार. 'गांडापूर वाहूं लागलें.' -एभारूड.

**गाडीगाडी**—स्त्री. मुलांचा एक स्काऊट खेळ. -व्याज्ञा १.३०३.

**गांडीचें गरगट होणें**—पादडलें जाणें; भूस पडणें; दमणें; थकणें.

**गाढिका**—स्त्री. १ प्रौढी; ऐट; पुरुषार्थ; बढाई; पराक्रम. 'हळदुवांचे पिलुकें। मुखें विनवति रूपकें। कोकिळा मंगळ-रागु कवतिकें। गाति गाढिकासी।' -नरुस्व ७५१. २ थोर; पुष्कळ. 'वारिणी साती मेळवी आइका । धाकुटिया चेंढति वारुवां वारिकां । विश्वास विकार गाढिका । सवें चालताती ।' -नरुस्व ३८५. [सं. गाध]

**गाताडी**—स्त्री. लांकूड; दांडा; सांपूड. 'राजावळीचे गांवांतून गाताडया आणून त्याचा ताफा बांधला.' -वसमो. [सं. गात्र]

**गाथा**—पु.स्त्री. काव्यसंग्रह. [सं. ग्रथ्]

**गादणें**—अक्रि. जमणें. 'तेथ समुद्रीं मोकलिलें कटक। तैसे सैंग सरोवर अनेक। तुंब वाहतां गादलें उदक। तो जाहला क्षीर समुद्र।' -नरुस्व ८२७. [गाध]

**गादिया**—पु. गादा पहा. समुद्रांतील मोठा मासा. 'गादिया देखील कुलबाब.' -वाबारो ३.३.

**गाधा**—पु. सहा सात फूट लांबीचा मासा. गादा पहा.

**गापटी**—स्त्री. (नाविक) पसरलेला कातळ; खडक.

**गाबडी शेट**—क्रिवि. गबाळेपणाचा; गचाळासारखें; गडबडगुंडा करून. 'हे शब्द बरोबर लिहिलें नाहींत. इच्छेस वाटेल तसे गाबडीशेट लिहिले आहेत.' -पेद ४१.३२२.

**गाबती-गावीत**—पु. महाराष्ट्रांतील एक दर्यावर्दी जात.

**गामचछोडा**—पु. पेशवाई व आंग्लाई यांच्या दरम्यानच्या काळांत प्रवाशांस लुटणारी एक जात.' -अर्थ २. ११.१९३८.५९. [सं. ग्राम+छोडना]

**गामायगौराय**—स्त्री. सोम्यागोम्या; फालतु माणूस; कोणीतरी. 'अरे मी चवदा चवकडयाचा राजा रावण, मला कसें नाहीं पत्र पाठविलेंस ? आणि गामायगौराय इत्यादिकांना

पत्रें पाठवून मला कसें नाहीं पाठविलेंस ?' -दशावतार मसाप २७. [गामाई-गौराई]

**गायत्री**—वि. गाईसारखा गरीब; निरुपद्रवी; साधा. 'तो गायत्री आहे., -राजगुरु वही. [सं.]

**गायदुम**—स्त्री. हातावर शरीराचा तोल संभाळून पाय डोकीवर आणून हातावर चालत जाण्याची कसरत. -व्याज्ञा ३.४२९ [सं. गो+दूम=शेपटी]

**गाया [गाळा?]**—पु. खड्डा; घरटें. 'रानडुकरांनीं गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्रदर्शन होऊं नये म्हणून तोंडे खुपसून बसण्यासाठीं गाये केलेले आहेत.' -बलवंत ९.९. १९३५.

**गारणें**—अक्रि. (महानु.) थंड पडणें; शांत होणें. 'सभा मंडपाचें देखोनि वैंवंपण । कैळासु गारैला आपण ।' -नरुस्व १०२४, [गार]

**गारपीट**—स्त्री. गारांचा वर्षाव; गारांचा पाऊस. 'सुरगुजा येथें गारपीट होऊन ३४ इसम ठार झाले.' -के ७.४. १९३९. [गार+पिटणें]

**गाऱ्हाणें बोलणें**—(का.) शत्रूचा नाश व्हावा म्हणून जो देवास नवस करतात तो.

**गालप**—वि. गालब पहा. 'याजवरील इभ्रत बहुत गालप पडली आहे.' -पेद २४.

**गालबता**—स्त्री. वर्चस्व; वरचढपणा. 'उभयतांवरील गालबता संपादिली.' -पेद २.१६. [सं. घालिब=वरचढ]

**गालुशी**—स्त्री. १ गालउशी; लहान गिरदी. २ (ल.) स्तन. 'तुझ्या वक्षाच्या मऊमऊ गालुशीवर मस्तक ठेवतांच त्यांनीं सगळा शीण शोषून घेतला.' -संन्यख ८९.

**गांवकीर्दसार**—लागवडसार. -के १२.११.१९३७.

**गांवखंडी**—स्त्री. खंडणी. 'वसई प्रांतांतून संभाजीला गांवखंडी मिळाली.' -वसमो. 'वसईवर गांवखंडी आणि दमणावर चौथाई लादण्यांत आली.' -के २३.६.१९३६.

**गांवगत**—स्त्री. गांवासंबंधीचें काम; गांवचें काम; गांवांत उत्पन्न होणारें काम. 'त्याजला पेशव्यांनीं पत्र करून दिल्हें कीं, तुझें गांवगतीचें काम तुझें तूं कर. श्रीनीं नवीन देवळें बांधलीं आहेत तेथील पूजा श्रीचे श्री घेतात.' -रा. द. पृ १९

**गांवगाई**—स्त्री. नगरभवानी.

**गांवगुंडी**—स्त्री. ग्रामदेवतांस नैवेद्य दाखवून सर्व मानकरी व गोरगरीब यांस प्रसाद वाटणें. -आडिमहा प्र ७.

**गांवबलांडा**—पु. गांवातील बालंट, उचापती, कुरापती गांवाबद्दल खस्त; त्रास. 'बेवीस वर्षे चाकरी सेवा कोणी केली चाकरीचे गांवबलांडे सोसले.' -रा १०.३७८. [गांव+बालंट]

**गावा**—पु. जथा; गट; संघ; घडण. 'माणूस विश्वासूक पुरातन राज्यांतील येका गाव्याचे आहेत याचा संग्रह खामखा असावा.' -पेद ३०.२३५. [सं. गृह-ग्रह=गावणें]

**गावी**—न. परभाणाच्या वर डोलकाठीच्या कळशीजवळचें शीड. 'गावी परबान जाया झालें.' -थोमारो ९. २३६.

**गासिबानह**—वि. जबरदस्त. -मुधो. [अर.)

**गाहा**—पु. जमाव; तयारी; स्थान धरणें. 'तुम्ही आपले फौजेनिशी गाहा करून असणें.' -शारो १.५. 'लहानथोराची दिलभरी करून फौजेचा गाहा करीत असतो.' -पेद १.२५. 'पत्रांमागून पत्रें व जासूद जोडया रवाना करून फौजेची गाहा येई तें करणें.' -रा ३.२२२. [ग्राह?]

**गाळपेरा**—स्त्री. धान्य पेरण्यालायक बनलेल्या गाळाच्या जमिनी. 'सरकारी तलावांतील गाळपेरा जमीन ३५ एकर लागवडीकरितां खंडानें देणें आहे.' -के ९.९.१९४१. [गाळ+पेरणें]

**गिट्टा**—पु. घट्टा पहा. खेळतांना मारावयाची मोठी गोटी वगैरे. -व्याज्ञा १.१५५. [गट्ठा]

**गिंती**—स्त्री. गणती; मोजदाद. 'माणसांची गिंती ठेवणें इत्यादि सूचना देण्यांत आल्या.' -त्रि ४.९.१९३९. [गणणें]

**गिर्दीवारी**—स्त्री. (ता.) कागदपत्रांची पाहाणी.

**गिरगिर मासा**—पु. एक मुलींचा वाटोळें फिरून खेळण्याचा खेळ. -मखे ३२९.

**गिरणगांव**—न. गिरण्या व कारखाने असणारा शहराचा भाग. [गिरणी+गांव]

**गिरंदार, गिरंबार**—वि. श्रीमंत व तोलदार मनुष्य.

**गिरफ्तन**—क्रि. घेणें. -मुधो. [अर.]

**गिरमिट**—न. करार; मुदतबंदी (मजूरांची). -मस प्र १३०. [इं. अॅग्रिमेंट]

**गिरामी**—वि. मोठी; फार. -मुधो. [अर.]

**गिरास**—स्त्री. गिराशी लोकांचें वतन. 'गिरास पूर्वीप्रमाणें आम्ही घेत आलों त्याप्रमाणें महालकरी देत नाहीं.' -दुबारो ५.१६४. [गिराशी]

**गिरिफ्त**—स्त्री. धरणें; बांधणें. -आफ. [फा.]

**गिरी**—स्त्री. गिरकी; फेरा; वळसा; वेढा; वर्तुळाकार भ्रमण. 'पांच चार गिऱ्या मारीत अगदीं दमून जमिनीवर बसतात.' -विछ १०. [गिरका; अर. घर्क]

**गिरेबान**—स्त्री. गळपट्टी. -मुधो. [अर.]

**गिर्दाब**—पु. भोंवरा. -मुधो. [अर.]

**गिर्रेबाज**—वि. अघळपघळ; विस्तृत; घेरेबाज; गिरेबाज कबूतराप्रमाणें. 'तें सामर्थ्य वसुंधरेच्या लंब्याचवडया गिर्रेबाज प्रवचनांत नाहीं.' -वावि १६०. [फा.]

**गिलकारी**—स्त्री. चिखल मातीचें बांधकाम. 'मध्यें पुरवणीस गिलकारी व धोंडे घालून पुरवणी भरतो.' -वसमो. [फा. गिल=चिखल, माती]

**गिलावस**—स्त्री. पाणथळ जमीन. 'जमीन गिलावस व कडधन व सर्दभात येणेंप्रमाणें.' -समारो ४.६०. [फा. गिल=चिखल]

**गीम पाऊस**—क्रिवि. बारमहा; वर्षभर; सतत. -चित्र-कृषि २३. [सं. ग्रीष्म प्रावृट्]

**गीर**—पु. सोरटी बैल; काठेवाडी गाई बैलांची जात. -के २६.७.१९३७.

**गीर्दपेश**—क्रिवि. आसपास; सभोवार. 'मौजे रीयाचे गीर्दपेश दाहा कोसांत पाणी नव्हतें.' -पेद २.१६. [फा. गीर्द+पेशी]

**गीर्देवारी**—स्त्री. गिर्दावरी पहा. 'सबब बागाइतास गीर्देवारी बसविली आहे.' -समारो ६.२२७. [फा.]

**गुगुली गोलंदाजी**—स्त्री. (क्रिकेट) हलू पण फसवी गोलंदाजी; गिरकीबाज गोलंदाजी. 'गुगुली गोलंदाजीमुळें प्रसिद्धीस आलेले ऑस्ट्रेलियन गोलंदाज.' -के ४.२१९४१. [इं.]

**गुग्गुळ**—पु. गुग्गुळ काढणें पहा. लिंगाइत लोकांत विवाहापूर्वी करावयाचा एक विधि. दोन शेगडयांमध्यें विस्तव घेऊन मिरवणूक काढतात व नंतर त्या फोडून टाकतात. -लविसो १६३.

**गुच्चापाणी**—न. एक मुलांचा खेळ. -मखे १०५.

**गुछली**—स्त्री. दोऱ्याची आंगठा व करंगळी यांसभोवती वेढून केलेली गुंडाळी ∞ आकाराची. -व्याज्ञा १.१६२.

**गुजगोष्टी**—स्त्री. एक लेखन प्रकार. निबंधापेक्षां निकट-वर्ती मित्रांशीं केलेल्या गोष्टी; वार्तालाप. यांत मार्मिक विचा-रांस अवकाश असतो.' -ज्योत्स्ना सप्टें १९४. [सं. गुह्य+गोष्टी]

**गुंज**—स्त्री. जमाव; जथा; जूट. [गुंज-गुंत-ग्रथन]

**गुंजा**—स्त्री. अव. पुष्पकोश गळून पडल्यावर मागें राहणारा बीजकोश. 'झाडांना बार फुटतो व मग त्यांच्या गुंजा बाजूनें फळें धरतात.' पाणकळा.

**गुजारंद**—क्रि. गुदरावें; घालवावें. -आफ; -मुधो. [फा.]

**गुजाश्तन, गुजाश्त**—वि. घालविलेलें.

**गुंजासी**—वि. लाभकारक; फायद्याचा. 'हसनाबाद व निलंगे हे दोनी महाल चांगले गुंजासी आहेत.' -पेद २५.२९५. [फा. गुंजाइश पहा.]

**गुंजाळी**—स्त्री. गुंतागुंत. 'सुताची गुंजाळी झाली आहे.' [गुंज]

**गुटण**—स्त्री. दोन्ही गुडघ्यावर आडवा मारलेला वार. -मवि. ९.११. [घुटण?]

**गुडघी**—स्त्री. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या गुड-घ्याच्या वाटीवर व मागून गुडघ्याच्या लवणींत आपल्या डाव्या उजव्या पायाचा जोरानें ठोसा मारणें.' -के १३.१२.१९३८.

**गुडशास्त्र**—वि. मटन खाणारा. -स्मृतिचि ४.६.

**गुडीगुडी**—वि. गुळमुळीत. 'गुडीगुडी चोरून ठेऊन राष्ट्राचा नाश होतो.' -के ९.५.१९४१. [इं. गुड]

**गुंडी घालणें-देणें**—अक्रि. म्हशीनें प.ना सोडावा म्हणून तिची शेपटी तिच्या योनींत घालणें. [गुंडी]

**गुडीगार**—पु. (म्है.) चंदनाच्या लांकडावर नकशी-काम करणारे.

**गुढगा-गुढगे**—पुनः आधार; आश्रय; टेंका. 'हे अभिमानास फार आहेत. तिकडील माणसाचे गुढगे फार.' -पेद ३६.३३६. 'त्यांत मोगल मागाहून येतो त्याचा गुडगा आंतून आहे.' पेद ३७.१५५. [गुडघा पहा]

**गुढी**—स्त्री. (खा.) भगत घुमूं लागला म्हणजे त्याच्या-पुढें गहूं, सुपारी, पैसे वगैरे ठेवतात ती मांड.

**गुढी परजाणणें**—हातांत गहूं घेऊन भगत विचार-लेल्या प्रश्नांचीं उत्तरें देतो त्यास म्हणतात. -संशोधन ऐ. ले. ५.२६९.

**गुढें**—न. सखल जागेंतील पाणी उंच जागीं फेकण्या-करितां त्रिकोणी संबळीच्या आकाराची टोपली. या टोपलीस दोन्ही बाजूंस मागें पुढें दोऱ्या बांधून त्या हातांत धरून पाणी वर फेंकतात.

**गुण करणें**—अक्रि. कुशलता दाखविणें; शहाणपण दाखविणें. 'मालती हल्लीं फारच गुण करिती झाली. तिला कीं नाहीं लहान बांगडया करून आणावयास पाहिजेत.' -विविध-वृत्त १६.७.१९३६.

**गुणकला**—स्त्री. गुणगान. -आत्मतेज. [सं.गुण+कला]

**गुणकी**—स्त्री. गुंडी; बटन; बिरडें. [गुंडी]

**गुणीबाब्या**—(उप.) मूर्ख मुलगा. [गुण+बाबा]

**गुणीबाळ**—न. गुणवान् मूल; लाडकें बाळ. सरळ अर्थानें व उपरोधानेंहि. [ गुण+बाल ]

**गुता-त्ता**—पु. संशय. 'तो (ऐवज) त्यानें साराच या परदेशियाचे घरींच ठेवला आहे यास गुता नाहीं.' –समारो ४.५.३; ६.०६. [गुंतणें, गुंता]

**गुद्दलपेंडी**—स्त्री. वज्रमुष्टीचा खेळ. –सह्याद्रि फेब्रु. १९३९. १२३. [गुद्दल=ठोसा; पिंडी=पीठ पाडणें]

**गुन्हेगारी**—स्त्री. वादांत हरला त्याजकडून घ्यावयाचा दंड. 'बोरगांवकर खोटे जाहले सबब गुन्हेगारी' –थोमारो ७.६५. [ अर. गुनाह् ]

**गुप्तगोई**—स्त्री. गुप्त संभाषण, गुप्तचर्चा. 'दरम्यान गुप्तगोई झाली.' –आंघइ १४. [फा. गुफ्तगो]

**गुंफा**—पु. एक मुलांचा खेळ; खेळाकरितां काढलेल्या चौकोनाचा कोन. –मखे ४४.

**गुंफेंत ठेवणें**—(महानु.) मूठमाती देणें; समाधि देणें.

**गुफ्तार**—स्त्री. गोष्ट; भाषण; बोलण्याची तऱ्हा. –आफ. [अर.]

**गुफ्रान पत्रह**—पु. क्षम्यांचा आश्रय. –मुघो. [अर.]

**गुंबज**—पु. घुमट. –गोलगुंबज. –के ३०.१.१९३४. [फा.]

**गुब्बा**—पु. भोवऱ्याच्या खेळांत ज्यावर डाव आला असेल त्याच्या भोवऱ्यावर आरीनें मारलेला घाव. –व्याज्ञा.

**गुमगुम**—स्त्री. वदंता; वार्ता; बातमी; कुणकुण. [ ध्व. ]

**गुमर**—स्त्री. किल्मिष; किंतु. 'गतवर्षी निखालसता दिसत नाहीं. न कळे काये मनांत गुमर आहे.' –पुद १.१३३. [ गुम ? ]

**गुमाश्तह**—पु. गुमास्ता पहा.

**गुरगुऱ्या भात**—पु. मऊ पातळसर भात. –श्याआ.

**गुरज**—पु. गुर्ज; गदा. –प्रश ४४. [फा.]

**गुराब ठेवणें**—न. गुराब ठेवण्याची जागा. –ज्ञाको ग १८२.

**गुरिंदा**—पु. बातमी देणारा. 'कमाविसदारानें पुष्कळ गुरिंदे म्हणजे बातमी देणारे हातीं धरून शोध चालविला होता.' –दुर्दैर्ं १३१. [ ? ]

**गुरुघंटाळ**—वि. मोठा आवाज करणारा; वाचिवीर्य; ओरड्या. 'तरी त्यास संकलनकार म्हणून हिणविण्यास हे गुरुघंटाल तयारच' –प्रतिभा ३.११.

**गुरुपकड**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबावर उडी मारून दोन्ही पाय मल्लखांबाच्या एका बाजूस नेऊन पोटरीच्या पकडींत मल्लखांब धरून मारावयाची उडी. –व्याज्ञा ३.६७.

**गुरुशिष्यसंवाद**—पु. सिद्धसाधकरूपणा, स्वहेतुसाधनात्मक संभाषण. पूर्वीचे ग्रंथांतील विषय प्रतिपादन सामान्यतः गुरुशिष्यसंवादरूपानें असे. जे सिद्धान्त प्रस्थापित करावयाचे त्याबद्दल शिष्यानें प्रश्न किंवा शंका विचारावयाची व गुरूनें उत्तरें देऊन समाधान करावयाचें. याप्रमाणें इष्ट तो सिद्धान्त प्रस्थापन करावयाचा. यांत जरी दोन पक्ष कल्पिलेले असत तरी प्रश्न व शंका आपणांस अनुकूल अशा रितीनें सोडविण्याच्या दक्षतेनें नमूद केलेल्या असत. 'बाल्फोरनें विचारावें आणि मोर्लेनें उत्तर द्यावें. गुरुशिष्यसंवाद. यापासून कांहीं एक निष्पन्न व्हावयाचें नाहीं.' –टिच २.५.५५.

**गुर्वी**—स्त्री. लेख्यशाला; हस्तलिखित ग्रंथांचें संग्रहालय.

**गुर्गुजा**—पु; गदा; लोखंडी सोटा. [फा. गुर्झ]

**गुरेह**—वि. एक. –आफ. [फा.]

**गुलगुला**—पु. भुमका. 'येसाच चहूकडून गुलगुला उठला आहे.' –हिंद १८९. [ ध्व. ]

**गुलवांग**—पु. अफवा; लोकवार्ता, वदंता; बोल. 'येकिल्यांत येतें. बेदरास येण्याचा गुलबांग दाट होता. तो तूर्त दिसत नाहीं.' –रा ०.११२. 'हैदराबादेकडे सवारी मुबारक मुतवजे होण्याचा दाट गुलवांग जाला आहे.' –रा ७.१९२. 'दोन दिवस याजप्रमाणेंच गुलवांग होता.' –रा ५.२०९. [ फा. गुलवांग-स्त्री. अफवा. किर्ती; बोल ]

**गुलाट अढी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाकडे पाठ करून उभे राहून उलटी मारून मारावयाची अढी.' –व्याज्ञा ३.८३. [गुलांटी+अढी]

**गुलाटचक्र**—न. एकमेकांच्या अंगावरून चक्राप्रमाणें गुलांट्या मारण्याची कसरत. –व्याज्ञा ३.४२१. –रा ४०५.

**गुलाल चिकवें**—न. लुगड्याचा एक प्रकार; वाण.

**गुल्मपद्धति**—स्त्री. झुडुपें लावण्याची पद्धति. –ज्ञाको. गु १६. [ सं. गुल्म+पद्धति ]

**गुल्शन**—स्त्री. वैद्य; बगीचा? –मुधो. [अर.]

**गुहिऱ्या**—वि. (व.) १ विषारी. २ दाट रंगाचा; घन रंगाचा. 'गोरीला लागे पान। नाग गव्हळ्या गुहिऱ्या। बाऱ्या चालू द्या दोहिऱ्या ॥' –वलो ४८. [गहिरा पहा]

**गुळभेलीवत्**—वि. (महानु.) अल्पकाल सुखदायक; क्षणभंगुर; तात्पुरतें सुख देणारा. 'आई मुलाच्या हातावर गुळभेली ठेवते. मूल तयाला जिभेनें चाटतां चाटतां लवकर संपवितें. व पुनः मागण्यास सुरवात करतें; त्याचप्रमाणें देवतांची सुखें अल्पकाळवत् आहेत.'

**गुळभात**—पु. (कुण.) लग्न ठरलें असतां पाहुणे मंडळींस करावयाचें जेवण. हा शकुनाचा समजण्यांत येतो. [गुळ+भात]

**गुळव्वा**—स्त्री. १ कर्नाटकांतील ब्राह्मणेतरांची गौर पूजा आषाढांतील मंगळवारीं. २ फतकल मारून बसणारी स्त्री. [गुळ+अव्वा]

**गुळीं**—न.अने. खाडींतील चिखल व दगड. 'बांधाची भोकें नजरेस येतांच तेथें गुळीं म्हणजे खाडींतील चिखल व दगड घालून बंद केलीं तर मग त्यांत पाणी शिरत नाहीं. -केळ आत्म ५१.

**गुळु**—पु. दंगल; कट. 'फर्काबादवाल्यांनीं अकबरपुरच्या जमिनदारास चिठ्या लिहिल्या कीं तुम्ही गुळु करून ठाणें उठवून देणें म्हणजे आम्ही येतो.' -पेद २.१३२. [फा. गुलु=गळा]

**गुळेकरी**—वि. परागंदा; गांव सोडून जाणारा. 'फिरंग्याच्या हल्ल्याची बातमी अगोदर फुटली असल्यामुळें लोक भीतीनें गुळेकरी बनून पळून गेले.' -वसमो. [गुळें]

**गूढगुंजन**—न. अमेय, कूटात्मक पण श्रवण मधुर असें कवन. ज्याचा अर्थ फार खोल आहे, वाच्यार्थापेक्षां ज्यामध्ये अधिक अर्थ गुपित आहे व श्रमानेंच कळण्या जोगा आहे असें वाक्य. [सं.]

**गृध्र**—पु. (उपहा.) वृद्ध मनुष्य. गिधाडाला आयुष्य फार असतें यावरून. [सं.]

**गृह्य**—वि. घरगुती; खासगी. 'सार्वजनिक गणेशोत्सव हा एकादा वैयक्तिक किंवा गृह्य उत्सव नाहीं.' -के १९.८.४१. [सं.]

**गेंजी**—स्त्री. कोंबडयाचा तुरा. 'गेंजी नराची ताठ व मादीची पडलेली व डोकें मोठें असतें.' -ज्ञाको क ७६६.

**गेडीदडा**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.२६२.

**गेंदगेंद शिवागेंद**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे २७४. -व्याज्ञा १.३८५.

**गेनमाळ**—स्त्री. (खा.) ज्ञानमाला. [सं. ज्ञान+माला]

**गेनमाळ टाकणें**—(खा.) भगतपणाची दीक्षा देणें; गुरुभगत यावेळीं शिष्याच्या गळ्यांत फुलाची माळ घालीत असतो. -संशोधन एलच २६८.

**गैरकारी**—स्त्री. भलतेंच काम; अयोग्य काम. -के २८.४.१९४६. [गैर+कार]

**गैरराह-हा**—वि. गैर रहा पहा. 'गैर राह वर्तणूक करणें.' -समारो ६.५९.

**गैरलगामी**—वि. अनियंत्रित; अव्यवस्थित; वाटलें त्यास उपयोग करावयास मुभा असलेला. 'शौचकूप एकच तोहि गैरलगामी आणि घाण.' -प्रतिआत्मच ३१०.

**गरादा**—वि. गैर-अदा पहा. बिन वसूली; अप्राप्त; न मिळालेलें; वसूल न झालेलें. 'बाकी दोन लाख अकरा हजार रुपये राहिले ते हाली सरकारांतून गैरादा करून गायकवाडावर वराता जाहल्या.' -पेद ३९.२७. [फा. गैर+आदा]

**गोंग**—स्त्री. खोटी ओरड; खोटा आरोप; तोहमत. 'एखादा महार हमताशीं धरून त्याजकडून खोटीखरी बनावट शिवाशिवीची गोंग करून या पंचावर आणतां येईल.' -के ५.९.१९४१. [ध्व.]

**गोगा**—पु. घोटाला; गोंधळ; गडबड; अस्ताव्यस्त स्थिति. 'त्यासी तेथील प्रकार पाहिला तर सारा गोगा होता म्हणून उठोन आलों.' -पेद २९.४७. [ध्व.]

**गोजी**—वि. (व.) गोजिरवाणी; लाडकी; आवडती. 'अथर बाई खालीं। सवाण सतरंजी। गेली मांडीवर झोंपी। माही सोनुकली गोजी।' -वलो ८०,

**गोटा**—पु. (ल.) मूर्ख मुलगा; ठोंब्या; नर्मद्या; दगड; फत्तर.

**गोटू**—न. (तंजा.) तंजावरकडील एक वाघ.

**गोटें वांगें**—न. सांगली जवळील गोटें या गांवाचें वांगें; कृष्णाकांठचें वांगें.

**गोट्या**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखे १४०.

**गोठण जेवणें**—मोठण म्हणजे रानांत दोन प्रहरीं उन्हाच्या वेळीं ज्या जागेवर छायेखालीं गुरें बसवितात ती जागा. या ठिकाणीं गुराखी एकत्र जेवण करतात तें.

**गोठवण**—स्त्री. संकलन; सांठवण; मांडणी; रचना. 'जे नाना विध अनुभव आले होते त्यांची नीटनेटकी गोठवण करून कृतकृत्य माणसाचे ते डोळे होते.' -काम्हाम्हा. [ग्रथन]

**गोठा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखे ३४३.

**गोडी फौज**—स्त्री. घोडेस्वार; केवळ तरवारी, भाले वगैरे हत्यारें असणारे बंदूकी वगैरे दारूचीं शस्त्रें नसलेलें सैन्य -वसमो.

**गोंडी**—स्त्री. पुंडाई; लुटारूपणा; बंडाळी. 'त्यानें देवरीप्रांते गोंडी करून गाव लुटून गांवास आगी देत होता.' -पेद २७.३ [म. गोंड या नांवाच्या लोकांवरून]

**गोडें हत्यार**—न. भाला, तलवार वगैरे; उलट बंदुक, तोफ वगैरे उडतें हत्यार. 'गोडया हत्यारानें लोकांचा टिकाव कसा होईल.' -वसमो.

**गोणी**—स्त्री. एक परिमाण. गुळाचे ६ रवे; ३२ पायली धान्य. [गोण]

**गोणी लोट**—पु. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्ष्यास पाठीवर असतां ढुंगणाखालून हात घालून आपल्या अंगावरून मागें फेंकून मारणें.

**गोत**—न. सहाय्यक वर्ग; साथी. -आडिमहा ११. [सं. गोत्र]

**गोताचे गुन्हेगार**—पु. स्वजनद्रोही. 'जें राष्ट्र जवळचें सोनें स्वत: उपयोगांत आणीत नाहीं किंवा इतर गरजवंत राष्ट्रांस उपयोगांत आणूं देत नाहीं त्या राष्ट्रास गोताचे गुन्हेगार म्हणतात. -के ९.८.१९३०.

**गोत्र झव्या**—पु. (अशिष्ट) नातेवाईकांशीं व्यभिचार करणारा; कुलांगार.

**गोदी**—स्त्री. (कुस्ती) एक डाव. समोरून अगर मागून सामनेवाल्याचा पाय व त्याच बाजूचा हात आपल्या हाताच्या कवळींत घट्ट धरणें.

**गोंदे**—पु. अव. चेंडू आपटून दोघांत खेळावयाचा खेळ. -मखे.

**गोधवड**—स्त्री. गुरें बांधण्याकरितां गाताडी वगैरे तयार करून केलेली जागा. -चित्रकृषि २.३. [गो]

**गोपटें**—न. अव. (साष्टी) कुंपणास पडलेलीं भगदाडें. [सं. गो+पुट]

**गोपर-गोपुर**—न. एक रांगोळीचा प्रकार. [सं.गो+पुर]

**गोपालवृत्ति**—स्त्री. पशुपालनाचा धंदा. -ज्ञाको. ज ८९. [सं.]

**गोपाळ**—पु. महार साधू. -अस्पृ ३३. [सं. गो+पाल]

**गोपुच्छ**—पु. बाणाचा एक प्रकार. -प्रश १९. [सं. गो+पुच्छ]

**गोफण**—स्त्री. (मल्लखांब.) दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांत अडकवून लांबून मल्लखांब गोफणी सारखा धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.५९. [गोफण पहा]

**गोमुखासन उडी**—स्त्री. (मल्लखांब) पाठीवर गोमुखा प्रमाणें मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.१०५. [गोमुख]

**गोमुखी**—वि. गरीब; गाईसारखा शांत. 'उगीच नाहीं म्हटलें तुला सिंहमुखी, आतां गोमुखी हो पाहूं.' [सं. गो+मुख]

**गोयन्द**—क्रि. बोलतात. -मुधो. [अर. गुफ्तन=बोलणें]

**गोरण**—स्त्री. गव्हाणी; गुरांस चारा घालण्याची जागा. -चित्रकृषि २.६. [सं. गो+रण]

**गोराडू**—वि. लापण (जमीन); दुंबा. [?]

**गोरी**—स्त्री. गोंवरी; राबाकरितां शेणाचे वाळवलेले डिखळे. -चित्रकृषि २.६. [सं. गो]

**गोऱ्हा**—पु. (ठा.) बैलास चवथ्या वर्षी म्हणतात. [सं. गो]

**गोलदंड**—पु. दंडाचा एक प्रकार. यांत साधा जोर काढून हात न उचलतां वाटोळें फिरावयाचें असतें. -व्याज्ञा ४.५५. [सं. गोल+दंड]

**गोल पोलीस**—पु. पायदळ. -ज्ञाको झ १६. [सं. गोल+इं. पोलीस]

**गोलथा**—पु. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २४. [?]

**गोलाई**—स्त्री. गोलपणा; वाटोळेपणा; स्थूलता; गुबगुबीतपणा. 'माझ्या शरीराला जी गोलाई आली ती आज मितीपर्यंत कायम आहे.' -माभू ७. [गोल]

**गोलाम**—न पुष्प; कापुर. कुंकुम कस्तुरी चंदन पालवी। गोलामे परतौनि नवीं। हा लेपु सिर व्यथे लाविता देवी। डोळा झांपडी पडत।' -नरुस्व ५४२. [?]

**गोवी**—स्त्री. गोता; अडचण; पाश. -दा १६.७.१९३६. [गोवणें]

**गोसावी**—पु. बैरागी. यांचे दहा वर्ग-तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, गिरी, पर्वत, सागर, सरस्वती, भारती व पुरी. [सं. गो+स्वामी]

**गोस्फंद**—पु. (गुरुमुखी) लठ्ठ शेंपटी असलेला मेंढा; दुंबा. -मुस [?]

**गोहो**—पु. गलबताचा एक कर. 'दर गलबतास गोहो सुमार ५.' -पेद ३४.१९७.

**गोहोत**—न. (कों.) पान्हवण; आंबोण.

**गोळकी**—वि. घेडगुजरी; गंगाजमनी. 'गोळकी भाषांतर.' -विकारवि. [गोलक=रंडापुत्र]

**गोळगोळंकी**—स्त्री. एक झाड. यास पिवळा धोमा म्हणतात. याचीं बोंडें लांबट असून तीं वाळलीं म्हणजे घुळघुळ असा आवाज होतो त्यावरून हें नांव पडलें असावें. [ध्व.]

**गोळी**—स्त्री. (ठा.) एक जातीचा मासा.

**गोळेकरी**—पु. गुळयांतील मनुष्य; शत्रुभयामुळें परागंदा होणाऱ्या टोळींतील मनुष्य. 'आम्ही माहुलीस जाऊन राहिलों हळूहळू सर्व सामान नांदोशीहून आणलें व गोळेकऱ्याप्रमाणें रचून ठेवलें. इतकें सामान इतकीं भाणसें यांचा समावेश माहुलीच्या वाड्यांत होणें कठीण होतें.' -प्रति आत्मच ६५. [गुळें पहा]

**गोळ्यावर घालणें**—एक शिक्षा. निरनिराळ्या वजनाचे तोफेचे गोळे वरखालीं करावयास लावणें. -आगरडों २. १९.

**गौंड**—पु. गोंड पहा. जंगलांतील जनावरांचे मार्ग. -किर्लो. मे १९३५.

**गौडीरीति**—स्त्री. एक संस्कृत वाङ्मय प्रकार. मोठमोठे समासयुक्त रचना. [ सं. गौड-गौडी+रीति ]

**गौर**—पु. बंडखोर; गवार लोक; पुंड. 'कांहीं जाटाचे स्वार घेऊन गौर इद्रुखीस आले होते.' -पेद २६.२०. 'एकूण गोहदवाले व गौर त्यास मिळाले आहेत.' -पेद २९.२०८. गवार पहा.

**गौर**—पु. विचार; चौकशी; वास्तपुस्त. 'पांच कळशांचीं इनामें चालवूं त्यांचा गौर करूं.' -वसमो.; 'हरएक विसीं गौर केला जाईल.' बाबारो ३.२०५. -पेद ४०.१९. [ फा. ]

**गौरपरदास्ती**—स्त्री. वास्तपुस्त; निगादानी. 'याची गौरपरदास्त करावी, त्याप्रमाणें नजमुदीखानानी सेवकास समागमे नेऊन नसीबयारखानास निरविलें.' -पेद २८.२१. [फा.]

**गौरी**—स्त्री. अशुद्ध रक्तवाहिनी. [ सं. ]

**गौरीच्या फण्या**—एक वनौषधि.

**गौरीशंकर रुद्राक्ष**—पु. जोड रुद्राक्ष.

**गौहर**—मोती. -आफ.; -मुधो. [ फा. ]

**ग्यारमी**—स्त्री. मुसलमानांस देण्यांत येणारी खिचडी. 'खंडेराव महाराजांनीं प्रत्येक मुसलमानास ग्यारमी देण्याची पद्धत सुरू केली.' -ज्ञामं १.१.१९३६.

**ग्रंथसाहेब**—पु. शीखांचा धर्म ग्रंथ. [ सं. फा. ]

**ग्रंथीवज्र**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २२. [ सं. ]

**ग्रामणी**—पु. ज्यावर ग्रामण्य म्हणजे बहिष्कार झाला आहे असा. 'ब्राह्मण्य धर्म संस्थापक आपण आहा त्यापेक्षां जे असे ग्रामणी आहेत याची पुरी चौकसी जाहाल्याशिवाय मुक्तपत्र होऊं नये.' -रा २१.२२०. [ सं. ग्राम ]

**ग्रीवास्थान**—न. खड्ग; एक तरवारीचा प्रकार. -प्रश १७. [ सं. ]

---

# घ

**घटकंचुकी**—पु. कांचोळी पंथ पहा. शाक्तांतील एक विधि. एका घटांत जमलेल्या स्त्रियांच्या कंचुकी घालून त्यांची पूजा करून जमलेल्या पुरुषांनीं त्यांतील एकएक कंचुकी घ्यावयाची व त्या स्त्रीबरोबर रात्रीं रममाण व्हावयाचें.

**घटणें**—अक्रि. घडणें; सिद्ध होणें; फलद्रूप होणें. 'त्यांस आम्ही जाबसाल घडे तसा करावा तरी समई नाहीं. पेचांत आहो.' -पेद ५.७४. [ सं. घट्=घटणें ]

**घटनासमिति**—स्त्री. एखाद्या संस्थेची घटना तयार करण्याकरितां नेमलेलें पोटमंडळ. [ सं. ]

**घटवटना**—स्त्री. वाटाघाट; निश्चिति. 'उपरांत घटवटना होऊन येईल.' -आंघइ १४.

**घंटा-घंट्या**—पु. (ल.) अभाव; नकारघंटा; नास्तित्व. 'मी जाऊन पाहतों तों तेथें काय नकार घंटा संपून गेलें होतें.' [ घंटा ]

**घंटातरंग**—पु. निरनिराळ्या सप्त स्वरयुक्त घंटांची माळ करून तीवर विशिष्ट राग वाजविणें. जलतरंगाप्रमाणें. [ सं. ]

**घटिगोपुर**—न. घड्यांचा मनोरा. [ सं. घटि+गोपुर ]

**घंटीअप्पा**—पु. दोन्ही हातांनीं घंटा वाजवीत भीक मागत फिरणारा मनुष्य. [ सं. घंटा+का. अप्पा ]

**घंटेकांटा**—पु. घड्याळांतील तासांचा कांटा. 'घड्याळांत घंटेकांटाच नाही. मग किती तास झाले हें कळणार कसें?' -श्रमसाफल्य २. [ सं. घंटा+कांटा ]

**घडणी**—स्त्री. एक हिशोबाचा कागद. प्रत्येक महालाबद्दल अगर एकाकडे अनेक महाल असल्यास त्या सर्वांबद्दल त्याचे नांवचा एकच पण मोकळे वर्षाचा कागद तयार करीत. त्यांत सरंजाम बाब त्याप्रमाणें खर्च लिहून बाकी राहिलेला आकार जामदाराचे नांवें लिहीत असत. तसेंच सनदापत्रें, एकसाली वगैरे पट्टी याशिवाय देवस्थान बर्षासन व खैरात व रोजीनदार व धर्मादाय व इनाम व किरकोळ दफाते व जप्ती मोकळीक व निवाडपत्रें व वतनपत्रें उत्साह खर्च व श्रावणमास दक्षिणा व हरदास बिदागी वगैरे प्रत्येक कलमाबद्दल एकंदर आवर्जे सालवार निराळे तयार करीत असत. याप्रमाणें घडणी हा कागद खतावणी अन्वये मोकळे वर्षाचा हुजूर तयार होत असे. -भारतवर्ष, मराठ्यांचें दप्तर १२. [ घडणें ]

**घडशी**—पु. मांगांतील एक खानदेशांत आढळणारी पोटजात; हे वाद्यें बाजवण्याचा धंदा करतात. -अस्पृ ४८. [घडणें]

**घणसाबैल**—नंदीबैल; पांगूळबैल. -मुंबईचें वर्णन३४१.

**घनकणमय**—वि. दाट परमाणूंचा बनलेला. [ सं. घन+कण+मय ]

**घनता**—स्त्री. १ घट्टपणा; दाटपणा. २ दृढता; दाढर्य. वजनास घनफळानें भागिलें असतां येणारा भागाकार तो त्या पदार्थाची घनता होय. [ सं. ]

**घनतिमिर**—न. दाट अंधकार. 'शुभ्र किरण घन तिमिरी पडती.' -मृच्छ. [ सं. ]

**घनपाठपूर**—घनपाठापर्यंत अध्ययन केलेला. [ सं. ]

**घनफूट**—एक फूट लांब; एक फूट रुंद व एक फूट उंच असा चौरस ठोकळा, किंवा इतकें घनफळाचें एक मान. [ म घम+ई. फूट ]

**घनमाकड**—न. एक मुलांचा खेळ. -मखे ११५.

**घनरस**—पु. कापूर [घन+रस]

**घनवर्धनीय**—वि. हातोड्यानें ठोकलें असतांना वाढणारा घन पदार्थ. [सं.]

**घनाकार**—वि. ज्याची लांबी, रुंदी व उंची सारखी आहे असा. [सं.]

**घनांत अध्ययन**—न. कोणत्याहि वेदशाखेचें घनपाठापर्यंत केलेलें अध्ययन. [सं.]

**घनावस्था**—स्त्री. घट्टपणाची, दाटपणाची स्थिति. [सं]

**घनिष्टता**—दाट परिचय; सलगी. 'नोकर लोकांबरोबर इतकी घनिष्टता मला पसंत नसावी हें तिनें चटकन् ताडलें.' -विविधवृत्त २७.६१९१४. [सं.]

**घनीभवन**—न. घट्ट होणें; दाट होणें; थिजणें. [सं.]

**घबाड**—न. दाराच्या फळीच्या खालच्या टोंकास फिरण्याकरितां जो गट्टू वगैरे बसवितात तो; खालचा वात्या.

**घर**—न. एक मुलींचा खेळ. -मखे ३०३.

**घर**—न. १ विशिष्ट खुणांनीं दर्शविलेलें अंतर; टप्पा; 'मिनिट कांटा एका तासांत ६० घरें चालतो.' -के. २ कोष्टकांतील खण, खाना. 'मध्यें तीन घरें मोकळीं टाकलेलीं होतीं व चवथ्या घरांत पांचचा आंकडा होता.' [सं. गृह]

**घरघुशी**—स्त्री. (ठा.) ठाकर वगैरे जातींत लग्न होत नसलेली मुलगी कोणाच्या तरी घरांत घुसते व तेथें राहूं लागते. पुढें जात दंड घेऊन त्यांचें लग्न लावते. 'लग्नाच्या बायका व घरघुश्या यांचें प्रमाण १६ आण्यांत ५ आणे असें पडतें.' [घर+घुसणें]

**घरटाळें**—न. सोनाराची कांटा ठेवण्याची पेटी. [घरटें]

**घरठाव**—पु. विवाह; योग; स्नेह; ऐक्य. 'मुस्लीम लीग व कॉंग्रेस या दोन संस्थांशीं घरठाव जमण्याचा योग नसल्यामुळें.' -विविध १.१०.१९३९. [सं. गृह+स्थान]

**घरफुंकी धोरण**—न. शत्रूच्या हातीं लागूं नये म्हणून स्वतःच सर्व कारखाने, धान्यादि माल वगैरे जाळून राख करण्याचें धोरण; विध्वंसन न्याय. -के २०.३.२९४१. [घर+फुंकणें+धोरण]

**घरमोड**—न. चांभारानें तयार करून दिलेलें आभूषण. 'समस्त ब्राह्मणांहीं विवाहामध्यें नवऱ्या नवरीचे मस्तकीं पुष्पमाला बांधाव्या मोची याचे घरचे घरमोड बांधावें.'

**घरू**—वि. घरगुती; घराऊ; खासगी. 'छ २४ रबिलाखरचें पत्र नवाब अकबर अलीखान याचें दिल्लीहून आलें. त्यांतील घरू मार लिहिला होता तो कांहीं समजल्यांत आला नाहीं.' -रा १०.३३५. [घर]

**घर्षणविरोध**—पु. एक पदार्थ दुसऱ्या पदार्थाशीं घासत गेला असतां होणारा अडथळा. [सं. घर्षण+विरोध]

**घसमर**—वि. बळकट; मजबूत. [सं. घस्मर]

**घळ**—स्त्री. तंबाखूचीं गळलेलीं पानें; घळीचा तंबाखू; अर्धवट पिकून किंवा खुरपण, औत काम वगैरे करतांना गळलेलीं पानें.

**घळ**—पु. १ मासे धरण्याचें एक हत्यार (गळ पहा). २ नियोजित ठिकाणाहून पाणी न जातां भलत्याच ठिकाणाहून ज्या भोंकांतून जातें असें भोंक. -चित्रकृषि २.६.

**घळई**—स्त्री. पठार.

**घळ्या**—वि. दुसऱ्याच्या गळीं पडून, आर्जव करून, मर्जी संपादून आपलें हित साध्य करून घेणारा मनुष्य.

**घाओसणें**—अकि. (महानु.) गवसणें; प्राप्त होणें; 'प्रिये अव्हेरिलेः धिगतीचें ज्यालें । वियोग घाओसलेः जन्मवेऱ्हीं:' -अभंगपत्रे

**घागऱ्या गोचिड**—पु. मोठी गोचडी. -चित्रकृषि २.३.

**घांगशा**—पु. कटकट; तंटा, बखेडा. 'घांगशा घालीत आहो. निर्गम आज्ञेप्रमाणें होईल.' -पेद ३३.३७४. [ध्व.]

**घांगी**—स्त्री. एक प्रकारचें गलबत.

**घाटांबा**—पु. गप्पागोष्टी घांटीत बसण्याची आंब्याखालची जागा; अड्डा. -आडिमहा ११.

**घाटौली**—स्त्री. कळया; वटमोगऱ्याच्या कळया. 'तव गगनीं नक्षत्रें उमटत। जैसी आकाशीं घाटौली फुलत । नातरि मेघ वीणि साधित । मोतियांची' -नरुस्व ४८६. [घाटवेल?]

**घाणा**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३२९.

**घाणा आढी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबावर पायांच्या आढ्या घाण्याप्रमाणें फिरवून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.८८.

**घाणा घाटणें**—ज्याप्रमाणें पोह्यांचें भात, लाह्या करावयाचे दाणे, भाजावयाचे दाणे वगैरे खापरांत किंवा भट्टींत घालून घाटण्यानें ढवळून भाजून काढतात त्याप्रमाणें रगडणें, ढवळणें; म्हणजे पर्यायानें शत्रूस चिरडून टाकणें, त्याचा निःपात करणें वगैरे. 'किती धाडले बहुतची मिरास जसे घाणा घाटला.' -ऐपो २.४६.

**घाण्यावर घालणें**—एक तुरुंगांतील शिक्षा तेलाच्या घाण्यास जुंपणें. -आगरडोंतु २.१९.

**घाण्याचें तेल**—गोडें तेल; आळशीचें तेल.

**घातशंका**—स्त्री. घात होईल अशी शंका; अनर्थाबद्दल भीति; संकटाबद्दल अंदेशा. 'त्याचे दरबारचे लोकांस घात

शंका उत्पन्न होऊन हैदराबादचा सुभेदार कंवरजखान यास लिहिलें.' –रा २. –पेश ४९. [सं. घात+शंका]

**घातीची ओल**—स्त्री. धान्य पेरणीस पुरेशी ओल. 'पेरणीचे वेळेस जशी घातीची ओल असते तशी ओल राहील अशा बेतानें पाणी देत जावें.' –के १९.२.१९३७. [घात+ओल]

**घानवत**—भुईकोट. –ज्ञाको. क ४९६.

**घाबरगुंडी**—स्त्री. घाबरटपणा; भेदरलेली, घाबरलेली अवस्था. [घाबरणें]

**घायाघाया**—क्रिवि. (महानु.) तातडीनें; घाईनें; जलद. 'कैवल्यदानी एरू आला तो घायाघाया.' –पैठण ली १५४. [घाई]

**घालकाढी**—स्त्री. आवक जावक; दप्तरांतील कागद बाहेर दिले असतांना नोंदून ठेवण्याची व परत आले असतां नोंदण्याची वही. ज्याप्रमाणें दुकानांत पसंतीकरितां पाठविलेल्या मालाची, किंवा परतीच्या बोलीची, किंवा उधारीची, जांगड वही असते त्याप्रमाणें ठेवलेली वही. [घालणें+काढणें]

**घालकाढ्या**—पु. घालमेल करणारा, उपद्व्यापी. [घालणें+काढणें]

**घावदाव**—पु घावडाव पहा. 'आपल्याकडीलहि घावादावाची लढाई नादरशाहाच्या तुल्य मानतात.' –पेद २.४. [घाव+दाव]

**घासकट**—न. (कों.) (लोहार) गावी सारखें एकादी वस्तु घट्ट धरण्याचें हत्यार; पकड. [सं. ग्रास–घास+कट]

**घासपार्टी**—स्त्री. आर्य समाजांतील वनस्पत्याहारी पक्ष. याचे विरुद्ध मांसपार्टी. 'लाला मुनशीराम हे घासपार्टीचे.' –गुजगो ३१२.

**घिउंदें**—न. एक पेय. 'ते आदि कुमारी विनोदें । महाकवी नवरसांचें घिउंदें । पेहें देउनि परिये दे । अनुहतिशब्दीं ।' –नरुस्व ९.

**घिगावणें**—अक्रि. घाबरणें. 'नारायणगडास खासा न लागतां जुन्नरकर दोगे खालीं मोर्चास ठेविले होते तेच धास्तीनें घिगाऊन संभाजी राजे यांचें निशाण घेतलें.' –पेद १०.५०.

**घिणघिण**—स्त्री. (व.) कटकट; चिरचिर. 'अस्तुरिकां पुरुषाची। रोज घरीं घिणघिण । कोण्या ब्राह्मणानं वेड्या। असं लावलं लगीन।' –वलो ४४.

**घिष्टपिष्ट**—स्त्री. घासाघिस. 'आमचे म्हणण्यांत ऐवज पावला नाहीं. असी दोनचार दिवस घिष्टपिष्ट जाली. तेव्हां मध्यस्त बोलले.' –रा २.१२२. [घृष्–घर्ष्]

**घिसाडघाई**—स्त्री. फाजील गर्दी; गडबड; घिसाडी ज्याप्रमाणें एखाद्या तापलेल्या लोखंडावर घाईघाईनें घणाचे घाव मारतो किंवा काम घाई घाईनें कसें तरी उरकून टाकतो त्याप्रमाणें घाईची, उतावळेपणाची कृति. [घिसाडी+घाई]

**घुगऱ्यांचा न्याय**—पु. घुगऱ्या हातांत घेऊन बोलणें; एक दिव्याचा प्रकार. 'घुगऱ्यांचा न्याय एकीकडे ठेवून आधीं देशपांडे व कुलकर्णी यांचा व खंडेराव याचा न्याय घ्यावा.' –पेम ४८३.

**घुगऱ्या पाखडणें**—मुलास देवी येऊन बऱ्या झाल्यावर देवीच्या देवळांत करावयाचा विधि.

**घुंगुरकेश**—पु. अने. कुरळे केश.

**घुंगेरा**—पु. (ठा.) काळा, तांबडा भुंगा.

**घुटी**—स्त्री. मादक पदार्थ, पेय; नशा; कैफ. 'याच सुमारास खंडेरावाचें घुटी घेणें वाढत चाललें; त्याला घुटीची दांडगी संवय लागली होती. तो त्यांत नेहमी दंग असावयाचा.' –देवीश्रीअहिल्याबाई ५४.

**घुवा**—पु. (कों.) कळा; न फुललेली कळी. –श्या. आ.

**घुम्म धरून बसणें**—गप्प बसणें; हूं कीं चूं न करणें; घुम्याप्रमाणें बसणें.

**घुरकी**—स्त्री. चक्कर; फेरा; धक्का; भोंवरा; हिसका; टोला. 'ऐकिल्यास उत्तम नाहीं तर एके घुरकींत हातपाय गळून पडतील –रा ५.७९. [ध्व.]

**घुराब**—स्त्री. गुराब पहा.

**घुलविणें**—सक्रि. फसविणें, भुलविणें; झुकविणें. 'नंतर ज्या ठिकाणीं दाणापाणी नाहीं, असे जागीं निजामास घुलवीत नेऊन अगदीं लढून जेर केलें.' –रा २ पेश ५६.

**घुलें**—वि. (ना.) अरुंद. 'तिचें कपाळ घुलें आहे.'

**घूकदृष्टि**—स्त्री. घूक म्हणजे घुबड तें दिवसा डोळे पुरे उघडीत नाहीं व किलकिले करून पाहतें यावरून डोळे अर्धवट मिटून पाहणें. 'त्यांनीं शाकुंतलाचें भाषांतर जें एखादे वेळीं कधीं वाचलें असेल ते त्यांच्या बंधू सारखेंच घूकदृष्टीनें?' [सं. घूक=घुबड+दृष्टि]

**घूत्कार**—पु. घुबडाचा आवाज. [ध्व.]

**घूब**—पु. गुराखी करतात असा एक प्रकार.

**घृतस्नायी**—वि. पानावर तूप वाढल्यानंतर स्नान करणारा. स्नान केल्याबरोबर खावयास बसणारा किंवा जेवण तयार होईपर्यंत स्नान न करणारा. –खस्व ९८.

**घेघाट**—पु. (महानु.) हाकाहाक; घेघे असें ओरडणें. -गस्तो. [घे ध्व.]

**घेटाघेटी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखे १००.

**घेरना**—पु. (महानु.) भोंवरा; आवर्त. [घेर]

**घेरावा**—पु. समुदाय; घेर; राहाटी; दाटी. 'चीड व देवदाराच्या भव्य वृक्षांचा घेरावा अनुपम छाया विस्तारीत होता.' -हिप्र ७०. [घेरा]

**घेरेदार**—वि. मोठी; वाटोळी. 'घेरेदार पत्रावळ.' -श्या. आ. [घेरा]

**घेंचा**—पु. तांबडया देठाची शेवरी. -ज्ञाको. न २३६.

**घोगारी**—पु. मराठ्यांच्या आरमारांतील एक लढाऊ जात. -वसमो.

**घोटणें**—अक्रि. स्फुट होणें; बाहेर पडणें; गळयांतून स्पष्ट होणें (आवाज वगैरे); 'त्यांचा आवाज त्यांना घोटेना.' -उपेअंत १९.

**घोटभर**—वि. एकदां गिळतां येण्यासारखा पातळ पदार्थ पाणी, दूध वगैरे. [घोट+भर]

**घोटा**—पु. दोन्ही घोंट्यावर आडवा मारलेला वार. मवि ९.११.

**घोटु**—पु घोटून केलेला पदार्थ; घोटा. 'स्वानंद रसाळ फळ घोटु।' -भारा. बाल १.१७. [घोटणें]

**घोडका**—पु. मोतद्दार; घोडयाची काळजी घेणारा; सैस. [घोडा]

**घोडदौड**—न. (बडोदे) घोडे पळतात ती जागा; घोडयांच्या शर्यतीचें मैदान. [घोडा+दौडणें-दौड]

**घोडविहिर**—स्त्री. घोडबाव पहा. घोडयांस पाणी पाजतां येईल अशी विहिर. ज्या विहिरीमध्यें घोडयास जाण्यासारखा उतार पाण्यापर्यंत बांधलेला असतो अशी विहीर. [घोडा+विहीर]

**घोडा**—पु. १ एक मुलींचा खेळ. -मखे २३०. २ एक गवतांत आढळणारा किडा. यास मुलें घोडा म्हणतात.

**घोडाआढी**—स्त्री, (मल्लखांब) उजव्या हाताचा पंजा व डाव्या हाताचा पंजा वर मल्लखांबावर दूर अंतरावर धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.७२. [घोडा+अढी]

**घोडाइंद्रावण**—न. एक वनौषधि; मोठी इंद्रावण. [घोडा+इंद्रावण]

**घोडाघोडा**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे ११३. **-टाळीचा घोडा**-पु. एक मुलींचा खेळ. -मखे २३१.

**घोतराचा घोडा**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे ११४.

**घोडा लागणें**—१ घोडयानें चारी पाय साफ टाकून वरील स्वारास यत्किंचितहि हिसका न बसेल अशा रितीनें सुयंत्रित पळणें. -प्रति. आत्म ६२. २ (शर्यतींत) आपण ज्या विशिष्ट क्रमांकाच्या घोडयाचें तिकिट घेतलें असेल तो घोडा निदान पहिल्या तीन क्रमांकांत येणें.

**घोडी**—स्त्री. गोट्यांच्या खेळांत हरणारांस खेळाच्या शेवटीं जी शिक्षा होते ती. -व्याज्ञा १.५१५२.

**घोडी काढणें**—घोडीस घोडा दाखविणें; घोडी फळविणें. 'परी घोडी सबर नसली तर कवडीस पाठवून काढवून आणावी.' -रा १०.१३०.

**घोडीपिढी**—न. अने. घोडीं वगैरे सामान. 'परंतु ते आपली घोडीपिढी संभाळावयास गेले.' -पेद १.७८. [घोडें+ पिढें]

**घोडीवर चढविणें**—एक शाळेंतील शिक्षेचा प्रकार. एका दोरीवर मुलास लोंबकळावयास लावून पायांवर छडया मारणें.

**घोडेस्वार**—पु. एक मुलांचा स्काऊटचा खेळ. -व्याज्ञा १.३०९.

**घोरपळी**—स्त्री. (खा.) एक रोग. 'गळयाचे खालचे दोन्ही बाजूला कल्लयाजवळ घोरपळीचे फोड आहेत.'

**घोरिवडा**—पु. (कों.) गौळ वाडा. -श्या. आ. [सं. घोषवाडा]

**घोषवाक्य**—न. गजर करावयाचें वाक्य; घोषणा करावयाचें वाक्य; प्रतिज्ञावाक्य. 'मनें दुखविणारीं गाणीं व घोषवाक्यें म्हणतात.' -के २८.३.१९३९. [घोषणा+वाक्य]

**घोळ**—पु. दंडाहत. -मसाप ४५.८. -अमर [घोळणें]

**घोळांद्रें**—न. (व.) रंजीस आणणें; सारखें पाठीस लागणें. 'या लहान मुलानें तर आपल्या आईचें घोळांद्रें मांडलें आहे.'

---

# च

**चउरा**—पु. चौक, चव्हाटा; चौकी. 'त्या जबानीत त्याणे लिहून दिल्हे की फरकाबादेहून येते समयी बऱ्हाणपुरास गेलो. तेथे चउऱ्यावर कागदाची चौकसी केली. त्यास कागद वाचले नाही, म्हणून बऱ्हाणपुराहून तुम्हाकडे जासूद देऊन पाठविले.' -पेद ४.२२. [सं. चतुर्]

**चउत्रा**—पु. चौथा भाग; चौथ; चतुर्थांश. ' बडोदें शहराच्या केलेल्या निरनिराळया प्रत्येक भागास चउत्रा म्हणतात. उदाहणार्थ, वाडी चउत्रा, रावपुरा चउत्रा.' -सयाजी १.१७७. [ सं. चतुर्थ ]

**चक**—पु. ( सातारा ) गुळाचा लहान रवा.

**चकडबंद**—वि. बंदिस्त; बद्ध. ' बायबलावर हात ठेवून शपथ घेणाऱ्या हातांनीं नानास चकडबंद केलें. ' -दुमो.

**चकनामा**—पु. नियमांचा तक्ता; नियमसंग्रह; नियमावली. ' शास्त्री व गुरु पाठशालेंत विद्यार्थि याचे वहिवाटीकरिता चकनामे करितील त्याप्रमाणे गुरूनी व विद्यार्थी याणी वागत असावे ' -पेद ८२.६.

**चकरका**—पु. तुकडा; कपटा. ' असें म्हणत टेबलावर लिहून अस्ताव्यस्त टाकलेले चकरके तिनें गोळा करायला सुरवात केली ' -आभाळाची सावली २१४. [चवरकाबद्दल चुकीनें]

**चकवा**—पु. नौकागीत. -किर्लो मे १९३९.

**चक्कर, चक्र**—न. ( ल. ) भाकर.

**चकरचुवा**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.२५४, ३७१.

**चक्का**—पु. घोडयास चाल लावण्याकरितां त्यास मैदानावर फिरविण्याची क्रिया.

**चक्काचूर**—पु. चकाचूर; चकनाचूर पाहा.

**चक्की**—स्त्री. एका लहान वाटोळया भोपळयाची जात. [ सं. चक्र ]

**चक्की पाडणें**—बुडखा काढून टाकणें.

**चक्कीवाला**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५७.

**चक्र**—न. ( विनोदानें लक्षणेनें ) भाकर. ' दोन चक्री खाऊन आलों. '

**चक्रदोष**—पु. चक्रापत्ति; पुन्हां मूळ मुद्यावरच येणें. ' हा तर्कशास्त्रदृष्टया चक्रदोष होईल. ' -पुरु. सप्टें १९४७.

• **चक्रधराचा हाकारा येणें**—( महानु. ) कैवल्यपदप्राप्ति होणें; देहावसान होणें. ' मला श्रीचक्रधररायाचा हाकारा आलागा. '

**चक्रबाण**—दारु कामाचा एक प्रकार; आतषबाजींतील वाटोळीं फिरणारीं नळेचंद्रज्योतींचीं यंत्रें. [ सं. चक्र+बाण ]

**चक्रापत्ति**—स्त्री. चक्रांत सांपडणें; भोंवऱ्यांत सांपडणें. परस्पर विरुद्ध गोष्टींच्या परिणामांमुळें एखादी अनिष्ट गोष्ट घडत असणें; परस्परांवर अवलंबून असणाऱ्या गोष्टींचा परिणाम अनिष्ट होणें. इ. व्हिशससर्कल यास प्रतिशब्द. -के २८.११.१९४१. [ सं. चक्र+आपत्ति ]

**चक्रासन**—न. जमिनीवर उताणें निजून मग कमान करणें. -व्याज्ञा ४.४९६. [ सं. चक्र+आसन ]

**चक्री**—स्त्री. भोंवळ; चक्कर. ' अखेर डोळयाला चक्री लागोन तो घायाळ मरणोन्मुख होऊन रणांत पडला. ' -ऐपो २.१५. [ चक्र ]

**चक्रीनाव**—स्त्री. चाकाचे साह्यानें चालविण्यांत येणारी नाव.

**चंग**—पु. ढंग; फाजिलपणा; थोतांड. ' ह्या गोष्टींना म्हाताऱ्या बाया बापडयांनीं सांगितलेल्या दंतकथा, धर्मोपदेशकांचीं थोतांडें, भूतादिकांचे ऐंद्रजाल आणि ख्रिस्तविपक्षीयांचे चंग म्हणून लोक लेखूं लागले. ' -विद्याभिवृद्धि १००. [ ? ]

**चंगेरी**—स्त्री. परडी; लहान टोपली; टोपला; करंडी. ' रात्री मीर षोकद अली याचे कबील्याकरितां मिठाई पन्नास खाने व फुले चंगेऱ्या व पानसुपारी ... दौलाचे हवेलीस पाठविले ' -रा ७.२२६. [ हिं. ]

**चंडीप**—वि. चंडीस, देवतेस अर्पण केलेलें सबब निषिद्ध. ईश्वरार्पण; कृष्णार्पण; देवतेचें; परमेश्वरस्व. ' गोपाळ पंडितो ! हें द्रव्य घेउनि जाः तंव आनोबासि म्हणितलें: हें मज आतां चंडीष कीं: म्हणौनि नेघतीचिः ' -वृद्धाचार ७. [ चण्डी+स्व ]

**चगदी**—स्त्री. चकती पहा. चिठ्ठी; पत्र; परवाना; सनद. ' तरी राजश्री भाऊसाहेब व मोदी यांचे कानावर घालून चगदी पाठऊन द्यावी. ' -पेद ४२.५३.

**चटपट**—स्त्री. तेजी; जोराची मागणी.

**चडगो**—पु. ( कर्ना. ) खाण्याचा पदार्थ; फराळाचा जिन्नस. ' मुख्य म्हणजे गाडींत खाण्याकरितां कांहीं तरी चडगो मिळायचे । ' -शालापत्रक एप्रील १९८५.

**चढी लावणें**—भर देणें; खुशामत करणें; बडेजाव करणें. ' पातशहास चढी लावून बहुत भासेणें करून भेटी जालिया दिवसापासून येकांत लोकांत मोठा साहच केला. ' -पेद १५.५३. [ चट ]

**चढोत्री**—स्त्री. देवास भेट, देणगी, समर्पण. ' सक्तीनें चढोत्री यात्रेकरू कडून घेऊं नये. ' -के २३.६.१९२९. [ चढविणें ]

**चतुर्थांश**—पु. चौथा भाग; हिस्सा. [ सं. ]

**चतुर्थोह्लिक**—ए. चातुर्थिक कर्म; विवाहाच्या चतुर्थदिनीं गृहप्रवेशनीय होम व कंकण सोडणें हे करावयाचे विधि. [सं.]

**चतुर्विध**—पु. (महानु.) १ स्वर्ग. २ नरक. ३ कर्मभूमि. ४ मोक्ष. 'चतुर्विधाचा दरकुटा। बंदी घातले त्रिविष्टपा।'

**चतुष्ट**—वि. उघड; प्रकट; जाहीर; चार जणांस माहीत. चतुष्टाई पहा. 'उतर खासदसखते चतुष्ट न होता प्राप्त व्हावे' –पेद २५.२६५. [सं. चतुर्]

**चतुष्ट-स्ट**—न. चौकशी; शोध; चार ठिकाणीं विचारणा, शोध. 'चतुस्ट करून शोधं पाहून पारवानगी राजश्री नारोपंत प्रचुरे यांसी सांगितले की आल्या वरास मूल देणें.' –पेद ४३.७२. [सं. चतुष्टय]

**चंदेरी**—वि. चांदण्याचा; चांदण्यांतील. [चंद्र]

**चंदेरीदरिया**—चांदण्याची नदी किंवा समुद्र. 'नाव उलटली माव हरपली चंदेरी दरियांत नाथा।'–गडकरी.

**चंद्रगमनी**—वि. चंद्रोदयाच्या अनुरोधानें गमन करणारा. चंद्रोदयाबरोवर खाडीस भरतीचें पाणी येऊं लागतें त्यामुळें ती वेळ निघण्यास सोईस्कर असते यावरून. 'त्याजवरोन हे तेथून चंद्रगमनी होऊन होडीस पांच रुपये देऊं करोन आले.'–रा १०.१५७. [चंद्र+गमन]

**चंद्रभाल**—न. एक शस्त्र. –पु. शंकर.

**चंद्ररेणुवृत्ति**—स्त्री. वाङ्मयचौर्य; दुसऱ्याचें लेखन स्वतःच्या नांवावर प्रसिद्ध करणें. 'हें भाषांतर आहे असें ग्रंथकर्त्यानें प्रस्तावनेंत म्हणावयाचें होतें. अशी चंद्ररेणुवृत्ति धरावयाची नव्हती. –निबंधचंद्रिका १४.३०.'

**चंद्रवट**—न. पोलादाचा एक प्रकार. –प्रश २४. [सं.]

**चंद्रहास**—न. खड्ग; एक तलवारीचा प्रकार. –प्रश १५. [सं.]

**चंद्रानना**—स्त्री. चंद्राप्रमाणें जिचें मुख सुंदर आहे अशी स्त्री; सुंदरी. [सं.]

**चंद्रावळी**—स्त्री. सुंदर स्त्री. 'नुसतीच चंद्रावळी आहे बघा.' –पाणकळा [चंद्र+आवली]

**चन्गाल**—पु. पंजा. –मुधो. [अर.]

**चंप**—स्त्री. (खान.) अधोली; दोन शेरांचें माप.

**चपर**—पु. सेवक; चाकर; दूत. 'चपर आपले फौज आणावयास कंधारेस पाठविले होते.'–पेद २.८३. 'अबदालीचे चपर काबुलेहून छ २० रबिलावली दिलीस पोचले.' –पेद ३.१०६.

**चपरणी**—वि. चापाच्या. 'चपरणी तोफा वोढिल्या बुरुजावर.' –ऐपो २.२०१.

**चपरास**—स्त्री. कुरुंदाचा दगड बसविलेला लाकडाचा हत्पा. –प्रश ८७.

**चंपा**—पु. पायाचा पुढील भाग; पायाचा पंजा. 'पायाचा चंपा एकदांच भुईवर आपटला,' –मन्वं. जाने ४२ [चाफा?]

**चप्पाळी**—स्त्री. लहान आकाराची शेणी; शेणकूट. [?]

**चंफा**—पु. मुलांचा एक खेळ. –मखे १४७.

**चंबेल**—न. मोगली एरंडाच्या वियांचें तेल.

**चमकलाडू**—पु. एक विधि; संस्कार. 'मूल चालावयास लागलें म्हणजे मुलाच्या पायांत चाळ घालून आईची ओटी भरतात व मुलाच्या डोक्यावर किंवा पायांवर लाडू ओततात. याला चमकलाडू म्हणतात.' –मसाप ३.२२६. [चमक+लाडु]

**चमनबंदी**—वि. एक प्रकारचें तरवारीस दिलेलें विषारी पाणी. –प्रश २९.

**चमन्स्थान**—न. बाग. –आफ. [फा.]

**चमाण**—स्त्री. चमान पहा. चंगळ.

**चमू**—स्त्री. मूळ अर्थ सैन्य. (ल.) परिवार, पदरचे लोक; सहकारी; सभोंवतीचे लोक; मंडळी. 'हे व मुद्दई यांची चमू यांचीं नांवें घेतलीं.' –रा १०.९५. [सं.]

**चमूयात्रा**—स्त्री. सैन्य समूह; सैन्य. [सं.]

**चयाळी**—स्त्री. (कर.) चंगळ; चैन. 'आज काय रामभाऊंची चयाळी आहे.'

**चरणक**—पु. वृत्ताचा एक घटक.

**चरक**—पु. चरा; खड्डा; खोचण. 'बाजार पेठेंतून रेडी तरीवर जाणाऱ्या रस्त्यास मोठमोठे चरक पडल्यामुळें दोन गाड्यांचीं चाकें व धुरा मोडून गेलीं.' –बळवंत १९.११.४१. [ध्व.]

**चरपरेपण**—न. स्पष्टपणा; मोकळेपणा; निखालसता. 'गोष्टी मातेंत तों चरपरेपण दिसोन आलें.' –रा १.१०७.

**चरितार्थ**—वि. (महानु.) सफल; फलद; कार्यकर. 'तुमची क्रिया चरितार्थ कीजैल.)–उच २०१. [सं. चरित+अर्थ]

**चरुस्नायी**—वि. भात वैरल्यानंतर स्नान करणारा. –खेस्व ९८. [सं. चरु+स्ना]

**चरुहोम**—पु. भाताच्या आहुति ज्यांत याव्या लागतात असा होम. [सं. चरु+होम]

**चरणक**—पु. वृत्ताचा एक घटक.

**चरंती**—पु. लिंगायतांच्या मठांतील एक अधिकारी. 'लिंगायतांच्या मठांत चरंति नांवाचा एक धर्माधिकारी असतो त्यानें तें पाहून आमची विहीर विटाळलीस असें म्हणून त्यास मठाच्या बाहेर टाकून दिलें.' –भारत वर्ष जुन्या. ऐति. गो. ३०.

**चलकुची**—स्त्री. सैन्याची चालकूच वगैरे; हालचाल; गडबड. 'आधींच बापू सत्वर जबाब देत नाहींत. त्याहीमध्यें चलकुचीकरतां जबाबास फारच विलंब लागतो.' –पेद ६.१६७. [ चलणें+कूच ]

**चलगोजा**—पु. पिस्त्यासारखें एक कवचीचें फळ. कदाचित मोगली एरंडाची बी. 'तुमान व खराद. चलगोजे येथील प्रसिद्ध आहेत. तेथील राहणार दिव्याचे ऐवजीं चलगोजेच जाळतात.' –सभारंजनी भारतवर्ष ६९. [ फा. चलगोझा ]

**चलचलाव**—पु. गडबड; घालमेल; घोटाळा; चळवळ; हालचाल. 'शत्रूची बातमी राखीत असों त्यासी कांहीं चलचलाव झाला तरी स्वामीचें पुण्य समर्थ आहे.' –पेद २४.३६. 'फिरंगी गोवेकर याचा चलचलाव आजपावेतों दिसत नाहीं.' –पेद ३५.१४४. [ चलणें ]

**चलण**—पु. वज्रमुष्टीचा व्यायाम. उभें राहून कमानें एक एक पाय व त्याच बाजूचा हात जमिनीवर पुढें टेकून करावयाचा व्यायाम. –व्याज्ञा ४.९७.

**चलतर**—स्त्री. चंचलता; चलबिचल; अस्थिरता. 'आनी जणाची बोली हेच आहे आनी आम्हास येथील चलतर दिसत आहे. नाना प्रकारच्या गोस्टी राजश्री राजे बहादर करीत आहे.' –पेद ३८.१००. [ सं. चल ]

**चलतापाणी**—न. एक चेंडूनें खेळावयाचा खेळ. –मखे ५६.

**चलनशक्ति**—स्त्री. चालण्याचें सामर्थ्य. [ सं. चलन+शक्ति ]

**चलनसाहेब फौज**—पु. मोठी फौज उभी करूं शकेल असा.

**चवअवचव**—स्त्री. गोंधळ; चबढब; अव्यवस्था. 'अग्रवादी बोलिला जे सभेस चवअवचव आली. याजकरितां हजर मजलासी तेच वेळेस गैर जाले.' –सनदा ११७.

**चवंग**—पु. लहान मुलांचा एक खेळ; यांत घरें आंखून कवड्या किंवा चपट्या खापऱ्या उडवून खेळतात.

**चवट**—न. दोऱ्याचा गुंडा; चिवट; दोर. 'पेशजी चवटे आपण दिल्हे होते ते खर्च जाहाले. हली गुराव्याची अवजारे धड करावी लागतात. यास्तव अगत्य जाणून लिहिले असे.' –पेद ३.८९. 'चवट्याविशी राजश्री मानाजी आंगरे यास लिहिले आहे त्यास चवटे आणून पाठवावें.' –पेद १७.४३. [ चिवट ]

**चवडे कलम**—न. गुटी कलम; झाडाच्या फांदीस वरचे वर मुळ्या आणणें.

**चवडे बांधणें**—कलमाचा एक प्रकार. वर पहा.

**चंवढाळें, चौढाळें**—न. घालमेल; गडबड; गोंधळ. 'यास कोण प्रकारें चवंढाळें करून पैसा मिळेल तो हाताखालीं घ्यावा.' –पेद २८.२४४.

**चवथल**—स्त्री. चौथाई; चतुर्थांश; चवथा भाग. 'शेतें करीत असतां चवथल घेतली.' –आठ. इति. १०३. [ सं. चतुः+स्थल ]

**चवरखा**—पु. कागदाचा १/४ भाग. [ सं. चतुर् ]

**चव्हाणचौथाई**—स्त्री. उदाजी चव्हाण लोकांपासून जबरदस्तीनें जो कर वसूल करीत असे त्यास म्हणत. 'उदाजी चव्हाण बंड करून चव्हाण चौथाई अशी बाब गांवगन्ना घेत होता.' –रा २, –पेशा ६०.

**चव्हाणपट्टी**—स्त्री. शाहू राजाच्या प्रांतांत उदाजी चव्हाण लूट करीत असे त्याचें निवारण करण्याकरितां घ्यावयाचा कर. 'राजश्री प्रतिनिधिनी चव्हाणपट्टी तीनशे साठ रुपये घेतले.' –रा ३.११.

**चश्म**—पु. डोळा. –मुधो. [ फा. ]

**चश्मजख्म**—दुर्दैव; दुष्ट नजर. [ फा. चश्म+जख्म ]

**चश्मा**—पु. झरा. –मुस. [ फा. ]

**चह**—सर्व. किती; काय; कोणतें. –आफ. –मुधो. [ फा. ]

**चहल**—वि. चाळीस. –आफ. [ अर. ]

**चहार**—वि. चार. –आफ. [ अर. ]

**चहार-दुहम**—बि. चौदावा. –आफ.

**चहारुम**—वि. चौथा. –आफ.

**चळ**—पु. हुलकावणी. 'करकमभोसे पंढरपूर इकडेच चळ द्यावा. दबाव पाडावा.' –पदे २८.२८. [ सं. चल ]

**चळकांपणें**—अक्रि. चळचळ कांपणें; कंपायमान होणें; भीतीनें कंप सुटणें. 'तिचें उभें शरीर चळकांपलें' –अपुरा १८. [ चल+कंप ]

**चाकव**—स्त्री. उपोद्रका; एक वनस्पति. –मसाप ४५.५.

**चांग**—पु. एक प्राणघातक यंत्र. एका उंच मंचाखालीं एक खड्ग जोडलेलें असतें. त्या मंचावरून अपराध्यास त्या खड्गावर फेंकून त्याचा प्राणघात करतात.

**चाचुरमुदी**—स्त्री. ( महानु. ) चौरस्ता; चौफुली; चव्हाटा. ' चाचुरमुदीपासी आसन ' -निराडोमे.

**चांचेगिरी-चांचेपणा**—स्त्री. पु. चांच्याची वृत्ति; दर्यावरील लुटारूपणा. -आंघइ १८.

**चाट पडणें, बनणें**—फजीती होणें. ' जर्मन वैमानिक क्रीट बेटाबर येतांच त्यांच्यावर चाट बनण्याचा प्रसंग आलाच ? ' -किर्लो आक्टो. १९४१.

**चाटूक्ति**—स्त्री. चटकदार गप्पा; अर्क सुभाषितें. -चित्रा २९.१.३९.२३.

**चाटूपुटू**—वि. तात्पुरतें; कामचलाऊ. ' चाटूपुटू औषध देऊन पाहिलें दुखणें कमी पडलें नाहीं म्हणून वैद्यास बोलावणें पाठविणें भाग पडलें. '

**चांदणी**—स्त्री. छोटा तंबू. ' भाऊसाहेब स्नानभोजनाकरितां चांदणीवर आले तर विश्वासराव तेथेंच असत. ' -दुरं १७७.

**चांदणी बघणें**—अक्रि. ( कुस्ती ) अर्धवट उताणें होणें; वर पाहणें. ' चांदणी बघितली, एका कुशीवर झाला, एक खांदा जमिनीला लागला कीं कुस्ती झाली. ' -के २०.१२.३८.३.

**चांदणी भोजन**—न. चांदण्यांतील जेवण, मेजवानी; चांदण्यारात्रीं उघड्यावर केलेलें डोहाळेजेवण वगैरे. [ चांदणी+भोजन ]

**चादरी दारूकाम**—न. तप्त सुवर्णाप्रमाणें लाल व पिवळ्या रंगाच्या फुलांचें दारूकाम. -पेम ३६३.

**चांदला**—पु. गुजराती लोकांत विवाह समयीं वधूवरांस रोख रकमेचा आहेर करतात तो. -के १८-८-१९३६. [ सं. चंद्र ]

**चांदवडी जोडा**—पु. चांदवड गांवीं तयार होणारा जोडा. याच्या वरच्या बाजूस कोरून बनात लावलेली असे. [ चांदवड गांव ]

**चांदा**—पु. मध्यप्रांतांत शेताच्या हद्दीवर खुणेकरितां बांधलेला दगड अगर विटांचा खांब. [ चंद्र ]

**चाप**—पु. ( ग. ) बांबूचा मोठा हारा. याचा उपयोग पाला भरण्यास करतात. डालगें.

**चाप**—न. १ ( गणित ) वर्तुलाचा अर्ध; वर्तुलांश. २ ( फ. ज्यो. ) धनुराशि [ सं. ]

**चाप**—पु. सवार.

**चापट**—पु. एक पतंगाचा प्रकार. -व्याज्ञा १.१६१.

**चापड**—न. ( इंदूर ) धान्याचा चुरा; गव्हाचा कोंडा. -के १.९.१९३६.

**चापर**—स्त्री. गुराच्या गळ्यांतील घांट. ' गुरांच्या गळ्यांतील चापरांचा आवाज गोड वाटतो. ' -शालाप. ऑग १९३९.

**चापऱ्या**—पु. सुखवासी; सुकवासी; दगड. [ ? ]

**चापाची जायपत्री**—स्त्री. निवडक, जाड जायपत्री.

**चापी**—स्त्री. तंबाकूची पेंढी. ' कच्च्या तंबाकूच्या चाप्या ? '

**चांबेटा**—पु. चाप; खोडा. ' हातास चांबेटे खिळून पहाऱ्यांत ठेवले. ' -आंघइ १०.

**चांभार ओढ**—स्त्री. अत्यंत जिकीर; ज्याप्रमाणें चांभाराला गिऱ्हाइकांनीं मुदत टळल्याबद्दल सतवावें त्याप्रमाणें झालेली ओढाताण.

**चांभारीपाटी**—स्त्री. आट्यापाट्यांच्या खेळांतील अगदीं पहिली पाटी; कपाळ पाटी. -व्याज्ञा १.२२०.

**चांभारी लाख**—लाखेचा एक प्रकार.

**चामठा**—पु. पावसाच्या अखेरीस काळा पडणारा खेंकडा.

**चामचोट**—पु. चामड्याचें कृत्रिम शिश्न.

**चामलोणी**—न. त्वचेचें खाद्य.

**चामुंडा**—स्त्री. ( उप. ) विधवा.

**चार**—स्त्री. गुरें चारण्याची जागा. ' कोटा अलीकडे चार आहे तेथपर्यंत मावळे लोक वगैरे बरखंदाज गेले. ' -पेद ३.३८. [ चरणें ]

**चारकोपरे**—एक मुलींचा खेळ. -मखे २८०.

**चार चौरस**—क्रिवि. सगळीकडे; सर्वत्र. ' जिरात जमीनीस बागाईत करून चारचौरस लावणी...... ' -बाबारो ३.५५.

**चारबोट चौबा**—एक मुलांचा खेळ. -मखे १२७.

**चारमठ**—पु. शंकराचार्यांचे चार दिशांकडील चार मठ. १ शृंगेरी. २ द्वारका. ३ पुरी. ४ बदरिकाश्रम ज्योतिर्मठ.

**चारींदें**—न. अडचण; गुंता; घोटाळा. ' निभाव नव्हे यास्तव यास टाकून येतां नये. चारींदें जाहलें आहे. ' -पेद १५.३५. [ ? ]

**चालचूक**—स्त्री. वाटेची चूक; भलत्याच मार्गानें जाणें; मार्ग चुकणें; आड वाटेस लागणें. ' कांहीं फौज तिकडे चेमलकडे चालचूक होऊन निघाली त्याचा थोडाबहुत गलाटा जाला. ' -पेद २९.१२७. [ चालणें+चुकणें ]

**चालणकार**—पु. (व.) चालणारा. 'आला चंद्र भागेपूर। वाहे पाणी तुपावाणी। वाटेचा चालणकार। पाहते का वेडया वाणी।' –वलो १२. [चालणें]

**चालणा**—स्त्री. गडबड; उलाढाल. 'चालणा फार करतील.' –पेद २६.९७. [सं. चल्-चालन]

**चालणी**—स्त्री. काथ्याचा दोर. –आंघइ ३७९.

**चावड**—पु. एक जात. 'याखेरीज चावड वगैरे याचे जागीर' –बाबारो ३.५२.

**चावरा कुत्रा चुकला**—पु. एक मुलांचा स्काउट खेळ. –व्याज्ञा १.३१५.

**चावराणा**—क्रिवि. चाहुरवार; प्रत्येक चाहूर जमिनीस अमुक अशा पद्धतीनें कर. 'मग बेलेपटी व प्रजेपटा दोनी बाबा याची खिस्त चावराणा करून दिली.' –पेद ४५.३. 'मग खानसोहेबी हुकूम फर्मावला की महसूल नख्त व बेलेपटी व प्रजेपटा व मोहीमपटी येकून कुलबाब जमिनेवरी चावराणा करून देणे म्हणौऊन हुकूम.' –पेद ४५.३. [चाहूर]

**चावरात**—चाहूर अनेवचन.

**चावळणें**—अक्रि. वेडें होणें; खूळ लागणें. 'कुत्रें चावळलें आहे.' [सं. चल्]

**चावीचा दगड**—पु. दगडांची कमान बांधताना अखेरीस सर्वांत वर मधोमध जो दगड बसवितात तो. यावरून, (ल.) अत्यंत महत्त्वाचा भाग; सर्वोत्तम गोष्ट; सर्व कार्यक्रमाचा आधार. 'अंदाजपत्रकांतील चावीचा दगड म्हणजे दारुबंदीचा कार्यक्रम.' –के २५.४.१९३९.

**चासणीदार**—पु. चाचणी करणारा; बादशहाच्या मुदपाकखान्यांत तयार झालेले जिन्नस प्रथम चाखून पाहणारा अधिकारी.

**चाहरम, च्याहरम**—पु. चौथ; चौथा हिस्सा; वसूलीचा चौथा भाग. 'सुज्यायेतखान अलजपूरचा सुभा यानें तीन वरशे आमचा च्याहरम दिल्हा नाहीं.' –पेद १५.८२. [फा.]

**चाळ**—पु. वाळू वगैरे पदार्थ चाळला असतां चाळणीवर जो जाडाभरडा भाग शिल्लक राहतो तो; चाळून राहिलेला अवशेष. [चाळणें]

**चाळ**—पु. (खा.) तोंडावरील वण; देवी वगैरेचा डाग.

**चाळाकुचाळा**—पु. उपद्व्याप; भानगड; खोडी; गडबड; बंडखोरी. 'कोठेंहि असतील तेथें लटकी राजकारणें करावीं, चाळाकुचाळा करावा प्यार लोक फोडावे.' –पेद २०.१०४. [चाळा+कु+चाळ]

**चाळिसा**—पु. उत्तर हिंदुस्थानांत संवत् १८४० मध्यें पडलेला दुष्काळ. 'हा भयंकर दुष्काळ संवत् १८४० मध्यें पडला यावरून त्याला 'चाळिसा' हें नांव पडलें. तें अद्यापि लोकांच्या बोलण्यांत येतें.' –महादजी चरित्र १९१. [चाळीस]

**चाळेगत**—न. (गो.) पिशाच्च. [चाळा]

**चिकटा**—पु. जिभेवर पांढरा साका बसतो तो. [चिकटणें]

**चिकन्दोजी**—वि. कापडाची एक जात. ७५० महमूदी चिकन्दोजी. –बाबारो ३.१२५. [फा.]

**चिकलदोडकी**—स्त्री. भाताची एक मध्यम जात. –चित्रकृषि २.६.

**चिकवाक**—पु. चीजवस्त; वस्तभाव; किडुकमिडूक. 'तेव्हां मुलींचा चिकवाक होता त्याचा ऐवज तीनसें रुपये करून रामाजी बल्लाळ भोमेंडकर हरी विश्वनाथ यांचा कारकून आला त्याच्या पदरीं घातला.' –आठ. इति. १०१. [?]

**चिकाटी**—स्त्री. (खान.) आरोळी. [ध्व.]

**चिकाटी**—स्त्री. (कुस्ती) प्रतिपक्ष्यानें आपला उजवा हात धरल्यास डाव्या हातानें त्याचा उजवा हात दाबून मागें ढकलून आपला हात सोडवून घेणें. –व्याज्ञा ४.१७१. [?]

**चिकारा**—पु. (  ) काळवीट.

**चिकीं भरणें**—धान्यांत रस उत्पन्न होणें; दाणा भरणें. 'हीं पिकें ऐन चिकीं भरण्याच्या वेळींच वाळून गेल्यामुळें.' –के १०.११.१९३६. [चीक]

**चिघोर**—पु. घोळका; पुंजा; जमाव. 'पण तिच्यांत-(सावलींत)च बराचसा पोरांचा चिघोर गोंगाट करीत बसला होता.' –उपेअंत २. [?]

**चिंचेचें झाड**—न. एक मुलींचा खेळ. –मखे ३२८.

**चिच्या**—पु. चुलता. 'आम्ही त्यास चिच्याचे जागा मानितों.' –पेद २५.८०. [ऊर्दू]

**चिडाचिप, चिडीचिप**—स्त्री. सामसूम. 'मास्तरांची दृष्टि वर्गाकडे वळतांच सगळीकडे चिडीचिप.' –मशा नोवें १९३६.९६.

**चिणचिण**—स्त्री. जिकीर; फिकीर; काळजी; धास्ती घेतलेल्या मनाची अवस्था. 'दोन तीन हजार माणूस जमलेलें पण चिणचिण करीत सगळा बाजार मागें पुढें मागें पुढें रेलत होता.' –उपे अंत २१. [ध्व.]

**चितल**—न. एक नाणें. –आफ. [?]

**चितु (छाप) सोनें**—न. विशिष्ट कस निदर्शित करण्याच्या छापाचें सोनें. चितु पटवर्धन या नांवाच्या सराफाची

पेढी मुंबई येथें आहे ती सोन्याचा कस ठरवून छाप मारून देते यावरून. ' शिक्षकानें स्वार्थत्याग केला पाहिजे असा घोष पूर्वी कधीं काळीं सुरू झालेला आहे तो जशाचा तसा चिंतू-सोन्याप्रमाणें अखंड टिकून आहे. ' -साहित्यधारा. -माटे १६.

**चित्रकलालेखन**—न. चित्रपटाचें शाब्दिक वर्णन. -साप्ता सका २५.१२.१९३४. [ सं. ]

**चित्रगुच्छ**—पु. अनेक चित्रांचा समूह एकसमयावच्छेदें किंवा एका मागून एक त्वरेनें दिसणें. -सह्या सप्टें १९३७. [ सं. चित्र+गुच्छ ]

**चित्रपट**—पु. अनेक चित्रें एकापुढें एक काढलेला पट; फिल्म. [ चित्र+पट ]

**चित्रसंयोग**—पु. अनेक एकापुढें एक काढलेल्या चित्रांचें सुसंगत एकीकरण. -सह्या सप्टें १९३७. [ सं. चित्र+सम्+युग् ]

**चित्रळ**—पु. पेशावर पलीकडील एक शहर, प्रांत व संस्थान.

**चिंध्या गाळणें**—फाटकीं वस्त्रें नेसणें; लकतऱ्या नेसणें.

**चिनगी**—स्त्री. ( अहिराणी ) ठिणगी. -अहिराणी भाषा व संस्कृति २५. [ ध्व. ]

**चिनी**—स्त्री. चूक; खिळा; मेख. [ चिनणें-छिनणें-छिद् ]

**चिनी भिंत**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३२८.

**चिपडचिपड**—स्त्री. झुंजुमुंजु; अरुणोदय; पहाट. ' दो प्रहरा रात्रीं खाडी उतरावी, चिपडचिपड होना हला करावी ' -पेद ३३.१६७. [ चिपड द्वि. ]

**चिंबोरा**—पु. खेंकडा. चिंबोरी पहा.

**चिंबोळी**—स्त्री. चिंधडी. ' त्या इसमाच्या आवाजाच्या चिंबोळ्या होऊन त्याला बोलतां येईना. ' -मरं ३०. [ चिंबणें-पिंजणें ]

**चिपटा**—पु. ( कुस्ती ) एक डाव. एका पटाऐवजीं दोन्ही पट उपसणें.

**चिमटागुडघा**—पु. मिंधेपणा; पेंच; अडचण. ' तुम्हास कोणाचा चिमटागुडघा असल्यास दिक्कत घेऊन लांबणीवर पडल्यास तुम्हास वाईट आहे. ' -ऐसंसाखं २.१७.

**चिमूट लावणें**—तगादा लावणें; पिच्छा पुरवणें; निकड लावणें. ' या पुस्तकाचें काम मजकडून अगदीं चिमूट लावून करवून घेतलें. ' -आडिमहा प्र १२.

**चिम्मटपंथी**—वि. कवडीचुंबक; कृपण. ' डॉ. आपटे मोठे धार्मिक असून चिम्मटपंथी होते. ' -आपघइ १२५.

**चिरणी**—स्त्री. पहिली नांगरट. -चित्रकृषि २.६.

**चिरपाटी**—स्त्री. आटापाट्यांवर खेळण्याचा एक खेळ.

**चिरपुट**—स्त्री. टिक्की. ' त्यानें सिगारेटची रिकामी पेटी डाव्या हातांत घेतली आणि तिच्या खालच्या पृष्ठभागावर उजव्या आंगठ्यानें चिरपुट लगावून ती वर उडवून दिली. ' -अंधारांतील वाट. [ ध्व. ]

**चिरबीड**—वि. दाटीनें लिहिलेलें; खोडाखोडी करून लिहिलेलें. [ म. चीर=रेघ; फट ]

**चिरसमय**—पु. दीर्घकाळ. [ सं. ]

**चिरस्मरणीय**—वि. दीर्घकाल आठवणींत राहण्या-सारखें. [ सं. ]

**चिराळणें**—अक्रि. चिरकणें; फाटणें; चीर पडणें, ' जें चिराळलें असतां ' -वाहतेवारे १९४. [ चीर ]

**चिलखत**—न. किल्ल्याच्या तटास वगैरे मजबुदी येण्या-करितां करावयाचें आंतील बाजूचें आधारादाखल बांधकाम; दुहेरी किंवा जोड बांधकाम; अस्तरी बांधकाम. ' गडाची इमारत गरजेची करूं नये. तट, बुरुज, चिलखतें, पाहारे, पडकोट जेथें जेथें असावे ते बरे मजबूत बांधावे. ' -बावडे दप्तर १.९७.

**चिलपे**—पु. अने. लांकडाचे ढलपे; सालपा.

**चिलीम**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे ३३५.

०**दोस्त**-पु. तंबाखू ओढण्याच्या व्यसनामुळें जोडलेला मित्र.

**चिल्हाटी**—स्त्री. ( व. ) एक कांटेरी झुडूप. ' वाटच्या वाटसरा। लेक जन्मते चिल्हाटी। माय बापाचे कुळाला। डाग लावते शेवटीं। ' -वलो ७.

**चिवड**—स्त्री. चुगली; नापसंतीदर्शक गोष्ट; चिडण्या-सारखी गोष्ट. ' सखारामाजवळ बाबानी नानाची चिवड सांगितली येथीलहि पुसले. ' -पुद १.१८१.

**चीची माशी**—स्त्री. आफ्रिका खंडांतील एक विषारी माशी. [ इं. Tsetse ]

**चीतपट कुस्ती**—स्त्री. कोणीतरी चारीमुंडे चीत झाल्याशिवाय सोडावयाची नाहीं अशी कुस्ती. [ चीत=उताणा, पट=उपडा+कुस्ती ]

**चीन लोह**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २३. [ चीन+लोह ]

**चीर**—स्त्री. १ एक लाठीचा वार. शत्रूच्या पायांमधून वर करावयाचा. २ फरीगदक्याचा वरीलप्रमाणें वार. -व्याज्ञा ४.३८४. [ चिरणें ]

**चुकर**—स्त्री. टंचाई. ' पैशाची चुकर आहे. '

**चुंग, चुंगा**—पु. वस्त्राच्या पदराचा भाग, सोगा. [ चोगा ? ]

**चुंगडी**—स्त्री. सुरुवात. 'चुंगडीला पेरणीला पाऊस पडला नाहीं.' [ ? ]

**चुगल्या**—वि. चहाड; चहाडी करणारा; चुगली लावणारा. [ चुगली ]

**चुटकी**—स्त्री. ४ चुटकी वाजवण्यास लागतो इतका वेळ; अत्यंत अल्प काळ. 'हें काम चुटकीसरसें करून येतों.'

**चुडत**—न. ( गो. ) झांप ( माडाचा ).

**चुडावोंडा**—पु. चुडी ओंडा वगैरे. 'सरकारची वेठबिगार चुडावोंडा व शाकार फडफर्मास व रावता महार वगैरे येणें.' –थोमारो ७.४७.

**चुडीदार पायजमा**—पु. ढोंपरापर्यंत सैल व खालीं घट्ट असा पायजमा. 'हिंदु मुलींनीं चुडीदार पायजमा व अंगरखा घालावा अशी नोटीस हैदराबाद येथें लागली आहे.' –के ३०.६.१९३९.

**चुणचुणी**—( कु. ) लुगड्याची एक जात. [ ? ]

**चुणचेणी साखर ( चुनचुनी खडीसाखर )**—स्त्री. पत्री खडीसाखर.

**चुणी**—स्त्री. अणीः टोंक; अग्र. 'मुजफरखान यांचा जावई भाऊचे डेऱ्यांत येऊन पाठीमागून कट्यारीची हूल चालविली. ते चुणी लागली.' –भारतवर्ष पंत प्रधान दुसरी शकावली १९३९.

**चुना लावणें**—एक मुलींचा खेळ. –मखे.

**चुनां**—वि. असा; इतकें. –आफ. –मुधो, [ फा. ]

**चुनाकह**—अव्य. इतकें कीं. [ फा. ]

**चुनांचह**—क्रिवि. ज्याप्रमाणें. –आफ. [ फा. ]

**चुनी**—अव्य. असें; इतकें. [ फा. ]

**चुंब उडविणें; प्रचुंब उडविणें**—अक्रि. परस्परांस भेटणें; चुंबणें; मिळणें. 'डोळ्यां वरखालीं पापण्या असती। पळें पळ चुंब उडविती। परी डोळे कांहीं त्यांस न देखती।' –योसं ८.५४. 'जैगा पापण्या प्रचुंब उडविती।'–योसं ८.५५.

**चुबकें**—न. ( लोहार ) भोकें पाडण्याचें हत्यार.

**चुरणें**—अक्रि. एखादें जनावर अथवा मनुष्य शक्तीपेक्षां अधिक काम पडल्यामुळें खुरटणें, वाढ खुंटणें. –चित्रकृषि२३.

**चुलचुले**—वि. अधीर; उतावीळ; अस्वस्थ. 'हे गोष्ट नबाबास विचारिली. उत्तर दिधले कीं, कुरुक्षेत्राकडे फौजहि पाठवणें आम्हास पुरवत नाहीं व अतःपर आम्ही फार चुलचुले जालों.' –पेद २.३९. [ ध्व. ]

**चुलटी**—स्त्री. चुइटी पहा. उसाची साल. 'संन्यासी भिक्षु चुलट्या सोलून ऊंस खातात.' –संन्यख ७९.

**चुलीची आराधना, पूजा**—स्त्री. स्वयंपाक; अन्न शिजविणें वगैरे काम.

**चुस्तपजामा**—पु. पायांस घट्ट बसणारी विजार; तंग पायजमा. [ फा. ]

**चुळळी**—स्त्री. ( महानु. ) नूतन आम्रवृक्षाच्या पाना प्रमाणें कोमलता; आरक्तता. 'कोवळिकेंची चुळळीः श्रीचरणतळवे झळाळी !'

**चूं**—क्रिवि. ज्याअर्थी; जेव्हां. –आफ. –मुधो. [फा.]

**चूकवाक**—स्त्री. चुकी वगैरे; दोष; अपराध; गलती. 'आम्हाकडून चूकवाक बोलीमध्यें जाली असेल तर क्षमा असावी.' –पेद ३६.५३. [ चूक द्वि. ]

**चूड**—स्त्री. गवत वगैरे. 'वेठवेगार व चूड वोंडा वगैरे कारसाज पाहिजे.' –बाबारो ३.२७५; –समारो ६.१५२. चुडावोंडा पहा.

**चुतडबंधू**—पु. एकाच स्त्रीचे जार. [ चुतड+बन्धु ]

**चूल**—पु. एक मुलींचा खेळ. –मखे ३४६. •उचलणें–एक मुलींचा खेळ. –मखे ३४७.

**चूलभाणस**—न. वधूवर वरातीनंतर वरगृहीं आल्यावर होणाऱ्या लक्ष्मीपूजनानंतर वरमातेनें नववधूस स्वयंपाक गृह दाखविण्याचा विधि. [ चूल+भानवस ]

**चेटीचंद**—पु. (सिंधी) महिन्याच्या प्रथम दिवशीं दिसणारी चंद्रकोर. [ चेटी+चंद्र ]

**चेंडू चुकविणें**—न. एक मुलांचा खेळ. –व्याज्ञा १. ३६८.

**चेपन्या**—स्त्री. अने. वाहणा. चप्पल-चपला.

**चेला**—पु. लांकडाचा ढलपा. [ध्व.]

**चेळा**—पु. विहिरींत माल सोडणें वर ओढणें यासाठीं माकडी ज्या दोरानें व खुंटयांच्या साहाय्यानें सोडतात तें साधन. विहीर.

**चै देणें**—( मुलांस ) ठो देणें; टक्कर देणें; ढुशी देणें.

**चैत्रावळ**—स्त्री. चैत्र महिन्यांतील उत्सव. हा चैत्रशुद्ध पौर्णिमेस असतो. –मशा जून १९३५.

**चैत्री पौर्णिमा**—स्त्री. हीस दवणी पौर्णिमा असें म्हणतात. या दिवशीं देवास दवणा वाहतात.

**चोकशी**—पु. ( गु. ) सोनें व चांदी पारखणारी एक जात; पारखी. [ चौकशी ]

**चोखत राहणें**—वाट पहात बसणें. 'खिरापती लागी चोखत ठेला.' [ चोखणें ]

**चोखा**—पु. चाखून पाहणारा; श्रीमंतांच्या घरीं प्रथम पदार्थ चाखून पाहणारा मनुष्य. -नि ३७२. [चोखणें; चाखणें]

**चोटकुली-लें**—स्त्री.न. लहान मुलाचें शिस्न.

**चोटफेट**—स्त्री. झीटफीट; मारामारी. 'अबदालीचे आगाडीचे लोकासी व राजश्री दत्ताजी सिंदे यांच्या आगाडीचे लोकासी नजर नजर चोटफेटहि जाली.' -पेद २.१०९. [चोथ=मार. द्वि.]

**चोडवोनवा**—वि. (महानु.) चौरस्त्यावर चारी बाजूनें मोकळा. [चोड=चार; वोनवा=ओणवा]

**चोडशी**—स्त्री. मातीचा सांचा; मूस.

**चोथवा**—पु. पोकळ नळा; तोटा; 'दारू वीस मण सांपडली व बाणाचे चोथवे कांहीं सापडले.' -पेद २५.१५९. [चोधा]

**चोप**—पु. माड, पोफळ, सुरमाड वगैरेचा कापून केलेला पाण्याचा पन्हळ.

**चोपडा**—पु. हौदा. -ज्ञाको झ १४.

**चोपडा**—पु. हौद. -माप्र ७३, ७४.

**चोपण**—स्त्री. (व.) राड; चिखलवट जागा. 'यंदा नवें घेतलेलें वावर चोपणीचें आहे तें पुष्कळ दिवस वाळत नाहीं.'

**चोपलेलें**—वि. कृश; हाडकुळें. 'एक लांबोळें चोपलेलें कुत्रें त्याच्या शेजारीं दोन पाय पुढें पसरून दीनवाणेंपणानें त्याच्या तोंडाकडे पहात बसलें.' -उपे अन्तः.

**चोबड**—वि. चोपडे; गुळगुळीत; लाडिकपणाचे; गौरवाचे. 'चोबडया बोला.'

**चोंबडेगिरी**—स्त्री. चोंबडेपणा; मध्येंच बोलणें; चहाडी करणें, लुडबुड. [चोंबडा पहा]

**चोरक**—न. एक वनस्पती; शंखिनी; चोरपुष्पी; केशिनी. -मसाप ४५.४. [सं.]

**चोरगल्ली**—स्त्री. १ एक मुलांचा खेळ. -मखे १३०. २ एक पाच सहा गडयांनीं गली व चेंडूनें खेळावयाचा खेळ. -मखे ५८. ३ या खेळांत पाडावयाची गल्ली, खड्डा.

**चोरचाबड**—वि. चोर; लबाड; अप्रामाणिक; ठक. 'परंतु निर्मळ भली लबाड चोर चाबड नसली तरी ठेवणें.' -पेद २७.२५८. [चोर द्वि.]

**चोरटेंपाणी**—न. गुप्तस्नान. मुंबई जवळच्या कांहीं शेतकरी लोकांत विवाहापूर्वी मुलगी ऋतुमती झाल्यास तिला चौथ्या दिवशीं गुप्तपणें स्नान घालतात त्यास म्हणतात. -मसाप १५.१६६.

**चोर शिपाई**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे १३८.

**चोरसा**—पु. चौकोनी तुकडा. 'साबणाचे लहानमोठे चोरसेही सर्वत्र मिळतात.' -त्रिकाळ १५.१०.१९३९. [चौरस]

**चोली**—स्त्री. (व.) लहानसा बुरडी पेटारा. 'पानाची चोली ओढ अलीकडे.'

**चोलीकुचाली**—वि. उपद्व्यापी; दंगेखोर; उचापती करणारे. 'इकडे मुरारराव वगैरे चोलीकुचाली फार आहेत. स्नेहानें सर्व आपले करून आपले कार्य होईल.' -पुद १.३३४. [कुचाली द्वि.]

**चोळकी**—पु. खणांचा क्वचित् लुगडयांचा व्यापार करणारा. [चोळी]

**चोळणें**—सक्रि. (ल.) पायमल्ली करणें; तुडवणें. 'द्रव्याचा मुलूक नव्हे च्यार वरसें फौजेनें चोललें व मोगलानीहि लुटले आहे.' -पेद १५.८९.

**चौक**—पु. तलवारीच्या मुठीचा ठोला असतो त्या ठिकाणीं होणारा चौकोनी भाग. -प्रश ५५.

**चौक**—पु. (आठ्यापाठ्या) दोन पाठ्यांचा अर्धा भाग व सूर यांनीं मर्यादित भाग. -व्याज्ञा १.२२०. ०**फेर**-पु. आठ्यापाठ्यांच्या खेळांत खेळणाऱ्या गडयांनीं एका अर्ध भागांतून दुसऱ्या अर्ध भागांत जाणें. ' -व्याज्ञा १.२४३.

**चौकडणें**—अक्रि. उडया मारणें. 'पुढा चौकडत कस्तुरी मृग। चविरियाचे पाडे उभसिंग । तें सड किर्सीसा बळिये सैंग। भार सिंग कोंतेकार।' -नरुस्व ७४५. [सं. चतुर]

**चौकडी**—स्त्री. (संगीत) चीज. 'प्रत्येक रागांत मला इतक्या चौकडया येतात.' -संशाक ६७.

**चौकडें**—न. (राजा.) संबळ वाजविण्याची वांकडी काठी. -आडिमहा प्र १०.

**चौकाटणें**—न. उभ्या फुलीच्या आकाराचें लांकडी चिन्ह; क्रॉस. ख्रिश्चन धर्माचीं निदर्शक चौकाटणीं बसविलीं आहेत.' -आयुया.

**चौकार**—पु. चारांचा टोला (क्रिकेट).

**चौकी बसविणें**—अंमल बसविणें; पाहारा ठेवणें. 'तुम्ही विशाळगडाखालीं चौकी बसविली आहे म्हणून वर्तमान आइकोन स्वामी संतोषी जाले.' -शारो १.१८.

**चौखई**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे ३३४.

**चौखईचा डाव**—पु. सागरगोटयांच्या खेळांतील एक डाव; एका डावाची संज्ञा; चारखडे एकदम झेलावयाची पाळी.

**चौखंड**—न. चारी खंडें. 'असा मनुष्य चखिंडांत मिळावयाचा नाहीं.' **०पृथ्वी**-स्त्री. सर्व पृथ्वी. चारी खंडें मिळून होणारी पृथ्वी.

**चौगाना**—स्त्री. ( महानु. ) एक अलंकार. 'हातीं चौगाना बर्वी। रत्नजडीत सुहावीं।' -चेंडुफळी १९.

**चौघींचा झिम्मा**—पु. एक मुळींचा खेळ. -मखे २२५.

**चौघींची फुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३१२.

**चौत्रा**—पु. नाकें; बसण्याची जागा; स्थान; पीठ. 'आपणांस मोगलाई अमल चौत्रे यावर रोज व जमीन इनाम बिघे व इनामगांव आहेत.' -बाबारो २.११७.

**चौथरा**—न. चवथ्या दिवशीं म्हणजे मध्यंतरीं दोन पूर्ण दिवस सोडून येणारा ताप. [ चतुर्थ ]

**चौथवा**—पु. एक शेर; पायलीचा चतुर्थांश. 'गल्ला कैली ८८।. चौथवा भर व मीठ कोठींपैकीं देत जाणें.' -बाबारो २.५७. [ चतुर्थ-चौथ ]

**चौदंडी**—(कुस्ती) परस्परांच्या मानेवर हात असतां उजव्या हातानें त्याच्या छातीस मागें ढकलून आपला उजवा पाय त्याचे मागें टाकून त्याचे मागें जाणें. -व्याज्ञा ४.१७१. [ चौ+दंड ]

**चौधरकी**—स्त्री. चौधरीचें काम; चौधरीपणाचें वतन; हक्क. 'रूपराम चौधरी हा पानशांच्या तोफखान्यांत चौधरकीच्या कामावर होता.'

**चौंधा**—पु. १ चव्हाटा. -पां मवाइ २. चार गांवची हद्द जेथें मिळते ती जागा. 'चौ गांवीचा चौंधा दक्षिणेस सुपे.' -रा १८.४. [ सं. चतुर्-चौ+धा ]

**चौपट करणें**—लांकूड तासून चारी बाजूंनीं साफ करणें; चौरस करणें; चौपाट; चौपाट करणें पहा. [ सं. चतुः+पट ]

**चौपाटी**—स्त्री. चार रस्ते जेथें एकत्र मिळतात अशी जागा. [ सं. चतुःपट ]

**चौरंगी बैठा खो खो**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३३७.

**चौसार**—पु.एक मुलांचा खेळ; सोंगट्या. -मखे १९६.

---

# छ

**छकुडी**—स्त्री. लाडिकपणानें स्त्रीस योजावयाचा शब्द.

**छचारदहा**—पु. तीन फांशांवरील एक दान. एकावर सहा व दोहोंवर दोन दोन या प्रमाणें. [ छ+चार+दहा ]

**छट**—उद्गा. छे; नाहीं. [ ध्व. ]

**छटाकी**—स्त्री. छटेल; नखरेबाज स्त्री; कलावंत स्त्री; 'सुगीच्या बाजारांत छटाक्यांची व कोल्हाटणींची गर्दी उडे.' -पाणकळा.

**छडाछड**—स्त्री. बारीक चौकशी. 'त्यास सरकारचे आरमार करी यांणीं छडाछड करूं नये.' -समारो ४.३१५.

**छड्डू**—पु. दंड. -गोव्या.

**छंद**—पु. हातांतील सोन्याचा दागिना; बांगडी. लाखेच्या बांगडीवर सोनेरी वर्ख लावून केलेली बांगडी.

**छंद**—वि. गुप्त; झांकलेलें. -दा १६.३.१९३९. [सं.छन्न]

**छपखून**—पु. शब्खून पहा. रात्रीचा हल्ला; रातघाला. 'राजश्री गोपाळराव गणेश याणी राजश्री आपाजी गणेश याचे फौजेवरी दगा करून छपखून करून कांहीं लोक लुटिले व बाकीचे पलोन गेले.' -पेद ३७.१०४. [ फा. शब्खून ]

**छपरबंद**—वि. छपर बांधून राहणारा; स्थायिक; घरवाला. 'सवापाच रुपये दर गांवास छपरबंद व पायकस्ता देखील करार असे.' -बाबारो ३.२२९.

**छपरमैना**—स्त्री. सॅपर व मायनर याचा अपभ्रंश. पलटणींतील रस्ते वगैरे करणाऱ्या लोकांची तुकडी. [ इं. सॅपर्स अँड मायनर्स ]

**छपु**—उद्गा. खेळामध्यें धरणाऱ्या मुलानें पळणाऱ्या मुलांच्या डोक्यावर हात ठेवतांना उच्चारावयाचा शब्द. 'बसलेल्या मुलांच्या डोक्यावर डाव असणारा मुलगा हात ठेवून छपू असें म्हणतो.' -व्याज्ञा १.१३६. [ ध्व. ]

**छपेलु**—वि. सहा पैलू असलेला. 'पांच मदनाईक छपेलु.' -समारो ३.७१. [ छ+पैलु ]

**छप्पर**—न. ( उप. ) डोक्यावर वाढलेले केंस.

**छप्परी मिशा**—स्त्री. मोठमोठ्या मिशा; ओंठावर छप्पर घातल्याप्रमाणें दिसणाऱ्या मिशा.

**छप्पूपाणी**—न. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.४०१.

**छबीना**—पु. चबिणा पहा. चणे वगैरे खाद्य. 'प्रत्येकाला रोज अर्धा आणा छबिन्या करितां म्हणजे चण्याकरितां देण्याचें ठरलें.' -चिज. जुलै १०४०. [ चबीना-चबिणा पहा. ]

**छल बे छल**—वि. विस्कळित; विखुरलेले; उसकटलेले. ' तुझ्या पगडीचे पेच मला छलबेछल दिसताती. '

**छलांग**—स्त्री. उडी. ' अवघ्या पांच सहा छलांगांत वाघ पुन्हा आडवळणानें येऊन उभा राहिला. ' -मनो जुलै १९३८. [ सं. चल्+ अंग ? ]

**छळणें**—अक्रि. कपट करणें; ठकविणें; फसविणें. ' तो प्रमदामदें वेधवोन । नगरा आणावा छळून । ' -भारा बाल १.१००. [ सं. छल=कपट ]

**छाकटेपण**—न. नीचपणाची वागणूक; हलकटपणा. [ सं. शाक्त=छाकटा+पण ]

**छाटका**—वि. थापेबाज; ढंग करणारा. [ सं. शठ-छाट ]

**छाडाछेड**—स्त्री. छळ; तसदी; त्रास. ' रयतेस छाडा-छेड केली. ' -ज्ञाको त १४३. [ छेडणें द्वि. ]

**छाती**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखे ३३७.

**छात्र**—पु. शिष्य. [ सं. ]

**छात्रवर्ग**—पु. शिष्यगण. [ सं. ]

**छानी**—स्त्री. भांगेच्या पाण्यांत केलेला घोटा. [ छानणें= गाळणें ]

**छानीबानी**—स्त्री. रंगेलपणा; शौक; चैन.

**छापा-प-पी**—पु. दुकान; सलून; केंस कापण्याचें दुकान. [ इं. शॉप अप. ]

**छायानट**—पु. परमेश्वर. [ सं. ]

**छायाभाग**—पु. ज्यावर प्रकाश पडत नाहीं जो साव-लींत आहे असा भाग. [ सं. ]

**छायार्क**—पु. मध्यान्हकालीं विवक्षित उंचीच्या पदार्थाची सूर्याच्या उन्हामुळें पडणारी छाया. ' -के १०.११.१९३५. [ सं. छाया+अर्क=सूर्य ]

**छीट**—स्त्री. डाग; ठिपका; छिटका. [ छिटकणें ]

**छीलछद्म**—न. कपटाचरण; लबाडी. ' तह पडत होता परंतु करणारांनीं छीलछद्म करून उभयतांमध्यें बिघाड पाडून ......इतके प्रकार केले. ' -रा १४.६५. ' छीलछद्म बहुत जालें आहे. ' -रा १४. [ सं. छल=कपट+छद्म=लबाडी ]

**छीन**—स्त्री. १ छिनणें; काढून घेणें. २ ( लाठी ) लाठी हातांतून पाडणें; काढून घेणें. -के ६.१०.१९३९. [ छिनणें ]

**छुपा**—वि. गुप्त; न दिसणारा; लपविलेला; झांकलेला. ' छुपा कॅमेरा '; ' जनतेंतील या छुप्या मनोवृत्तीला वाचा फुटली व गेले तीनचार दिवस सारा हिंदुस्थान निरनिराळ्या प्रक्षोभक कारणांनीं हादरून गेला ? -के १४.८.१९४२. [ हिं. छुपा; सं. छद्-छाद्=झांकणें ]

**छूट**—स्त्री. एक प्रकारचा डाव; यांत कोणताहि संकेत नसून प्रत्येकास आपल्या कौशल्याप्रमाणें खेळावयाची मुभा असते. [ हिं. छुटना ]

**छूट**—स्त्री. मोकळीक. [ हिंदी छुटना ]

**छेक**—पु. खोडून टाकणें. -वि. साफ; पूर्णपणें; निपटून. ' जो गांव छेक उजाड आहे. त्याची तरतूद होत नसल्यास पट्टयानें गांव द्यावा. ' -पेद २४.२६६.

**छेडणें**—क्रि. वाजविणें. उदा. सतार छेडणें; सतारीच्या तारा छेडणें; सतार वाजविणें.

**छेडाछेड**—स्त्री. कटकट; दंगा; फिसाद; बंडाळी. ' त्या मार्गास छेडाछेड वाट चालों देत नाहींत. ' -पेद २४.८१.

**छेडाछेडी**—स्त्री. पुंडगिरी; कटकट; गडबड. ' इंग्रेज जलमार्गे जोरावर छेडाछेडी करीत असतां त्याची ग्याली रेवदंडे थोरवडे याचे बारेयावर नागरवाडा होती. ' -ऐपो २.४१. [ छेडणें ]

**छोटा चक्कर**—न. साबरमती तुरुंगामधील बंदिस्त आवार. -उत्तभिंती १४.

---

# ज

**जकणी**—स्त्री. जखीण; स्त्रीपिशाच्च; हडळ. विवाहित स्त्री पितृगृहीं मृत झाल्यास ती पिशाच्च होते अशी समजूत आहे; म्हणून तिच्या नांवानें एक लुगडें व खण वाहतात. [ म. जखीण; सं. यक्षणी ]

**जकरीरा**—जकीरा पहा. माल, सामान. ' ठाणीं दाबतीं असतील तीं जकरीरामुद्धां याचे हवालीं करावीं. ' -दुबारो ५.१६८. [ अर. झकीरा ]

**जकायती**—बि. जेथें जकात घेण्यांत येते अशीं ( बंदरें ). ' गांवकुळकर्ण देखील जकायती बंदरें. ' -बाबारो ३.१. [ अर. झकात ]

**जखडबंद**—पु. ( कुस्ती ) एक पेंच. प्रतिपक्षाच्या पाठी-वर असल्यास त्याच्या हातांवरून आपल्या हातचा विळखा घालणें.

**जखमपट्टी**—स्त्री. एखाद्यास सरकारी कामामध्यें इजा झाल्यास उपाय करण्याकरितां देण्यांत येणारी देणगी. ' मुलाच्या समाचारास पाठवून जखमपट्टीकरितां तीन हजार रुपये देव-विले. ' -रा ५.३०. [ जखमपट्टी ]

**जग**—स्त्री. एक मोठी ३-४ फूट व्यासाची २ फूट खोल बांबूची परडी. 'यल्लमाची मूर्ती पुजारी सौंदत्तीस घेऊन जात. हिला जगाची यल्लमा म्हणत.' -शिंआत्म ११.

**जंग**—न. तारवाचा प्रकार; गलबत; जहाज. 'तेथ तरिया तारुवें दोनि प्रव्हाणें । नावा होडीं बेडिया जंगें विस्तीर्णें। जयाचेनि न दिसेति उंचपणें। मेघ अंतराळीचे।' -नरुस्व ७२०.

**जंग**—पु. घाटसर; घुंगरांची माळ; घंटा वगैरे. 'बैलांच्या गळ्यांतील जंगांचा नाद.' -शिंआत्म २५१.

**जगडी**—स्त्री. (ठाकरी) झगरी शेकोटी. ही बारा मास दिवसरात पेटलेली असते.

**जगती**—स्त्री. भिंत; आवाराच कसूं; तट. 'चांगदेवीं जगती आंतु मठीं अवस्थान दीस सात' -लीच ३. पृ ६५.

**जगदाळ**—भांडखोर; कलह करणारी. [ सं. जगडवाळ]

**जगनामोष**—पु. कीर्ति; लौकिक; जगप्रसिद्धि. 'स्वामि सेवा करून आपला जगनामोष करून घेणें.' -शारो १.२८. [ जग+अर. नामूस=कीर्ति; अपकीर्ति ]

**जंगल**—वि. (ल.) म्हातारा.

**जंगलोजड**—वि. रानटी.

**जंगी**—स्त्री. १ अवजड दगड, लाकूड वगैरे उचलण्याकरितां केलेली लांब दांडा घातलेली शिंकाळी. २ छोटें दार; छिद्र. [अर. जंग=युद्ध ]

**जंगी बंदूक**—तोडयाची बंदूक. [अर. जंग=युद्ध ]

**जंगी लाट**—पु. सेनापति; लष्करी मोठा अधिकारी. [अर. जंग=लढाई+इं. लॉर्ड=बडा सरदार, अधिकारी]

**जगुमला**—वि, (व.) जगांत प्रिय; लाडकी; आवडती. 'उभ्या वाटेनं चालली । पाहा माही जगुमला । पळे बाहेर खेळाला। चेंडु चांदणीनं नेला।' -वलो ८१.

**जगो**—पु. पुरुषाचें शिरोभूषण. 'जगो घाट साधा' -दुबारो ५.१२३. [ मूळ जेगा पहा. चुकीचें वाचन ]

**जंजीर पटकणें**—(व.) पराकोष्टेची खटपट करणें; धडपड करणें. 'आम्ही पुष्कळ जंजीर पटकला पण त्यानें आमचें मुळींच ऐकूनच घेतलें नाहीं.'

**जटिलो क्रिया**—स्त्री. यौगिक क्रिया; औषधी रसायनें वगैरे करण्याची एक पद्धति. [सं. जटिल=कठिण, कूट+क्रिया]

**जड**—स्त्री. मूळ; आधार; (ल.) स्थान; जोर; बैठक. 'शत्रूची जड कमी होईल.' -समारो ४.३१३. [ हिं. जड ]

**जडवाद**—पु. सृष्टींतील सर्व क्रिया ईश्वरेच्छेवांचून होतात असें मत; ऐहिकवाद; जडसृष्टीच्या पलीकडे किंवा तीशिवाय कांहीं नाहीं असें मत. इं. मटीरिॲलिझम. [ सं. ]

**जडे**—वि. उपरी; मूळचे नसून मागाहून आलेले; चिकटलेले. [ जडणें=चिकटणें ]

**जत**—स्त्री. (गो.) गोत; गाणें; पद. 'श्रीमंत मार्सेकर देसायांची जत, भोसल्यांची जत इ.' -ब्राह्मण मासिक १.२. [ जथणें=जुळणें ]

**जत**—पु. (हिराणी) जंत पहा.

**जत**—वि. (खान.) जड.

**जत्रा**—स्त्री. जत्रेमध्यें करावयाचा एक नाट्यप्रकार; हा दक्षिण कोंकणांत प्रचलित होता. जत्रा करणाऱ्यांना देवळी म्हणतात. -मानस २९.

**जथवणें**—जताविणें पहा. बजावणें; निक्षून सांगणें. 'रणादित्य यानेंहि पुढें पश्चात्ताप होईल असें जथविलें.' -राजतरंगिणी ७.

**जदनामा**—पु. वंशावळ. 'गोखल्यांच्या एका जदनाम्याची नकल मागविली.' -गोराघ ९८. -गुण्ये घराण्याचा इतिहास १२२. (**एक**)**जदी**-वि. सखे; एकाच आईबापाचे; एकाच वंशांतील. 'खंडोबा म्हणतो मोरोबा आम्ही एकजदी. भाऊ वडील आम्ही धाकटे. मोरोबा म्हणतो हे आम्ही एकजदी नव्हे आपल्या बापास संतान नव्हतें जालें याकरितां हे भाऊपणियास आणिले.' -रा ६. पृ ५८. [ जड ]

**जद्द**—पु. आजा. -मुधो. [अर.)

**जनाजा**—पु. मुसलमानाची तिरडी. [अर. जनाझा ]

**जनांतिक**—वि गुप्त; इतरास ऐकूं न येणारें. 'कांहीं तरी महत्त्वाचा उहापोह दिसतो शिवाय जनान्तिक असावें.' -पुरु मार्च ३९. [सं.]

**जनाव**—स्त्री. उंबरठा. -आफ. [अर.]

**जनाह**—पु. पंख; हात. -मुधो. [अर.]

**जनि**—स्त्री. जन्म. [ सं. जन् ]

**जनूबी**—स्त्री. एक तरवारीचा प्रकार. दक्षिणी. -प्रश ३४. [अर. जनूब=दक्षिण ]

**जनोई**—न. जानवें; लाठींतील एक वार; खांद्यावरून खालीं तिरपा जानव्याप्रमाणें केलेला वार. -लाखे. [ जानवें ]

**जन्नत आरामगाह**—वि. स्वर्गवासी. -मुधो. [ अर. ]

**जन्यजनकभाव**—पु. पुत्र व पिता यांचा संबंध. [सं.]

**जपानी शिवाशिवी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५१.

**जफरतकिया**—एक तरवारीचा प्रकार. -प्रश ३४.

**जफारखाना**—पु. रुग्णालय. 'या सोयीव्यतिरिक्त एक जफारखाना आहे.' -हिप्र २१३. [ फा. ]

**जफ्त**—पु. दाब; नियंत्रण; धाक. 'कोण्ही कोण्हास पुसत नाहीं। सरदाराचा जफ्त फौजेवर नाहीं.' -पेद ६.१६५. [फा. जप्त-पहा]

**जबर**—स्त्री. धाक; शासन. 'त्यांजकडील लोग असतील ते तमाम जबर पोचवून.' -शारो १.११६. [जरबबद्दल चुकीचें वाचन]

**जबाण**—न. (व.) जबान पहा. वाचा. 'जाते शेवावरी रात। काय सांगू सासूरवास । कसा भरल्या सभेंत । जबाण तूं हारलास ।' -वलो ५५.

**जबाबदारीचें स्वराज्य**—न. जनतेस जबाबदार असलेल्या (लोकनियुक्त) मंत्र्यांनीं चालविलेला कारभार. -के १७.९.४०. [अर.+सं.]

**जंबुरेदार**—पु. उंटावरचा गोलंदाज; जंबुरा चालविणारा. 'एक हजार उंटावरचे जंबुरेदार होते.'-दुर १७४. [जंबुरा]

**जंबुसरी**—वि. स्पेनमधून बी आणलेल्या भुइमुगास म्हणतात. विलायतीप्रमाणें परदेशी बियाचें. -चित्रकृषि २.४.

**जब्त**—वि. जप्त पहा. **जब्ती**-स्त्री. जप्ती पहा.

**जब्ब**—घोरपड. -मुंधो. [अर.]

**जब्ह**—पु. कपाळ; मुख; चेहरा. -आफ. [अर.]

**जमेअ**—पु. संतोष. -आफ. [अर.]

**जमधर**—स्त्री. एक तलवारीचा प्रकार; यमगृह. -प्रश ४४. [यमगृह]

**जमधाढ**—न. एक दोन पात्यांचें शस्त्र; यमदाढ. [सं. यम+दंष्ट्रा]

**जमन**—तपशील. -आफ. [अर.]

**जमादि उकसानी**—पु. जमादिल आखर. -आफ. [फा.]

**जमानसाखळी**—स्त्री. परस्परांस जामीन राहण्याची क्रिया; जामीनदारांचा गट. 'तेथें जे मराठे लोक भेटले असतील त्यांचा बहुता प्रकारें दिलासा करून जमानसाखळी करून घेऊन तेच स्वामी कार्यावर सादर होत तो अर्थ करणें.' -रा ६.८.

**जमानसाजो**—स्त्री. जामिनकी; हमी. 'त्यानी जमान साजीवरी द्रिष्टी दिल्ही आहे.' -पेद २८.७३. [जमान]

**जमालगोटा**—पु. १ जयपाळाचें बीं. एक तीव्र रेचक. २ (ल.) दंडयोजना; शासन; इंगा; बडगा. 'मुस्लीम लीगचा जमालगोटा.' -के २०.९.१९४०.

**जमीअ**—वि. सर्व. -आफ. [फा.]

**जमीअरिकाब**—सर्व चाकर. [अर.]

**जमीर**—पु. मन. मुधो. [अर.]

**जमेनीस**—पु. एक मुलकी कामगार; जमाबंदीकडील लिहिणारा. 'सदाशिव कानो जमेनीस पाठविले आहेत.' -बाबारो ३.२५.

**जम्रा**—स्त्री. ? 'हरिजन लोकांत जम्रा नांवाची प्रथा होती.' -के १.८.३९.

**जम्हरिकाब**—पु. जमीअरिकाब पहा. सर्व चाकर; नोकर.-आफ. [अर.]

**जयचंदवृत्ति**—स्त्री. जयचंद या कनोजच्या राजानें पृथ्वीराजावर शहाबुद्दीन घोरीनें स्वारी केली त्यावेळीं देशद्रोह केला यावरून; स्वजनद्रोह. 'तेव्हां जयचंदी वृत्तीचे लोकांस खांडव्याची हिंदुसभा नगरपालिकेच्या निवडणुकींत उभे न करील तरच बरें.' -के १०.५.१९४०.

**जयमुहूर्त**—पु. ज्या वेळीं काम आरंभलें असतां यश मिळतें अशी वेळ. [सं.]

**जरा**—पु. मुसलमानी शस्त्रवैद्य. -पुरु. द्वि. । ३८. [अर. जर्राह]

**जरतारी**—वि. दिखाऊ; वरवरचें; झकझकीत. 'सुभाषबाबूंचा गुळगुळीत जरतारी नकार.' -वि. वृ. २६.५.१९४०.

**जरा**—पु. अल्पांश; किंचित भाग; थोडा भाग. 'रात्रीस हैदरखान जराभर सगेन मेलकोटयाचे पश्चिमेस माचीस पुढें तोफा रोखून आगव्यानें राहिला. -पेद ३७.२६६. [अर. झर्रा]

**जराई**—स्त्री. शेती. 'तरी उतार वगैरे जराई बट्टापटी बाब.' -बाबारो ३.३. [अर. झरअ=पेरणी, पेरलेलें]

**जराल**—पु. फिरंगी सेनापति. [पोर्तु. इं. जनरल]

**जरासंधी कुस्ती**—स्त्री. प्रतिपक्षास हूल दाखवून मारणें. जरासंधावरोबर भीमानें केलेल्या कुस्तींत श्रीकृष्णानें केलेल्या खुणेप्रमाणें भीमानें त्यास चिरून फेकून दिलें यावरून.

**जरीअह**—पु; योग; कारण; रूप; साधन. -मुधो. [अर.]

**जरीदा**—वि. सडा; एकटा. 'जरीदाहि होत जातो.' -पेद २.४. 'खासा माधोजी जरीदा पंधरासे रावतानिशीं रणथंबोरास पा(सा ?)हयास जातो.' -पेद २.१८. [अर. जरीदा=एकटा]

**जरीबाना**—पु. जमीन मोजण्याची दस्तुरी. 'नाकेदारी जरीबाना व नजराणा.' -बाबारो ३.४९. [जरीब पहा.]

**जरीबी**—वि. तब्बल; पुरे; पक्के मोजून. 'दुसरे दिवशीं जरीबी ७॥ कोस अंतर तोडून निलंग्यापासून एक कोसावर

मुक्काम झाला.' -ऐपो २.६. [अर. जरीब=जमीन मोजण्याची सांखळी, दोरी]

**जरीला**—स्त्री. कपाशीची एक जात; लांब धाग्याची कपाशी.

**जर्रह**—वि. जरा पहा. थोडा अंश. -आफ. [अर]

**जर्रहबजर्रह**—वि. अंश नि अंश. जराबाजरा पहा. -आफ. [अर.]

**जर्रार**—वि. शूर. -मुधो. [अर.]

**जलकुलूप**—न. उंच व सखल असे जलमार्ग एकमेकाशीं जोडण्याचें साधन; ज्यामधील पाणी आपल्या इच्छेप्रमाणें खालच्या किंवा वरच्या पातळींत दुसऱ्या जलाशयापाशीं समपातळींत आणतां येतें अशी रचना; कोंडी. इं. वॉटर लॉक यास प्रतिशब्द. [सं. जल+फा-कुल्फ]

**जलतस्कर**—पु. चांचा; समुद्रावरील लुटारू. -मवाइ २. [सं.]

**जलमेंढा**—पु. खालून वर पाणी नेण्याचें एक यंत्र. इं. हायड्रॉलिक रॅम. [सं. जलमेष]

**जलवाहिका**—स्त्री. गलबत; नौका: नाव; होडी. [सं.]

**जलशास्त्र**—न. पृथ्वीच्या पोटांत पाण्याचे प्रवाह कसे असतात याचें ज्ञान देणारें शास्त्र. [सं.]

**जलसंचयक्षेत्र**—न. तलावामध्यें ज्या प्रदेशांतील पाणी येतें तो प्रदेश. इं. कॅचमेंटएरिया. [सं.]

**जलादत**—स्त्री. मोठेपणा; श्रेष्ठता; सामर्थ्य; चापल्य. -आफ. [अर.]

**जलाबाधित**—वि. पाण्याचा संसर्ग नसलेला. इं. अनडायल्यूटेड. [सं.]

**जलाल**—पु. मान. -आफ. [अर.]

**जलीस**—पु. सहवासी; मित्र. -आफ. [अर. जिल्स= सहचर]

**जल्दू**—पु. बक्षीस. -मुधो. [अर.]

**जल्ल**—वि. मोठा; श्रेष्ठ. -आफ. [अर.]

**जल्ल**—स्त्री. आच्छादन. -आफ. [अर. जल्ल=बैल, हत्ती वगैरेंचें घर; छप्पर, आच्छादन]

**जवका**—स्त्री. शिंग; शृंग; न्हस्वांग, जीवक. -मसाप ४५.४. [सं.]

**जवाळी**—स्त्री. माळ; हार; खारका, बदाम वगैरेचा हार. 'नवरीचे गळयांत जवाळी मुचीची (चांभाराची) केलेली न घालावी.' -पेम ४०२.

**जव्हेर**—न. तरवारीवर चढवलेलें विष; जहर. -प्रश २९. याचे तीन प्रकार आहेत. चंद्रवट अथवा मोमिया, हत्तीपगी व रामपुरी. -प्रश ८०.

**जशारत**—स्त्री. सुगमता. -मुधो. [अर.]

**जसोऊ**—बि. रेषांचें चीट. 'जसोऊ बऱ्हाणपुरी.' -समारो ६.७३.

**जहत**—स्त्री. हेतु; कारण. -आफ. -मुधो. [अर.]

**जहां**—स्त्री. जग. -आफ. [फा.]

**जहांदारी**—स्त्री. पादशाही. -आफ. [फा.]

**जहाज लागणें**—विहीर खोदीत असतां तळाशीं एक प्रकारचा कातळ लागणें; अशा तऱ्हेचा खडक लागल्यास विपुल पाणी लागतें.

**जहालत-जाहालत**—स्त्री. पशुत्व; अज्ञान; मूर्खपणा. 'आतां गुढी बलावली जाहालात न करावी.' -पेद ३८.९५. [अर. जह्ल्=अज्ञान; मौर्ख्य]

**जहुर**—पु. भरती; उधान. 'चिखोल बहूत; जहुराचे पाणी बहुत येते.' -पेद १६.१४५. [अर. जझ्र=ओहटी भरती]

**जळतारक**—वि. पाणबुडे; पाण्यांतून तरून नेणारे; नावाडी वगैरे. 'मणिकार रजक। जळतारक निघाले।' -भावा अयो १२.५८. [सं. चल+तृ]

**जळप**—स्त्री. एक वसूल पद्धति. 'भिल्ल लोकांकडून सावकार सर्व पीक घेतात व त्याची किंमत बाजारभावाच्या निम्मे अगर तृतीयांश लावतात त्यास म्हणतात.' -के ९.६. १९३६.

**जळफळाट**—पु. संताप. [जळणें द्वि.]

**जा**—जागा. -मुधो. [अर.]

**जाखा**—स्त्री. कोंवळया मुळया. 'अळी खणून मुळया उघड्या कराव्या जाखा छाटाव्या.' -ज्ञाको उ २६.

**जागड**—स्त्री. स्वास्थ्य. 'या मुलाला जन्मापासून जागडच नाहीं. नेहमीं निरनिराळे करतो.'

**जागल**—स्त्री. पाहरा; जागरण. 'जागल करून राहूं.' -समारो ६.१६९. [जागणें]

**जागीर**—जाहागीर पहा.

**जांघ**—स्त्री. कमरेपासून जांघाडांत मारलेला तिरकस वार. -मवि ९.११. [सं. जंघा]

**जांघी**—स्त्री. अर्धी विजार. थंडीत प्रत्येक कैद्याला दोन जांधिया दिल्या जात होत्या.' -के १५.३.१९३८. [सं.जंघा]

**जाडी**—स्त्री. वस्त्र. 'एकी अंगी फेडा; आणि जाडी फेडा: जी जी: जाडि विण न गमे:' -लीच ३. पृ. ७८. 'आजि आतां जाडि नको पांगरा: -लीच ३. पृ ७९.

**जाणा**—पु. प्रियकर; सखा. [?]

**जात**—पु. मालक; अर्के. -मुधो. [अर.]

**जातपाततोडक**—वि. जातिभेद मोडण्याचा प्रयत्न करणारा.

**जातिनिष्ठ**—वि. विशिष्ट जातीचा पक्ष घेणारा. [सं.]

**जातीय निर्णय**—पु. 'हिंदुस्थान सरकारनें हिंदुमुसलमान वगैरे संबंधीं जी व्यवस्था १९३५ च्या कायद्यानें नमूद केली ती.' -के ४.९.१९३६.

**जातें**—न. एक मुलींचा खेळ. -मखे ३०६. -व्याज्ञा १. ३५९.

**जातेपरते**—वि. उपऱ्ये; तात्पुरते. 'वतनी चाकर जातेपरते नाहींत.' -पेद २.९२. [जाणे+परतणें]

**जात्यंध**—वि. केवळ स्वतःच्या जातीपुरतें पाहणारा [सं.]

**जाद्दह**—पु. मार्ग. -मुधो. [अर.]

**जान, ज्यान**—लोकरीचा गांवठी गालीचा; बुरणूस.

**जान**—स्त्री. प्राण. -मुधो. [अर.]

**जानगुदाझ**—वि. प्राणघातक. [अर.]

**जानत निशान**—न. राजेपणाचें चिन्ह. 'आंके जानत निशान.' -थोमारो ९.६६. [दियानत निशान]

**जाननिसारी**—स्त्री. प्राण ओवाळणें. [अर.]

**जानपरवर्षी**—स्त्री. लढाईत पडलेल्या मनुष्याच्या मुलाचे संरक्षणास खर्च कांहीं रोख अथवा जमीन वगैरे देत असत त्यास म्हणत. -भारतवर्ष पेशव्यांचें दप्तर १५. [फा. जान=जीव.+परवरीश=संरक्षण; पालन]

**जानफिशानी, ज्यांफिशानी**—स्त्री. निष्ठा; तत्परता; अतिशय उत्साह; प्राणार्पण; आत्मयज्ञ. 'याजवर मीं उत्तर केलें नोकर खाविंदाचे कामावर ज्यांफिशानी करून चाकरी करितों.' -रा ७.१५७. [अर. जानफिशानी=उत्साह; अत्यंत तत्परता; आत्मयज्ञ]

**जानबाझ**—पु. प्राणाशीं खेळणारा [अर.]

**जानसिपार**—पु. प्राणार्पण करणारा. [अर.]

**जानसिपारी**—स्त्री. प्राणार्पण; प्राणाहुति. [अर.]

**जानुशिरासन**—न. एका पायाचा तळवा दुसऱ्या पायाच्या मांडीस लावून दोन्ही हातांचे आंगठ्यांनीं दुसऱ्या पायाचा अंगठा धरून डोकें गुडघ्यावर लावणें. -व्याज्ञा ४. ५००. [सं.]

**जानू फैला**—पु. दोन्ही बाजू. 'करणे ते महाराजांनीं मनसुबियाचा जानूफैला चितात आणून कर्तव्य तें करावें.' -पेद ३३.७९. [?]

**जानोसें**—न. कुळवाचा फांस; कुळवास बसविणेचा मधला दुवा. -चित्रकृषि ९.६.

**जाफरखानी**—वि. केशरी रंगाचें. -थोमारो ९.१५७. [जाफरानी ?]

**जाफरी लुगडें**—न. सुताडा; हलकें लुगडें.

**जांफिशानी**—स्त्री. आत्मयज्ञ. -आफ. [अर.] जान फिशानी पहा.

**जाफ्ता**—पु. रुंदी.

**जाबकरी**—पु. मजकूर सांगणारा; जबाब देणारा. 'मखमालीचा आहे म्हणून जाबकरी यानें जबानी सांगितलें. पत्रीं कांहींच लिहिलें नाहीं.' -रा ३.२७७. [जबाब+करणें]

**जाबत**—स्त्री. सत्ता; अधिकार; मुखत्यारी. 'त्यास किले मजकूरची जाबत फर्मास चालवावयास किलियाचे पायनाम येकमहाल येथें दुतर्फा सता असलियास विचार कलत आहे.' -पेद १७.१७९. [फा.]

**जॉबर**—पु. १ रोखे बाजारांतील शेअर खरेदीविक्री करणारा वर्ग; मंदीवाल्यापासून विकत घेऊन तेजीवाल्यांस विकणारा वर्ग. -व्या उ. २ गिरणींतील एक कामगार. [इं.]

**जाबितह**—जाब्ता पहा.

**जांबुरी**—स्त्री. जंबीर पहा. एक प्रकारचें ईडनिंबु. याच्या रोंपावर डोळे भरून कलमें करतात. [सं. जंबु]

**जांबुवंती कुस्ती**—स्त्री. प्रतिपक्ष्यास हूल देऊन चीत करणें.

**जामदारी**—स्त्री. संरक्षण; जिम्मेदारी; रक्षण. 'जामदारीसहि स्वार घेतले होते. जामदारीचा पैका देऊन मुलुक लुटीत गेले.' -पेद २८.२४३. [जिम्मा+दारी]

**जामेवार**—पु. झग्याचें कापड; झग्यास पुरेसें कापड. 'जामेवार जरी निशाणास.' -समारो ४.३९. [अर. जामावार]

**जारी**—वि. चालू. [फा.]

**जांवई**—पु. (बे.) धाकट्या बहिणीचा नवरा.

**जावजें-डें**—न. (कों.) गुलालपाणी; गुलाल घातलेलें पाणी. -आडिमहा प्र १०.

**जावरा-डावस**—स्त्री. अनिष्ट करणाऱ्या देवता. -आडिमहा प्र ७.

**जावळपान**—न. (व.) जावळांत घालावयाचा पिंपळपानासारखा दागिना. 'घरीं मामाजी पुसती । भाचीला काय तानें। सोडिती जावळपानें।' -वलो ५६. [जावळ+पान]

**जासवट**—पु. (महानु.) पळी; डाव; दर्वी. 'तो पाळन्यावरौनि पडीला तें जासवट रुपला तो डोळा फुटला.' -उच २२४.

**जासा**—स्त्री. (गु.) खुनाची धमकी. -चिज ए १९३५.

**जास्तानी**—वि. व्यवस्थित. -उन ५२.

**जाह**—पु. मान. -आफ. -मुधो. [अर.]

**जाहिर व बाहिर**—वि. व्यक्त. -मुधो. [अर.]

**जाहिराना**—पु. उघडपणा; स्पष्टपणा; व्यक्तता. 'राजश्री रघुजी भोसले सेनासाहेब व मातुश्री दर्याबाईहि युक्तीनें आणून राजश्री साबाजी भोसले नाना त्याची याची भेट परस्परें रहस्यें करून जाहिरान्यात गोड केले.' -पेद ५.२५. [अर. जाहीर]

**जिक**—स्त्री. बोलणें; हकीगत; जिकीर; जिकर पहा. -आफ. [अर.]

**जिगट**—वि. चिकट. 'जिगटलाख.'

**जिगा**—पु. पोगाटयावरील रत्नालंकार. 'हस्ती, जिगा, वस्त्रें, अस्व, सिरपाव जाला.' -पेद १५.५०. 'जवाहीर दर जोडांत कंठी, सरपेंच, जिगा, भुजबंद, दस्तबंद, तुराबलज्या, याप्रमाणें हिऱ्याचा जोड एक व जमरुद पाचेचा जोड एक व तिसरा माणकाचा एकूण तीन जोड जवाहीर दाखविलें.' -रा ७. खलप १.२१. [फा. जीघा, जेघा]

**जिणें**—अक्रि. (महानु.) जगणें; वांचणें. 'ती ठाईं सिंपिला आणि जियाला.' -उच ८. [सं. जीव्]

**जिदाल**—पु. लढाई. -मुधो. [अर.]

**जिनतमकान**—न. गृहभूषण; एक पदवी. 'जिनत-मकान शाहाज्यादा शाहाअलम.' -मदरु २.८६. 'जिनत-मकान समशेर बहादूर.' -मदरु २.८७. [अर. झीनत= भूषण; अलंकार+मकान=घर]

**जिनी**—वि. जिवंत करणारी. 'कीं चंद्रसरोवरिचिया यक्षिणी। कीं अमृताचिया विनीं। कीं मूर्तीसि आलिया जिनी। डोळेयांचिया।' -नरुस्व ७९. [सं. जीव्]

**जिबटा**—वि. चिक्कू.

**जिभ, जांभ**—जीभ पहा.

**जिभट**—वि. बडबडया; जीभ सैल सोडणारा. 'भूपाळें उचितीं वारिला भाटु। तो म्हणे पुरे तेयाचा पाटु। मग राया भेटविला किन्नरु जिभटु। दिव्यरत्नांचा।' -नरुस्व १३७. [सं. जीव्]

**जिभी**—स्त्री. किल्ल्याचा पुढें आलेला भाग; किल्ल्याचा दूरवर पसरलेला भाग. 'तुम्हास बेंगरूळ घेणें तर तोफा च्यार पांच पूर्वेचे दरवाजेस पेटत नेऊन जिभीवर मार च्यार दिवस करावा.' -पेद २८.२४३. [जिभ]

**जिभीची चौकी**—स्त्री. किल्ल्याच्या दरवाजाचे बाहेर असणारी पहिली चौकी. (जिभी पहा).

**जिमी बिघा**—जिम्मेस असलेला बिघा; लागवड झालेली जमीन. 'आणी गढी कोट जिमी बिघा विरचा जागा तनखा वगैरे.' -बाबारो ३.२२.

**जिरगें**—न. जिरगा पहा. एक भाताची जात. -चित्रकृषि २.६

**जिरवण, जिरवंत**—न. (ठा.) मोराच्या आंतड्यां-तील एक पडदा. हा वाळवून अन्न जिरण्याकरितां औषध म्हणून देतात. [जिरणें]

**जिरात**—वि. जिराईत पहा. कोरडवाहू. 'जिरात जमि-नीस बागाईत करून.' -बाबारो ३.५५.

**जिरीयानी**—वि. चालू; वाहणारा (प्रवाह). -आफ. [अर. जिरियान=प्रवाह]

**जिलअह**—पु. जिल्हा पहा.

**जिलही**—स्त्री. भोंवऱ्याच्या खेळांत काढलेलें लहानसें वर्तुळ. -व्याज्ञा १.१५८.

**जिल्ल**—छाया.

**जिवाजूक-ग**—वि. जिवापाड; सामर्थ्याबाहेर. 'त्यानीं जिवाजूक उचललेली कर्जाची धोंड पाहून मीनाच्या भावप्रवण मनाला किती क्लेश झाले' -अपुरा २०. [जीव+अजोग]

**जिवाभ्य**—वि. प्र. जीवाभ्य. जिवापाड; जिवापलीकडे. 'त्यानें पडेल तसें जिवाभ्य श्रमसाहस करून स्वामीकार्य करावें.' -अमात्य आज्ञाप. [जीव]

**जिव्हा**—वाप्र. जिव्हेस टाचा देणें. १ न खाणें. २ इंद्रियदमन करणें. ३ न बोलणें.

**जिव्हाल सुद**—क्रिवि.. तोंडी. 'परंतु तह न करावा येैसें परिछिन्न भाषण अपवादाचे जिव्हाल सुद येथें मातुश्रीनीं सांगोन पाठविलें कीं निमित्य त्यास विश्वास बसून त्याचे आग-मन त्वरेनें पाषाणास व्हावें.' -पेद ६.१९०. [सं. जिव्हा]

**जीणें**—अक्रि. जगणें. 'मागिल सा चक्रवर्तीचे या परि। जीणें देशाचां करभारीं। तैसा नव्हे रावो मुरारी। हा आपु-लेचि दे।' -नरुस्व ७०६. [सं. जीवन]

**जीतसती**—स्त्री. जीवंत साध्वी; जिवंतपणें सती गेलेली; प्रत्यक्ष सती. 'सखवारबाई जीत सती आपली खावंद आई.' -पेद ६.१४७. [सं. जीव्+सती]

**जीनबडक**—वि. चिक्कू; कृपण.

**जील**—वि. पुढें येणारा, खालील; पुढील; निम्नलिखित. -आफ. -मुधो. [अर.]

**जीवनवेतन**—न. केवळ निर्वाहापुरतें वेतन; केवळ जगण्यापुरती मजुरी. [सं.]

**जीवसुत**—पु. (गो.) एक विधि. ब्राह्मणेतरांतील अंत्येष्टिकर्म; और्ध्वदेहिक विधि. [सं. जीवत्सुत]

**जीवाअजोग**—वि. जीवापलीकडील; सामर्थ्याबाहेरचें; शक्तीपलीकडील. 'जीवा अजोग श्रमानें बेशुद्ध होऊन पडले.' -विछ ६०. [जीव+अ+जोगें]

**जीवाभ्य**—वि. जीवापलीकडील; पराकाष्ठेचा; शक्य-तितका. 'जीवाभ्य श्रम करून पाहिले.' -पेद १.२५. [सं. जीव]

**जीवावरची होड**—प्राणावर बेतलेलें संकट; प्राणाची पैज; प्राण पणाला लावणें.

**जुइटें**—न. बेट. -सह्या ४.३५. [सं. द्वीप]

**जुगली**—स्त्री. हूण; वार; मार; आघात. 'तरवारेची जुगली जानोजी पिसाळया लागली. पोटला बाहेर निघाला.' -रा १५.२.

**जुगाड**—न. सर्दी; खोकला वगैरे किरकोळ आजार.

**जुजगल**—वि. जुजबी; किरकोळ. 'जुजगल कोन्ही राहिले.' -पेद १६.३६.

**जुझबी**—वि. जुजबी पहा. -आफ. [अर.]

**जुत**—स्त्री. लागण; जोपासना. 'तुम्ही खाऊन मुलखाची जुत होत नाहीं.' -बाबारो ३.७. [सं. युज्-युति]

**जुत्पती**—पु. वानर. [सं. यूथपति]

**जुनट**—पु. (महानु.) थवा; जमाव. 'आणिकें जुनेट नवनवजणें। आंबनवपीती जाणपणें।' -जांस्व.

**जुपान**—पु. तिबेटी गव्हर्नर.

**जुम्लह**—पु. संघ. -मुधो. [अर.]

**जुरूर**—जरूर पहा.

**जुरूरत**—जरूरी पहा.

**जुलाह**—पु. कोष्टी; विणकर; जुल्हाई पहा. [अर.]

**जुल्म**—पु; जुलूम पहा. -आफ. [अर.]

**जुवाळिया**—पु. (महानु.) जुळवाजुळव करणारा; वार्ती-कार; संघ करणारा. [सं. युग]

**जुवाळून**—अव्य. मेळ करून; संघ करून; समजून.

**जुवें**—न. (गो.) बेट. उदा. कुंभार जुवें. [सं. द्वीप]

**जुहूर**—वि. व्यक्त; जाहीर. -आफ. [अर.]

**जूग**—न. एक प्रकारचें गलबत.

**जूती**—स्त्री. जुडी; जुडगें. 'बाणाच्या सर्वे जूत्या राजा मिर्जा मोहोरे आला.' -एपो २.२९.

**जून**—वि. भक्कमः मजबूत; पक्का. 'बुरजाचा घेर शंभर हात होणें आहे तें काम जून पायावर चढवावें लागतें तें करावयासी लाविलें आहे.' -पेद ३९.१४९.

**जूप**— 'किताबती व पानसरे व जूप व मोग-लाई व रिताब जिन्स.' -थोमारो ७.७०.

**जेक**—पु. खांब. -शिआत्म पृ ९६.

**जेठी**—पु. जेठी; वेताळ; भूतश्रेष्ठ. -मसाप ४५.८.

**जेब**—पु. सौंदर्य; शोभा. 'सारांश शादीची खुषी व राव पंतप्रधान यांचे भेटीचा हेत फार आहे व यांचे येण्यांत रौनक होईल. जेब व जीबत येईल.' -रा ७.१९४. [फा. झेब=भूषण शोभा]

**जेबिन**—क्रिवि. खिशांत. 'सेविकाचे जेबिन आज्ञापत्रें खान अजमाचा लखोटा होता तो काढून आज्ञापत्र वाचून दाखविलें.' -पेद २८.२२. [फा. जेब]

**जेरदरयाफत**—वि. चौकशी व्हावयाचा. 'शिक्षा न झालेल्यास जेरदरयाफत कैदी असें लिहावें.' -के २३.६.१९३९.

**जेल, जैल**—पु. तपशील; नोंदी. 'रयतेकडील राजी-नामा ज्याचे हातचा त्याच्या हातची जेलाची वाटणी असावी ते नाहीं म्हणतात. त्याचे उत्तर जैल म्हणजे तपशील ज्याणें राजीनामा लिहिला त्याचे हातचा महालवार नाहीं हा दोष म्हणतात.' -पेद ३१.१४८. [अर. झील]

**जेवतेव**—क्रिवि. कसेंबसें; कसेंतरी; कांहींतरी करून. 'त्याज अलिकडे चार पांच वर्षें जेवतेव चालविलें. गतवर्षीं कांहीं पावलें नाहीं.' -पेद २३.८२. [जेमतेम पहा]

**जेवर**—न. जवाहीर; ऐवज; किमतीमाल. जवाहीर पहा.

**जेवा**—पु. उपजीविकेचें साधन; उपभुक्ति; पोटापाण्याची तरतूद. 'याखेरीज कुणबाव्याचें सेत जेवा होता त्याचा हिस्सा सरकारांत देत असतो.' -पेद ४१.२६२.

**जेसुईट**—पु. एक ख्रिस्ती पंथ व त्यांतील व्यक्ति. हा पंथ इग्नेशिअस लोयोला यानें स्थापन केला.

**जैदाद**—स्त्री. जायदाद १ पहा. फौजेच्या खर्चाकरितां दिलेला सरंजाम, नेमणूक, जमीन वगैरे. 'महादजीनें या नव्या फौजेच्या खर्चासाठीं डिबाईनाला दुआबांतील कांहीं प्रांत जैदाद अगर सरंजामाकरितां दिला.' -महादजीचरित्र २२४.

**जैपाणणें**—अक्रि. जापाणणें पहा. 'जैपाणी जैपाणी द्वारावतीकारचरित्र कुंड जैपाणिलें।' -लीलाच.

**जैश**—सैन्य. -मुधो. [अर.]

**जोकमार**—पु. एक क्षुद्र देवता; कामण्णा; कर्नाटक प्रांतांत भाद्रपद शु॥ ८ पासून एक पुरुषाकृति मातीचें चित्र बृहच्छिस्न असलेलें व तरवार धारण केलेलें तयार करून टोप-लींत ठेवून गांवांत घरोघर फिरवितात व ज्वारी कपडे वगैरे

भीक मागतात. याचा जन्म तराळाचे घरीं व मृत्यु परटाच्या धुण्याच्या दगडावर होतो व परीट सुतक धरतो. या दिवसांत म्हणजे शु॥ ८ पासून १५ पर्यंत लहान मुलांचे कडदोरे तोडून टाकतात व नंतर बळकव्वा देवीपुढें मुलांस नेऊन तिची ओटी भरून मग कडदोरा बांधतात.

**जोकमारा सारखा मिरविणें**—गांवांमध्यें बेमुर्वत फिरणें; कोणाचीहि भाडभीड न धरतां वाटेल तसें वागणें; भटकणें वगैरे. वर पहा.

**जोगडीण**—स्त्री. बोहारीण; सुया, दाभण, गळेसर वगैरे विकणारी स्त्री. [ सं. योगिनी ]

**जोगवटा**—पु. वस्त्र; कफनी; जोग्याचें वस्त्र. 'उद्यवन जालेयानंतर जोगवटा केला.'; 'आउसें जोगवटा घालुनी बैसली होती तया उपरी म्हणीतलेः ना एकाः यातेंहि एकु जोगवटा होताः परिः तो पाटसुताचाः' –लीच १.१५. [योगी+पट]

**जोगविणें**—सक्रि. बसविणें; व्यवस्था करणें; ठीक करणें. 'भांडी आणून जोगवितो.' –पेद ३ १५. [ सं. युज्= जोडणें; जोगविणें ]

**जोगी**—पु. आपल्याकडील गोंधळ्याप्रमाणें दिल्लीकडे असणारे शाहीरी स्वरूप पेशाचे लोक. –महाविस्ता मार्च ४२.

**जोडमंडी**—स्त्री. वज्रमुष्ठी व्यायाम. बैठक मारून क्रमानें दोन्ही हात व दोन्ही गुडघे जमिनीवर टेकून करावयाचा व्यायाम.' –व्याज्ञा ४.९५.

**जोर्डापाड**—पु. एक मुलांचा स्काऊट खेळ. –व्याज्ञा १.३०८.

**जोडेकरी**—पु. जासुदजोडी; हरकारे. 'पत्रदर्शनी जोडेकरी दोन्ही स्थली रवाना करावे विस्तारे आपणासी ल्यहावे.' –पेद ३.२२. [जोडा+करी]

**जोत**—न. तलवारीचा बंद. –प्रश्न ५३.

**जोतपात**—स्त्री. जमिनीची मशागत; लागवड; नांगर, कुळव वगैरे जोडणें, चालविणें इत्यादि क्रिया. 'जलद आलिया पुढें उन्हारीची जोतपात होईल.' –पेद २९.२५. 'जोतपात करावयाचे दिवस चालिले.' –पेद ३९.२०७. [म. जोतणें द्विरुक्ति ]

**जोंधळी**—स्त्री. भुई आंवळी; एक वनौषधि. इचा काढा मधुमेहांत देतात.

**जोबळा**—पु. नामर्द; नपूंसक.

**जोशी**—पु. जनावरें विकणारी एक जात. –खेस्व १६५.

**जोसावणें**—अक्रि. जोर धरणें; वाढीस लागणें. 'महाराष्ट्रांतील संस्था निघतात व कशाबशा टिकतात, पण त्या जोसावत नाहींत.' –नरसिंह केळकर पृ ५१.

**जोसीक**—न. जोशीपणाची वृत्ति; ज्योतिषाची वृत्ति; 'त्याणे तुम्हास यजितखतं लिहून दिले आहे तरी गावातील जोसीकास त्याजला तालुका नाहीं येविसी गोतानें महजर करून तुम्हास दिल्हा आहे.' –रा २०.१७६. [जोशी]

**जौहर**—पु. रत्न; जवाहीर. –मुधो. [अर.]

**ज्यातप्राय**—वि. जवळ जवळ पूर्ण झालेलें; झाल्यासारखें. 'तो हौद ज्यातप्राय आहे.' –पेद १८.१८२. [सं. जात+ प्राय]

**ज्योहवेज्याह**—क्रिवि. जागोजाग. 'ज्याहबेज्याह बंदोबस्त ठेवावा.' –ना. भो. संबंधाचे कागदपत्र.

**ज्याहेली**—स्त्री. जहाली पहा. उग्रता; रागीटपणा; कडकपणा; तिखटपणा. 'ते मल्हारराव यांचे ज्याहेलीमुळें हे खराबी! मोटा सदमा गुजरला' –रा ७. खलप १.२७.[फा.]

---

## झ

**झकात**—स्त्री. कर. जकात पहा. –मुधो. [ अर. ]

**झगडा**—पु. एक मुलींचा खेळ. –मखे २८३.

**झगडा**—पु. मूल्य; पैसे; किंमत. 'एका भिल्लिणीला मी झगडा भरला आहे म्हणून एक मुसलमान उचलून घेऊन गेला.' –प्रबोध ८.११.१६,

**झटका**—पु. बकरें मारण्याची एक पद्धत; एक झटक्यांत मारण्याची पद्धति. याच्या उलट हलाल] करणें. 'झटक्याच्या मांसाचें दुकान या रस्त्यावर नवेंच निघालें आहे.'

**झटपेट**—न. स्पिरीट; चटकन पेटणारें तेल. [झट+पेटणें]

**झट्टीमिट्टी**—स्त्री. चिकाटी. [ झटणें+मिटणें ]

**झट्टीमिट्टी खेळणें**—मनगटें धरून झोंबाझोंबी करणें.

**झडका**—पु. (व.) १ नोक; झोक; ऐट. 'माह्या दारावरुनी। गेला कोण झडक्याचा' २ झपाटा; धडका. 'सागूचा सासुरवास। मन सारखं विटलं। वाऱ्याच्या झडक्यानं। पान केळीचं फाटलं।' –वलो ५२. [ ध्व.]

**झडाडी**—स्त्री. सोसाटा; धडका; धोधो आवाज. 'वाऱ्याची, वायूची झडाडी. –क्रिवि. सोसाट्याचा; फार जोराचा; झंझावातासारखा. 'वायु झडाडी सुटला व वातचक्राकरितां धुळोरा उठला. अंधी झाली.' –रा १.२३.

**झब्बी**—स्त्री. नरसाळें; गळणी.

**झब्बूशाही**—स्त्री. एखाद्या लब्ध प्रतिष्ठित मनुष्याची अरेरावी, एखाद्या उपटसुंभाचा तोरा.

**झमाना**—पु. जमाना पहा. काल. –आफ. [ अर. ]

**झमीन**—स्त्री. जमीन पहा.

**झर**—स्त्री. जर. -आफ. [ अर. झर=सोनें ]

**झरना**—पु. झरा. उंचावरून पडणारी पाण्याची धार. 'जवळच पाण्याचा झरना' -केदार खंड ३४.

**झरबादी**—पु. ब्रह्मी स्त्री व मुसलमान पुरुष यांची संतती.

**झरवणें**—अक्रि. उगाळणें; मात्रा, गोळ्या वगैरे सहाणेवर घांसून उगाळणें. [ झरणें=झिजणें ]

**झलम**—पु. (व.) पडदा. 'लाल झलमाची गाडी। पाहतां कां दारीं सोडा। माझ्या बांधवाचे कोणी। शेल्यावजा बैल झाडा।' -वलो ९७,

**झळ बडविणें**—उपसर्ग लागणें.

**झांज**—वि. लहर; आवेश; त्वेष; मूर्च्छा. 'तरी झांज स्वभावानी आली तरी सबूरी करून गम खाणें हा मोठा उपाय आहे.' -शामब भारतवर्ष ४.

**झाड फेडणी**—स्त्री. झाडणी; केरसुणी. 'शूद्री झाड-फेडणी झाडफेड करी। आपण जाऊनि बसली सांदोरीं। शौच म्हणवूनी आनंदती नरनारी। शूद्र झाडणी निवांता' -योसं ६.४१.

**झाडली**—स्त्री. अव. झाडल्या. गलबतांत झाड्यास बसण्यासाठीं केलेली लांकडी सिंक्यासारखी चौकट. -आंघइ १७९. [ झाडा ]

**झाडपच्छाड**—स्त्री. बोलाचाली; उत्तरप्रत्युत्तर; तंटा; भांडण. 'आम्ही गेलो. आमची झाडपच्छाड बहुतच झाली. आम्ही जाऊ न देऊ ऐसें देखोन बाबाजी म्हसके यांणीं निकाल काढला. -पेद ३३.२२७.

**झाडा**—पु. कांबळयाचें एक पट्टें. दोन्ही पट्टीं एकत्र जोडून कांबळें होतें.

**झाडियानसी, झाडेनसी, झाडेनिशीं**—क्रिवि. झाडयासुद्धां; मागील बाकीसुद्धां; झाडून सर्व; झाडा करून; पूर्ण फेड करून. 'तो झाडियानसी देणें.' -समारो ८.१२. 'बाकी राहिली असेल ते झाडेनिशीं पाठविणें.' -शारो १.६०.

**झानी**—पु. बाहेरख्याली; व्यभिचारी मनुष्य. -आफ. [ अर. ]

**झांबळें**—न. कांबळें; लोंकरीचें वस्त्र. -चित्रकृषी २६.

**झामर**—न. कागदी लिंबाच्या जातीचें एक अतिशय आंबट फळ; जंबूर; ईडलिंबू. [ सं. जंबूर ]

**झाराझुरा**—पु. (व.) चुरा; चाराचुरा. 'पाणी वरून पडतें। मोत्यांचा झाराझुरा। जाते पाणी देवघरा।' -वलो २२. [ सं. क्षर ]

**झारोखा**—पु. १ खिडकी. २ भिंतींतील मडकें वगैरे पुरलेला कोनाडा. झरोखी पहा.

**झाळकी**—स्त्री. जाळी; झुडूप; राहाटी. 'शिंगें एका झाळकींत अडकल्यामुळें त्या गरीब जीवाचा घात झाला.' -सायं.

**झिंदाबाद**—चिरायु होवो. [ फा. ]

**झिपोटी**—स्त्री. (व.) झिपटी. 'झिंजी माझ्या हातीं सापडली तर झिपोटया धरून हालविल्या असत्या.'

**झियादती**—स्त्री. अधिकता. जाजती पहा. -आफ. [ अर. ]

**झियादह-झियादा**—वि. अधिक. जादा पहा. -आफ. [ अर. ]

**झिराअत**—स्त्री. शेती, जिराइत महा. -आफ. [ अर. ]

**झिलाभाला**—पु. एक प्रकारचा भाला.

**झिलमटोप**—पु. एक बाणाचा प्रकार. -प्रश १९.

**झुअरह**—पु. शुक्राचा तारा. -आफ. [ अर. ]

**झुगुर**—न. (ठाकरी) लहान एकेरी घोंगडी.

**झुटाजंग**—पु. लढाईची रंगीत तालीम; लुटूपुटीची लढाई. [ झूटा+जंग ]

**झुडूपांतील खार**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३४१.

**झुपाट**—न. झुडूप; लहान झाड. 'विखुरलेल्या तिळांच्या झुपाटांवर पिंवळकर फुलें लागून त्याचा मंद वास पसरू लागला.' -किर्लो नोव्हे १९४०.

**झुबा**—पु. डूल; एक कर्ण भूषण. 'माझे कानांत सुंदर झुबे घातले होते.' -शिंआत्म पृ ५८.

**झुबी**—स्त्री. लोलक. 'झुबी लटकती नथणीस.' -समारो ४.७२.

**झुब्दत**—पु. सत्व; नवनीत. -आफ.; -मुधो. [ अर. झबत=घुसळणे ]

**झुम्रह**—पु. जमाव. -मुधो. [ अर. ]

**झुऱ्या**—उद्गा. पु. विटीदांडूच्या खेळांतील संज्ञा. असावधान.

**झुलपिकार**—न. एक कबूतराची जात.

**झुलभुरली**—स्त्री. (मोडी वाचनाची चूक असावी) एक हक्क. '५१ यैन खंडणी मोकास बाब; ३ झुलभुरकी; ३ घासदाणा.' -पेद ३१.१२५.

**झू झू**—पु. लहान मुलांकरितां कापडाचा पाळणा.

**झूटा**—वि. झुटा पहा. उष्टा.

**झूटाबर्तन**—न. १ उष्टें भांडें. २ (ल.) उपभोग घेऊन टाकलेली वस्तु.

**झूद**—वि. चलाख. -आफ. [ अर. ]

**झूल**—पु. विटीदांडूच्या खेळांतील एक संज्ञा; झक्कू. -मखे २१.

**झेंदू**—पु. लाकडाची मोठी टकळी.

**झेंडू फुटणें**—संधिप्रकाश; अरुणोदय होणें. 'मी पहाटें झेंडू फुटण्यापूर्वी येतों.'

**झेपुटी**—स्त्री. झोंपाळयाची दोरी.

**झेराफिन**—न. एक फिरंगी नाणें. -वसमो.

**झोंड**—वि. आडदांड.

**झोंडोली**—जुडी पेटविणें.

**झोंड्याचा कापूस**—पु. अखेरचा कापूस.

**झोती**—स्त्री. 'त्याकडील मुर्चा पांचसे माणसाचा झोतीवर होता.' -पेद ३.५४.

**झोंपाळा**—पु. १ एक मुलांचा खेळ. -मखे २४८.२. २ एक खेळ. एक कडी पायांच्या लवणींत धरून दुसरी कडी हातांत धरून झोके घेणें- -व्याज्ञा ३.४१८.

**झोरा**—पु. एका लोखंडी चौकटीस झोळीप्रमाणें कापड शिवून केलेला मुलांकरितां झोला, पाळणा इ.

**झोला बसणें**—गोता बसणें; नुकसान होणें.

**झ्याक-झ्याकी**—स्त्री. ऐट; तोरा; बडेजाव.

**झ्याकझूक**—स्त्री. टापटीप; व्यवस्थितपणा; ऐटदारपणा.

**झ्या झ्या**—पु. ( लहान मुलांत ) घोडा.

**झ्याक-की**—स्त्री. १ ऐट; बडेजाव; शोभा. २ आरास; सौंदर्ययुक्त मांडणी.

**झ्याकझूक**—स्त्री. व्यवस्थितपणा; टापटीप.

---

## ट

**टँक**—न. चिलखती मोटार. [ इं. ]

**टक्याचें भांडण**—न. एक मुलींचा खेळ. -मखे २३९.

**टणू**—पु. गांठ; ग्रंथि; टेंगूळ.

**टपका**—पु. कुसवाचें घर.

**टपाल**—न. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३४४.

**टप्पोरे**—वि. ठसठसीत; मोठें; गरगरीत ( मोतीं इ. ).

**टमटम**—स्त्री. एक घोडागाडी.

**टमटमवाला**—पु. टांगेवाला.

**टरकणें**—अक्रि. पातळ शौचास होणें.

**टरका**—वि. तिरवा.

**टरबाजी**—स्त्री. टरेंबाजी; मुजोरी; दांडगाई. 'असें टरबाजीचें उत्तरहि देण्यांत आलें.' -के १२.४.१९३८. [ टर=ध्वनि+अर. बाज ]

**टलवटा**—पु. ( उचले ) पागोटें. -मज्ञा ३४.

**टंवचणें**—अक्रि. टोंचणें; भोंक पाडणें. [ जमीन भोपळा वगैरेस ] -चित्रकृषि २.४. [ ध्व. ]

**टवकी**—स्त्री. इकडेतिकडे फिरणें.

**टवकी**—स्त्री. एक वजन.

**टवर**—न. तुकडा; तोडलेला भाग.

**टहरणें**—अक्रि. ठरणें; स्थिर राहणें; ठाम उभे राहणें. [ हिं. ठहरना ]

**टहाळ**—न. हरभऱ्याचें झाड; ओल्या हरभऱ्याचें वगैरे झाड.

**टाकणकार**—पु. जात्याला टाकी लावणारे. 'यांची टाकणकार आडनांवाची एक जात आहे.' -शाब ३.१३.

**टाकणें**—अक्रि. गांठणें; पकडणें. 'भट गोसावी यांतें टाकीत जातिः परि टाकतिना:' -लीच ३ पृ ८४.

**टाकणें**—सक्रि. ( महानु. जुनें ) मिळविणें; प्राप्त करणें; जवळ करणें. 'कां ग्रीष्में दगधु । जेवि टाके गंगेचा ऱ्हदु' -ऋ १०६. 'तया मज तो हा वाङ्महापथु । केवि टाके ।'-ऋ ७. तऱ्ही प्रेमाचा कडलगीं । टाकुनि कैवल्य दुर्ग ।' -उ १६५.

**टाकन**—पु. टाकण पहा. लहान जातीचा घोडा; तट्टू. 'येक टाकन बसावयासी दिल्हा.' -पेद ४०.९८.

**टाकमटिकम**—क्रिवि. कसाबसा; जेमतेम. 'संसार टाकमटिकम चालतो.'

**टांकलावणी**—स्त्री. नोंद; लेख. 'या गोष्टीची लोकांनी कधींच टांकलावणी करून ठेवली आहे' -विद्याभिवृद्धि १७०. [ टांक+लावणें ]

**टाकली सांड करणें**—हेळसांड करणें; दुर्लक्ष करणें. 'रंगोपंत बोलले तर टाकली सांड करण्यावर जाई' -प्रति-आत्म.

**टाकळणें**—क्रि. आग होणें.

**टाकळाण**—स्त्री. जळल्यासारखी आग.

**टांकीथापी**—स्त्री. तबल्याची वादन शैली. 'हवी ती पराण अगदीं टांकीथापीला खणाणत राहूनहि बत्तासा फुटत नसे' -विछ ९६.

**टाकेदार**—पु. खंडकरी; खंड देणारा. 'यामुळें तिच्या हाताखालचे टाकेदार क्वचित प्रसंगींच खंड देण्यास हरकत करीत.' -देवीश्रीअहल्याबाई १२९.

**टाकोळी**—स्त्री. खंडणी. 'टाकोळी १०० रुपये द्यावी लागते.' -ज्ञाको त ८१.

**टांग**—स्त्री. ( कर. ) टांगण्याची तिपाई; कांटा टांगण्याचें साधन. 'नुसता कांटा काय करायचा? टांग पाहिजे.' [ टांगणें ]

**टांग उचलणें**—संभोग करणें.

**टांगदिवा, टांगता दिवा**—पु. लोंबता दिवा; टांगतां येईल असा दिवा; लामण दिवा.

**टांगटोला**—पु. ( क्रिकेट ) चेंडू पायांमधून मागें जाईल असा टोला. इं. लेग हिट. [ टांग=पाय+टोला=मार ]

**टांगर**—बि. दांडगी ( स्त्री ).

**टाच देणें, मारणें**—घोड्यास चालण्याबद्दल इशारा देणें; टांचेला मंब्रेज असतो त्यानें घोड्यास टोंचणें.

**टापर**—न. डोक्यावर पांघरण्याचें फडकें; टापशी. 'आंधारिये घालविति चकोर। खूडां पाडवीति सोगौर। राजहंसा आणवीति टापर। मदवियेचे।' –नवरत्न ५९६.

**टापूची सजा**—जन्मठेप; काळ्या पाण्याची शिक्षा.

**टांबलणें**—अक्रि. संभोग करणें.

**टायखिळा**—पु. तरोटा; दद्रुघ्न; प्रपुन्नाड; एडगज; पुआड. –मसाप ४५.५.

**टाला**—पु. टाळा पहा. झुकांडी; टाळाटाळ. 'याकरितां टाला देऊन दिलीकडे छ २७ सफरी कूच करून गेले.' –पेद १४.९. [ टाळणे ]

**टाली**—सिंधप्रांतांतील एक इमारती लांकूड. –सिंभू.

**टालेटोले**—पु. अने. टोळ्या; जमाव; जुटी. 'रायजी बंडगर यानें राजश्री माणकोजी बंडगर यांची फौज आणीकहि टालेडोले जमा करून बालेघाटी चिरंजीव माहादाजी बाबाकडील ठाणें आहे त्यासी वेढा घातला होता.' –पेद ११.१३. [ टोळी, टाळा, टोळा ]

**टावकें**—न. लग्गा; घबाड; किफायतशीर गिऱ्हाईक; लाग. 'उपाध्ये बुवाना चांगलें जरी नाहीं तरी बऱ्यापैकीं टावकें सांपडलें असें वाटलें.' [ ठाव ]

**टाळीचा घोडा**—पु. एक मुलींचा खेळ. –व्याज्ञा १.३९४.

**टाळी पाडणें**—भोंक पाडणें. 'मराठ्यांनीं सुरुंग लावला कीं त्यांनें उलट सुरुंग लावून सुरुंगाना टाळी पाडावी.' –वसमो.

**टाळू पडणें**—लहान मुलांस होणारा एक रोग, यानें मुलें रोड किरकिरीं होतात.

**टाळू येणें**—जमिनीस खरपुड्या येणें. 'लोक म्हणतात जमिनीला टाळू आली आहे.' –के ३०.३.१९३७.

**टाळेंतून खीस पडणें**—(उपं.) अतिशय जोरानें टाळघोष करणें.

**टाळेटोळे**—वि. बंडखोर; उनाड. 'विरप्पा वगैरे टाळेटोळे जमा होऊन मुलुखांत धूम मांडिली आहे.' –शारो १.२२. टालेटोले पहा.

**टाळें**—न. आढें. छपराच्या मध्यभागाचा वासा.

**टिकाळी**—स्त्री. उंच टोंक; शिखर. 'आम्ही एका टेकडीच्या टिकाळीला येऊन पोंचलों.' –सस प्र ७.८०.

**टिका-का**—स्त्री. टीक पहा. वज्रटिका.

**टिचीव**—वि. साफ केलेल्या दगडांचें. याच्या उलट सडकींव म्हणजे ओबडधोबड व घडीव किंवा माठींव म्हणजे गुळगुळीत. 'टिचीव जोतें.'

**टिपणबाज**—वि. काटेकोर; करारी; वक्तशीर इ. 'इंग्लंडमधील छापखानेवाले इकडच्यापेक्षां मोठे टिपणबाज.' –आत्म ४३४. [ ठिपण+बाज ]

**टिपरघाई**—नगाऱ्यावर गति वाजवतांना किंवा टिपऱ्या खेळतांना ज्याप्रमाणें अखेरीस अतिशय जलदीनें वाजवतात व खेळतात त्याप्रमाणें अतिशय त्वरित होणारी क्रिया. [ टिपरी+घाई ]

**टिबा**—स्त्री.अव. याद्या; टिपा. 'पंचविसा हजाराच्या टिबा दिल्या त्याची हुंडी करून देणें.' –पेद १५.२३. [ टीप ]

**टिंबू**—पु. गोट्यांच्या खेळांत ज्याचा एकहि गुण झाला नाहीं असा खेळाडू. –व्याज्ञा १.५५४.

**टिमटिम**—स्त्री. पिरपिर; कुरकुर. [ ध्व. ]

**टिंवाळ**—न. ( गो. ) सार ( आमसोलांचे ).

**टीप**—स्त्री ( व. ) १ जम; मेळ; मिलाफ. 'अस्तुरीकां पुरुषांची। ख्याली खुशाली दिसेना। टीप दोघांची बसेना। सूत घरांत जमेना।' –वलो४४. २ शिस्त; रेखीवपणा. 'रेशीम काठी जोडा। कसं पाहणं रोखाचं। बाई चालणं टीपीचं। काय सांगू राजसाचं।' –वलो १०९. [ टिपणें ]

**टीर फाटणें**—हैराण होणें. 'बोल बोलतां सोपें वाटे करणी-करतां टीर फाटे.'

**टीला**—पु. उंचवटा. –के ७.२.१९४१.

**टीलिल्लो**—पु. एक मुलांचा खेळ. –व्याज्ञा १.१५३. [ ध्व. ]

**टुकटुकी**—स्त्री. अखेरची धुगधुगी. 'बाकी सर्व संपलें आहे केवळ टुकटुकीत जीव आहे.'

**टुमणीदंड**—पु. तोम; वेणुक; टुमणें; तोदन; प्राजन. –मसाप ४५.६.७.

**टुमा**—पु. टोमणा; टोंचणी. 'त्रिंबकजी भोसले बाबांस टुमा देतात कीं, वचनचल न होऊं या व त्याला बाबांनी जाब दिल्हा कीं ते कागदी लिहिता नये.' –पेद ६०८४. [ टुमणें ]

**टूकलणें**—अक्रि. नष्टाशा झाल्यानें खंगणें. -चित्रकृषि २.४.

**टू जोडून**—कसा तरी संबंध जोडून. -वेटिंगरूम.

**टेगा**—पु. गोंधळ; गडबड; दंगल. ' हें न झालें तर स्वामी मोगलाच्या शहास गुंतले तो चार रोज टेगा माजिवतील धामधूम करितील ' -पेद ६.२०७.

**टेटर**—वि. हट्टी; हेकेखोर. ' तो बापासारखाच टेटर निघाला. '

**टेंबूक**—न. टेंगूळ; उंचवटा. ' तूं म्हणशील कीं माझ्या पाठीवर टेंबूक आहे म्हणून. ' -निळा पक्षी १०.

**टेव**—पु. थर मातीचा. -चित्रकृषि २.४.

**टोंक**—न. तलवारीचें अग्र, टोंक. -प्रश ५३.

**टोकणा**—पु. पाणजांवई; जांवयाचा भाऊ; विवाहसमयीं बरोबर असणारा करवला [ टोकणें ]

**टोकरा**—पु. होडी. एक प्रकारची नाव; बांबूच्या टोपलीसारखें केलेलें नदी उतरण्याचें साधन. टोकरी पहा. ' व्यंकटराव नावा टोकरे जमा करून जलदीनें नदी उतरला. ' —वसमो ' नदीयास टोकरे नाहींत. ' पेद ३.१८.; ' टोकरियांत बसोन ' —शारो १.२१२.

**टोगळ**—वि. ( महानु. ) हट्टी; बंडखोर. ' टोगळ लेकरू; अव्हेरी जननी । तैसे चक्रपाणी: त्यजु नको ॥ ' -अभंग.

**टोंगी**—स्त्री. टेंकडी; बिंडा; टेंब; डोंगर. ' अंजनवेलीकडील खाडी अलीकडे आहे ती धामणीपासून येक भाग होऊन येक फाटा धामणीच्या टोंगी खालून गेली आहे ' -पेद ३३.३९२.

**टोपर**—पु. टोपकर; टोपीवाला; इंग्रज. ' टोपराचा कारभार खुलाशाचा नाहीं. ' -भारतवर्ष पत्रेंयादी ५१.

**टोपर गाणें, ठेवणें**—टेपर ठेवणें पहा. दुसऱ्याबर ठपका ठेवणें.

**टोपी उचल**—पु. स्काऊट खेळांतील टोपी उचलण्याचा खेळ. -व्याज्ञा १.३००.

**टोलेवारी**—स्त्री. टोलवाटोलवी; चालढकल. ' मग निघाल्या देहाबाहिरी । बाईल घेती टोलेवारी । ' -भारा बाल १६.८२.

**टोळकें**—न. टोळी; जमाव. ' त्या जमातीचे व्यापारी टोळकीं करून गेले. ' -के २०.१०.१९३९.

**टूंकवाला**—पु. ( उपहा. ) लिंगायत. यांच्या गळयांत चांदीच्या पेटींत लिंग असतें यावरून. [ टूंक=पेटी ]

**ट्राम्वे**—स्त्री. शहरांतून रुळावरून चालविण्यांत येणाऱ्या गाडया: या पूर्वी घोडयाकडून ओढल्या जात. अलीकडे पेट्रोल किंवा विजेच्या साहाय्यानें ओढल्या जातात.

**ठकसेन**—पु. ठक; खोदा; लबाड. ठकसेन या नांवाचा एक राजपुत्र होऊन गेला त्यानें आपल्या चातुर्यानें अनेकांस फसविलें अशा लोककथा आहेत त्यावरून.

**ठकाई मावशी**—स्त्री. लबाड स्त्री. [ ठकणें ]

**ठकारा**—पु. ( व. ) ठसकारा; तोरा. ' सासऱ्याला जातां । मोठी ठकाऱ्याची तानी । आसु पुसा नेतराची । सोड लुगडयाची चिणी । ' -वलो ११५.

**ठठरी, ठठोरी, ठठोली**—स्त्री. थट्टा; चेष्टा; मस्करी. ' उपाध्याय भाषण करते झाले आमची ठठोली करतां काय ' -माभू ८८.

**ठसणें**—अक्रि: शोभणें. ' बाळ काळसा ठसे. ' -ऐपो २.४३.

**ठाओ**—पु. ठाव; ठिकाण; स्थान. ' ठाओ करिती. ' -डोउली ५.

**ठाकोर**—पु. ठाकूर पहा.

**ठाणपालटाची शेती**—स्त्री. वरचेवर स्थान बदलून करावयाची शेती; थारेपालट करून केलेली शेती. ' वरील दळयासारखी ठाणपालटाची शेती करणाऱ्या अनेक जंगली टोळया आहेत. -ज्ञाको ज १३. [ स्थान+पालटणें ]

**ठाणांतरी**—पु. ठाणेदार; सेनापतीच्या हाताखालचा अधिकारी. ' प्रधानें बोलाविला सेनानी । ब्राह्मण आणावा धरोनी । तेणें ठाणांतरी पाचारोनी । म्हणे ब्राह्मण बांधोनि आणावा ॥ ' -भारा बाल १६.१८७. ' बाहेर निघाला ठाणांतरी । पुढें पायिकांच्या हारी । ' -भारा १६.१८९.

**ठांबेठोक**—वि. धडधाकड; धीट; मजबूत; धीराचा. ' चार माणसें वागविणारें माणूस ठांबेठोक पाहिजे. ' -हिरवळी खाली ४४.

**ठास**—पु. पक्केपणा; कायमपणा. ' यास्तव ठासाची सूत्रें राखून ठेवणें म्हणौन आज्ञा. ' -पेद ६८०. [ ठसणें ]

**ठिकठाक**—क्रिवि. बरोबर; योग्य; व्यवस्थित.

**ठिका**—वि. लटका; खोटा. ' राजाहि बोलतो कीं, त्याणी येऊन समक्ष मजला पाहोन ठिका म्हटलें तरी ते क्षणीं मजला मारा. ' -पेद ४०.१०८.

**ठिकी**—स्त्री. नथेंतील खडा; टीक.

**ठिक्क**—वि. पूर्ण. ' ठिक्क ओवळें. ' -खेस्व ४३.

**ठीक**—वि. नक्की; बरोबर. ' ठीक ९ वाजतां. ' [ हिंदी ]

**ठीकेठीक**—वि.क्रिवि. ठाकठीक; पक्का; ( व्याजोक्तीनें ) नेस्तनाबूद; शिक्षा देऊन वठणीवर आणलेला. ' तरी ऐशा चाकरास ठीकेठीक केले पाहिजेत ! ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो ? ' -मइसा पया ३१. [ ठीक द्वि. ]

**ठुमकी**—स्त्री. पतंगास दिलेला हिसका. -व्याज्ञा १.१६३.

**ठेक**—स्त्री. रास. 'घरीं ओसरीवर तांदुळाची ठेक लावून दिली.' -हनाआ आठ.

**ठेका**—पु. ठराविक काम; ठरवून दिलेलें काम; मक्ता. 'भरपूर ठेका मी करावा असें अधिकारी म्हणूं लागले.' -के ४.६.१९३७.

**ठेंगी**—स्त्री. पोहे, चुना, वगैरे कुटण्याची लाट; डंग.

**ठेंगडी**—स्त्री. आंखूड पायांची एक हात औरस चौरस विणलेली बाजली, इचा उपयोग खेडयांत बसण्याकरितां करतात.

**ठेंगेवाले**—पु. लाठीबाज; पहारेकरी. पूर्व खानदेशांत पिकाच्या रक्षणासाठीं ठेवलेले लोक. -के २.३.१९३४.

**ठेच**—स्त्री. कॅमेऱ्यांतील लेन्स पुढील पाकळयांची उघडझाक करण्याचें साधन. 'शटरच्या पुढें जें भिंग असतें त्याच्या मागें उघडझांक होऊं शकणारा पडदा असतो. पुढच्या अंगास एका बाजूला एक ठेंच असते ही दाबली म्हणजे पडद्याची उघडझांक होते.' -उद्यम जाने १९४२.

**ठेचगा**—पु. मार; ठोक. 'शामलास ठेचगा देऊन खाडी भरवण केला.' -पेद ३.१४८. 'याकरितां त्याला ठेचगा द्यावा म्हणून लिहिले.' -पेद १६.१४. [ठेचणें]

**ठेरी**—स्त्री. (गुरु.) बैठक. -मुस.

**ठोकणें**—अक्रि. कुदळीनें भोकें पाडून बी टाकून पेरणी करणें; (पाभरीनें किंवा दाणे टाकून नव्हे) 'लाकडी कुदळीचा काथवटी व हेटकरी लोक डोंगरी भागांत नाचणी, वरी वगैरे ठोकण्याकरितां उपयोग करतात.' -ज्ञाको क ६२३.

**ठोकर मोळा**—पु. बुटाच्या ठोकरीस मारावयाचा खिळा.

**ठोकळजिन्नस**—मुख्य गोष्टी; पदार्थ. [ठोकळ+जिन्नस]

**ठोकळ माणसें**—प्रमुख गृहस्थ.

**ठोकळ माप**—ल. अंदाजी माप.

**ठोकळेबाजपणा**—पु. ठरींवपणा. 'कला, राजकारण याविषयीं त्यांत ठोकळेबाजपणा आला आहे.' -त्रिकाळ २२.११.१९३८. [ठोकळा]

**ठोके**—पु. हांका करतांना झाडांवर आवाज करण्याकरितां बसविलेले लोक. [ठोकणें]

**ठोणका**—पु. ठोकळा; आवणाची माती झाडण्याकरितां केलेला लाकडी ओंडा.

**ठोंबरें**—न. जोंधळयाच्या कण्या शिजवून केलेलें अन्न. -मध्वमु.

**ठोंबा**—पु. ठोंब; वेल चढविण्याकरितां खांब वगैरे आधार पुरतात तो.' -चित्रकृषि २.४. [सं. स्तंभ]

**ठोम**—पु. वनस्पतीचा कांदा; कंद; एक झाड.

**ठोमरी**—विटकरीचे लहान लहान तुकडे.

**ठोला**—पु. तलवारीच्या मुठीचा (खालचा) हाताजवळील भाग. -प्रश ५६.

**ठौळ**—न. समूह; खिल्लार. 'कीं वांबळैली तमाळाची वाडी। कीं महामोहाची धुपाडी। कीं चरत द्यावापृथ्वीयेचां पाडीं। ठौळ कांतिलोहाचें.' -नरुस्व ४७३.

---

## ड

**डंकी उडी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाजवळ बसून उंच उडी मारून दोन्ही हातांनीं मल्लखांब धरून पाय हातांपलीकडे काढून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.१००.

**डखळ**—न. (महानु.) मातीचें ढेंकूळ; ढेला; खडा. (गुळाचा वगैरे).

**डंकी**—स्त्री. पहाडी मेणा; दांडी; हिमालयांत प्रवासी लोकांस उचलून नेण्याचें साधन. [सं. दंडी]

**डफणा**—पु. भोंवऱ्याच्या खेळांत भोंवरा उलटा मोगरीवर फिरला तर म्हणतात. -व्याज्ञा १.१५९. [?]

**डफळी**—स्त्री. समुद्राची लाट. किर्लो. ऑ. १९३७.४८. [?]

**डबगाई घालणें**—जमीनींत खड्डा खणून त्यांत रताळीं पुरून वर विस्तव पेटवून भाजणें. डबघाई पहा. [?]

**डबघाई**—स्त्री. उकड हुंडी. डबगाई पहा. 'हुरडा, डबघाई कधीं मक्याचीं मळींतलीं कणसें.' -नकुलालंकार ५७.

**डंबर**—वि. धीट. [?]

**डबरल**—पु. पठाण (स्त्रिया व मुलें म्हणतात).

**डंबरी**—स्त्री. मेघडंबरी पहा.

**डबी**—स्त्री. कर; पट्टी; जकात. 'पंढरीस नळावर सरकारची डबी बसविली.' -पेद ४१.२२६.

**डबकारपणा**—पु. स्वतःच्या कृत्याचें समर्थन (क्रि. करणें, दाखविणें). [?]

**डवणा**—पु. डोहणा पहा. उपद्रव; गोंधळ; बंड. 'खांदेशप्रांतें हजार पांचसे राउत रवाना केले आहेत. जागाजागा डवणा करितात.' -पेद १२.८४.

**डवला**—पु. एक सुगंधी द्रव्याचें झाड.

**डवांगी**—क्रि. (महानु.) बाजूनें, आडवांगी. 'मागापुढा डवांगी न ठकत न मरें.' -धस्तो २०. [आडवें+अंग]

**डव्हला**—पु. घोंटाळा; बिघाड. 'म्हणे पातशाही कामाचा डव्हला होईल. -पेद २.२. [डहुळणें, ढवळणें]

**डहाकणें**—अक्रि. (महानु.) ढेंकर देणें; डकारणें. 'डाहाकतांती.' -गस्तो. [ ध्व. ]

**डाई**—पु. लपंडावांतील भोग्या. 'जो डोळे झांकतो त्यास डाई असें म्हणतात.' -व्याज्ञा १.१४०.

**डाउ**—पु. गणेश; गणपति. 'कीं राहोभेणें दिनकरें। समुद्रीं ठेविलीं तेजाचीं भांडारें। कीं गगन-डाउ डवरिला सेंदुरें। प्रकाशाचेनि।' -नरुस्व ७१३.

**डाकपाडी**—वि. डाकील; डाक लावलेला. [ डाक+पाडणें ]

**डाकपान**—न. तांब्याचा रंग दिलेला पातळ पत्रा. हा अतिशय चकचकीत असून जाळीच्या मागें लावतात. भिन्याचा पत्रा. [ डाक+पान ]

**डाखण**—स्त्री. (खा.) एक मुलींचा खेळ; चोरगळी. -मखेपु ५८.

**डांग**—पु. दरख; अधिकार; पद; सत्ता. 'परंतु पाटिलकीचा डांग त्यांजकडे चालत नव्हता.' -रा १६.४. [ ? ]

**डांगरी**—वि. स्त्री. डांगवण; डोंगरी टेकडांचा. 'परगणे डांगरी प्रांत खानदेश.' -थोमा १ ३२०. [ डांग ]

**डांगवी**—स्त्री. (महानु.) दिवसा घोडी व रात्रीं स्त्री असणारा असा प्राणी पुर्‍या( रू )वा राजाजवळ होता. 'डांगवा राजा; डांगवी घोडी.' -डांगवी आख्यान.

**डांगे**—पु. जकात घेणारा अधिकारी. 'सोंदळच्या पराडकर मंडळीकडे डांगी पतकीचें वतन चालत असे.' -मोघ २. [ डांग=डोंगर ]

**डांचणी**—स्त्री. टोंचणी; रुखरुख. 'अशा प्रकारची जी डांचणी, घरून निघतांना त्यांच्या मनास अखंड लागून राहिली होती.' -विछ ८२. [ डांचणें ]

**डाप**—स्त्री. दाब; वर्चस्व; जरब. 'वेठ बिगार दादासाहेबाचे डोपेखालीं चैन पडूं देत नाही.' -पेद १९.७३.

**डाब**—स्त्री. स्त्रियांचा एक दागिना; सोनें अथवा चांदीचा कमरपट्टा. दाब ( ११ ) पहा.

**डांबरट**—वि. डांबर लावलेली (रहाटाची माळ).

**डांबीर**—स्त्री. (महानु.) वरचा पडदा; वरचें आवरण. 'श्रीनखें डांबीर उघडीली. -उच २५५.

**डाराडूर**—क्रिवि. गाढ; दाट (झोपणें; निजणें ). [ ध्व. ]

**डाली**—स्त्री. खंड. (क्रि. पडणें ). 'चालू सालीं पिकाला डाली पडल्या आहेत. रान भरून नाहीं.' [ ? ]

**डाव**—पु. बसण्याची जागा; अड्डा; कट्टा; खेळण्याची वगैरे जागा. 'यास्तव माशाचे डाव जागजागा राजश्री स्वामीनी घातले आहेत. नित्य जाऊन गल टाकून बसावे.' -पेद ८.२६. [ ठाव? ]

**डावाडोल**—वि. विस्कळित; घाबरलेला; भ्यालेला.' डावाडोल झालेल्या मराठ्यांना टिकाव धरतां आला नाहीं.' -वसमो.

**डावा पक्ष**—पु. विरुद्ध पक्ष; प्रतिपक्ष; सुधारणावादी पक्ष; पार्लमेंट वगैरे विधिमंडळामध्यें या पक्षाचे लोक अध्यक्षाच्या डाव्या बाजूस बसतात यावरून. [ डावा+पक्ष. इं. लेफ्टिस्ट ]

**डाळप**—न. (गो.) देवाच्या व देवचाराच्या नांवानें दिलेलें भोजन. [ डाळणें ]

**डिंगमार**—पु. डेन्मार्क मधील लोक; डेन लोक. 'साहुकारांमध्यें व इंग्रज व वलंदेज फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेहि लोक सावकारी करितात.' -बावडा दप्तर १.९७.

**डिंगरा**—पु. (महानु.) दासीपुत्र; पालकपुत्र.

**डिगली**—स्त्री. यारी. -ज्ञाको आ ४३.

**डिझेल तेल**—न. रॉकेलसारखें एक एंजिनांत पेटविण्याचें तेल. 'डीझल नांवाच्या शास्त्रज्ञानें अन्तर्ज्वलन होऊन चालणारें अन्तःस्फोटक इंजिन शोधून काढलें. या इंजिनास डीझेल इंजिन व त्यांत वापरावयाच्या तेलास डीझेल तेल असें म्हणतात.' [ इं. ]

**डिबरा**—पु. लाकडाचा हलका ओंडका; ओंडा; ओंडका.

**डिवरी**—स्त्री. दूच. [ ? ]

**डिमकी**—स्त्री. वज्रमुष्टीचा व्यायाम. 'एका हातानें एक पाय पकडून दुसरा हात जमिनीवर टेकून क्रमानें उलटसुलट गोलांट्या मारणें.' -व्याज्ञा ४.१०३.

**डीप**—पु. साकू; तात्पुरता पूल. 'पावसाळ्यांत मोटारीचे वाहातुकीसाठीं फक्त एक डीप बांधलेला असतो.' -के ८.५. १९३७.

**डीलारू**—पु. एका मनुष्याचें नांव. याच्या नांवानें प्रसिद्ध असलेला कागद. याच्या नांवाचे खेळावयाचे पत्तेहि प्रसिद्ध आहेत. [ फ्रें. ]

**डुगडुगपाणी**—एक मुलांचा खेळ. -मखेपु १४४.

**डुय**—स्त्री. पिढी. [ डोई=शिर, डोकें ]

**डुरा**—पु. डवरा. डुर पहा.

**डूब**—स्त्री. डुबणी; रंगांत वगैरे भिजविणें; रंगांत बुडवून ठेवणें. [ डुबणें ]

**डूब मारणें**—(पट्टा.) हुलकावणी देऊन बगलेखालून निघून जाणें.

**डेक**—न. आगबोटीवरील तक्तपोशीवरील उघडी जागा. [ इं. ]

**डेंगा**—पु. खेकड्याचा पाय. [ तुल. ढेंग=जंघा ]

**डेला**—पु. (गु.) वाडा.

**डोईवरचा पदर टाकणें, डोईवरचा पदर काढणें, डोईवरील पदर काढणें**—लाज सोडणें; निर्लज्ज बनणें; भाडभीड टाकून देणें. 'बाकी डोईवरचा पदरहि टाकावा याप्रमाणें खबरी आईकल्या'; 'सरदारास आम्ही बाहेर घातले नाहीं तो डोईवरचा पदर काढतील.' -पुद १.२८८. 'सरदाराकडील विशेष उत्पात डोईवरील पदर काढून करणार किंवा निष्ठा उत्तम आहे. दंडकास काय करितील इतकाच प्रकार आहे.' -पुद १.२८९.

**डोक**—पु. (खा.) दोन्ही तळहात एकाशीं एक धरले असतां होणारा आकार.

**डोकमा**—पु पारशांचें शांतिमंदिर; प्रेतविधीची जागा; स्मशानभूमि. [अवेस्ता-दख्म; तुल० सं. दह् जाळणें]

**डोखळा**—पु. जलाशय. -वसमो.

**डोंगरकडासी**—स्त्री. डोंगराची कडा, बाजू; डोंगराचा पायथा, उतार वगैरे. 'जिरात पायमाल होउं लागली म्हणून डोंगरकडासीनें सिवगांव परगण्यांत आलें.' -पेद २५.४. [डोंगर+कडा]

**डोंगरपाणी**—न. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.४००.

**डोंगळी पोत**—स्त्री. मोठी काळी पोत. 'मातोश्री आनंदीबाई यांनीं कोंकणी रिवाजाप्रमाणें मुलाच्या गळ्यांत दृष्टमणी बांधणें दोन्ही मनगटांत डोंगळी पोतीचे सर अडकवणें, रोज संध्याकाळीं दृष्ट काढणें वगैरे गोष्टींत कधींच आळस आणि विसराळूपणा केला नाहीं.' -गणपतराव जोशी ४६. [डोंगळा+पोत]

**डोणसाल**—न. विजापूर जिल्ह्यांतील एक भाग. हा भाग डोणी सारखा असून अत्यंत सुपीक आहे. या भागावरून 'पिकेल डोण तर खाईल कोण' ही म्हण रूढ झालेली आहे.

**डोणा, डोण्या**—पु. पोर्तुगीज शिपाई. 'ते महागिरी मुंबईहून वरते साहा डोणे घालून पाणी जोखावयास पाठविली.' -पेद ३८.६१. [पो. डॉन]

**डोंबरा**—पु. आगीचा डोंब; आगीचा लोळ; आगीचा झोत. 'आगीचे ओंडे जळके टाकून त्यावर तेल, दारू, राळ टाकून चार चार रोज डोंबराहि सारखा करी.' -रा ३.२२.

**डोबरूं**—न. (ठाकरी.) म्हसरूड; म्हैस. अनेकवचन डोबरें -म्हसरें.

**डोबोडोबीं**—क्रिवि. (व.) डबक्यामध्यें; पाण्याच्या डबऱ्यांत. 'पाणी वरून पडतें। पद्दा म्हशी डोबोडोबीं। गवळी उभा लोभी।' -वलो २२.

**डोम पंडित**—पुः डोंब जातीचा शीतला देवीचा पुजारी. -शारदा १.४.

**डोमळ**—स्त्री. गाडीची धुरा. [?]

**डोलजवासा**—पु. गलबताचें पुढचें शीड.-आंघइ ३७९.

**डोलना**—पु. डोला; प्रेताची तिरडी; प्रेताची पालखी. 'शिद्दी सुरुरखान साहेब फौत जाले. त्यांचा डोलना बाहेर राजपुरीस आणिला.' -जंजिरेकर शिद्दी हकीगत, भारतवर्ष ३.

**डोलारा**—पु. १ मोठी पोकळ रचना. २ बाह्यात्कारीं मोठी पण आंतून पोकळ रचना. ३ (ल.) अवडंबर; आव. 'त्याच्या साधुत्वाचा डोलारा कोसळला.'

**डोली**—स्त्री. मच्छीमारीवरील एक कर. 'दर गलबतास डोली ४ येकूण देत असो.' -पेद ३४.१९७. [डोलणें]

**डोली-ढोली**—स्त्री. लहान मुलांचा दस्तापिंजर या खेळांतील एक संज्ञा शब्द. पांच ही संख्या. -व्याज्ञा १.१४२.

**डोलीचें जाळें**—न. तोंडाजवळ रुंद व पुढें बारीक होत गेलेलें लांब मासेमारीचें जाळें.

**डोशी**—स्त्री. (गुज.) म्हातारी.

**डोहलोट**—पु. नदीमध्यें उन्हाळ्यांत जें केवळ डोहांत पाणी असतें तें पहिला पाऊस पडल्यामुळें वाहून नवीन पाणी येणें; पहिला वळिवाचा वगैरे पाऊस पडून नदीच्या पात्रांतून पाणी वाहाणें. 'कृष्णातीर प्रांतांत आहेत. पाच मुकाम जाले पुढें आनखी होनार. कृष्णेस डोहलोट जाला.' -पेद ३८.१२८. [डोह+लोटणें]

**डोहाळतुली**—वि. डोहाळे होत असलेली. [डोहाळा]

**डोळा भरणें-करणें**—डोळा बांधणें पहा.

**डोळे चोरणें**—तोंड लपविणें; भेट चुकविणें; नजर टाळणें. 'त्याशीं कसें बोलावें याची आज्ञा आली पाहिजे. डोळे चोरले असतां पत जाते. मोठे अडचणीत.' -रा ५.२१०.

**डोळेदार**—वि. डोळ्यासारखीं चिन्हें असलेला पतंग. -व्याज्ञा १.१६२.

**डोळेफोड**—वि. सहज डोळ्यांत भरणारी; सहज दृष्टि जाईल अशी; स्पष्ट; सहज नजरेस पडणारी; डोळ्यांत खुपणारी. 'त्यास पांढरे मातीनें भिंतीचें बाहेरील अंग सारावें म्हणजे डोळेफोड दिसणार नाहीं.' -पेशव्यांचा जुनावाडा भारतवर्ष ३६.

**डोळ्यास पाणी लावणें**—नेत्राचमन करणें; एखाद्या धार्मिक विधीच्या आरंभीं स्नानाच्याऐवजीं उदक स्पर्श करणें; नेत्रस्पर्श.

**डौल**—पु. योजना; कार्य; कृति; घटना. 'सरकारतर्फेची लावणी आबादीचे डौल केले आहे.' -पेद ९.१०१.; 'होलकरातर्फेचीहि आबादीचा डौल करतो.' -पेद २९.१०१.; 'याप्रमाणें सिबंदी असल्याविना चोराचे पारपत्य होऊन लावणीचे डौल होत नाहीं.' -पेद २९.१०१. [अर. डौल]

# ढ

**ढकेल**—स्त्री. परस्परांस मागें ढकलण्याचा व्यायाम. –व्याज्ञा ४.१७४. [ ढकलणें ]

**ढंग**—पु. चमत्कार; तऱ्हा; अचाट गोष्ट; नवीन प्रकार. 'ऑस्ट्रेलियन मुत्सद्यांनीं एक मोठा ढंग केला जगभर खळबळ माजवून दिली.' –के १८.२.१९४१.

**ढगळ**—स्त्री. डाहाळी; फांदी. 'झाडाच्या लहानशा ढगळीप्रमाणें ती झपाट्यानें खालीं वाहात जाऊं लागली. लोकांनीं एकच हलकल्लोळ केला' –किर्लोस्कर, मार्च १९४३. ४३६.

**ढगार**—वि. ( नंद. ) हजार. 'मुलीच्या लग्नास ढगार भुर्के ( रुपये ) खर्च आला.'

**ढपदार**—वि. ऐटबाज; दिखाऊ; झोंकदार. 'झाडाझुडांची व रानाची ठेवण मोठी ढपदार आहे.' –राणीचें पुस्तक ८०. [ ढब–ढप+दार ]

**ढबाखोर**—वि. घमेंडखोर; गर्विष्ठ; चढेल. 'हीं आधीच कोलापुरे ढबाखोर.' –ऐपो २.१९८. [ ढब=प्रतिष्ठा+खोर ]

**ढरंगळणें**—अकि. पातळ शौचास होणें; ढाल होणें; पोट झडणें. [ ध्व. ]

**ढलाईत**—पु. ढालाईत पहा. 'ढलाईत.' –समारो ४.२३.

**ढवळा कावळा**—पु. कावळ्याच्या आकाराचा पण सफेत व मधुर शब्द करणारा समुद्राच्या लाटांवर झोके खाणारा पक्षी. ( इं. ) सी–गल. –सह्या ४.१९३६.

**ढसराई**—स्त्री. टाळाटाळ; हलगर्जीपणा. 'अशा ढसराईवारी चालू धर्मभोळेपणावर जे पांघरूण घालूं इच्छितात.' –किर्लो. फेब्रु. १९३७.५३७.

**ढापणें**—न. बांध; ढेकळांचा बांध. –चित्रकृषि २.६.

**ढापा**—पु. झाडाची मोठी फांदी. –चित्रकृषि २.६.

**ढापी**—स्त्री. ढाप पहा.

**ढामीण**—स्त्री. धामण.

**ढाल**—न. पराक्रम; अचाट कृत्य; साहस. 'ज्या सरंजामावरी येवढें ढाल केलें त्याचा परिणाम कोणीकडे जाला बरें?'

**ढालढकल**—स्त्री. दिरंगाई; चालढकल; पुढें टाकणें; अळंटळं; एखादी गोष्ट करण्याचें दिरंगाईवर टाकणें; काणाडोळा. 'आमचीं कामें ढालढकलीखालीं पडल्यास कसें पुरवेल.' –रा १४.५९; 'परंतु याउपरी तैसीच ढालढकल करावी यैसा अर्थ नाहीं.' –पेद ३३.२९२. [ ढकलणें द्वि. ]

**ढालणी, ढाळणी**—स्त्री. पलटी; उलट; माघारा वळसा. 'गलबते माहिमाकडे जात होती अकस्मात ढाळणी घेऊन फिरोन जंजिरे मजकूरचे बारियावर होरीबेरी घेत राहिली.' –पेद ३४.८०. [ ढळणें ]

**ढालपट्ट्याची मारपकड**—स्त्री. तरवार व ढाल यांसह मारामारी; ढालतलवार खेळणें.

**ढालीस्वर**—पु. नीच स्वर; खर्जस्वर. 'तंबोऱ्याचा स्वर उंची आहे तबला ढाली आहे.'

**ढाहग**—स्त्री. डाक ( स्त्रीलिंगी ) पहा. गोंधळाच्या किंवा उत्तर क्रियेच्या वेळीं कुंभार वाद्य वाजवितात तें, ढोलकें. 'गोंधळांत कुंभारांनीं ढाहग वाजवावी.' –सर्म ५.२. देवश्रीअहिल्याबाई २.

**ढाळ**—पु. वर्तोळा; नमता तोल; तराजूच्या दोन्ही पारड्यांतील वजन समतोल झाल्यावर जो थोडा अधिक पदार्थ तें पारडें खालीं ढळावें म्हणून घालतात तो. [ ढळणें ]

**ढिकाणा**—पु. फलाणा; अमका; कोणीतरी. 'फलाणा कोण? शंकराचा मुलगा. ढिकाणा कोण? यमाचा पुत्र.' –सुदेह पृ ३७.

**ढिम्मा**—स्त्री. जाणीव; दाद; पर्वा; खातरजमा; वार्ता. 'अजूनपोतर त्यांना कशी ती ढिम्मा नव्हती.' –खेस्व ४९.

**ढिसाळ**—पु. लोंढा. 'कोंकणच्या नद्यांत मधूनमधून पाण्याचे ढिसाळ उर्फ लोंढे काय भयंकर येतात.' –मातीर्थ ४.४.

**ढीलढाल**—स्त्री. ढिलाई; दिरंगाई. 'सरकारांतून ढीलढाल अथवा दिवसगतीचा प्रसंग आडलला.' –पेद २.१५; 'ये विषयीं ढीलढाल व ढालढकल आठचार दिवस करीन म्हटल्यासी.' –हिंद ८४. [ ढिला पहा ]

**ढुशी**—स्त्री. थाप. 'जाणूनबुजून तिनें ही ढुशी दिली होती.' –अस्पृश्य.

**ढेगोमेगो**—( प्र. ) ढगोजी मेघोजी. अतिशूद्रांतील उपाध्याय. 'अतिशूद्राचे जातींत ढेगोमेगो.' –समारो ३.२८०.

**ढेबरी**—स्त्री. चाकी; इं. वॉशर.

**ढेमा**—पु. नाकांतील मळ.

**ढोंग**—वि. लबाड; ठक. 'आणखीहि कितेक ढोंग आहेत त्यांचें पारपत्य करावें लागतें.' –पेद २७.२४१. [ ढोंगी ]

**ढोंगा**—पु. दळा; तुकडा ( जमीनीचा ). 'ढोंग्याची पद्धति; कुरमीची शेती पद्धति; जंगल जाळून विशिष्ट जमीनीवर पीक काढणें, पुन्हां दुसऱ्या वर्षी दुसऱ्या ठिकाणीं याच प्रमाणें नवीन जमीन करणें.' -ज्ञाको ( ज ) १७.

**ढोणा**—वि. उच्च; कुलीन. -पु. पोर्तुगीज शिपाई. डोणा पहा. 'गोरा इंग्रज शिपाई वगैरे दवणेस नवा कपितान पाठविला, त्याजबराबर पांचसे ढोणे आहेत.' -पेद ३०.६१. 'दोन हजार गोरे कातडीचे ढोणे वगैरे लढाईचा सरंजाम आणविला आहे.' -पेद ३५.१८६. [ पोर्तु. डॉन ]

**ढोबर म्हैस**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखेपु ६१.

**ढोंबें**—न. उसाच्या चरकाच्या वरील आडवें जूं.

**ढोंबेल**—न. ( ठाकरी. ) एक जातीचा मासा.

**ढोरकावळा**—पु. डोमकावळा; द्रोणकाक; काकोल. -मसाप ४५.५.

**ढोस**—स्त्री. खोंच; अणी; एक लाठींतलि मार. 'आपली लाठी शत्रूच्या कंठांत, छातींत अगर ओटीपोटांत जोरानें भोसकणें.' -लाखे.

---

## त

**तअद्दी**—स्त्री. जुलूम; अपाय; जबरदस्ती. -आफ. [ अर. तअद्दी ]

**तअय्युनात**—स्त्री. तैनात पहा.

**तअलीक**—स्त्री. नक्कल; प्रत; तालीक पहा. -आफ. [ अर. तअलीक, यादी ]

**तअल्लुक-ह**—पु. संबंध; नातें. तालुक-पहा. -आफ.; -मुधो. [ अर. तअल्लुक ]

**तई**—क्रिवि. रवाना; प्रेषित. 'वजीर आजम व खानदौरा व बंगस वगैरे अमीर तई केले.' -पेद १५.१७. 'रघोजी भोसल्यावरी राजश्री सुलतानजी निंबालकर व चंद्रसेन पांचा हजार फौजेनिसी तई केले.' -पेद १५.८५. [ फा. ]

**तक**—स्त्री. संधि; वेळ; प्रसंग. 'हे तक फार उत्तम आहे ऐसी येणार नाहीं.' -पेद ३६.८१. [ हिंदी ]

**तकटी**—वि.जरीचें;भरजरी ( निशाण. जरीपटका ). 'हत्यारे तो लोकांनीं पाडाव केली तकटी खासा निशाण पाडाव तसेंच नगारा पाडाव जाहला.' -पेद १६.९५.

**तकरार**—स्त्री. चौकशी; पूसतपास. 'आज पाकनिष्पत्ति तयार काय झाली याची तकरार हमेशा करावी.' -ना. भो. संबंधाचे कागद पत्र १२.

**तकवेतूट**—वि. अधीर; बेदील; घाबरी. 'गनीमाची दाटीची खबर ऐकोन रयत तकवेतूट होऊन परागंदा जावयास लागली.' -पेद ३.६२ [ अर. तकवा+तुटणें ]

**तकाजा**—पु. तगादा पहा; नेट. 'तकाजा बहुत आहे. -पेद २५. १८७. तकाझा पहा.

**तकासुल**—पु. कुचराई; हलगर्जी. ( चुकीचें वाचन ? ) -आफ. [ अर. तकाहुल ]

**तकीक**—स्त्री. खात्री; निश्चय; खरेपणा. तहकीक पहा. 'साहेबानी आज्ञा केली होती जी बंगाल्याच वरतमान कैसा झाला तो तकीक करूनी पाठवन.' -ऐपो २.३. तहकीक पहा.

**तकुर**—क्रिवि. ( कुण. ) पावेतों; पर्यंत. 'मुंबई तकूर वाट हाय.'

**तक्दीम**—स्त्री. प्राथम्य; प्रगति. -मुधो. [ अर. ]

**तक्लीफ**—स्त्री. त्रास. तकलीफ पहा.

**तखफीक**—स्त्री. सूट; तसली; तकावी; सवलत. 'मामिलतेंत तखफीक घेऊन नारनोर व आगेर याचा इजारा करून घ्यावा व रामसिंगजीचीहि मामिलत करून देऊन बखतसिंगजीसहि येहसानमंद करावें.' -पेद २.१६. [ अर. तख्फीफ= सूट; कमी करणें ]

**तखल्लुल**—पु. विरोध; प्रतिबंध. -मुधो. [ अर. ]

**तंगड**—स्त्री. लाठीचा पायावर केलेला मार. -लाखे.

**तंगवस्त**—क्रिवि. तयार; घोड्याचा तंग आवळून वगैरे अगदीं सिद्धतेनें, हुशारीनें. 'तुम्ही आपले जागा घोडेपिढे चाकर माणूस यांचा तंगवस्त राखून परम सावध होऊन जाणे.' -पेद ३८.३७. [ फा. ]

**तगी लावणें**—मागें रेटणें; मोडून मागें घालविणें. 'आमचे विल्हेस आलीखान व गावडे वगैरे फौज होती ती मोडून तीन कोसपर्यंत तगी लावले.'; 'दोबाणाची खांचपर्यंत पदमोजीबावास तगी लाविले याजमुळे भास्कर हरी याचे बुनगे वाचले.' -पेद १५.४३. [ तग ]

**तजवीज नामा**—पु. व्यवस्थापत्र; तजविजीचें पत्र. -सनदा २२१. [ फा. तजवीज+नामा ]

**तजेवत**—स्त्री. लबाडी; कपट; फरक; अंतर; कसर. 'येथील कमाविसदारांनीं तजेवत यांस दस्तऐवज पत्ता लावून देऊं ऐसा दिल्हा असतां सांप्रत उमरखेडकर म्हणतात कीं शंकरराव येथें नाहीं. नागपुरास गेला.' -रा ७.८९. [ तजावत पहा. अर. तजावुझ ]

**तज्कीर-ह**—स्त्री. निरोप; हकीगत. -आफ. [ अर. ]

**तट**—पु. खोळंबा; अडचण; थांबणूक. 'आम्हास मापारी येथें नेहमीच द्यावा. माप घेऊन जाईल तर आमचा तट होईल.' -रा ३.९०. [तटणें]

**तटाई**—स्त्री. स्थगितता; अडचण; खोळंबा; थांबवणूक. 'आज दोन साले तटाई; दरसाल युद्धप्रसंग परंतु सरकार काम जाणोन निकड करोन समयास आले असेत.' -पेद २०. १२१. [तटणें]

**तटाईत**—वि. अडखोर; आडमुठा. 'महाराज बोलले सर्व भार इकडील तुम्हावर आहे इकडील पदरचे मंडळ बहुत तटाईत कळेल तसा सांभाळ करावा.' -मदरु २.६७. [तटणें]

**तडक तराफा**—पु. जलद जाणारें गलबत. 'तडक तराफ्यांतून बातमी आली कीं संभाजीचे आरमार घेरियांत नाहीं.'

**तडकी**—स्त्री. तिरडी. **तडकी आवळणें**-(शिवी.) मरणें. 'मेल्याची तडकी आवळली.'

**तडजी**—स्त्री. (कु.) १ तसदी; तगादा. 'सावकारान व्याजापायीं लई तडजी लावलीया.' २ ओढाताण. 'तडजी करून पैका देतुया.'

**तडस**—पु. द्रोण; पात्र; कलश; पखाल. 'अवकाळ जलदांचिया धारा। बहुत करूनि वरषेति गारा। तया गारांचे पाणी धरिति चतुरा। तडसी कमळ दळांचा॥' -नरुस्व ५६८.

**तडिद्युद्ध**—पु. चपलयुद्ध; विजेसारखें अत्यंत वेगानें व चपलतेनें चालविलेलें युद्ध. जर्मन ब्लिट्झ क्रीग यास प्रतिशब्द. -सह्याद्रि मार्च १९४२.

**तंडेल**—पु. मजूर ठरवून देणारा मनुष्य. -हिमालयवर्णन.

**तढणें**—अक्रि. उतटणें; तडा जाणें; उलणें. 'मुरारिचें दर्शन देखौनि साजिरें। हिंपुटी जालां पद्म रागाचीं भांडारें। तैसीं दाडींबे तढेलीं निडरें। बनें दाडिंबीचीं॥' -नरुस्व ७९८.

**तणसडी**—स्त्री. तनसडी पहा; तृणाची काडी. -चित्रकृषि २.४.

**ततोप्यधिक**—वि. त्याहून अधिक; त्यापेक्षां वरचढ. 'आपण संपादिली किर्ती ततोप्यधिक कीर्तीचा विस्तार व्हावा हेंच मनोभिष्ट इच्छित असे.' -पेद ३.२४.; 'किंबहुना ततोप्यधिक परस्पर सौरस्य चालोन.' -पेद ३.९१. [सं. ततः+अपि+अधिक]

**तत्ता**—क्रिवि. ताबडतोब; क्षणांत. 'मी तत्ता जाऊन येतो.'

**तत्रस्थित**—वि. तेथें असलेले. 'ये प्रांतीचे गृहस्थ वतनदार तत्रस्थित व अत्रस्थित प्रसंगास अनुपयोगीच.' -पेद ३९.११५. [सं.]

**तथा**—अ. ऊर्फ; किंवा; अथवा. 'रामभाऊ तथा भाऊसाहेब.' (चुकीचा प्रयोग, मूळचा अर्थ 'आणि' असा आहे)

**तथाकथित**—वि. १ मानीव; म्हटलेलें; म्हणून प्रसिद्ध. याप्रमाणें सांगितलेलें; बोललेलें. 'तथाकथित अस्पृश्य वर्गांना कांहीं विवक्षित कालखंडापर्यंत.' -के २१.१२.१९३९. 'त्यांच्या तथाकथित घोषणेमध्यें जे आरोप केले आहेत.' -के १७.१.१९४१. [सं. तथा+कथित]

**तथागत**—वि. पूज्य; श्रेष्ठ. बुद्धास योजिलेलें विशेषण. 'अधिकांत अधिक त्याग केला असेल तर तो तथागत भगवान् बुद्धदेव.' -सैन्य ख ७१.

**तद्दन**—वि. पूर्णपणें; एकदम; अगदीं; साफ. 'तद्दन नवी वार्ता.' -जकुआ ६. [हिंदी]

**तन**—न. तण पहा. शेतांतील निरुपयोगी गवत. [सं. तृण]

**तनाखा**—पु. चंदनासारखें एक लांकूड. हें उगाळून ब्रह्मी स्त्रिया चेहऱ्यास लावतात.

**तन्खाह**—पु. तनखा पहा. पगार; नेमणूक. -आफ. [अर. तन्ख्वाह]

**तन्नकतारा**—पु. सोनेरी ताऱ्यासारखी टिकली. 'हातांत पाहावी तर एकेकच बांगडी पण ती सुद्धां तन्नकताऱ्यांची.' -खेस्व ११२.

**तन्बीह**—स्त्री. तंबी; शिक्षा. -आफ.; -मुधो. [अर.]

**तन्मणि**—तनमणि पहा. 'त्याच्या घरीं एक दिवस तन्मणि हरवला होता.' -बाभ.

**तफकी**—वि. हैराण; दीन; बेजार. 'ठाणियाचे लोक तफकी जाहाले होते त्याणी माघती ठाणे बांधावयासी लागले आहेत.' -पेद १५.२५. [फा.]

**तफक्कुद, तफक्कुदात**—पु. स्त्री. दया; कनवाळूपणा; सहानुभूति. -आफ. [अर. तफक्कुद]

**तफसील**—स्त्री. स्पष्टीकरण; विवरण. -आफ. [अर.]

**तफ्वीज**—स्त्री. देणें; सोडून देणें. -मुधो. [अर.]

**तबकडी**—स्त्री. घड्याळयाच्या तोंडावरील आंकडे घातलेला पत्रा. [फा. तबक]

**तबकफाड अढी**—स्त्री. (मल्लखांब.) मल्लखांबाच्या एका बाजूस दोन्ही तळहात जुळवून मल्लखांब पकडींत धरून एक पाय खालीं व एक पाय वर टाकून त्यांच्या लवणींत मल्लखांब धरून मारावयाची अढी.' -व्याज्ञा ३.८७.

**तबरी**—स्त्री. तबारा पहा. -आनंद, सप्टें १९३९.

**तबलीक**—स्त्री. मुसलमान करून घेणें; बाटविणें.

**तबाखी जहाज**—न. चिलखती जहाज; पोलादी पत्रे बाहेरून बसविलेलें जहाज. –के २३.१२.१९४१. [अर. तबक-पत्रा]

**तबार**—पु. दर्जा. –आफ. [अर. तबार=लोक, राष्ट्र, जात]

**तंबीट**—न. राळयाचे तांदूळ व गूळ असे उखळांत कुटून त्यांत खोबरें, वेलदोडे वगैरे घालून लाडू करतात हे नागास नैवेद्य दाखविण्याकरितां लागतात. [का. तंबे+इट्टु=पीठ]

**तब्बल**—पु. ताशाबरोबर वाजविण्याचा ढोल.

**तब्रूक**—पु. तबरूक पहा. प्रसाद; शेरणी. 'अबदलअली वगैरे मुख्य सरदार यांस तब्रूक, उदी वस्त्रें, मिठाई व अंगारा प्रासादिक पाठविला' –रा. ३.१७२. [अर. तबर्रुख]

**तम**—क्रिवि. तर मग याचा संक्षेप. 'तम विचार आहे का कांहीं.' –सोय ३७.

**तमतम**—स्त्री. (व.) कुरकुर; पिरपिर. 'सासुचा सासुरवास। करते तमतम। घालूं तोंडाला कुलूप। करूं बाई किती सम।' –वलो ९३. [ध्व.]

**तमतमपूजा**—स्त्री. आपल्या पुरती तजवीज, व्यवस्था.

**तमांचा**—पु. १ (कुस्ती.) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या डाव्या कानशिलावर दिलेला मार. २ (कुस्ती.) एक डाव. प्रतिपक्ष्याचे दोन्ही पट काढून आपल्या छातीपर्यंत वर खेंचून त्याच्या पाठीवर आपला पाय आडवा टाकून कलाटणी देणें. ३ लाठींतील एक मार. 'शत्रूच्या कानशिलावर दिलेला मार.' –लाखे. ४ गदगाफरींतील एक वार. शत्रूच्या कानशिलावर केलेला वार. –व्याज्ञा ४.३८४. –मवि ९.११.

**तमानियत**—स्त्री. खात्री; खुलासा. 'अगर टिपु सुलतान याजकडोन या दों सरकारांसीं बदआहदी अमलांत येणार नाहीं अशी राव पंतप्रधान यांची पक्की खातरजमा असल्यास खुलाशानें आमचीहि तमानियात व्हावी.' –रा ७.११. [अर. तमन्ना=विनंति]

**तमाषबिनी**—स्त्री. देखावा; प्रदर्शन; केवळ वरवर दाखविणें. 'नबाबाची व सरकारची दोस्ती दिली, नबाबाचा वृद्धापकाळ, या दिवसांत तमाषबिनी स्वामीकडून झालियास दौलतीस नबाबाचे धक्का बसेल' –रा ५.५०. 'तमाषबिनी करणार बहूत आहत, परिणामावर दृष्टि देऊन जें नेक तें करावें' –रा ५.७५. [फा. तमाषा+बिनी]

**तमासबीन**—पु. तमासगीर. 'मनुष्यें बीडचे वगैरे तमासबीन हजार दोन हजार मिळाले होते.' –पेद ५.८५. [फा. तमाशा]

**तमीर**—तांबर.

**तम्कीन**—स्त्री. ऐश्वर्य; सत्ता. –आफ. [अर.]

**तरकटणें**—अक्रि. तिरसटपणानें बोलणें; आवेशानें जळणें;पेटणें. 'जसा दहन तरकटुनि रानीं।' –मोद्रोण १२.११५.

**तरंग**—काष्ठतरंग, घंटातरंग, घुंगरुतरंग, जलतरंग, नसतरंग, बासतरंग, बुलबुलतरंग, लोहतरंग, स्तंभतरंग, इ. वाद्यें. निरनिराळया पदार्थांवर अगर वस्तूंवर आघात वगैरे करून स्वरसप्तक बसवून निरनिराळे राग वाजविणें.

**तरंगणें**—अक्रि. दमणें; थकणें; भागणें. 'आमचीं घोडीं तरंगलीं आहेत. घोडी अजूदी जाहलीं म्हणजे आठा चहूं दिसी...स्वामीचे भेटीस येऊन.' –पेद ३०.२१६.

**तरणी**—स्त्री. नाव; होडी; गलबत. [सं.]

**तरतुद्या**—वि. तरतूद करणारा; तजवीज, बंदोबस्त करणारा. 'परंतु मातबर माणूस तरतुद्या कोण पाठवावा ऐसे राजश्री बोलिले.' –पेद ३.१२३. [अर. तरद्दूद]

**तरदाम**—पु. एक प्रकारचें कापड. 'किनखाप सहा व शालजोडया सहा व तरदाम बंगाली. थान सहा व फुलचरी बदामी थान सहा.' –रा १२.४२.

**तरब**—स्त्री. आनंद. –आफ. [अर.]

**तरबियेत**—वि. तरबेज; वाकबगार; पुरे. 'त्यास ते राजश्री यादोरावजीचे संगतीस तरबियेत जालेत, त्यास आगडबागड पाहिजे.' –पेद १५.३५. [फा. तर्बियत्]

**तरबी**—वि. मातीचीं. 'तरबी किंवा जर्मन सिल्व्हरचीं भांडीं मातीनें घासूं नयेत.' [अर. तुराबी=मातीचें]

**तरमीम**—स्त्री. उपसूचना. 'श्री. कमलादेवी यांनीं तरमीम आणली व अच्युतराव यांनीं दुजोरा दिला.' –के १७.३. १९३९. [अर.]

**तरवार**—तरवारींचे प्रकार. लहान–१ क्रियाखड्ग. २ मरकखड्ग. ३ मारखड्ग. ४ मार्गस्थखड्ग. ५ चित्रतालितखड्ग. मध्यम–१ सुखसंचारखड्ग. २ सुखसंनाह्यखड्ग. ३ मध्यम. ४ मध्योत्तम. उत्तम–१ दुर्धर्ष. २ विजय. ३ सुनन्दु. ४ नन्दन. ५ श्रेष्ठ. –युक्तिकल्पतरु. प्रश्न–७४. इतर प्रकार–अग्रपृथु, मूलपृथु, संक्षिप्तमध्य, समकाय, पीडित, पत्र, एकधारा, द्विधारा. तरवारीचे हात अथवा पवित्रे, असिचालन–१ भ्रांत. २ उरुदांत. ३ आविद्ध. ४ आप्लुत. ५ सुत. ६ संपात. ७ विप्लुत. ८ समुदीर्ण. ९ श्येनपात. १० आकुल. ११ अध्युत. १२ सव्य. १३ अवधुत. १४ वाम. १५ अलखित. १६ विस्फोट. १७ कराल. १८ इंद्र. १९ महासख. २० विक्राळ. २१ निपान. २२ विमिष्क. २३ भयानक. २४ समग्रकमल. २५ अर्धकमल. २६ तृतीय कमल. २७ पादकमल. २८ पादार्धकमल. २९ प्रत्यालीढ. ३० आलीढ. ३१ वराह. ३२ ललित.

**तरसा**—पु. चिडखोरपणा; राग; त्रास; तिरस्कार; तिरसटपणा. 'परंतु जाधवराव तरसे भरून पत्रें न मानितां जाब देऊं लागले.' -शामब. भारतवर्ष ५०. [फा. तर्ष=दुःस्वभाव; वक्रता; कडक; तीव्र]

**तरळ**—पु. कच्च्या कैदेंतील लोक ठेवण्याचा तुरुंगाचा भाग. -डॉग २.३६.

**तराझिन्दह**—पु. आरास करणारा. -आफ.; -मुधो. [अर]

**तराटणी**—स्त्री. दमबाजी; धमकावणी. 'तिची शेवटची तराटणी हवेंत हळूहळू विरत चालली.' -उपेअंत ६२.

**तराटणी**—स्त्री. ताठण्याची क्रिया; तरारण्याची स्थिति; ताण. 'फेफरें आलें म्हणजे मुठी वळाव्यात डोळ्याला तराटणी धावी.' -प्रति. आत्म. ९२.

**तरांडकें**—न. तरांड पहा.

**तराणी**—स्त्री. तरणी पहा.

**तराणें**—न. (महानु.) तर; नाव; होडी; ताफा. 'सुलभ बळाचेनि तरानें। समुद्र लंघु पाहे उडानें।' -जांस्व २७६.

**तराळू**—न. गलबताचा एक प्रकार. [तरणें]

**तराग्रणें**—न. हलवाई वगैरेंचें बांबूचें डमरूच्या आकाराचें साधन. घडवंचीसारखें, मालाचें ताट ठेवण्याचें उपयोगी.

**तर्ककर्कश**—वि. अगदीं तर्काला धरून; काटेकोर. 'तर्ककर्कश लेखनापेक्षां त्याचें अंतःकरण किती भिन्न...' -के १.४.१९३८. [सं.]

**तर्कदुष्ट**—वि. तर्कास न पटणारें. 'तींच मुळांत काल्पनिक आणि तर्कदुष्ट आहेत.' -के २.९.१९३८. [सं.]

**तर्जन्यावर्त**—न. एक तलवारीचा पवित्रा. -प्रश १६. [सं.]

**तर्पण**—न. लाह्यांचें पीठ.

**तर्फेन, तर्फैन**—पु. दोन्ही बाजू;उभयपक्ष. 'कोणतेही प्रकारें तर्फेनच जाब सालचा उलगडा व्हावा.' -रा ७.२२७. 'यास्तव तर्फैन मुलाकातीचा इत्यफाक ठरण्यांत यावा.' -रा ५.१६०. 'याचाही निश्चय तर्फैनचे सलाहाप्रमाणें ठरेल.' -रा ५.१६. [अर. तर्फ, तरफ याचें द्विवचन]

**तर्बत्तर**—वि. विसंगत; भलतेंच. **तर्बत्तर बोलणें**-बडबडणें; विसंगत बोलणें.

**तलपत**—स्त्री. माफी किंवा नाममात्र साऱ्याची जमीन सोडून जीवर सरकार सारा पूर्ण किंवा अंशतः बसविलेला असेल अशी जमीन. 'सरकार तलपतचा कापूस सरकारांत दरोबस्त कापूस पाहिजे असें लोकांचें म्हणणें.' -पेद ३९.१४८. [गुज. तलपत पूर्ण किंवा अर्धे किंवा कांहीं प्रमाणांत उत्पन्न सरकारांत देणारी जमीन. याच्या उलट खाजगी किंवा माफी जमीन]

**तलऱ्याचें खत**—न. (व.) मागणीपत्र.

**तलाव**—पु. देवप्रतिष्ठेजवळ एक रांगोळीनें काढलेला चौक. या चौकांत वर आपलें बाशिंग काढून ठेवतो व विवाहानंतर तीन दिवस वधूवर त्या चौकांत निजतात.

**तलावडी**—स्त्री. लहान तलाव; तळी. 'मोठी खाइ दिवसेंदिवस गुदरल्यावरी पडून अल्पस्वल्प तलावडीच झाली. तींत उदक बहुत दिवस असावें.' -शिदि ७४.

**तल्कीन**—स्त्री. धार्मिक दीक्षा. -मुधो. [अर.]

**तल्लक**—पु. तलाख पहा. -के ६.१२.१९३८.

**तल्सीम**—स्त्री. चुंबन. -मुधो. [अर.]

**तवंग**—पु. पूल

**तवताला**—पु. तपासणी, रुजुवात; परीक्षण. 'त्याचा वसूल सालोसाल काय आला तो हिसेब आज तागाईत निवडून तवताला करून पाठवावा.' -पेद २४.१४९. [ताळा, ताल द्वि.]

**तवर**—पु. (गो.) झाडाचा मोहोर; अंकुर; कोंब.

**तवली**—स्त्री. (गो.) तवा; कढई.

**तव्हारी**—स्त्री. मूर्छा. 'थोडयाशा मारानें निष्प्राण लोक तव्हारी येऊन पडत व मरत.' -पाणकळा.

**तसदीक**—पु. तसदूक पहा. कुर्बान, ओंवाळून टाकलेले; भिक्षा दिलेला. 'तमाम लोकांनीं सतके नगदी रुपये व खुर्दा व उडीद तेल व तीळ वगैरे जिन्नस तसदीक केले.' -रा ७.१२०. [अर. तसद्दुक]

**तसदीख**—स्त्री. चौकशी बद्दलचा शेरा; खात्रीची सही. 'इराण मध्यें तेथील अधिकाऱ्याकडून तसदीक घेणें जरूर असते.' -के ३०.७.१९३५. [अर. तसदीक=रुजुवात; साक्ष; खरे करणें]

**तसदूक**—वि. हजीर; स्वाधीन; पुढें प्राप्त. 'हजरत उभे राहतील ते समयीं आपल्या जानमालासी तसदूक होईन.' -पेद २.४. 'नजरा व लोकांचे तसदुक सतके जाले.' -रा ७.१२३. [अर. तसद्दूक]

**तसर-री**—स्त्री. ओळ; रांग; ओळी; गल्ली. 'साऱ्या तसरीला असे उमदें वासरूं नाहीं.' -निवाडे.

**तसर्रुफ**—पु. खर्च; उपयोग; विनियोग; ताबा; अंमल; कबजा; तसरूफ पहा. -आफ. [अर.]

**तसली**—स्त्री.: खातरजमा; आश्वासन; 'जर बोलावणे सलाह असेल तर कृपापत्रे सन्माने तसलीची याकूबआली खानाचे नावची पाठवावी.' -पेद २.१०३. [अर. तसल्ली]

**तस्तकी**—स्त्री. भांडें. 'दोन सुरेखशा तस्तक्या असे नग होते.' -कुस १३८.

**तहखाना**—पु. तळघर. [अर.]

**तहगिरी**—स्त्री. तगीरी पहा. बडतर्फी; नोकरीवरून दूर करणें; कामावरून दूर केलें जाणें. 'आपणास तहगिरीचीं पत्रें आलीं तीं बजिनस आपणाकडे पाठवलीच होती.' -पेद ३९.६५. 'मामलतीची तहगिरी झाल्यावर सहासात महिन्यांनीं सात आठ लाख रुपये तफावत लागू करून दणार.' -पेद ३९.१४४. [अर. तग्यीर]

**तहताज**—स्त्री. जरूरी; गरज. -आफ. [अर.]

**तहरह**—पु. तह वगैरे. 'कदाचित तहरहामुळें मुबला कार्यास येईल म्हणून ठेवावे.' -वसमो.

**तहव्वुर**—पु. १ बहादुरी; शौर्य. २ घाई. ३ राग. -आफ. -मुधो. [अर.]

**तहशील**—स्त्री. पट्टी; वसूली; वर्गणी; कर. 'अंतर्वेदींत मेरटेकडे जाऊन दर रुपयास दोन आणे येणेंप्रमाणें तमाम अन्तर्वेदींत तहशील केली.' -रा १२.४०. [अर.]

**तहसीन**—स्त्री. स्तुति; प्रशंसा. -मुधो. [अर.]

**तहीय्यह**—स्त्री. तयारी, व्यवस्था. -मुधो. [अर.]

**तह्रीरन**—पु. लेखन. -आफ. [अर.]

**तळप्रहार**—पु. चापट; लाथ. 'देवीनें एक जोरानें तळप्रहार मारून त्यास जमिनीवर पाडलें.' -व्याज्ञा १.६०. [सं.]

**तळबूड**—न. आगापिच्छा; इत्थंभूत माहिती. 'त्याचें तळबूड आम्हास माहीत नाहीं.' [तल+बूड]

**तळसरी**—स्त्री. विहीर बांधतांना तिच्या तळाशीं जो पहिला थर देतात तो. 'बाभळीच्या लाकडाचा उपयोग विहीरीच्या तळसरीकडे करतात.' -उद्यम जाने १९३६.

**तळसूती**—स्त्री. (महानु.) काष्टा. 'तळसूती घालौनी नाव आवळी.' [सं. तल+सूत्र]

**तळिंब**—न. तळंब पहा. वधूवरांस बसविण्याकरितां केलेली गादी. 'रण कोहळें सोहळिया कारणें। होईल बाणाचें उटणें। अशुद्धें अंबा शिंपणें। तळिंब झाडणें शस्त्रास्त्रें।' -भारा अरण्य ८.१७३.

**तळें**—न. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३४५.

**ता**—क्रिवि. पर्यंत; म्हणजे. -आफ. [अर.]

**ताइद**—स्त्री. मदत; साह्य. -आफ. [अर.]

**ताई भरणें**—अक्रि. तावणें; तापणें; संतापणें; रागावणें; ताव चढणें. 'राजश्री बहुतसे ताई भरून मोठया कुर्ऱ्यानें बोलले. -पेद ४०.६५. [सं. ताप-ताव]

**ताकपीठ**—न. ताक व पीठ कालवून केलेलें खाद्य.

**ताकभातखाऊ**—पु. (उपहासार्थी.) कोंकणस्थ ब्राह्मण. कोंकणस्थ ब्राह्मण विशेषतः ताकभात खाऊन राहतात यावरून.

**ताखीर**—स्त्री. उशीर. -आफ.; मुधो. [अर.]

**ताख्त** —स्त्री. हल्ला; धाड; चाल. -वि. उजाड; उध्वस्त; ओसाड. 'येणें करून तालुक्यांची तमाम ताख्त व ताराजी होऊन कोठील पैसा या दिवसांत मवसर नाहीं.' -रा ५.१६०. [फा. ताख्त=हल्ला; चाल]

**ताख्तताराज**—वि. उध्वस्त; उजाड; ओसाड; खराब. 'इंग्रजी फौजेची गोळी वाजली म्हणजे करनाटकांत फौज पाठवून मुलूख ताख्तताराज करावा.' -ऐटि ३. [फा.]

**तागडथोम**—दि. पौराणिक; ज्यांत मृदंग वाजवून त्या तालावर पात्रें नाचत असें (नाटक). -मरं ३०. [ध्व.]

**तागा**—पु.विल्हा; व्यवस्थित मांडणी. **तागयास ठेवणें-लावणें**-योग्य ठिकाणीं ठेवणें; व्यवस्थित मांडणी करणें.

**तागुर**—पु. अंकुर; ताणा. 'काळ्या भोपळयाचे तागुर.'

**तागेर**—वि. बडतर्फ; कामाकरून दूर. 'तुम्हासी तागेर करून दुसरे गुमा करतील त्या गुमासी जाबे मारूं.' -एसंसा १.१४. [अर. तगीर पहा]

**ताजवा**—पु. (मल्लखांब.) बगली करून बोंडावर जाऊन बेंबी बोंडावर ठेऊन समतोल राहणें. **०फरारा**-पु. (मल्लखांब.) ताजवा करून धरलेला तोल. -व्याज्ञा ३.२१९.

**ताट**—पु. भात शेतांतील तण. -चित्रकृषि २.६.

**ताटी**—पु. (व.) चाटी पहा. कापडाचा किरकोळ व्यापार करणारा. 'ताट्याच्या पालामंदी। उभी मायबाई कोण। रुपयाचा जरीखण। फाडला एकलीनं।' -वलो ९५. [चाटी]

**ताठमारी**—स्त्री. आट्यापाट्यांचा एक प्रकार. -व्याज्ञा ३.५७.

**ताडा**—पु. (व.) पानमळा. -के १९.१.१९४०.

**ताडासन**—न. एक हात वर उंच करून उभें राहणें. -व्याज्ञा ४.४९६.

**ताडी**—स्त्री. काडी; तारेचा लांब तुकडा; विशेषतः छत्रीस तारा असतात त्यापैकीं प्रत्येक. [सं. तार]

**ताण**—पु. ताणण्याची दोरी; ओढ; तणावा पहा. 'त्या खांबास लावलेला ताण सार्वजनिक रस्त्यावर येत असल्यानें अडथळा होत होता.' -के १२.९.१९३९.

**ताण**—पु. (कुस्ती.) एक डाव. प्रतिपक्ष्याचा एखादा अवयव पकडून तो खूप ताणणें. -के २९.११.१९३८.

**तातमेडा**—पु. थथामेड पहा. ब्रह्मदेशांतील एक वार्षिक कर. [ब्रह्मी]

**तातीतोडा**—पु. किडूकमिडूक; जवळचें थोडें फार द्रव्य, जिन्नसपान्नस, वगैरे. ' आपला आहे तातीतोडा तो आपल्यापाशीं असूं द्या. ' -प्रतिआत्म ७५.

**तातू करणें**—आहेर करणें.

**तांदळी**—स्त्री. तांदुळजाची भाजी; तांदुळजा नांवाचें रोपटें.

**तादाद**—स्त्री. येणें बाकी; तथापि बाकी; तत्रापि शेष. ' वसूल काय पोंचून बाकी राहिली, किंवा सालीम ऐवज रहात आला याची तादाद समजावी. ' -रा ५.१०६. [फा.]

**तादाप**—पुस्त्री. [चुकीचें वाचन तादाद पहा.] वसूल येणें. ' हिशेब यावा ऐवज तादाप काय राहिला ? हें मुख्य यांचे बोलण्यांतील रहस्य ' -रा ७.; -खलप २.१२६.

**तादीब**—स्त्री. शिक्षा; उपदेश. -आफ. [अर.]

**ताद्रक**—वि. तादृक; यथातथा; क्षुल्लक. ' आपले नजरेनें जागा पाहतां म्हणणाऱ्यांच्या गोष्टी ताद्रकच आहेत. ' -वसमो. [सं. तादृश]

**तानपुरा**—पु. तंबोरा.

**तान्हा**—वि. (ठाकरी.) एक वर्षाच्या आंतील बैलास म्हणतात.

**तान्हापोळा**—पु. पोळयाच्या दुसऱ्या दिवशीं करावयाचा मुलांचा मातीच्या बैलांचा पोळा.

**ताप चालणें**—वरचढपणा, वर्चष्मा करणें. ' कोणाचीहि ताप चालूं न देणारा अमेरिका. ' -नवभा ५.१६८. [(प्र.) टाप]

**ताबडतोब**—स्त्री. त्वरा; घाई; जलदी; शीघ्रता. ' ताबडतोब होऊन मालाचें ठिकाण लागलें तर उत्तम नाहींतर वाट चालणें कठिण होईल. ' -पेद २५.१०६.

**तांबवटी**—स्त्री. (महानु.) तांब्याची कळशी; चरवी. ' तांबवटीचे उदक पाहिला. ' -उच २५५. [सं. ताम्र+वटिका]

**तांबार**—स्त्री. नाचणी पिकणारी तांबडी जमीन. -चित्रकृषि २.६. [सं. ताम्र]

**ताबारा, तबारा**—पु. महंमदानंतरच्या व अलीपूर्वीच्या खलीपांची निंदा करणारीं पद्यें. ' सार्वजनिक जागेंत ताबारा वाचल्यामुळें ७५ शियांस अटक झाली. ' -प्रभात ४.४.१९३९. [अर.]

**तांबिट**—न. डोंगरी गवताची एक जात; शाकारणीचें गवत. -चित्रकृषि.

**तांबील**—स्त्री. मेहनत; सक्ति; श्रम. ' थंडी वाऱ्यांत कामाची अगदीं सक्त तांबील पडते. ' -शालाप, ऑगष्ट १९३९.

**तांबेसाज**—पु. अरुणोदय; तांबडें; प्रातःकाळीं सूर्योदयापूर्वी पूर्वेकडे दिसणारा तांबडा प्रकाश. ' त्याजवर गडबड आम्ही उदैक गुरुवारीं प्रातःकाळीं तांबेसाज फुटते समयीं करतों. ' -पेद २५.१७८. [सं. ताम्र+साज]

**तांबोळा**—पु. भात पिकणारी तांबडी जमीन. [सं. ताम्र]

**तांब्र**—न. १ ताम्र; तांबें. २ (महानु.) पैसा; धन. ' तांब्र किती आहे. ' -पु. (ल.) मुसलमान. [सं. ताम्र]

**तामीरात**—स्त्री. दुरुस्ती; डागडुजी ' गलबताची तामीरात करून तेल देऊन सिद्धता केली आहे. ' -पेद ३.४४. [फा.]

**ताम्हण**—पु. एक झाड. ' ताम्हणाचीं झाडें येथें जास्त आहेत. ' -गोराघ ३४.

**तायीद**—स्त्री. मदत; पाठपुरावा. -मुधो. [अर.]

**तार, तारा**—स्त्री. (महानु.) नाणें. ' कोन्ही तारा घालिती. '; ' कांहीं तार कवडा होता तयाची पूजा द्रव्यें आणिलीं । ' -उच २०३.

**तारंगण**—न. सज्जा; निरीक्षणासाठीं उंच जागीं बांधलेला माच. ' गांवाभोवती तळें पोटीं घेऊन लकडकोट करून तारंगणें बांधून मजबुदीनें आहे. ' -पेद ३३.१५४. [तारांगण पहा.]

**तारण**—न. १ संरक्षण. २ प्रसंग. ' हिंदु बहुसंख्य प्रांतांत मुसलमानांनीं तारण मागावयाचें. ' -के २६.३.१९४०. [सं. तृ-तारण]

**तारफणी**—स्त्री. तरवारीच्या म्यानावरील शिवणीवर लावलेली पट्टी. -प्रश ६७.

**तारवा**—पु. तरवा पहा. १ रोप पेरणीची भाजलेली जागा. २ भाताचें व नाचणीचें रोप. -चित्रकृषि २.६.

**तारा**—स्त्री. बोधिसत्त्वाच्या स्त्रियांस संज्ञा. -शारदा १.४.

**तारांगण**—न. (ल.) अकांडतांडव; आदळआपट.

**ताराजी**—स्त्री. लूट; नासाडी; उध्वस्तता. ' येणें करून तालुक्यांची तमाम ताख्त व ताराजी होऊन कोठील पैसा या दिवसांत मवसर नाहीं. ' -रा ५.१६०. [फा. ताराज=लुटालूट; उध्वस्तता]

**तारामैत्रक**—न. चक्षुराग; अकारण, आकस्मिक स्नेह; प्रथम दृष्टीबरोबर उत्पन्न होणारें प्रेम. तारामैत्री पहा. [सं. तारा+मैत्रक]

**ताल**—पु.स्त्री. वाफ्याची कडा, बाजू. -चित्रकृषि २.६.

**ताल**—पु. पत; सौदा; व्यवहार. 'आपण व कारभारी यानी सावकाराच्या घरास जावे परंतु ताल न पटे.' -पेद ७.६०.

**ताल**—पु. लोक; प्रदेश. 'तुम्हास रहावयास तीनहि तालीं कोठेंहि नाहीं.' -पटच.

**ताल**—पु. शिल्पशास्त्रांतील लांबीचें एक माप. बारा अंगुळें म्हणजे एक ताल. नरमूर्ति दहा तालांची, क्रूरमूर्ति बारा तालांची, कुमारमूर्ति सहा तालांची. -भमूर्ति ११३.

**तालु लागणें**—स्त्रियांस होणारा एक स्तनरोग.

**तालुका**—पु. संबंध. 'नबाबानी आमचा तालुका खानाकडील दूर केला.' -पेद २५.१०. [अर. तअल्लुक]

**तावडा**—पु. मचवा; गलबताचा एक प्रकार. 'तावडा तो परमीणपटण या बंदराचा तावडा थेट राजापुरास जात होता तो धरून आणिला.' -पेद ३३.२४०. 'तीन तावडे लोक येक खेपेस त्याणी नेले.' -पेद ३४.१५२. 'त्यांणी एक तावडा गांवीचा कची धरून आणिला.' -रा ३.२७३.

**तावडी**—स्त्री. ताबा; स्वाधीनता; हस्तगतता. 'परंतु पैका अबदुल खैर खानाचे हवेलींतच आहे. वकिलाचे तावडीला पैका जाला नाहीं.' -रा १.८. [तावड पहा]

**तावडें**—न. एक प्रकारचें जहाज. 'खांदेरीच्या बाऱ्यावर त्यांचीं फिरंग्यांच्या तीन तावड्यांशीं गांठ पडली.' -वसमो. तावडा पहा.

**तावदानी रोषनाई**—स्त्री. कांचेच्या कमानींतील दारूकाम. -पेम ३६२.

**तावीज**—पु.न. १ कबरेवरील उंचवटा; कबरेवरील विटांचें बांधकाम. 'त्यांच्या चौथऱ्यावरील तावीजें दक्षिणोत्तर असतात.' -के१०.३.१९३९. २ ताईत; सोनें, चांदी वगैरेच्या पत्र्याचा एक अलंकार. यांत मंत्राचा कागद, गंडा वगैरे असतो. हा गळ्यांत घालतात किंवा दंडाला बांधतात. 'त्याचे हातची मणगटी व पागोट्यांतील तावीज परवारी यासी द्यावयाची आज्ञा नाहीं म्हणून ठेविली असे.' -पेद १७.१२२. [अर. तअवीज्]

**ताव्या**—पु, एक पतंगाचा प्रकार. -व्याज्ञा १.१६१.

**ताश**—पु. जर. 'दोन प्रहरा निजामुद्दौला ताशाचा पोशाक करून मुबारकबादीस आले.' -रा १.१००. [फा.]

**तास**—पु. गांवांतून जाणाऱ्या नदीच्या प्रवाहाच्या बाजूस बांधलेला घाट.

**तास्तपिंजन**—एल मुलींचा खेळ. -मखेपु ३१२. दस्ता, पिंजर, इत्यादि शब्द पहा.

**ताहीर**—वि. शुद्ध. -आफ. [अर.]

**ताळी-ली**—पु. पुतळी; प्रतिमा. (विशेषतः सौंदत्तीची ताळी). 'तिनें त्या देवीची ताळी देव्हाऱ्यांत ठेविली.' -शिं. आत्म ११.

**तिउंधा**—पु. तीन रस्ते मिळतात ती जागा; तिठ्ठा; तिडा. 'पेशवाईत तिउंधा अथवा चौकामध्यें सर्व घडामोड चाले.' -ज्ञाको न २६८. तिवंधा पहा.

**तिकटी**—स्त्री. १ तिरडी; प्रेत वाहून नेण्याची ताटी. २ तीन रस्ते जेथें मिळतात ती जागा; तिठ्ठा. 'तिकटीवरून न्हाव्यास बोलावून आण.'

**तिकडी**—स्त्री. तिपायी; तीन लाकडांचा तिकोन. -मनो. फेब्रु. १९३७.

**तिकाडी**—स्त्री. एक हलक्या जातीचें गवत. -चित्रकृषि २.६. तिखाडी पहा.

**तिकोनी रस्सीखेच**—स्त्री. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३१०.

**तिखणी**—स्त्री. तीन खणांची जागा.

**तिगडी**—स्त्री. त्रिपुटा; त्रिवृत्ता; त्रिभंडी; श्वेतडा; एक वनस्पति. -मसाप ४५.४.

**तिट्टा**—पु. अड्डा; तिठा पहा.

**तिडण-न**—स्त्री. अडचण; पेंच; संकट. 'घाटाखालीं येतपर्यंत लोकांची येक मास तिडणच बसली याजमुळें सरकारचे महालात च्यार रुपये घेऊन वोढ वारणें पडली.' -पेद २०.१४०. 'त्याचा भार आभार सर्व रा हरिपंत तात्या कडेच घालून लिा, त्याजकडील साधन रक्षावें, रा मामाकडील तिडन पडों देणार नाहीं त्यासीं यजमानाचें त्यांचें पूर्ण संधान होतेंच.' -रा १०.११०. [तिडणें]

**तिडतिडीत**—वि. १ कृश; किडकिडीत. २ चिडखोर; रागीट. 'हरिभाऊंच्या मित्रपरिवारांत एक तिडतिडित गृहस्थ होते.' -ह. ना. आ. आठ ७६.

**तिडा**—पु. एक कपाशीचा रोग. 'कपाशीला तिडामुळें नुकसान आलें तें मोठ्या प्रमाणावर आहे.' -के २८.१. १९२६.

**तिड्डा**—पु. पतंगास लावलेली उभी कांबटी.' -व्याज्ञा १.१६१.

**तिढण**—स्त्री. हरकत; अडचण; पेंच; तेढ; गैरसमजूत; तिढा. 'या मसलतीस मुख्य उपयोग. तिढण नसावी.' -रा १०.९०. तिढणें, तिढा पहा.

**तितरी पंजर**—न. तरवारीचा एक प्रकार. -प्रश १७.

**तित्तिरांग**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २२. [सं.]

**तिथिनिश्चय**—पु. वरवधू निश्चित झाल्यानंतर ज्योतिषाच्या साहाय्यानें विवाह दिन ठरविण्यांत येतो तो विधि. यास मुहूर्त निश्चय असेंहि म्हणतात. [सं.]

**तिपार**—स्त्री. तीन प्रहर; तिसरा प्रहर. 'वेळ तिपारचा सिनेमा संपून संध्याकाळीं प्रेक्षक परत फिरण्याची होती.' -वाशो जाने १९४२.

**तिरकाटी, तीनकाठी**—न. एक गलबताचा प्रकार.

**तिरकुट**—न. झोपडें; छपरी. 'या माडाची माडी तो बागेंतल्या तिरकुटांत विकावयास देत नसे.' -स्वैसं.

**तिरखई**—स्त्री. सागरगोट्यांतील एक डाव. एका वेळीं तीन खडे उचलून घेऊन वर फेंकलेला खडा झेलणें. -मखेपु ३३३.

**तिरंगी**—स्त्री. (गंजिफा.) डावाच्या अखेरीस तिघांचेंहि एकाच रंगाचें एक एक पान असणें.

**तिरंगी खो खो**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १. ३४१.

**तिरंगी निशाण**—न. सध्याचा भारताचा राष्ट्रध्वज.

**तिरजें**—न. लहान झरोका.

**तिरडविरड, तिरढो विरढी-विरढ**—क्रिवि. वेडेवांकडें; वांकडेतिकडे; कोणीकडच्या कोणीकडे. 'नादाची अत्यंत प्रौढी। पृथ्वी गेली तिरढो विरढी।' -भारा. बाल. २०.५१.

**तिरफटणें**—अक्रि. इकडेतिकडे व्यर्थ भटकणें, हिंडणें, फिरणें.

**तिरफटून लावणें**—परतून लावणें.

**तिरफळी**—स्त्री. स्क्रूड्रायव्हर.

**तिरवणें**—सक्रि. जिरवणें; मिटविणें. 'गोष्ट जिथल्या तेथें तिरवून टाकावी.' -हिरवळी खालीं.

**तिराघाटी**—स्त्री.वि. तरवारीची एक जात. स्थानावरून पडलेलें नांव. -प्रश ३६.

**तिरुवा**—पु. (महानु.) तिरुका; रुका; नाणें. 'तिरुवांचे गहूं दळीले.'; 'तिरुवेंचिया तीनी माळा घेतलिया.' -उच २४०.

**तिरोभाव**—पु. १ अंतर्धान. २ मृत्यु. 'स्वरूपदामोदरांचे तिरोभावानंतर रघुनाथदास पुरी सोडून गेले.' -गौरांग ५९६. [सं.]

**तिलद्वादशी**—स्त्री. माघ वद्य द्वादशी. 'तिलद्वादशीस तिळाचें हवन करतात.' -राजतरंगिणी ५.१३९. [नीलमत-पुराण]

**तिलमीवह, तिलमेवा**—पु. तिळगूळ. -आफ.

**तिवडा**—पु. तिन पायांची घडवंची; धान्य वारवण्याची घडवंची. [सं. त्रि+वत्-वृत्त]

**तिवंधा**—पु. १ तिवाठा; तिट्ठा; तीन रस्ते मिळतात ती जागा. तिउंधा पहा. 'नाशकास एक तिवंधा आहे.' -मवाड २.४३०. २ तीन गांवांची सीमा जेथें एकत्र येते ती जागा. 'पुढें तिवंधा तीन गांव सुपे, वढाणे, पडवी.' -रा १८.५.; 'तेथें तिवंधा चिचोळी, सुपे, वढाणे हा तिवंधा.' -रा १८.५. [सं. त्रि+धा]

**तिवंधा**—पु. तिरस्थळी; मनाची ओढाताण; व्यग्रता; एकनिश्चय न होण्याची मनःस्थिति; तीन प्रकारचे विचार मनांत येणें. 'येथून जावे तिकडे रोख पडतो तो तिवंधा आहे.' -पेद १.११. [सं. त्रि+धा]

**तिव्हडा**—पु. खळयाच्या मध्यभागीं पुरलेला खांब. यास बैलाची पात मळणी करतां जुंपतात. -**तिव्हडेकर बैल** -मळणी काढण्याकरितां तिव्हडयाला जुंपलेला बैल. 'जैसा तिव्हडेकर बैलाचा फेर। तैसा ध्रुवभक्ताचा असे विचार। सेलेचे बैल तैसे तारागण। फेरा ईश्वरी प्रदक्षिणा।' -योसं ९.३२.

**तिसरून**—क्रिवि. तिसऱ्यांदा. 'शिवाळ आण, तिसरून भुजबानें जानकीला हुकूम केला.' -पाणकळा ३३. [सं. त्रि]

**तिळें**—न. एकदम झालेलीं तीन मुलें. जुळें याप्रमाणें.

**तीं**—वि. तीन. 'फौजेच्यो देण्याचा पेंच तीं वर्षांचा पडला आहे.' -रा १०.२०८. [सं. त्रि]

**तीग**—स्त्री. तरवार. -मुधो. [अर.] **तीगझनान**-तरवारमाऱ्या.

**तीझ**—वि. तीक्ष्ण. -मुधो. [अर.] **तीझ चंगाल**-वि. तीक्ष्ण नखांचा.

**तीन ककार**—पु. कनक, कांता, कादंबरी (मद्य).

**तीप**—स्त्री. ढेप. -मुधो. [अर.]

**तीफुला**—पु. तीन पुडांचें पात्र. चौफुल्याप्रमाणें प्रयोग. 'विद्यार्थी तीफुला.' -पेद १८.१८५. [सं. त्रि+फुल्ल;म.फूल]

**तीर्था**—स्त्री. कांठाजवळची जाड सुताची विणींतील कोर. [तीर]

**तीक्ष्णवर्म**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. -प्रश १५. [सं.]

**तीक्ष्णाग्र**—स्त्री. अणकुचीदार टोंक असलेलें खड्ग; तीक्ष्ण धार असलेलें खड्ग. -न. तरवारीचा एक प्रकार. -प्रश १७. [सं.]

**तुक्कल**—स्त्री. शेपटी ऐवजीं गोंडा असलेला पतंग. -व्याज्ञा १.१६१.

**तुग्रह**—पु. नक्षीदार मथळा. -आफ. [ अर. ]

**तुज्जार**—पु. व्यापारी. -मुधो. [ अर. ताजीर अने. ]

**तुडतुड, तुडफुड**—स्त्री. ( महानु. ) कुरकुर; कुरबुर. तुडतुड करूं लागली.' 'तुडफुड झाली.' -चरित्र. [ ध्व. ]

**तुडवणी**—स्त्री. पायमल्ली. 'आपणच हैगै केली तरी आम्ही तुडवणीस पडलों.' -पेद २.२६. [ तुडविणें ]

**तुणी**—स्त्री. एक वनस्पति; नादुकर्णी; कुणि; कछ; कांतलक. -मसाप ४५.४

**तुंद**—न. कबुतराची एक जात.

**तुंदपणा**—शिरजोरपणा; हट्ट; दुराग्रह. 'हाहि एक प्रकार तुंदपणाचा आहे.' -पेद ६.१४७.

**तुफन्ग**—पु. गोळा. -मुधो. [ अर. ]

**तुफर**—पु. वि. फितुर; बेदिल; शत्रु. 'जागजागा तुफर होते त्यांचें पारपत्य करावें या उद्देशें मोहिम.' -रा ११. पृ ५७. [ ? ]

**तुबकी**—पु. बंदूकवाला; बंदुकदार. 'सदरहू खून इतबारखान सांगातें तुबकी गेला होता त्यानें केला हे लाजिम जाले.' -रा १८.४. [ तुर्की. तुपक=बंदूक ]

**तुंबा**—पु. भोपळा; गलवताचा नांगर टाकला कीं खुणेकरितां बांधलेला भोपळा. -आंघइ ३७.९.

**तुमकुराई**—स्त्री. तुकमरिआ, तुकमराई पहा. तुकंबरी; सबज्याचें बीं.

**तुरबूत**—स्त्री. थडगें व त्यावरील चबुतरा. 'गोपाळपुरावर साहेबाची तुरबूत चोरानी खोदली होती.' -पेद ३९. २२९. [ फा. तुर्बत ]

**तुरसंदाज**—पु. बरकंदाज. 'बंदुकी, तुरसंदाज, कानडे, तोरसाळी व जांगडे, बंदुकी व तिरंदाज यांची संचणी करून हशम मेळविले.' -बावडा दप्तर १.९६.

**तुराबलज्या**—पु. एक अलंकार. 'दर जोतांत कंठी, सरपेंच, जिगा भुजबंद, दस्तबंद, तुराबलज्या याप्रमाणें हिऱ्याचा जोड एक.' -रा ७. खलप १.२१.

**तुरुकहांडी**—स्त्री. तुरुकहोड पहा. बखेडा; तंटा; पण; इरा; वाद. 'तुरुकहांडीस देशमुखी पडली होती.' -रा ३.६४.

**तुर्फह**—स्त्री. उघडझांक. -मुधो. [ अर ]

**तुलकाठी**—स्त्री. लांबी मोजण्याची काठी.

**तुषार**—पु. थंडीचा कडाका; हिंवाचा कडाका. 'ग्वाल्हेर कडे या तुषारामुळें पिकांचा नाश होतो.' -के ४.१२.१९३६.

**तुसवत**—वि. तुषासारखा; कस्पटासमान; तुच्छ. 'जाबसाल लिहिला तो फिरोन स्मरणाने तुसवत् जाहला असेल.' -पेद ३६.४२६. [ सं. तुष ]

**तुसी**—वि. एक प्रकारचा रंग; तुसासारखा पिंगट रंग; पिवळसर तांबडा रंग. 'शालेचा बुरणूस सोवळयांत पांघरावयाचे उपयोगी, मधून दोरा नसावा, एकपटी रंग काळा अगर तुसी नसावा.' -पेद ३२.१२९. [ सं. तुष-तूस ]

**तूट खाणें**—बिघाड होणें; बिनसणें; वैर उत्पन्न होणें; तुटणें. 'खंडेराव गायकवाड दमाजी गायकवाड याजसी तूट खाऊन मुलें लेकरें सुधा निघोन इकडे येत होते.' -पेद ३९. ८३. [ तुटणें ]

**तृण ओवाळणें**—तृणानें दृष्ट काढणें. -तुलरा १६७.

**तृतीय प्रकृति**—वि. तटस्थ. 'जातीय निर्णय निषेधाच्या बाबतींत कॉंग्रेसला तृतीय प्रकृति करून ठेवावयाचें.' -के १८.७.१९४१. [ सं. ]

**ते**—अ. पर्यंत; पावेतों. [ फा. ता ]

**तेजीवाला**—पु. प्रथम वायदा विकत घेऊन किंमती वाढल्यानंतर विकून टाकून मधील फायदा खाणारा; यास बैल ( इं. ) बुल म्हणतात. -उद्यम सप्टें १९४१.

**तेजीमंदी खाणें**—विमास्वरूपी खरेदी किंवा वेंचाण करून फायदा रोख घेणें.

**तेजीमंदी लावणें**—विमास्वरूपी खरेदी किंवा वेंचाण करणें; वायद्याचा सौदा करणें.

**तेढें**—न. संशयास्पद; कूट. 'मोरेश्वर तरी मला ओळखील कीं नाहीं हें सुद्धां जरा तेढेंच आहे.' -भावबं.

**तेताल**—पु. तरवारीच्या म्यानाच्या तोंडावरील धातूचें मढवण; कबजा. -प्रश ६८.

**तेंदवा**—वि. तेंडवा पहा.

**तेमर**—पु. बाणाचा एक प्रकार. -प्रश २०. [ सं. ]

**तेलकरीण**—स्त्री. बाळंतिणीस तेल लावण्याकरितां ठेवलेली मोलकरीण.

**तेलन**—न. ( खा. अहि. ) विवाहाच्या आदल्या रात्रीं एका चाळणींत दिवा ठेवून ती चाळण चूल, उकिरडा, पाटा, दिवा, घुसळखांब, उंबरठा, इ. वस्तूवर धरून गाणीं म्हणतात तो विधि.

**तेलन पडणें**—पूजा. ज्या वस्तूवर तेलन पाडतात त्यांची पूजा झाली असें समजतात. -संशोधन, ऐलेच २७८. [ तेलवण ]

**तेलीण बोदला**—पु. एक मुलांचा खेळ. -मखेपु १२३.

**तेवती**—स्त्री. एक झाड; याच्या पानाच्या विड्या करतात. -चित्रकृषि २.६. [ सं. त्रिपर्णी ]

**तैनात**—स्त्री. तैनात म्हणजे सालीना किती नेमणूक द्यावयाची त्याची बेरीज, यास 'तैनात सालीना' असें म्हणतात. -भारतवर्ष मराठ्यांचें दप्तर १४.

**तोकजंजीर**—क्रिवि. गळ्यांत पट्टा व सांखळी अडकवून. 'पांच सात माणसें खिदमतगार वगैरे शागीर्दपेशाचीं व एक मोदीवाणी इतक्यास धरून नेऊन तोकजंजीर करून कैद केलें.' -रा ५.१२८. [ अर. तौक=पट्टा+जंजीर=सांखळी ]

**तोचतोपणा**—पु. एकरंगीपणा; एकसुरीपणा; कंटाळवाणी एकच एक तऱ्हा. 'त्यांच्या भाषणांतील तोचतोपणा ऐकून हिंदी जततेचे कान किटले.' -के १३.१.१९४२:

**तोंडफुटका**—वि. फटकळ; जिभेवर नियंत्रण नाहीं असा. 'मिरा अगदीं तोंडफुटकी आहे.' -आई.

**तोंडमिटवणी**—स्त्री. निरुत्तरता; गप्प बसविणें. 'तसेंच जर कोणी नसते आक्षेप आणूं म्हणेल तर त्यांचीहि आपोआप तोंडमिटवणी होणार आहे.' -विद्याभिवृद्धि ११.

**तोंडला**—पु. कपाळास बाशिंग बांधणें.

**तोडी**—स्त्री. हरणवेल; जीवंती; जीवनी; जीवा; मधुश्रवा; एक वनस्पती. -मसाप ४५.४.

**तोताचिश्म**—वि. ( महानु. ) पोपटनेत्री पहा.

**तोतापरी ( तोतापुरी ) आंबा**—पु. तोता म्हणजे पोपट याच्या चोचीच्या आकाराचा आंबा. हा दक्षिण हिंदुस्थानांत होतो. याचा हंगाम उशीरां असतो.

**तोदा**—पु. १ तगादा. 'लोकांचे देण्याचे तोदे, येथें पैक्यास ठिकाण नाहीं.' -पेद ५.६२. 'देण्याचे तोदे भारी जाहाले.' -पेद ५.६४. २ तंटा; भांडण; गोंधळ; गडबड. 'नाहक तोदा करून घर घेतले चौघे लाऊन फिसादी करून गेला.' -पेद २०.१५६.

**तोबा**—पु. एक मुलांचा खेळ. -मखेपु १३२.

**तोरा**—पु. मोठा मनुष्य; मोहरा; श्रेष्ठ अधिकारी. 'हा पूर्ण भरंवसा आम्हास आहे या अर्थी येथें तोरा कोणी यावा येविसी लांबण होऊं नये.' -रा १०.१०३. 'इंग्रजांस ऐसी शिकस्ती कोणी दिल्ही नव्हती. शिकस्ती देऊन आपला तोरा जायां न होतां आला हें केवढें जालें.' -रा १०.२००. 'जर नबाबाचा तोरा कोणी तेथें नसला ... म्हणजे येऊन शहर वेढील.' -रा ३.३९९. 'आलमगीराचे दोघे पुत्र हाताखाले तोरा घालून अंतरवेदात गेला.' -पेद २.७२. [ सं. तुल्=तोलणें ]

**तोल**—पु. ठराविक वजनावर घ्यावयाचा वर्तोळा. गुजराथेंत हा प्रचार आहे. -के ३१.१०.१९३९.

**तोलेदो**—न. तोलेदो ( स्पेनमधील एक शहर ) येथें तयार होणारा पोलादाचा प्रकार. -प्रश २४.

**तोहफा**—वि. १ नामी; उत्कृष्ट; दुर्मिळ; तऱ्हेवाईक; मूल्यवान्. 'पादशहा वजीर इत्यादिक यांस कधीं कधीं तोहफा म्हणून कांहीं जिन्नस पाठवीत असतात.' -पेद ८.२२. [ अर. तुहफा ] २ तोफा पहा.

**तोळ**—( बं. ) पाठशाळा.

**तौंग**—पु. पूल.

**तौर**—स्त्री. तऱ्हा; रीत; प्रकार; पद्धत. -मुघो. [ अर. ]

**तौरिया**—सरसू.

**त्रिकर्णपुरस्सर**—कायावाचामनें करून; तन, मन, धन वेंचून. [ सं. त्रि+करण=इंद्रिय+पुरःसर ]

**त्रिकस्थान**—न. ( फलज्यो. ) कुंडलींतील ३,६,८,१२ या स्थानांस म्हणतात. [ सं. ]

**त्रिकोण**—पु. ( फलज्यो. ) कुंडलींतील प्रथम, पंचम व नवम स्थानाला म्हणतात. ग्रहाच्या स्थानापासून पांचवें व नववें स्थान.

**त्रिदंडी संन्यास**—पु. बाह्यात्कारीं घेतलेला संन्याशाचा वेष; संन्याशानें त्याग करावयाच्या सहांपैकीं फक्त तीन गोष्टींचा त्याग करणें. 'घेऊनि त्रिदंडी वेषा गेला त्या हलधरासि वंचाया' -मोरोपंत सुभद्राहरण. २ ( लं. ) पोकळ आव; ढोंग; आणलेलें सोंग. 'संस्थानिकाचा अधिकारन्यास त्रिदंडी संन्यासाप्रमाणें अथवा' -के २०.३.१९४२.

**त्रिदोष**—पु.अने. ( महानु. ) १ विकार. २ विकल्प. ३ हिंसा. 'तिन्ही दोष जया घडलेः तया सृष्टि शून्य.'

**त्रिपुटी**—स्त्री. ( महानु. ) १ कर्मसृष्टि. २ विकार सृष्टि. ३ दिव्यसृष्टि. 'कर्मः विकारः दिव्यसृष्टिः ती मिळोनि त्रिपुटीः'

**त्रिफाट**—स्त्री. पांगापांग; विभागणी; विस्कळितपणा. 'परंतु जमावाची त्रिफाट जाहाली यास्तवच विचारांतर प्राप्त जाहाले आहे.' -पेद १३.२१. [ सं. त्रि+म. फाटणें ]

**त्रिवडा**—पु. ( महानु. ) रेशमी वस्त्र. 'त्रिवडी ओळगवी.' -ऋ. [ त्रिवट=तिवट ]

**त्रिसळ**—स्त्री. तिसळ; एक बोराएवढें हिरवें फळ; याचा चुरचुर लागतो. -श्या आ. [ सं. त्रि+शकल ]

**त्रिसुपर्ण**—न. भोजनास आरंभ करण्यापूर्वी नारायणीय उपनिषदांतील मंत्र म्हणतात ते. [ सं. ]

**त्वर्य**—वि. घाईचें; निकडीचें. ( इं. ) अर्जंट. 'राजसभेनें कांहीं अत्यंत त्वर्य कामासाठीं तिकडचें बोलावणें पाठविलें.' -संन्यख ५५. [ सं. त्वर् ]

# थ

**थकबाकी**—स्त्री. कुळाकडे मुदतीबाहेर राहिलेली कर्जाची बाकी. [ थकणें+बाकी ]

**थटथट**—क्रिवि. अडखळत. ' कळा हे दावी कीं थटथट वदे क्रोधविकला. ' -भामा २२. [ ध्व. ]

**थटकारून**—क्रिवि. एकदम; धाडदिशीं; जोरानें; आवेशानें. ' हें ऐकून दौला निजले होते ते थटकावून उठोन बसले, आणि बोलले कीं, आम्ही कोठें नको म्हणतो ? ' -रा ७.११५. [ ध्व. ]

**थडणें**—अक्रि. तटणें; थांबणें; अटकून राहाणें. ' राणांत थडावे ऐसे नाहीं. ' -पेद २७.५५. [ सं. स्था ]

**थडियावणें**—सक्रि. थापटणें. ' जेणें श्रीकृष्णें जमुनेचा पोटीं। तोंड फाडूनि काळया सूदलां थाटी। तो काळचि थडियाविला पाठीं। तेणेंचि मिशें। ' -नरुस्व ३०८.

**थडी**—स्त्री. ( गुरु. ) चौथरा. -मुस.

**थंडी गुलाबी**—वसंत ऋतूंत पहांटेच्या वेळीं पडणारी आल्हाद कारक थंडी.

**थंडीताप**—पु. हिंवताप; शीतज्वर. [ थंडी+ताप ]

**थडें**—न. ( गुरु. ) तपस्येची जागा. -मुस.

**थथामेड**—पु. उत्तर ब्रह्मदेशांतील एक वार्षिक कर. [ ब्रह्मी ]

**थर्मास बाटली**—स्त्री. या बाटलींत पदार्थ ठेवला असतां त्याचें उष्णमान कायम राहतें. [ इं. थर्मास+बॉटल ]

**थर्मी**—न. स्नानगृहें. -ज्ञाको ( व ) १८९. [ इं. थर्म= उष्णता ]

**थरडी**—स्त्री. गंध ठेवण्याची वाटी; फुलें ठेवण्याची परडी.

**थरथरीत**—वि. ( महानु. ) थलथलीत; हालणारें. ' तैसें अगाध दोंद अरुवार थरथरीत. ' -नरुस्व १११६.

**थाटणी**—स्त्री. थाटमाट; व्यवस्था; रचना. ' यवनानें आपला भला माणूस सैफुल्लाखान व मल्हारपंत किंभुवने, दोनशें स्वार, दोनचार हस्ती अशी थाटणी करून पाठविले. ' -रा ३.४३३. [ थाटणें ]

**थान**—न. (गुरु.) समाधिस्थान. -मुस. [ सं. स्थान ]

**थानह**—पु. ठाणें. -मुधो. [ अर. ]

**थाप**—स्त्री. ( मल्लखांब. ) मल्लखांबावर एका हातानें थाप मारून झटक्यांत मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.५९.

**थापफेरी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५२.

**थापा**—पु. थवा; समुदाय. ' बाप्पाजी हो बापा। लेकी फार म्हणूं नका। जसा चिमण्यांचा थापा। उडुनी जाई। ' -स्त्रीस्वभाव. [ सं. स्था ]

**थापो**—पु. ( गो. ) थाबडा; शेणाचा पो.

**थार**—पु. आधार; आश्रय. ' तिकडे थार होत असेल तरी ठेवावी नाहीं तर पुण्यास पाठवावी उचित आहे. ' -पेद ६.५६. [ सं. स्था ]

**थारणें**—अक्रि. थकणें; राहणें; बाकी राहणें; शिलक राहणें. ' परंतु मागेपुढें आम्हाकडे ऐवज थारला असतां आम्ही देत नाहीं; खावंदगिरीकरून लोकांकडील मात्र ऐवज वसूल करून आणितों, हे बोलावयास जागा होतो. ' -पेद ६.१२४.

**थारा**—पु. चबुतरा.

**थालीपीठ**—न. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३८८.

**थावराथावर**—स्त्री. आवराआवर; वारासार; व्यवस्था; आटोपाआटोप. ' ते लोक आपली थावराथावर करीत होते इतक्यांत त्या पांगलेल्या लोकांतून आप्पासाहेब गायकवाड जेथें होते तेथें येऊन पोंचला. ' -भारतवर्ष, जुन्या ऐति. गोष्टी ३४. [ सं. स्थावर द्वि. ]

**थिरमे**—न. वस्त्र. ' राजश्री आपा डेरियास गेले होते तेथें दिली थिरमे जोडी. ' -पेद २२.३४.; -सारुह ३.४०.

**थुड्डी**—स्त्री. शत्रूच्या हनुवटीवर केलेला वार. -मवि ९.११. [ थुड्डी=हनुवटी ]

**थुपथुपी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३३७.

**थूडी**—वि. (महानु.) उतावळा; युद्धोत्सुक. ' थूडी पाढसळे बळे प्रतपतू। ' -गस्तो ७४.

**थेटणें**—अक्रि. चिकटणें; भिडणें; खेटणें.

**थेटून बसणें**—भिडून, चिकटून बसणें; एखाद्याच्या अंगाशीं अंग लावून बसणें.

**थेतरेपणा**—पु. कंप; अडथळा; घुटमळणें. ' तान मारतांना किंचित् थेतरेपणा येई. ' -माभू ३८९.

**थेरकरी**—वि. नर्तक; नाच्या; नट. ' जैसा थेरकरी नटला मानभावपणें। मोडूनी टाकून मांडिलें नाचणें। ' -योसं १८.१८१. [ सं. स्थविर-थेर ]

**थेला**—पु. जळाऊ लांकडाचा ढलपा.

**थोथंड**—न. थोतांड पहा. ढोंग; लबाडी; कपट. ' गांवकरी तुम्ही ऐवज सारा नेता म्हणून सांगोन थोथंड करून मशारनिलेस कांहीं देत नाहीं. ' -रा ३.२४१.

**थोरली आई**—स्त्री. १ अक्काबाई; अवदसा; लक्ष्मीची मोठी बहीण. धाकटी आई म्हणजे लक्ष्मी. २ मातृभूमि.

# द

**दखलगिरी**—स्त्री. नजर; ओळख; परिचय. 'राजाची दखलगिरी ही दहा हजार रुपयांच्या चलनी नोटेसारखी आहे.' -राज्यशास्त्र.

**दगटणें**—अक्रि. खेटून बसणें; चिकटून बसणें; अंगाला अंग लावून बसणें.

**दगडफोडणी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखेपु ९५.

**दगडी कांसव**—न. पाण्यांत न राहतां दगडांत राहणारें कांसव.

**दगडी बोर**—न. बोराच्या आकाराचा दगडासारखा खनिज पदार्थ; हा औषधी आहे.

**दग्धभू**—स्त्री. घरफुंकी. (इं.) स्कॉर्च्ड अर्थ. **दग्धभूचें धोरण**-शत्रूस संकटांत घालण्याकरितां स्वतःचा देश जाळून पोळून बेचिराख करणें. 'दग्धभूचें दुधारी शस्त्र वापरूं नका.' -दैका १४.३. १९४२.

**दंग्या**—पु. मृदंग्या; सूर. (आट्यापाट्यांच्या खेळांतील).

**दच**—स्त्री. द्वेष; कलह; तंटा; भांडण; द्वैत. 'सेनापति व यमणा याणी तो आपणासी दच बांधली आहे.' -पेद २६. २६. [ ? ]

**दच्गा**—पु. थाप; फसवणूक.

**दच्चा देणें**—चाट मारणें; यःपलाय करणें.

**दंडक**—पु. (कुस्ती.) तरफ. -के ६.१२.१९३८.

**दडंची**—स्त्री. दडी; लपून बसणें. [ दडणें ]

**दडंची मारणें**—बेपत्ता होणें; गैरहजर असणें.

**दडणी**—स्त्री. (सोनारी) एक नकशीचें हत्यार.

**दंडअढी**—स्त्री. (मलखांब.) मलखांबास दंड लावून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३७९.

**दंडणें**—अक्रि. (व.) शोभणें. 'गोड बोलका भाऊजी। माही वहिनी प्रीतीची। कशी राघोला दंडेत। मैना राघोच्या तोलाची।' -वलो १०२. 'लाल कुसुंबी पागोटी। बांधणी शिंदशाही। दंडे बाणा मोगलाई। सखा मनाचा देसाई।' -वलो १०९.

**दंडपेटी**—स्त्री. दंडांत घालावयाचा एक रत्नजडित अलंकार. 'संभाजी महाराजांनीं आपले अंगावरील भरगच्ची पोशाख, जवाहीर, मोत्याची कंठी, दंडपेट्या, पोचपानें, गजिरा वगैरे मातबर जवाहीर घातलें.' -शामब. भारतवर्ष ५४. [ दंड+पेटी ]

**दंडफुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. दोन मुलींनीं एकमेकींचे दोन्ही दंड धरून घालावयाची फुगडी. -व्याज्ञा १. ३७६. [ दंड+फुगडी ]

**दंडमार**—पु. परस्परांसमोर उभे राहून परस्परांच्या दंडावर दंड आपटणें.' -व्याज्ञा ४.१८१. [ दंड+मारणें ]

**दंडयोजना**—स्त्री. शिक्षा लावण्याकरितां असहकार, प्रतिकार. [ दंड+योजना ]

**दंडवत घेणें**—क्रि. एक नवस; नवस केलेल्या देवास नमस्कार घालीत जाणें. [ सं. दंड+वत् ]

**दडसणें**—अक्रि. घट्ट होणें; गांठ येणें; सूज येऊन दडदडीत होणें. [ दंड+ध्व ]

**दडार**—वि. घट्ट; दडदडीत; हरळीनें घट्ट बसलेली जमीन. (क्रि. होणें).

**दंडाबाजी**—स्त्री. मारामारी. [ दंड+बाझ ]

**दंडाबेडी**—स्त्री. ज्या बेडीला सांखळी ऐवजीं दांडा लावलेला असतो अशी बेडी. ही तुरुंगांत शिक्षा म्हणून घालतात. 'सर्वांच्या हातांत बेड्या व पायांत दंडाबेडी घातलेली होती.' -उपेअंत १२. [ दंड+बेडी ]

**दंडांची भंची पुटकी**—स्त्री. वज्रमुष्ठीचा व्यायाम. प्रथम दंड काढून पुढें डोकें टेकून गोलांटी मारून पुढें हात टेकून जमीनीवर बसणें. -व्याज्ञा ४.१०३.

**दांडिया**—पु. (ना.) आंखूड लुगडें; अपुरें लुगडें; तोकडें लुगडें. 'आमच्या दुकानीं दंडिये खण, गुजराथी पद्धतीची साडी विकत मिळतील.'

**दंडी**—स्त्री. आराम खुर्चीसारखें वाहन. डंडी पहा. -हिमा.

**दंताळवाडी**—स्त्री. दंतपंक्ति; दंतावलि; तोंडांतील दांत; दातांची रांग. 'दंताळवाडी ओस पडली.' -एकनाथी भारूड. [ दंत ]

**दत्त**—वि. दिलेलें; दिलें. **दत्त म्हणून हजर**-एखादी इच्छा करावी किंवा सहज बोलावयास जावें तो त्याप्रमाणें घडून येणें. याबद्दल एक गोष्ट सांगतात. एक मनुष्य होता तो संसारास कंटाळून अरण्यांत गेला. तेथें एका झाडाखालीं बसून तो मनाशीं म्हणूं लागला कीं येथें आपणास सुग्रास भोजन मिळेल तर काय बहार होईल. त्याबरोबर त्यास तेथें सुग्रास भोजन मिळालें. कारण तें झाड कल्पवृक्षाचें होतें किंवा त्या झाडावर देवतेची वस्ती होती. याप्रमाणें मनांत आणावें ती वस्तु त्याला मिळत गेली. शेवटी त्यास येथें कोणी भूत तर नाहीं व तें आपणास खाणार तर नाहीं असें मनांत वाटूं लागलें म्हणून तो म्हणाला, मला कोणी खाणार तर नाहीं? तों त्याप्रमाणें दत्त

म्हणून एक पिशाच्च येऊन त्यानें त्यास खाऊन टाकलें. [ सं. दा=देणें-दत्त ]

**ददोडा**—पु. गांध; फोड; उठाणू. 'पोटांत उजवे बाजूस कळ उत्पन्न होऊन पोटावर लाल ददोडे आले.' -चित्र. ऑगष्ट १९३५.

**दधिमंथन**—न. ताक घुसळणें. [ सं. ]

**दधी करंबा**—पु. ( महानु. ) दहीभात; एक दहीं-भाताचें खाद्य; दही करंबा. 'भाते दूध विर्जिजे मग येळा मिरियें आलें सामुद्रिकें बघारून त्यार करणें.'; 'दधी करंबाची आरोगणा होये.' -ऋ. [ सं. दधि+करंभ ]

**दफातवार**—क्रिवि. विल्हेवार; यथानुक्रम. 'त्या निकालपत्रावर दफातवार व समाकुल पांढरीच्या साक्षी झाल्या.' -पेम ४७९. [ फा. ]

**दफाते**—पु. मराठेशाहींतील जमाखर्चांतील एक सदर. 'दफाते म्हणोन एक सदर रवासुदगीचे खालीं असतें. त्यांत सनदा पत्रें जीं हुजुरांतून हरएक प्रकारचीं होत होतीं तीं बार करीत होते.' -मराठ्यांचें दप्तर. -भारतवर्ष ९.

**दफ्तअन**—क्रिवि. वारंवार; एकदम. -मुधो. [ अर. ]

**दफ्तनी**—स्त्री. गवसणी; आच्छादनाची खोळ; वरून गुंडाळावयाचें वस्त्र अथवा पिशवी. 'आज्ञा होईल तरी दफ्तनी पाठऊन देऊ.' -पेद १८.५७. [ फा. दफ्तन ]

**दबीर**—पु. सल्लागार. डबीर पहा. -आफ [ फा. ]

**दमछाक**—पु. धीर; अवसान.

**दमण**—न. शिडाचें वरचें टोंक.

**दमनवस्त्र**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार.

**दमानची**—पु. कडाबीनवाला; लहानतोफ किंवा बंदूक बाळगणारा सैनिक. [ दमानक=कडाबीन-ब्लंडरबस ]

**दमास**—न. दमास्कस येथील रेशमी कापड. 'रजई पिवळे दमासाची व नारायण तेल आक्रोड व बदाम याजप्रमाणें पाठवून देणें.' -रा ३.२५२. [ दमास्कस ]

**दमास्कस**—न. दमास्कस येथें तयार होणारा पोलादाचा प्रकार. -प्रश २४.

**दम्साज**—पु. दोस्त. -आफ. [ अर. हमसाज ? ]

**दर**—स्त्री. रस्ता; तऱ्हा; रीत; मार्ग. 'हें सर्व दरेनें तुम्हांसीं हमेष बोलण्यांत आलें.' -रा ७.८१. [ अर. दर-पु-दरवाजा, फाटक, दार ]

**दर**—क्रिवि. मध्यें.

**दर आमदन**—आंत येणें. घडणें; दरबदस्त. -सर्व.

**दरईबाब**—क्रिवि. या बाबतींत. दरींबाब पहा. -आफ. [ अर. ]

**दरज**—स्त्री. पीडा; त्रास; तोषीस; उपद्रव. 'सावनूरकर दरसाल च्यार पांच गांव मारून लुटून दरज देऊं लागले.' -पेद २८.२०८. [ फा. दर्ज-दे ]

**दरणीं पारणीं**—स्त्री. धरणीं पारणीं पहा. पगार बाकी वगैरेकरितां धरणें धरून, उपास करून वगैरे बसणें व त्यामुळें दिरंगाई, खोळंबा; दीर्घसूत्रीपणा. 'तोपर्यंत दरणीपारणी कुच्यांस खोलंबा ऐसे टंटे पडतात.' -पेद ५.२५.

**दरपये**—क्रिवि. सविस्तर; तपशीलवार. 'येविशी गोविंदराव याणीं दरपये सेवेसी विनंती लिहिली आहे.' -पेद १९.९२.

**दरपेश**—क्रिवि. पुढें, समोर. 'परंतु स्वामीकडील जाबसाल येक प्रकारचा दरपेश आला आहे. यास्तव त्याची समजावीस हरयेक प्रकारची कहाडून त्याजला हाती घेणार.' -पेद २५;१२२.; 'ही गोष्ट मार्गाची होती, ते हजरतीकडून न घडतां बिघाडाची करून लढाई दरपेश करून आम्हांस नेस्त नाबूद करावयाचा इरादा केला.' -रा ५.६. [ अर. दर+पेश ]

**दरबदर**—दरबिदर पहा.

**दरबस्त**—क्रिवि. निरपवाद. दरोबस्त पहा. 'वसूल दरबस्त नेहटोन देणें.' -पेद ३१.२४.

**दरबार**—एक पदवी. 'दरबार गोपाळदास.' -के ८. ११.१९३८. [ फा. दर्बार ]

**दरबारह**—अव्य. विषयीं; करितां; तर्फे. -आफ.

**दरबारी दातृत्व**—न. खार्चिक उदारपणा; सढळपणा.

**दरबिदर**—क्रिवि. दारोदार; देशोधडीस; घरपरस्त. 'दौलताबादचें राज्य सर्व पदरच्यांनीं दिल्लीपतीच्या घरांत नेऊन घातले आणि आपले वडिलांस दरबिदर केलें.' -शामब भारत वर्ष ४. [ फा. दर=दरवाजा; दरबदर=दारोदार ]

**दरमियां**—क्रिवि. मध्यें. दरम्यान पहा.

**दरयाब**—क्रिवि. वि. ( बाऱ्याबबद्दल चुकीनें लिहिलेला अथवा वाचलेला ) हजर; सामोरे; पुढें. 'रोज शनवार च्यार घटका दिवस आल्यावर खिलबतेंत आले. दोघे हकीम रायेराया दरयाब जाले. जाबसाल करून प्रहर दिवसा बरखास्त.' -पेद २५. १८९. [ अर. बार्याब पहा ]

**दरवजह, दरवजे**—क्रिवि. रूपामध्यें; रूपानें. -आफ. आठइति.

**दरवाजा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखेगु ३४४. ०**देणें**-दार बंद करणें. 'यास्तव काल रात्रीं लोक व लक्ष्मणपंत व दौलतराव यास पाठविले असतां दरवाजे दिल्हे प्रातःकालीं निघतो बोलले.' -पेद ६.११९.

**दरहाल**—अ. सध्या. -आफ. [ फा. दर+हाल ]

**दराटिया**—स्त्री.अव. ( महानु. ) धाडी; दरोडे. 'देशीं खाने दराटिया वाटा, घाटा, पडतातीः'

**दरादर**—क्रिवि. भराभर; फराफर. 'लेखक आपल्या पायरीनें वागत नाहीं असें त्यांस वाटूं लागतें आणि मग लोक त्याचीं बिंगें दरादर ओढून बाहेर काढतात. -साहित्यधारा, भाटे ४६.५२.

**दरार**—क्रिवि. दरारा; भरपूर; भरारा भरून. 'जसे बगळी वाहून जात असे दरार.' -ऐपो २.१९४.

**दरावणें**—सक्रि. दटावणें; धाक दाखविणें. 'कारभार सरकारचा यास्तव दराऊन लिहिणें लागलें.' -पेद ३७.२३२. [ सं. दर=भीति ]

**दरूल अमान**—पु. इस्लामी आचार पाळण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असलेला देश; अभयभूमि. [ अर. ]

**दरूल हरब**—इस्लामी आचारांवर निर्बंध असलेला देश; रणभूमि. [ अर. ]

**दर्गाह**—पु दरबार; मशीद; जागा. -आफ ; -मुधो. [ फा. ]

**दर्ज**—स्त्री. भीति; ददात; पर्वा. 'मला त्याची काय दर्ज आहे.' 'प्रपंचांत त्याला कोणत्याहि गोष्टीची दर्ज नाहीं.' [ फा. दर्द ]

**दर्जेह**—दर्जा पहा.

**दर्याइ**—वि. रेशमी. 'भोजन करते वेळेस सकल ब्राह्मण स्त्रीनें दर्याईची चोळी घालावी.' -पेम ४०४.

**दर्यासारंग**—पु. नौदलांतील अधिकाऱ्याची एक पदवी. ॲडमिरल याअर्थी वापरतात. [ दर्यासारंग=शिवाजीचा एक आरमारी अधिकारी.

**दर्शनानुशासनशास्त्र**—न. प्रकाशशास्त्र. [ सं. ]

**दलवट**—न. पायमल्ली; तुडवणी. 'मोगलाचे फौजेच्या दलवटामुळें खराब जाहला.' -पेद १५.४१. [ दल+वट ]

**दवडा**—पु. दौड; मजल. 'बोले सर्जाखान दवडा केला!' -ऐपो २.२२२. दौड पहा.

**दवलेरी**—स्त्री. वारली लोकांत लग्नविधि चालवणारी वृद्ध स्त्री. -ज्ञाको २० ( व ) १७६.

**दवाम**—वि. अखंडित. -मुधो. [ अर. ]

**दशक**—पु. वरचष्मा; वर्चस्व; वरचढपणा. 'सीझर सलाचा उपहास करून आपला दशक चढवून म्हणाला.' -विद्याभिवृद्धि १६२.

**दशदर**—वि. घाबरा; भयभीत. 'यावरून नवाब चित्तांत बहुत दशदर आहेत.' -पेद २५.८५.

**दशाफळ**—न. ( अहिराणी ) एक व्रत; पोवतें वाहण्याचा विधि. 'खानदेशांत व महाराष्ट्रांतील जिल्ह्यांत स्त्रियांचें दशाफळाचें व्रत म्हणून एक श्रावणांत व्रत येतें.' -अहिराणीभाषा व संस्कृति ४८.

**दस्तउतार**—पु. ( कुस्ती. ) परस्परांच्या मानेवर हात देऊन उभे असतांना आपला डावा हात प्रतिपक्ष्याच्या उजव्या दंडाखालीं ठेवून एकदम झटक्यानें वर उडवून व उजव्या हातानें मान डावीकडे वळवून त्याच्या पाठीमागें जाणें. -व्याज्ञा ४.१६९.

**दस्तगाह**—पु. ताबा; शक्ति; सामर्थ्य. -आफ. [ फा. ]

**दस्तचाप**—पु. डावी बाजू; वांकडी बाजू; तिरपी बाजू. 'चंडावल व दस्तरास व दस्तचाप सरदार व फौज नेमून सर्वां मार्गें आपण उभयतां फौजेनसी बाहिर बुनगाहेस पाठीमागें घेऊन ... स्वार झाले.' -पेद २.१६. [ फा. ]

**दस्तबंद**—पु. रत्नांचा किंवा मोत्यांचा सर; हातांत घालावयाचें भूषण. 'कंठी, सरपेंच, जिगा, दस्तबंद, भुजबंद, याप्रमाणें.' -रा ७.; -खलप १.२०. [ फा. दस्त=हात+बंद ]

**दस्तरबंदी**—स्त्री. ( मूळ अर्थ-पागोटें बांधणें ) अधिकारदान. 'खैरपूरच्या मीर साहेबांचा दस्तरबंदीचा समारंभ व्हावयाचा आहे.'

**दस्तरास**—पु. उजवी बाजू. 'चंडावल व दस्तरास व दस्तचाप सरदार व फौज नेमून.' -पेद २.१६. [ फा. दस्त-रास्त ]

**दस्त लागणें**—रेच होणें. 'त्याच्या सेवकांना भीतीमुळें किंवा जागरणामुळें दस्त लागले.' -राजतरंगिणी ६.पृ. १४९.

**दस्तहत**—क्रिवि. हाताखालीं. -आफ.

**दस्ता**—पु. लहान मुलांच्या पाणी घालण्याच्या खेळांतील एक संज्ञा. [ दस्त=हात ]

**दस्ती**—स्त्री. पट्टा; कमरबंद. 'राजा रट्टी या तरुणानें परेडच्या वेळीं कमरेला दस्ती बांधण्याचें नाकारतांच त्यास फटक्यांची शिक्षा झाली.' -के १.८.१९३८.

**दस्ती**—स्त्री. बाजू; हातोटी. 'त्याला म्हणावें आपली दस्ती फिरवून उलट बाजूनें बोल.' -विद्याभिवृद्धि १५६. [ दस्त=हात ]

**दह**—वि. दहा. [ सं. दश ] -न. खेडें. अव. दहात. -मुधो. [ अर. ]

**दहनभूमि**—स्त्री. स्मशान. 'दहनभूमि घटिकेसम त्याज्य बुधजनीं।' -मृच्छ. [ सं. दहन+भूमि ]

**दहन्द**—क्रि. यावें. -आफ. [ फा. ]

**दहशतवादी**—पु. भीति दाखवून आपलीं मतें मान्य करावयास लावणारा, किंवा आपलें कार्य साधणारा. खून, मारामाऱ्या, दंगे वगैरे घडवून आणून आपलें उद्दिष्ट साध्य करणारा राजकीय पक्ष. [ दहशत+वादी ]

**दहानन्द**—क्रि. देववावे. -आफ. [ फा. ]

**दहानीदह**—अ. देववून. -आफ. [ फा. ] **दहानीदह आयद**-देववून टाकावें.

**दहीम**—क्रि. देतों.

**दहीहंडी**—स्त्री. एक प्रकारचा कर. हा काजीनें वसूल करावयाचा असे. 'बादशाही कामाबद्दल दहीहंडी'; 'सायर खर्चाबद्दल दहीहांडी.'; 'सर्व हरकती दिवाणी व बादशाही कामाचे म्हणजे दहीहंडी व नजराणा.' -सनदा ७७,७९,८२. [ दही+हंडी ]

**दहेकचे**—वि. द्यावयाचे; देण्याचे. 'मातुश्री उमाबाई काकी याणी आम्हासी दोहोमहिनियांचा करार केला कीं जाते-क्षणी दहेकचे रुपये साडे बेतालीस हजार देतो.' -पेद १२.८१.

**दळपीण**—स्त्री. दळण दळणारी. [ दळणें-दळप ]

**दळभंजन**—वि. ( उप. ) बावळा; दळभद्र्या. मूळ शब्द दलभंजन चांगल्या अर्थी. [ सं. दल=सैन्य. भंजन=मोडणें ]

**दळवाडें**—न. दळवईपण; शौर्य. 'आंगीं थोडेंची दळ-वाडें। पण रागीटु कवणी पाडें।' -उषा १६५९. [ सं. दळ= सैन्य+वाही-दळवई, दळवी ]

**दळा**—पु. जमीनीचा तुकडा. 'सदरहू पांचा बिघ्याचा दळा दुमाला करणें.' -रा १५.२२८. [ सं. दल ]

**दळें**—न. कमरबंद; तरवार ठेवण्याचा कमरपट्टा. 'आंतीचे नि परिमळें। चंदन जिंकिलें कसा आगळें। तें यक्ष कर्दमें बांधलें दळें। विरहिणीसी ॥' -नरुस्व ५८९.

**दळें बांधणें**—(ल.) वैर करणें; युद्धास सिद्ध होणें. वर पहा.

**दळयाची पद्धति**—स्त्री. नवीन जागेंत जंगल साफ करून जाळून शेती करण्याची पद्धति; कूर्मी पद्धति. ठाणपालट पहा -ज्ञाको ( ज ) १३.

**दक्षिणीमहाल**—पु. महाराज सातारकर यांचे राण्यांस वस्त्रें अलंकार अथवा गांव जमिनी मोकास अथवा रोख पैसा पावत होता. तो या सदरांत खर्च पडत असे. -भारतवर्ष -मराठ्यांचें दप्तर १६.

**दाइद**—पु. ( महानु. ) दायाद; बांधव; सगोत्र. 'संसार दाइद नव्हे.' -ऋद्धी.

**दाखलदप्तर**—वि. दप्तरीं दाखल झालेलें; ज्यावर कांहीं कारवाई करावयाची नाहीं असें समजून केवळ विल्ह्यास लावून ठेवलेलें. ( क्रि. करणें ). 'अगोदरच सौदा ठरून गेला असल्या-मुळें हें पत्र दाखलदप्तर करण्यांत आलें.' -के २७.३.१९३८.

**दाखवणी**—स्त्री. जांगड वही; माल पसंत करण्याकरितां दिला असतां टिपून ठेवण्याची वही. 'हें कापड दाखवणी वहीस लिहून द्या.'

**दाखिल**—श.अ. देखील; सह. -आफ.

**दागदूम**—पु. थांगपत्ता; तपास; शोध. 'गुरें घोडीं गेलीं त्याचा दागदूम लावून ज्यांचे घरीं गुरें उमगलीं त्यांचे आंगी लाऊन लिहून पाठविलें.' -पेद ४३.२६. [ दाग-दूम ]

**दाटुका**—वि. ( महानु. ) दाटुगा पहा. दटाविणारा; दापणारा. 'दाटुका दाटुला जो:' -गस्तो.

**दाटोवाटीं**—क्रिवि. दाटून; मुद्दाम; बळजबरीनें. 'तरी प्रारब्ध बळी ये सृष्टी। अनिर्वाच्य त्याच्या गोष्टी। तें मज येथें दाटोवाटीं। नेतें उठाउठी सत्य लोका।' -भारा अयोध्या ३.४८.

**दाड**—पु. ( गो. ) एक देवचार. हा बहुधा प्रत्येक गांवीं असतो.

**दांडगा**—पु. गुंड; दंगेखोर; पुंड. 'या तीन गावीचे दांडगे भिवंडीकरांनी मेळवून चालोन येऊन कसबे मजकूरचे लोक दाहा जखमी केले.' -रा ६. पृ १३२. [ सं. दंड ]

**दाडफुरई**—स्त्री. दांतकोरणी; इकडून तिकडून खटपटीनें जमविणें; अडचणीनें प्राप्त करून घेणें. 'आतां रुपया होणें तो दाडफुरई करून जमा करितात.' -पेद १४.४५. [ दाढ+ फुरई ]

**दांडाऱ्या वेली शेज**—स्त्री. ( खा. ) वर आपल्या वधूस शकून दिवा घेऊन शोधून काढतो. नंतर वधुवरांस मांडवाबाहेर एखाद्या दालनांत केळीच्या पानावर बसवितात व शेजारीं दहा जोडपीं पदरास गांठ मारून बसवितात. नंतर सुवासिनी या अकरा जोडप्यांवर अक्षता टाकतात तो विधि. [ दांडारा= केळीची डांग+त्र-ली+शेज ]

**दांडी**—स्त्री. केशयुक्त शेपटी; वालहस्त; वालधि. -मसाप ४५.७.

**दांडी करणें**—अक्रि. ( व. ) शिवणें. 'जरीचा धोतर-जोडा नका करूं बाई! दांडी। बंधु दिवाणाची माझा। मोठयाच्या शेजी मांडी।' -वलो १०२. [ दंड ]

**दांडी मारणें**—बुट्टी मारणें; गैरहजर राहणें. [ दंड-दांडी ]

**दांड्या रास**—पु. टिपऱ्या घेऊन खेळलेला रास, नाच. -व्याज्ञा १.४०५. [ दंड+रास ]

**दाढगळी**—स्त्री. ( कुस्ती. ) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या जबडयाखालीं आपले पंजे घालून त्याची गर्दन मागें ताणणें.

**दाढणें**—अक्रि. संकटांत सांपडणें. **दाढैले**-क्रि. दाढेंत, संकटांत सांपडले. 'प्रभुचेया दादुलेपणाची सिग। देखोनि दाढैले दैत्य पतंग। कंसाचे उभणचि फुटले आंग। हातु न लावतां।' -नरुस्व ३१०.

**दाणा**—पु. ( ग्राम्य. ) मदनछत्र.

**दादड**—वि. दाट; घन. ' रसरजनां पाचिचें बुड । सोनेयांचिया शाखा पालव दादड । फळें जैसे नक्षत्रांचे घड । महरू नवरत्नांचा ॥ ' -नरुस्व ८३५.

**दादन**—क्रि. देणें. -मुधो. [ अर. ]. **दादह**-देऊन, दिलेलें.

**दादर**—पु. समुद्र कांठचा उथळ पाण्याचा प्रदेश. ' हजार स्वार व दोन हजार गारदी यांची रवानगी होऊन दोहों चहूं रोजांत वसईचे दादरावर येऊन पोंहचत तें झालें पाहिजे. ' -भारतवर्ष पत्रें यादी ६०. ' आम्ही दादरावर राहिलों. ' -रा ३.२८.

**दादरा**—पु (गो.) श्रावण महिन्यांतील एक धार्मिक विधि. यामध्यें माडाच्या पोयींत भात, दिवा वगैरे ठेवून ती समारंभानें नदींत सोडतात. [ दादर ? ]

**दान**—न. देणगी; साम, दान, दंड, भेद या उपाय चतुष्टयांतील शत्रूस धन वगैरे देऊन संतुष्ट करण्याचा मार्ग. -अवदान. [ सं. ] दाम पहा.

**दानद्**—क्रि. जाणावें. -आफ. [ फा. अव. दानंद ]

**दानाई**—स्त्री. शहाणपण. 'कलकत्त्याहून नबाब आलियावर महाराज आपले दानाई विचार करोन फिरोन दोस्तीचे विचारावर येतील ही इंज्यानेबाची उमेद आहे. ' -पेद ४१. ९९. -मुधो. [ फा. ]

**दानिश**—स्त्री. ज्ञान; शहाणपणा; शास्त्र. [ फा. ]

**दानिशाह**—अ. जाणून. -आफ.

**दापपर्याय**—पु. धमकावणी; दमदाटी; दाबदबाव. ' आम्ही सर्वांचा म्हणोन निरोप दापपर्याये आईसाहेबास सांगोन फरीदखान व चिंतो विनायक गडावर पाठविले होते. ' -पेद ६.११९. [ सं. दाप+पर्याय ]

**दापुगा**—वि. ( महानु. ) दांडगा. ' रगडित समरी दापुगे दुष्ट वैरी: ' -गस्तो ५२. [ दाडुगा ? ]

**दाबचें पाणी**—न. वायुमिश्रित जल; उदा. सोडावॉटर, लेमोनेड, वगैरे. सोडावाटर, लेमोनेड वगैरे पेयांत दाबलेला वायु मिश्रित केलेला असतो यावरून. ' उन्हाळयांत धरणी मातेवर लोळून दाबचें पाणी पिण्यांत अर्थ नाहीं हें आम्हाला पण पटलें. ' -महाराष्ट्र, मार्च १९४२. [ दाबणें+पाणी ]

**दाबरोआब**—पु. भीतिदायक देखावा; भीतीची परिस्थिति; उग्र दृश्य; धाक वाटेल असा चेहरामोहरा. ' इतक्यावर लढाई जाली असतां कसें घडेल ? हा दाबरोआब सर्वांस दिसों लागला. ' -रा ७.; -खलप १.२७. [ फा. दाब+रू+आब ]

**दाम**—पु. द्रव्य; साम, दाम, दंड, भेद यांपैकीं शत्रूस द्रव्य देऊन वश करण्याचा उपाय; लांच. [ सं. ]

**दामत**—वि. शाश्वत; अखंडित. -आफ. [ अर. ]

**दायरा, दाइरा**—पु. परीघ; वर्तुळ; कक्षा. -आफ. [ अर. ]

**दायित्व**—न. भार; जबाबदारी; उत्तरदायित्व याचा संक्षेप. ' पाठपुरावा करण्याचें दायित्व आतां मुख्यतः आहे महाराष्ट्रावर. ' -के ४.४.१९३९. [ सं. दा ]

**दार**—न. कवाड; दरवाजा बंद करण्याकरितां किंवा लावण्याकरितां केलेलें फळी, कांबटया, तट्टया वगैरेचें झडप. [ सं. द्वार ]

**दार**—गृह; घर. -मुधो. [ अर. ]

**दार-इ-सालम**—शांतताद्वार.

**दारउजजफर**—विजयगृह.

**दारकिंड**—न. ( ठाकरी. ) माशास भोंसकण्याचें एक हत्यार.

**दारंद**—क्रि. धारण करतो. -आफ. [ अर. ]

**दारवद**—न. दारिवठा; दारापुढची, दाराजवळची जागा. ' परसु व अंगण व दारवद व करवड. '

**दारवान**—पु. १ पहारेकरी. २ घरवाला. [ फा. ]

**दालदागिना**—पु. चीजवस्त. -वसमो. दागदागिना-चुकीचें वाचन अथवा मुद्रणदोष.

**दालदाचें जाळें**—न. दालदी लोक समुद्रांत जीं मोठीं जाळीं लावतात त्यांपैकीं पांचसहा फूट रुंद व ऐंशीं फूट लांब असें जाळें. हीं पाचसहा जाळीं एकत्र करून लावतात. [ दालदी+जाळें ]

**दालभ्ये**—क्रिवि. हजारहिशानें; बहुतांशीं. ' ये वर्सी राजश्री जनार्दनपंतासहि लिहिले आहे परंतु बहुधा दालभ्ये ठरणारच नाहीत. ' -पेद ३६.११९. [ सं. बहुदारभ्य-बहुदालभ्य-दालभ्य. आरभ्य या संस्कृत शब्दापासून हा बनला आहे. मागील शब्दाच्या पंचमीच्या रूपास जोडून हा येतो व त्या पंचमीचा प्रत्यय त् हा घेऊन दालभ्य अशा रूपांत वापरला जातो. जन्मादारभ्य हें रूपहि मराठींत बरेंच प्रचलित आहे. ]

**दावत**—स्त्री. मैफल; मेजवानी; पाहुणचार. ' अल्लादियासाहेबांनीं मंडळीस गाण्याची दावत देऊन मनसोक्त गाणें ऐकविलें. ' -माभू ६५.

**दावल**—स्त्री. ( महानु. ) परीक्षा; झळक. ' आचार निपुणें । दावल दाखविणें । ' [ दावणें=दाखविणें ]

**दावा**—पु. ( सोनारी. ) मासोळीचा ठसा. [ इं. डाय ]

**दाशान्**—क्रि. धारण करणें. -मुधो. [अर.]

**दाशाहअन्द**—क्रि. ठेवले आहेत. -आफ. [फा.]

**दाशाह बाशद**—क्रि. प्राप्त झाला असेल; धारण केलेलें असावें. -आफ [फा.]

**दाशाहगुदह बूद**—धारण केलेला होता. -मुधो.

**दासघडा**—पु. मिरवणुकींत कांहीं बायका डोक्यावर घडा घेतात तोप्रकार (?) 'माझ्या मुलाच्या लग्नांत दासघडा चढणार आहे तो तुझ्याच डोक्यावर.'-ज्योत्स्ना, ऑगष्ट १९३८. २५४.

**दासवंती**—स्त्री. ओडरवृक्ष; ओडूपुष्प; जपा; जास्वंद. -मसाप ४५ ३.

**दासा**—पु. (बे.) जोत्यावर खडांगाच्या ऐवजीं बसविला जाणारा दगड. दाशा पहा.

**दासेरक**—न. उंटाचें पिलूं. -सारुह ३.४७. [सं.]

**दाहिजा**—पु. दशांश; दहावा हिस्सा. 'यापैकी जो आकार होईल त्याचा श्रीस्वामीस दाहिजा देऊन बाकी ऐवज सुखरूप आनभवणे.' -पेद ३१.९९. [फा. सं. दश]

**दाही**—स्त्री. (व.) द्वाही; शपथ. 'आस्तिकाची दाही हा सर्पाची बाधा दूर करण्याचा मंत्र आहे.' [सं. द्वाहि]

**दाही**—स्त्री. डाव; हार. 'गोसाविया खेळतां जीयावरि दाही ये तेयाचिए पाठीवरि अरुढण करीतिः' -लीच १.३३. [दाव-डाव]

**दाहुडणें**—अक्रि. आटोपणें; संपणें; निरोप देणें. 'त्यावरी दरबार दाहुडला.' -पेद ११.१२. [फा.]

**दिङ्निर्णययंत्र**—न. होकायंत्र. [सं]

**दिंड**—न. उंसाच्या चरकाची लाट. [का.]

**दिंड**—नांगरणीनंतर ढेंकळें फोडण्याचें वजनदार हत्यार. [का.]

**दिंडा**—वि. (ल.) फार मोठी; वाजवीपेक्षां मोठी. 'ही नवरी दिंडा झाली आहे.' [कान. दोड्ड ?]

**दितीदिती**—क्रिवि.] जोरानें; घाईनें, धापा टाकीत (पळणें). 'कशाला उन्हांत दितीदिती पळत आलास.' [सं. द्रुत द्वि.]

**दिनमेक**—पु. दिवसगत. विलंब; दिरंगाई. 'तुमच्या मारफर्ताचा कारभार आसोन यैवजास दिनमेक न व्हावा.' -पेद २८ २७९. [सं. दिनम्+एक]

**दिनायत**—स्त्री. मुसुलमानी धर्मशिक्षण. -के १७.३. १९३९. [अर.]

**दिपकणें**—अक्रि. दिपणें. [सं. दीपनम्]

**दिमडी**—स्त्री. एकतारीबरोबर साथ करण्याचें चर्मवाद्य: डफडी. [ध्व. दिंडी]

**दिलपसंत**—न. धेंडसें; एक चक्कीसारखें भाजीचें फळ. [फा.]

**दिवडा**—वि. देहुडा; दिडका; एक पाय पुरता टेकलेला व दुसऱ्याचा केवळ आंगठा टेकून बाकीचा वांकडा धरलेला अशी स्थिति. 'उजवा हात पारावर ठेवून पाय दिवडा करून कसा प्रतिबंध करीत आहे.' -प्रतिआत्म ४७३. [दीड]

**दिवशी अमावास्या**—स्त्री. (कर्ना.) दिव्याची अमावास्या; आषाढ वद्य अमावास्या. या दिवशीं दिव्यांची पूजा करतात. **दिवशी पूजा**-स्त्री. (कर्ना.) दिव्यांच्या अमावास्येच्या दिवशीं करावयाची दिव्यांची पूजा. हीस ठाणवई पूजा म्हणतात. [सं. दीप+अमावस्या=पूजा]

**दिवसवड**—न. दररोजचें वेतन; रोजमुरा. 'चौकीदारासी बहुत खायापियास दिवसवड उदंड देऊन त्यास राजी ठेविले.' -पेद २८;१०२. [दिवस+वृत्ति]

**दिवा लावणें**—शिडीच्या खेळांत भट्टा रेषेजवळ पडला असतां त्याजवळ भट्टा लावून खेळणारास अडचण उत्पन्न करणें. 'खेळणारांपैकीं एकजण भट्ट्याजवळ त्या रेषेवर आपला भट्टा लावतो. यास दिवा लावणें म्हणतात.' -व्याज्ञा १.१५१.

**दिवाळशीप**—न. (ठाकरी.) एक पांढरें रानफूल; (कृष्ण कमलासारखें).

**दिवीदिवी**—स्त्री. एक वनौषधि.

**दिव्योदक**—न. वर्षाजल; पावसाचें भांड्यांत धरलेलें पाणी. [सं. दिव्य+उदक]

**दिशादाह**—पु. दिशा आरक्त होणें; दिशा पेटल्याप्रमाणें क्षितिजाजवळ आकाश आरक्त होणें. 'चार घटकापर्यंत लाल असते. मागती निवलते. दिशादाह होतो. दुछिन्न आहे.' -पेद २२.२६४. [सं. दिशा+दाह]

**दिशायंत्र**—न. होकायंत्र. 'दिशायंत्र रुपें वजन तोळे ।≈' -पेद २२.१९५. [दिशा+यंत्र]

**दीगर**—वि. दिगर पहा. अन्य; दुसरा. -आफ.; -मुधो. [फा.]

**दीडतांदुळ**—पु. (लक्षणेनें) स्वतःचा बेत; आपलें कार्य. 'नाहींतरी तिचा नेहमीं दीड तांदुळ निराळाच असतो.' [दीड+तांदुळ]

**दीन**—पु. धर्म. -मुधो. [अर.]

**दीबाचह-चा**—पु. प्रस्तावना; उपोद्घात. -आफ; -मुघो. [फा.]

**दीवानी**—दिवाणी पहा.

**दीक्षान्त भाषण**—न. पदवीदानप्रसंगीं पदवीधरांस उद्देशून केलेलें भाषण; स्नातकाची दीक्षा देण्याच्या प्रसंगीं केलेलें भाषण. -के १२.११.१९३७. [सं. दीक्ष+अन्त+भाषण]

**दीक्षिणी**—वि. व्रतस्थ स्त्रिया; पतिव्रता. 'कुमारी तापसा दीक्षिणी। वेधें भूललिया चक्रपाणी। तेथ पाठीं धावती गौळणी। हे काइ बोलों॥' -नरुस्व ३३५. [सं. दीक्षा]

**दुअंगी**—वि. दुहेरी; दोन्ही बाजूंनीं; दोन प्रकारांनीं उपयुक्त; परस्पर विरुद्ध गुण असलेलें. 'आजपर्यंत संगीतांत किंवा गद्यांत दत्तोपंतांच्या तोडीचें दुअंगी असें सव्यसाची पात्र झालेंच नाहीं व पुढें तरी होईल किंवा नाहीं याची वानवाच आहे.' -गणपतराव जोशी पृ. १५३. [दु+अंग]

**दुआजबी, दुआसबी, दुहजबी, दुहसफी**—वि. (दुहसबी पहा). १ दोहोंकडे लागू पडणारा; दुटप्पी; दुहेरी उपयोगी. 'कोणत्याहि दोन उपयुक्त गुणांचा एकाच जनावरांत प्रकर्ष झाल्यास त्यास दुआजबी जनावर म्हणतां येईल.' -के ३.११.१९३६. २ दुदील; दुटप्पी. 'आपण श्रीमंतांस दुअसफी लिहिलें होतें.' -पेद १९.१०२; 'प्रस्तुत मुरारजी घोरपडे याचा शेह भारी, तर मुलें दुआसबी आहेत.' -पेद २४.१५७. ०**मन**-द्विधा मन. 'अनुकूल पूर्वग्रहांत बुडालेलें असून शिवाय पूर्वग्रहांतून स्वतःस मुक्त करून सत्य शोधनास सत्पात्र होण्यास समर्थ मन.' -के ११.५.१९३७.

**दुआरी भोंवरा**—पु. दोन आरींचा भोंवरा. -व्याज्ञा १.१५७.

**दुकटें**—न. जुळें. [दुं=दोन+कट]

**दुकाळ**—पु. वाईट दिवस; दुष्काळ. 'दुकाळीं कष्टानें रोपट्याची जपणूक केली तरच तें सुकाळीं फोफावतें.' -के १८.९.१९३६. [सं. दुर्+काल]

**दुगाणा**—पु. प्रार्थना करतांना म्हणजे नमाज पढतांना मध्यंतरीं जे वांकून नमस्कार करावयाचे असतात तसे दोन नमस्कार. 'निमाज व दुगाणा झाल्यानंतर काजीस खिलत दिला.' -भारतवर्ष, अखबार, दिनचर्या ७. [फा. दुगानह्]

**दुग्रह**—पु. वाईट मत. 'संतांविषयीं नवशिक्षितांत अनेक दुग्रह झाले आहेत.' -मवाड २. [सं. दुर्-दु+ग्रह]

**दुघडपण**—न. (व.) द्वैत; परकेपणा. 'ताव्याच्या पालामंदी रंगीत साडया दोन। आपला दुघडपण। नाहीं लोटत हें मन॥' -वलो २५.

**दुजाणणें**—अक्रि. मानणें; मान देणें; जुमानणें. 'परंतु अंतर्यामी यासहि दुजाणत नाहींत.' -रा १.५. [दु+जाणणें]

**दुट्टा**—पु. जोर; दट्टया. 'मागून वाऱ्याचा दुट्टा व पुढून वृक्षाची ओढ.' -के ४.७.१९४१.

**दुडाळी**—वि. द्विदल; दोन डाळिंब्या असणारें. [सं. द्वि-दु+दल-डाळ]

**दुंडा**—पु. खळयाच्या भोंवतीं कडब्याचा घातलेला बांध. -मशा फेब्रु. १९३५.

**दुतोंडी**—वि. दोहीं बाजूंनीं बोलणारा. 'पुनः ती (माता) दुतोंडी (वाईट अर्थानें नव्हे) असावी लागते. पिता व पुत्र या दोघांच्याहि बाजूनें बोलणारी पाहिजे.' -के ३०.१२.१९४१.

**दुदगें**—न. लहान वासरास दूध जास्त झाल्यामुळें होणारा रोग. [सं. दुग्ध-दूध]

**दुदनी**—स्त्री. एक वनस्पति; दुग्धिका; क्षीरावी. -मसाप ४५.३. [सं. दुग्ध]

**दुदेह**—वि. दोन गांवांतील. 'इनाम जमीन चावर दीड दर सवाद दुदेह पा। मजकूर.' -रा २०.१११. [फा. दु+देहे]

**दुद्दा**—स्त्री. एक प्रकारची जोड तलवार. -प्रश ३६.

**दुबरी म्हैस**—एक मुलांचा खेळ. -मखे ६१.

**दुबाला**—वि. स्वाधीन. दुमाला पहा. -आफ.

**दुब्बालह**—पु. हवाला. -मुधो. [अर.]

**दुभत्याचें घर**—न. दुभाळ गाई वगैरे ठेवण्याचा गोठा, व शेत वगैरे. 'लार्द ब्रेदालबनचें दुभत्याचें घर आहे तेथपर्यंत आम्ही गेलों.' -राणीचें पुस्तक २१. [इं. डेरी यास प्रतिशब्द] [दुभतें]

**दुभाषी-सी**—वि. दुतर्फी. द्व्यर्थी (बोलणें); एकदां एक एकदां एक असें (बोलणें); मेळ नसलेलें. 'कारभार तो दुभासी आहे. अंतःकर्णापासून नाहीं.' -पेद १२.९०. [दु+भाषा]

**दुमेंत-ध**—न. गलबताच्या तुळया. -आंघइ ३७९.

**दुमाला**—पु. तलवारीच्या मुठींत गडलेला भाग. -प्रश ५३.

**दुरग मरगी**—स्त्री. एक रानटी जात. हे कडक लक्ष्मी-नाडलक्ष्मीचें सोंग काढून भीक मागतात.

**दुरगव्वा मरगव्वा**—स्त्री. या दोन क्षुद्र देवता असून यांचा उत्सव गांवांत पटकीचा उपद्रव झाल्यास करतात. [दुर्गा+मरगी]

**दुरंगी**—स्त्री. एक मुलांचा सोंगट्यांचा खेळ. -मखेपु १८५.

**दुराखई**—स्त्री. मुलींच्या सागरगोट्यांच्या खेळांतील एक डाव. एका वेळीं दोन खडे उचलून घेऊन वर फेंकलेला खडा झेलणें. -मखेपु ३३२. [सं. द्वि-दुरा+खई]

**दुराद्रष्ट**—न. दुर्दैव; अभाग्य; दुर्भाग्य. 'त्यास श्रीचे चित्तास येऊन लोकांचे प्रजेचे दुराद्रष्ट तदनुरूप येसा विचार घडोन आला.' -पेद ३.९०. [सं. दुर्+अदृष्ट]

**दुरासह**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. -प्रश १५.

**दुर्योधनी हट्ट**—पु. हेकेखोरपणा; आत्यंतिक दुराग्रह; कधीं न सुटणारा हट्ट. दुर्योधनानें पांडवांस एका सुईच्या अग्रावर मावेल इतकी मृत्तिकाहि देणार नाहीं असा हट्ट धरल्यामुळें कुरु पांडवांचें भारतीय युद्ध होऊन कौरवांचा नाश झाला त्यास अनुलक्षून. 'बिहारच्या अदूरदर्शी गव्हर्नरानें व त्याच्या सल्लागारांनीं दुर्योधनी हट्ट धरून हें रणक्षेत्र उत्पन्न केलें.' –के ३०.१२.१९४१.

**दुर्रेह**—पु. मोती. -आफ. [अर. दुर्र]

**दुर्वाड**—पु. (महानु.) दुःख. 'काइसया दुर्वाड भोगता.' -अज्ञातच ५८.

**दुवाझदह**—वि. बारा; द्वादश. -आफ. [फा.]

**दुवारणी**—स्त्री. दुसरी नांगरट. -चित्रकृषि २.६.

**दुव्वुम**—वि. दुसरा. -मुधो. [अर.]

**दुःसंबळ**—वि. (महानु.) पराधीन. 'तो काई सावाधावा न करी जी दुःसंबळ विप्रवसु जी:' -अज्ञातच २४.

**दुसर**—न. जोखड.

**दुसवटा**—पु. दुसोटा पहा. एकाच जमीनींत एका पिकामागून लागलीच घेतलेलें दुसरें पीक. 'रानांत सजगुरे दहा ठिकीं होतीं तीं मोडिलीं दुसवटा पेरतील.' -रा ३.४३२.

**दुसी**—पु. कापडविक्या. 'दुसीं दिंडें घेतलीं थोरें।' -भारा अयोध्या १२.५४. ०**मुसी**-पु. वस्त्रवाले; कापडवाले. 'निद्राले दुसीमुसी साळीमाळी। चाटेभाटे तेली तांबोळी।' -भाराध्या अयो ८.११८. [दुस=वस्त्र, द्वि.]

**दुहरावणें**—सक्रि. पुन्हा सांगणें; पुनरुक्ति करणें; दुसऱ्यानें सांगणें. 'तव्हां बहुतेक ममतेनें पूर्वीं वचनें दिधलीं आहेत तीं दुहराहून बोलोन त्यांणीं उत्तर दिलें कीं.' –रा १२.१८. [दु+हार]

**दुहुळा**—पु. घोटाळा; घालमेल; गडबड. 'प्रतिनिधि आदिकरून राजकारणाचा दुहुळा करावयास गेले आहेत.' -पेद २५.९. [डोहणा पहा]

**दूटी**—स्त्री. (महानु.) पासोडी; दोनपटी. 'मेघवर्णी दूटी' -प्रमा ६. [सं. द्वि-दु+पट=वस्त्र]

**दूत**—न. (व.) भविष्य. 'हें दूत मला पूर्वीच कळलें होतें.' [?]

**दूदमान**—पु कुल. -आफ. -मुधो. [फा.]

**दूरंदेशी**—स्त्री. दूरदृष्टि; दूरदर्शीपणा. 'दादासाहेब याजकडील जमेत भारी आपला निभाव पडणार नाहीं...... ही दूरंदेशी माधवराव साहेब चित्तांत आणिली.' -मदरु २. ८९. [फा.]

**दृग्यंत्र**—न. दुर्बीण. [सं.]

**दृष्टिदोष**—पु. १ नेत्रविकार; मनुष्याच्या पाहण्याच्या शक्तींत उत्पन्न झालेला विकार. २ विशिष्ट गोष्टीकडे पाहण्याच्या दृष्टिकोनांत असणारा विकार; विशिष्ट हेतूनें एखाद्या गोष्टीकडे पाहिल्यामुळें तिचें खरें स्वरूप दृष्टीस न पडतां विकृत स्वरूप दिसणें. [सं.]

**देकारी**—स्त्री. जें मागेल तें देऊन टाकण्याची वृत्ति. [देणें+करणें]

**देखतभूल**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३७२.

**देखली बुधी करणें**—पाहून वर्तन करणें; परिस्थितीप्रमाणें वागणें; प्रसंगास अनुलक्षून वर्तन करणें; वेळेवर योग्य प्रकारें वागणूक ठेवणें. 'पत्राचे उत्तराची वाट पाहातो उत्तर आलें म्हणजे देखली बुधी करू.' -पुद २.२५९. 'तुमचे युक्ती न आले(तर)उत्तर करू नका. त्यातच आम्ही समजोन देखली बुधी करून पुणियास जाऊ.' -पुद २.२५४.

**देखी**—स्त्री. दृष्टि. 'देखि लागे।' -सारुह २.

**देगंदाज**—पु. तोफ डागणारे. –पेम ५३२. [फा.]

**देंडावणें**—अक्रि. (व.) जड होणें; आळसावणें. 'आज आंग जरा देंडावल्यासारखें वाटतें.'

**देंडुभ**—न. (महानु.) माडूळ; एक जातीचा साप. 'देंडुभ आंगीचिया चाप लागती। सहस्त्रमुखेंसी सरी करी दुर्मती।' -जांस्व.

**देवऋषि**—पु. मांत्रिक; मंत्रतंत्रादि तोडगे करणारा. [सं. देव+ऋषि]

**देवकार्य**—न. विवाहपूर्व दिवशीं उभय पक्षीं कुलदेवतेचा प्रसाद व्हावा म्हणून करावयाचा विधि. –लविसो ११८. [सं.]

**देवकुळें**—न. अव. मृतांच्या पुतळयांचीं संग्रहस्थानें. [सं. देव+कुल]

**देव घालणें-पडणें, देवस्थान घालणें-पडणें**—देवाची प्रार्थना करून त्याजकडून शत्रूस पीडा करणें; देवामार्फत शत्रूचा नाश करणें; देवस्की करणें.' –पेंद्य ५९.

**देवचेंडू**—पु. पांच किंवा अधिक गडयांनीं चेंडूनें खेळावयाचा खेळ. –मखेपु ५८.

**देवडबा**—पु. (ब.) चोरगल्ली; एक मुलांचा खेळ. -मखेपु ५८.

**देवडी**—स्त्री. सैन्याच्या तळावरील तंबू. -पेम ५२१.

**देवडोंगरी**—देवडांगरी पहा. देवताड. –मसाप ४५.३.

**देवढामार**—पु. भडिमार; एकसारखा, सतत मार; लागोपाठ मारा. 'तोफा लागू जाहल्या असल्या तरी देवढामार करणे म्हणोन लिहिले. तरी संध्याकालीच तोफा लागू करून च्यार आवाज केले.' -पेद १६.९७. [देवढा+मार]

**देवदिशा**—स्त्री. उत्तरदिशा; याच्या उलट पितृदिशा म्हणजे दक्षिणदिशा.

**देवराहाटी**—स्त्री. देवाची जाळी; देवाकरितां राखलेलें दाट जंगल. 'कांहीं गांवीं देवराहाट्यांची दुरुस्ती करण्याचें ग्रामस्थांनी ठरविलें.' –बलवंत २८.८.१९४०. [देव+रहाटी=जाळी]

**देवलसीण**—स्त्री. देवांची पुजारीण; अंगांत येणारी स्त्री; प्रश्निका; ईक्षणिका; दैवज्ञा. [सं. देवलसी]

**देवांग**—पु. एक विणकर जात; कोष्टी.

**देवापाया**—पु. (राजा.) देवळाचा पाया.

**देविणें**—सक्रि. देण्याचें योजणें; यावयाचें निश्चित करणें. 'यासी मौजे मजकूरपैकीं रुपये पन्नास देविले आहेत. देण्याची आज्ञा करणें; अदा करणें.' –पेद ७.३४.; 'ब्राह्मणास सामग्री पाहिजे त्यास पेशजीचे मोइनीप्रमाणें नारो जनार्दन याजकडून देविले आहे तेथन आणवावें.' –पेद ९.५८. [सं. दा; म. देणें-देवविणें]

**देव्हारबडवा**—पु (महानु.) पूजारी. 'सर्वे हडपु सागळिया सुआरू । देव्हारुबडुवा दिवटा वेचकरू । भांडारी भोई मादुरी चवरधरु । हे दाही जण ।' –नरुस्व ६९५.

**देव्हारसर**—न. (महानु.) देवघर. 'पारतिलीए कस्तुरे चिंये बोवेरी । तेथ कुंकुमाचा देव्हारसरी । चांदिणेयाचा अरुवारीं । सुतली ते ॥' –नरुस्व ५७८.

**देशक**—न. देसक पहा. गांवचे वतनदार वगैरे. 'अवघे देशक बरोबर आहे.' –रा ३.६४.

**देशगावडा**—पु. देशकुळकर्णी. 'खंडोजी बिन दमाजी थोरात देशगावडे प्रा पुणे ता जुनर येथील देशगावडकीचे वतन तुम्ही व तुमचे वोशपरंपरेने आनभऊन वतनाची सेवा करून आसगें.' –पेद ३१.५५. [देश+का. गौडा]

**देशगावडकी**—स्त्री. देशकुळर्ण्याचें वतन. वर पहा.

**देशाळणें**—अक्रि. देशस्थितीस अनुसरून असणें. 'पं. जवाहिरलाल यांचे भाषण लखनौ येथील भाषणापेक्षां पुष्कळच देशाळलें होतें.' –के ५.१.१९३७.

**देश्य**—वि. देशज; देशांतील; स्वदेशी. 'देश्य लोकांशीं एकजीव झालीं.' [देश]

**देसाउर**—वि. खेडवळ; अडाणी. 'प्रथम देसाउर माणसानें आपल्याला तारेनें पाठवावयाचा मजकूर लिहून काढावयाचा.' –के ८.३.१९४०. [देश]

**देह तुटणें**—आजारी पडणें. 'कवीस्वर बासांचे देह नावेक तुटले आन म्हणितलें:' –वृद्धाचार १९.

**देहधर्म**—पु. (महानु.) शरीर वयाप्रमाणें जर्जर होणें; केंस पांढरे होणें; अंगाला सुरकुत्या पडणें वगैरे. –वि १०६. [सं.]

**देहविदेवी**—क्रिवि. गांवोगांव, गांवगन्ना. 'जे तिसाला देह विदेवी जमा खंडणी त्याचा वसूल तेरीखवार किर्दी सिलीकबंद आणणें.' –पेद २.६८. [फा. देहे+वि+देहे]

**देहस्थान**—न. कबर; थडगें. –चढा १०.

**देहळी**—स्त्री. (महानु.) देहली; उंबरठा. –बटी.

**देहात**—स्त्री. अनेकवचन. गांव. एकवचन **देह; देहे.** –आफ. [फा.]

**देहाती**—वि. खेडवळ; ग्राम्य. 'ही देहाती कॉंग्रेस हिंदी जनतेचें प्रतीक आहे.' –के १.१.१९३७. [फा.]

**दैत्यवेळ**—स्त्री. तिनीसांजा. –श्याआ. [सं. दैत्य+बेला]

**दैनंदिन**—क्रिवि. प्रतिदिवशीं; दररोज; प्रतिदिनीं. [सं. दिन+दिन]

**दैनंदिनी**—स्त्री. प्रतिदिवस घडणाऱ्या गोष्टी लिहून ठेवण्याची वही, प्रथा, हकीगत वगैरे. (इं.) डायरी. [सं. दिन+दिन]

**दैवकीन**—दैविक याचें स्त्रीलिंगी रूप. दैविक पहा.

**दैवऱ्हाट, दैवऱ्हाटी**—स्त्री. (महानु.) दैविक मार्ग; निवृत्ति मार्ग; दैव राहाटी.

**दैविक**—पु. (महानु.) एकनिष्ठ परमेश्वर भक्त.

**दोखरणें**—अक्रि. घोगरा आवाज होणें. 'त्यांचा घसा दोखरल्यामुळें ते रेकून बोलत होते.' –माभू ८५.

**दोखा**—पु. (व.) १ साथ. 'या प्रकारच्या तापाचा दोखाच निघाला आहे अलीकडे.' २ नवीन रीत; टूम. 'हा दोखा प्रथम काढला तुम्ही [?]

**दोमला**—पु. अर्धा हिंदु व अर्धा मुसलमान पिंजारी. –के ४.२.१९४१.

**दोगांडें**—वि. दुहेरी उपयोगाचा. 'हें वावर दोगांडें आहे जवारी काढल्यावर त्यांत हरभराहि होऊं शकतो.'

**दोघट**—वि. दुर्घट; अवघड; कठिण. 'दोघट तो भारी आहे परंतु विना जबरदस्ती पैसा देत नाहींत बास उपाय काय करावा?' –पेद २९.९९. [सं. दुर्घट]

**दोजक**—पु. नरक. 'चांडाळाशी खावया दोजकामधी । मेवा लाविला असे ।' –योसं १८.२९९. [फा.]

**दोणा**—पु. पोर्तुगीज शिपाई. (डोण्या, डोणा पहा). 'ते महागिरी मुंबईहून वरते साहा दोणे घालून पाणी जोखावयास पाठविली.' –पेद ३४.६१. [पोर्तु. दों. Don]

**दोरेकार**—पु. ब्राह्मण; सूत्रधारी; जानवें घालणारा; सूत्रधारी. [दोरा+कार]

**दोरीसूद**—क्रिवि: दोरीसूत पहा; सरळ; फेरफार न करतां; क्रमानें. 'सगळ्या अधिवेशनाचें वेळापत्रक दोरीसूद रीतीनें ठरवून बसलेल्या लोकांना ही सोइस्कर सूचना कशी पटावी?' –के १.३.१९३८.

**दोस्तीदाया**—पु. मैत्री; मित्रत्वसंबंध; मित्रत्वाचें नातें. 'तुमची आमची दोस्तीदाया म्हणून बोलाविलें, आलों, जाला मजकूर सांगितला.' –शामब भारतवर्ष ३१. [ फा. दोस्ती+दाइया=इच्छा ]

**दोहरणें**—अक्रि. १ दुआई देणें; जाहीर घोषणा करणें. 'दोहरून ती म्हणाली.' २ पुन्हां सांगणें; दुसऱ्यांदा सांगणें. –वेटिंगरूम.

**दोहरी**—स्त्री. पासोडी. [ दुहेरी ]

**दोहिरी**—वि. (व.) दुप्पट; दुगुणी. 'गोरीला लागे पान। नाग गव्हाळ्या मुहीऱ्या। वाऱ्या चालूं या दोहिऱ्या।' –वलो ४८. [ दो+हार ]

**दौडि**—स्त्री. वस्त्र. 'दोनी आंगीया: माथां: दौडि: तेयावरि पासौडी पांगुरले.' –लीच ३. पृ. ७८. 'दौडि: फेड फेडविली.' –लीच ३. पृ. ७९.

**दौरान**—पु. काल; युग; चक्र. –आफ. [ अर. ]

**दौलतखाह, दौलतख्वाह**—पु. ऐश्वर्येच्छु; हितेच्छु; दौलतीचे शुभ इच्छिणारे. 'राजश्री तुकोजी चव्हाण मायेचे माणूस व दौलतख्वाह आहेत. यास या स्थलास एका दो दिवसांत रवाना करणार आहेत.' –पेद २५.२९९. [ फा. ]

**दौलतखाही, दौलतख्वाही**—स्त्री. साम्राज्येच्छा; उत्कर्षाभिलाष. 'माझे दौलतख्वाहीचा सिलसिला कायम करावा.' –रा ७. खलप २.३४. 'रयेती आपले रजामंदीनें राखे व दौलतख्वाहीस तकसीर न करी दौलतख्वाही केलियान दौलतख्वाहीचा नतीजा पोहचल.' –पेद ३१.२५. –आफ. [ अर. ]

**द्रव्यवश**—वि. लांचखाऊ. 'वर्तमानपत्रें सामान्यतः द्रव्यवश नसतात ही गोष्ट मान्य आहे.' –गुजगो ८४१.

**द्राक्षांचा घड**—पु. एक मुलींचा खेळ. –मखेपु ३४२. [ सं. द्रक्ष+वश ]

**द्रागौ**—पु.अने. दुतर्फाचे; दोन पक्षांकडील; मध्यस्थ; दोहोंच्या दरमियानचे. 'रामाजी गोसावी व वरकड द्रागौ आहेत त्याचे फर्मान इनामाचे करून यावे कलम.' –पेद १०.१. [ सं. द्वि+गम् ]

**द्राडी**—स्त्री. बहिणीची मुलगी, भाची. [ध्राडी ]

**द्वादशाक्षरी मंत्र**—पु. 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र. [ सं. ]

**द्वार निधणें**—यात्रेहून परत येणाऱ्यांस सामोरें जाऊन त्यांची मिरवणूक काढणें. पूर्वी महायात्रा करून येणें म्हणजे एका जीवावरच्या साहसांतून निभावून येणें असें मानीत असत. याकरितां अशा यात्रेकरूंचें सामोरें जाऊन स्वागत करीत.

**द्विम** —पु. बाणाचा एक प्रकार. –प्रश १९. [ सं. ]

---

# ध

**ध**—पु. धैवत हा गायनांतील सहावा स्वर.

**धक**—वि. योग्य; लायक; सिद्ध. 'हें काम करावयास धक आहेत. तरी यांस वाडियाचे कामावरी ठेऊन काम घ्यावे.' –पेद ९.३. [ ? ध्व. ]

**धकवणें**—अक्रि. कंठणें; काढणें; घालविणें. 'आई मोलमजुरी करून कसे तरी दिवस धकवीत होती.' –मशा जाने. १९३७.

**धकार**—पु. धश्चोट; धनशेट वगैरे. ज्याच्या आरंभीं ध हें अक्षर आहे असे.

**धग**—स्त्री. धास्ती; हरकत; आडकाठी. 'दहा वर्षे जगण्यास त्यांना अजून धग नाहीं.' –खेस्व ४०. [ध्व. ]

**धगटी**—स्त्री. १ तट; तीर; कांठ (नदीचा). २ शेवट; अंत.

**धज**—स्त्री. तगादा; नेट. 'राजश्री यशवंतराव रघोजीबावासी बरी धज लाविली आहे कीं याणी येंदा आम्हाखेरीज कामकाज केले तर काये चिंता आहे.' –पेद ६.२९. [ सं. ध्वजा ]

**धजाव**—पु. निभाव; वाढ; वर्धन; टिकाव. 'निबंधमालेच्या पायावर बरींच मासिकें निघूं लागलीं, परंतु त्यांचा धजाव पुढें कसा काय होणार, हें आज सांगणें कठिण आहे.' –निबंधचंद्रिका उपोद्घात २. [ धजणें ]

**धडधूत**—वि. धट्टाकट्टा; मजबूत. 'परंतु त्याची सरदारी ओढगस्त व ते चाकरीस धडधूत या संकोचानें पैका माफ केला.' –भारतवर्ष पत्रें यादी ४४. [ ध्व. ]

**धडपडया**—वि. खटपटी. [ धडपडणें ]

**धडमुसळया**—वि. आडदांड; दांडगा; धसमुसळया.

**धडवंत**—वि. शहाणा; विचारी; ऐश्वर्यसंपन्न; गुणी.

**धडसोबती**—पु. स्थिरस्नेही; चिरमित्र; कायमचा स्नेही. 'तेहि आमची धडसोबती आहेत.' –पेद ३.१८. [ धड+सोबती ]

**धतरफतर**—क्रिवि. थातुरमातुर; कशीतरी समजूत करून. 'लोकांस चार गोष्टी सांगून धतरफतर करून कूच मात्र करविलें.' -पेद २८.१३६. [ ध्व. ]

**धंदीर**—न. पोकळ गोष्ट; अनिश्चित घटना; अशाश्वत बनाव. 'निंबाळकर ये काये ठिकाणें देतील हें होणें नाहीं. ठाणें हस्तगत व्हावयाचें धंदीरच आहे.' -पेद ३०.२४०. [ धांदरा पहा ]

**धंद्र**—न. घोंटाळा; अर्धवट स्थिति; गुंता. 'छावणीस सरदार ठेवावयाचें धंद्रच आहे.' -पेद ३७.२०९. धंदीर पहा.

**धनवरी**—क्रिवि. (महानु.) धणीभर पहा. तृप्त होईपर्यंत. 'बोरें धनवरी खादले असती :' -अज्ञातच ६१.

**धनी**—स्त्री. धनीण; धन्याची स्त्री. 'स्वामीचें आपलें भाषण जाहलें तितकें सविस्तर धनीस सांगितलें. स्वामीची तबियत फिरली म्हणोन धनीस सांगितलें.' -ब्रह्मेंद्रनिधन बखर, भारतवर्ष ६. [ धनीन-धनी ]

**धनुरासन**—न. (मल्लखांब.) बोंडावर कमान टाकून पायांनीं मल्लखांब तटवून धरणें. -व्याज्ञा ३.२३६. [ सं. धनुः+आसन ]

**धनुष्यासन**—न. (मल्लखांब.) मल्लखांबाचें बोंड पायांच्या अटींत धरून एक पाय लांब करून त्याचा आंगठा हातांत धरावा व दुसऱ्या हातानें दुसऱ्या पायाचा आंगठा धरावा. -व्याज्ञा ३.२४५. [ धनुष्य+आसन ]

**धप्पाधप्पी**—स्त्री. चिंध्यांचा चेंडू घेऊन मारामारी करण्याचा खेळ. -मखेपु ५९. [ ध्व. ]

**धमकुसु**—पु. कल्होळ; हल्ला; घोष; नाद. 'धमकुसु घालिताती मांदळी । वंशवीणें वाताती कहाळी ।' -नरुस्व १०३५. [ ध्व. ]

**धम्म**—वि.क्रिवि. मुग्धः मुकाट; गप्प, स्तब्ध. 'मास्तरीणबाई धम्म बसल्या होत्या.' -खदे. [ ध्व. ]

**धर**—पु. (महानु.) आधार; आश्रय; टेका; खांब. 'अडल्यासी धर'; 'धर्मी धर दीजे.' -सिमू. [ सं. धृ=धारण करणें ]

**धर**—पु. कांठ. 'रांजणगांवीं एका शेतांतील विहिरीचे धरावर एक वाघ बसला होता.' -के २४.९.३५. [ सं. धृ ]

**धरतरी**—स्त्री. (व.) पृथ्वी. 'किती अस्तुरी गांजली। गांजली परोपरी । जागा देवाजीच्या घरीं । भेटे न धरतरी ।' -वलो ९३. [ सं. धरित्री ]

**धर्मपाल**—पु. खड्ग; तलवारीचा एक प्रकार. -प्रश १५. [ सं. ]

**धर्मपाळ**—पु. झाडावर राहणारा धर्मरक्षक, देव, भूत, मुंजा, वगैरे. [ सं. धर्मपाल ]

**धर्माचा जीव**—मोठया संकटांतून पार पडलेला; मोठया शर्तीनें वांचलेला.

**धवधनी**—स्त्री. (महानु.) धणी पहा. तृप्ति. 'अमृत धवधनी पूरिली विश्वबाणीः' -गस्तो २४.

**धवलागिरी**—पु. खड्ग; तलवारीचा एक प्रकार. -प्रश १५. [ सं. ]

**धस**—पु. बारीक तूस; पापुद्र्यासारखा भाग. 'कागदाचे धस निघून ते छपाई होतांना रुळावर किंवा शाईंत मिसळतां कामा नयेत.' -के ३०.३.३७. [ ध्व. ]

**धाऊ**—न. एक प्रकारचें गलबत. [ इं. ढौ ]

**धांगा**—पु. गलबताचा एक प्रकार.

**धाडधडसपणा**—पु. धाडस; हिम्मत; साहस; पराक्रम. 'ही कर्मे धाडधडसपणाची आहेत केवळ आज्ञा प्रमाण म्हटल्यानें कार्य कसे होते.' -पेद १६.१५. [ धाडस ]

**धाडा**—पु. (गो.) एक स्त्रियांचा सण.

**धाडा**—पु. फाटा; गुंगारा. (क्रि. देणें). 'फिरंगियांनीं धाडा दिला.' -वसमो. [ धाड ]

**धांडाळें**—न. (महानु.) धंदा; व्यसन; उठाठेव; काम. 'अनेका धांडाळे याचा येथ असो नेदावे.' -उच १.

**धाडेती**—पु.अने. धाड घालणारे; दरवडेखोर. 'धाडेती लोकहि तिनें लावून दिलेल्या देणग्यांवर धाड घालीत नसत.' -देवी श्रीअहल्याबाई ३१०. [ धाड ]

**धाणेरा**—पु. दांडोरा; दवंडी. 'आज धाणेरा पिटला कीं जरिदें स्वारी सांगाते येणे व रांड पोर कोन्ही सांगात न घेणें व दाणा चौचौ दिवसाचा घेणें.' -पेद ३८.५२.

**धातुपाक**—पु. शरीरांतील धातूंत (कोष्टांगांत यकृत, फुप्फुसें इत्यादींत) तापानें सूज येऊन पू उत्पन्न होणें.

**धातुपौष्टिक**—वि. शरीरांतील धातू पुष्ट करून त्यांचें संवर्धन करणारें (औषध). [ सं. धातु+पुष्-पुष्ट ]

**धांदरट**—वि. घाबरा; गोंधळ्या; बडबड्या. [ धांदल ]

**धादा**—पु. हल्ला; हरकत; अडथळा (करणारा). 'त्यास कोणी धादा पाठविला तरी ज्याप्रमाणें दीक्षितांचे वेळीं साहित्य लोकांचें होत असे त्याप्रमाणें करीत जाणें.' -रा ३.५१९. [?]

**धानमटया**—स्त्री.अव. भाताचीं शेतें; भाताचें पीक. 'मुलकांत कही घालून रागीची शेतें व धानमटया कापून आणून गांव लुटून आणतात.' -पेद २८.२४३. [ धान=भात+मट्या ]

**धाबकधुबक, धाबाधुबी**—पु.स्त्री. चिंध्यांचा चेंडू घेऊन मारामारीचा खेळ; बदाबदी. -मखेपु ५९. [ ध्व. ]

**धावडा**—वि. १ एकमार्गी; सरळ; साधा. २ साधें; विशेष रंग, रस नसणारें. 'आमचें आपलें धावडें भजन कोणास पचंत पडेल न पडेल.' भावडा पहा.

**धामट**—वि. धामा पहा. ओंगळ; घाणेरडा.

**धायजा**—'एक वाहन (?) 'बेबी महाराज धायजांतून परेड ग्राऊंडवर आल्या.' -के ४.७.४१.

**धायवरी**—क्रिवि. तृप्ति होईपर्यंत; पोटभर. 'मग धायवरी केलें खावविलीः' -लीच ३ पृ ४. [ सं. धाया=तृप्ति ]

**धारकरी**—पु. समर्थसंप्रदायी संत. याच्या उलट 'वारकरी.' धारकरी हे प्रवृत्तिमार्गी असत.

**धारकोर**—स्त्री. लांकडाच्या धारा व कोरा; लांकूड कामाची बरोबर सफाई. -**धारेकोरेचा**-वि. ज्याचें लांकूडकाम सफाईदार आहे, ओबडधोबड नाहीं असा. 'तेथें एक पांच खण उत्तम धारेकोरेचा लिंबाचा उत्तम लांकडाचा कां होईना पण सोपा, तेवढेंच माजघर.' -प्रतिआत्मच ३१२.

**धारणा**—स्त्री. बाजाराचें धोरण; व्यापाराचा अंदाज; दराबद्दल अंदाज. [ सं. धृ-धारण ]

**धारबंद**—वि. जेर; पराभूत; त्रस्त. 'अबदूल रहीम खानजादे याणी सिद्दी याकुबखान यास धारबंद करून आपण तख्तनिसीन जाले.' -पेद ३२.१४७. [ धारा+बंद ]

**धारबळ**—वि. बिनहिशोबी; घोटाळयाचा.

**धारसा**—पु. धीर; आधार; उपराळा. 'पुढें आम्ही यात्रा सोडून फौजसुद्धां यात्रेस धारसा दिला.' -पेद २१. १०२. [ धर ]

**धाराग्नि**—पु. अग्निहोत्र; सतत अग्नि धारण करण्याचें व्रत. [ सं. धारा+अग्नि ]

**धाराग्निवाला**—पु. अग्निहोत्री. -डोंतु २.३८.वर पहा.

**धारादामोदर**—न. धारागृह; जलमंदिर. 'धारांचे दाटेति सायार। परि झगटौनि फुटेति तुषार। जैसे भूमी उदकाचे गुढर। तैसें तें धारादामोदर॥' -नहस्व ४३२.

**धाराळ**—वि. मोकळा; खुला. 'आपले गड किल्ले मजबूत करून फौजमात्र दाखऊन देयीनासे राणांत दबऊन ठेवून अफजलखान येणारास त्याचे फौजेनिशी धाराळ सोडून देणें.' -तंजाशिला ३३.

**धारुकें**—न. (महानु.) वस्त्रविशेष; कपडा. 'चीर धारुकें.' प्रभा ८.

**धारुकें**—न. (महानु.) पाण्याची लहान मशक; पात्र. 'पव्हे धारुकें.' -प्रभा १४. [ सं. धृ=धारण करणें ]

**धारेवट**—पु. आराखडा; धोरण; कल्पनाचित्र; ठोकळ वर्णन. 'कितेक मसलतीचा धारेवट लिहिला आहे तो कळला.' -रा १२.१७१.

**धारेस लागणें**—प्रवाहांत सांपडणें; प्रवाहाबरोबर वाहूं लागणें. 'नांव धारेस लागली.'

**धार्य**—न. अग्निहोत्र; स्मार्ताग्नि; रोजचें अग्निकार्य; होम वगैरे. धाराग्निव्रत. 'बुधवारी राजश्री मोरो विश्वनाथ धडफळे यांणीं धार्य घतलें. अग्नसिध केला असे.' -रा २ पृ १४. 'श्रीमंत राजश्री बाबासाहेब याचे धार्य करावयाविसी लेहून पाठवून उत्तर आणावे म्हणून बाईसाहेबाची आज्ञा झाली.' -पेद ४.११. 'श्रीमंत राजश्री बाबासाहेब यास धार्या अग्नि निमित्त अग्निस दक्षिणा व पिंडपितृयज्ञ वगैरे मिळोन सालिना शंभर रुपयांत करावे म्हणोन आज्ञा जाली.' -पेद ४६१. [ सं. धृ ]

**धांवत**—स्त्री. महत्त्वाकांक्षा; उडी; आकांक्षा; हौस; मनांतील इच्छा; हेतु. 'नानाची धावत मात्र पुरावी असे भावे नानानीच कारभार करावयाचा डौल आहे किंवा कांहीं फिके पाडावयाचे तऱ्हेने आहे हेंहि लिहून पाठविणें.' -पुद १.२४६. [ धांवणें किंवा धाया ]

**धास्तदपट**—स्त्री. धाकदपटशा; भीति दाखविणें; जरब. 'यद्यापि येखादे अंतर जाहले अशिले तर धास्तदपट करून आणावा.' -पेद ३३.१५. [ धास्ती+दपटणें ]

**धिगाई**—स्त्री. धिटाई; पुंडावा; बंडखोरी. 'देव ब्राह्मणांचाहि उच्छेद आरंभिला आहे व वसईकडील आज दोन वर्षे धरून त्या उद्योगावरहि आहेत; त्याप्रमाणें धिगाई आरंभिली आहे.' -पेद ४०.५८.

**धीडरी**—पु. अव. धिरडीं. 'तुम्ही येथ आपुलेचि हातें धीडरी करा.' -शिच ३ पृ ५७. 'मग तेहि डाली दळुनि भीजत आपणाचि वांटावि आपणचि धिडरी करावी.' -लीच.

**धीरज**—पु. धीर; धैर्य. 'शोध करुनि पाहे, धीरज मौल्य वस्तु आहे.' -महानुभावी म्हणी. [ सं. धीर. ]

**धुडफुड**—वि. धुडफुडा पहा.

**धुंडमारी**—स्त्री. बारीक शोध; धुंडणें; कसून शोध; तपास. 'तरी त्वां पृथ्वी करावी निक्षेत्री। धुंडमारी करोनिया।' भारा बाल १६.१५४.

**धुडाडा**—वि. (महानु.) कष्ट; धास्ती; दुःख. 'देखौनि धुडाडा। वाटताया।' -अभंग.

**धुतलें**—वि. स्वच्छ; निर्मळ; स्पष्ट. 'आपला जाबसाल कच्चा पक्का राखून धुतलें ठेवलें असते म्हणजे त्यासहि उमज पडता.' -पेद १९.९३. [ धुणें ]

**धुंद**—स्त्री. गडबड; दंगा; कटकट; बंडाळी; अंदाधुंदी. 'बुंधेले यार्णी बहुत धुंद आरंभिली, जागा जागा किल्ल्यांस मोर्चे लाविले.' -रा ३.१९०. [ ध्व. ]

**धुंदरा**—पु. गवत, लांकूड इ.ची गंजी. 'रात्रीं मशाली पेटविण्यांत आली धुंदरे जळण्यांन आले.' -सह्याद्रि सप्टें. १९४१.

**धुंदा**—पु. एक जातीचें कबूतर.

**धुंधुकणें**—अक्रि. (महानु.) धुरानें वेष्टित होणें; भडकणें. 'क्रोधे पावक धुंधुके नयन तें:' -गस्तो ८४.

**धुपधुपीत**—वि. स्वच्छ; धुतलेल्या; शुद्ध केलेल्या. 'ऐसिया विटाळा परी। श्रीराम अंतरला दुरी। धुपधुपीत पाकाभीतरीं। कर्मअहंकारीं गुंतलें॥' -भारा बाल २७४१.

**धुपार**—न. धुकें. 'मराठयांच्या सैन्यावरहि हें धुपार पसरलें.' -दुरं २०३.

**धुपावणें**—अक्रि. (व.) धुतला जाणें; स्वच्छ होणें. 'सीतेला वनवास। सासु कैकइनं केला। रामाच्या रामटेकी। बरड धुपावला॥' -वलो १४. [ धुपणें, धुणें ]

**धुमाकस**—स्त्री. लहान आगबोट. 'शुद्ध भागीरथींत आगबोट चालत नाहीं; धुमाकस म्हणजे लहानशी आगबोट मात्र चालते.' -माप्र ४४.

**धुम्मा**—क्रिवि. धूम; जोरानें; तडक. 'धुम्मा पळाला.' -गोश्या.

**धुर**—स्त्री. धुरी; बैल जोतास वाहण्याचा काळ, वर्ष वगैरे. 'बैल किती धुराचा असेल? पाठीवर थाप मारून तर पहा.' -खेस्व, ६५. [ सं. धूः, धुरा ]

**धुरणें**—अक्रि. धूसर होणें; धुक्यामुळें वगैरे अस्पष्ट दिसूं लागणें. 'मग पावसाच्या धारांतून धुरणाऱ्या डोंगराची शिखरें दिसेनाशीं होऊन बरसात सुरू होते.' -पाणकळा ३.

**धुरंधार**—क्रिवि. (बायकी.) अतिशय. 'पाऊस धुरंधार पडला.'

**धुरा**—पु. पावलाच्या वरचा भाग. 'याचा धुरा उंच आहे. हा जोडा पायांत येत नाहीं.'

**धुराजरा**—पु. तंबाखूचा अगदीं बारीक चुरा.

**धुला करणें**—अक्रि. खेळखंडोबा करणें; नाश करणें; उधळणें. 'अलाव्यांत हैदोस घालून आपल्या हिंदुत्वाचा धुला करूं या.' -के २.४.१९३७. [ मोहरमांत दुला दुला, धुला धुला असे शब्द करून ओरडतात, नाचतात, यावरून ]

**धुले**—वि. शूर; प्रतापी. 'नांवाचे ज्ञानराव धुले.' -ऐपो २.२११. [ दुल्ला पहा ]

**धुवा**—पु. (व.) धूर. 'अहुळी नार मेली। गेला सरगांत धुवा। घात लेकरांचा झाला। काय केले तुवा देवा॥' -वलो ८४. [ सं. धूम्र-धूर ]

**धुळधोई**—पु. एक मुसलमान जात; झारेकरी; हे सोनाराच्या दुकानांतील धूळ वगैरे धुऊन त्यांतून सोनें काढतात. -के ३.६.४१. [ धूळ+धुणें ]

**धुळवाफ**—स्त्री. प्रत्यक्ष पाऊस पडण्यापूर्वीं कोरड्या जमीनींतच पीक पेरणें. कोंकणांत भात पेरतात त्याप्रमाणें. [ धूळ+वाफ ]

**धुळाक्षर**—धूळाक्षर पहा.

**धूप**—स्त्री. धुपण्याची क्रिया: पावसाळयांत पाण्यामुळें शेतांतील माती वगैरे धुवून जाते ती. 'जमिनीची धूप कशी थांबवावी याबद्दल माहिती देण्यांत येते.' [ धुणें ]

**धूपावणें**—न. (महानु.) धुपाटणें. -गस्तो २१.

**धूपी**—पु. १ धूप जाळणारा; धुपाटणें धरणारा. २ धूप वगैरे सुगंधी पदार्थांचा व्यापारी, दुकानदार. 'हडपी, बारी व्यवहारी। जळप्राशक धूवा फुलारी।'-भारा. अयोध्या ८.४४.

**धूस**—पु. वाळूच्या पोत्यांचा तट. 'कानपुरास गंगातटांत धूस रचून आंत गोरे राहिले होते.' -ज्ञाको (न) २१५. -माप्र ४२.

**धेडीसूत**—न. पूर्वी बाजारांत धेड लोकांनीं कांतलेलें सूत विकावयास येत असे त्यास म्हणत. [ धेड+सूत ]

**धोटकें**—न. धोकटें पहा. 'तांबोळीं बांधलीं आटकीं। ब्राह्मणीं बांधिलीं धोटकीं।' -भारा. अयोध्या १२.५६.

**धोटा**—पु. गांजाचा अंमल; गांजा पिणें; गांजाचें व्यसन.

**धोडी**—स्त्री. भांडीं घडण्याचें तांबटाचें हत्यार. 'तांबटास भांडी घडावयाची धोडी कल्याणास आहेत म्हणून विदीत जाहले. यैसियास येथे धोडी नाहींत.' -पेद ९.६४.

**धोबट**—न. धोपटमार्ग; धोरण; सरळ मार्ग. 'सारांश येका धोबट सरल विश्वास ठेवून कारभार करते करून घेते तर सर्व चांगले होते.' -पेद द. ११९. [ धोपट ]

**धोरड**—पु. धुरा. दोन शेतांमधील बांध किंवा सीमा, म्हणजे दोन्ही शेतांच्या दरम्यान सोडलेली, न नांगरलेली व न पेरलेली पड जमीन. 'त्याजखाले पूर्वाभिमुख घोरड मान्वाडास आडसरावरी आला...वाट खाली ता लवण तेथे धोरड पूर्वाभिमुख गेला आहे. -रा १८.१. [ धुरा ]

**धोरवा**—पु. धोरण; धारणक्रिया; ठेवण्याचें धोरण. 'आम्ही कार्या कारणे कमी जाजती सिबंदीचा धोरवा धरून आहो.' -पेद ६७.११२. [ धृ-धरणें=धारणें ]

**धोरिणता**—स्त्री. पुढारीपणा; धुरीणत्व. 'दोन हजार माणूस जमाव त्याजपाशी आहेत. धोरिणता हरयेक प्रसंगास बाबूराऊ याजवरीच आहे.' पेद ३.१८०. [धुरीणता]

**धोलासन**—न. एक आसन. हे पुढीलप्रमाणें करावयाचें असतें. उताणें निजून पाय डोक्याकडे पाठीमागें नेऊन उजव्या हातानें डाव्या पायाचा आंगठा व डाव्या हातानें उजव्या पायाचा आंगठा धरावा. -व्याज्ञा ४.५०४.

**धौ**—स्त्री. (महानु.) गेरूचा रंग; काव. 'धौ घालावी.' -स्मृति

**ध्याजत**—स्त्री. नामुष्की; अप्रतिष्ठा; फजीती. 'एकादे जागा सेवक जातीनसी खर्च होईल. परंतु ध्याजतीनें तोंड दाखवील ऐसें नाहीं.' -पेद १६.७७. [?]

**ध्याड**—पु. (कुण.) दिवस. उदा. ध्याडसारी=दिवसभर; रातध्याड=रात्रंदिवस.

**ध्याय**—कु. (कुण.) देह.

**ध्रुव**—पु. नाकाचा शेंडा; नासिकाग्र [सं.]

**ध्रुवभोग**—पु. ध्रुवताऱ्यापासून नक्षत्र ग्रहादिकाचें अंशात्मक अंतर. [सं.]

**ध्रुवांक**—पु. गणित करतांना प्रथम सुरुवातीस एखादा अंक गृहीत धरण्यांत येतो त्यास म्हणतात. [सं. ध्रुव+अंक]

**ध्वनिलेखक**—पु. ध्वनि लिहून घेणारें किंवा अंकित करणारें यंत्र.

---

# न

**नकर्दह**—न केलेला. -आफ. [फा.]

**नकशान**—न. (कु.) नराणी; नखें काढावयाचें हत्यार. [नख; नखजान]

**नकसीरी**—स्त्री. शत्रूच्या नाकावर केलेला वार. -मवि ९.११.

**नकादह**—सार. -आफ. [फा.]

**नकीकस**—स्त्री. १ (कुस्ती.) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या खाकेंतून हात घालून मानेवर आणून त्याचे हात धरून जवळ जवळ खेचणें. २ (मल्लखांब.) एक हात पाठीकडून आणून व एक हात वर धरून त्यांत मल्लखांब पकडून मारावयाची उडी; मुसकबंद. -व्याज्ञा ३.५९.

**नकीब**—पु. बगदादमधील मुख्य धर्मगुरु. -मुमुमु.

**नकुलांग**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. -प्रश १५. [सं.]

**नक्कारह**—पु. नगारा. -मुधो. [अर.]

**नक्कीमूठ**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखेपु २६.

**नक्दियाद**—स्त्री. नकद. -आफ. [फा.]

**नक्रासन**—न. (मल्लखांब.) बोंडावर ताजवा करून हात पाय जुळवून लांब करून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२३७.

**नक्श**—स्त्री. आकृति. -मुधो. [अर.]

**नखचित्र**—न. कागदावर नखाच्या साहाय्यानें काढलेलें उठावदार चित्र. [नख+चित्र]

**नखचित्रकला**—स्त्री. नखानें चित्र काढण्याची कला.

**नखा, नख्खा**—पु. तरवारीचें पातें मुठीस जोडलेलें असतें त्या ठिकाणीं मुठीच्या पात्यावर येणारा टोंकदार भाग. -प्रश ५५. [नख]

**नखुल्या**—स्त्री. नखुली पहा. एक मुलींचा खेळ. -मखेपु २२२. -व्याज्ञा १.३८०.

**नगदी साल**—न. सारा वसुलीचें साल. एप्रिल ते मार्च अखेर वर्ष.

**नगारी**—पु. एक मुसलमान जात. हे ताशा, ढोल, वगैरे वाजवतात. -के ३ ६.१९४१. [नगारा]

**नंगी**—स्त्री. पायाचा खूर. 'आमच्या बैलाच्या नंग्या झिजल्या आहेत. वेळींच पत्र्या मारून घेतल्या पाहिजेत.' -खेस्व १७१.

**नगीन**—पु. आंगठीवरील खडा; नगीना पहा. -आफ. -मुधो. [फा.]

**नजरनछावर, नोच्छावर**—स्त्री. नजराणा; ओवाळणी. 'सर्वांनीं धन्यता देऊन विश्वासरावांस मोठ्या आदरानें नजरनछावर केली.' -दुर्ं १३९. [फा.]

**नजरबाज**—पु. नजर ठेवणारे; टेहळे; गुप्तपोलीस. -पेद् २०. [फा.]

**नजाबत**—स्त्री. महानुभावित्व; उमरावी; महत्त्व; उदारता. -आफ. -मुधो. [अर. नजीब]

**नटरंगी**—वि. नाटकी; खेळी; लपंडाव खेळणारी. 'काय बाई नटरंगी मुलगी ही.' -चित्रवंचना ९८. [नट+रंग]

**नटुली**—वि. (व.) ठेंगणी; लहानसर. 'माहेरा मी जातें बाई। शिंपीण सयाबाई। आखुड धर बाही। नटुली भावजई॥' -वलो ९६. [नट]

**नडगी**—स्त्री. दोन्ही पायांच्या नळ्यांवर वार. -मवि ९.१५. [नडगी=पायाचे नळ]

**नडघेमोड**—स्त्री. उभी दरड; जेथें चढतांना ढोपरांस नडग्यांस लागण्याचा संभव असतो अशी चढण. (अशी नडघेमोड लकडी पुलापाशीं होती). 'उमाबाई दाभाडी पुणियांत

नडघेमोडीपाशीं डेरे देऊन राहिली होती तेथें वारली.' -रा ६, पृ ९९.

**नतकाल**—पु. ( फलज्यो. ) सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काल, [ सं. ]

**नतपर्व**—पु. बाणाचा प्रकार. -प्रश १०.

**नंद**—वि. ( सांके. ) नऊ ( नंद नऊ होते यावरून ). [ सं. ]

**नदहंद**—देऊं नये. -आफ. [ अर. ]

**ननंदुली**—स्त्री. नणंद; नंदुली पहा. 'नांदारूनी आंगणीं। चिमण्या पाणी पिती । तोंड ननंदुल्या धूती।' -वलो २. [ सं. ननांद ]

**ननुमायंद**—दाखवूं नये. -आफ. [ अर. ]

**नन्हग**—स्त्री. सुसर; नक्र; मगर. -आफ. [ अर. ]

**नफरत**—स्त्री. तिरस्कार. [ अर. ]

**नफरीन**—पु. इनकार. -आफ. [ अर ]

**नफवणें**—अक्रि. (महानु.) १ न शोभणें. २ न सांपडणें. 'हें तेयासि नफवे.' -वि ११५. [ न+फावणें ]

**नबीरह**—पु. नातू. -मुधो. [ अर. ]

**नबेदा**—अक्रि. ( अहिराणी. ) अदृश्य होणें. -अहिभाषा व संस्कृति २५. [ नभून ]

**नब्वियय्यह**—प्रेषितासंबंधीं. -मुधो. [ अर. ]

**नभोनाटिका**—स्त्री. श्राव्य नाटिका; नभोवाणींतून ऐकविली जाणारी नाटिका. -के २७.९.१९४१.

**नमक**—पु. मीठ.

**नमक**—पु. शतरुद्रीयस्तोत्रांतील पहिला भाग. यांत रुद्राची स्तुति असून नमो शब्द वारंवार येतो. दुसरा अर्ध चमक; यांत चमे हा शब्द वारंवार येतो. [ सं. नमः ]

**नमस्कारदंड**—पु. दंडाचा एक प्रकार. यांत दंड काढल्यावर बसून हात जोडून नमस्कार करावयाचा असतो. -व्याज्ञा ४.४९.; ४.१०८.

**नमाजबंद**—पु. ( कुस्ती. ) एक डाव. प्रतिपक्षी खालीं असतां त्याचा एक हात आपल्या पायांच्या कचाटींत, बगलेंत पकडणें.

**नमीकुनन्द**—क्रि. करीत नाहीं. -आफ. [ फा. ]

**नमूदह**—अ. दाखवून. -आफ. [ फा. ]

**नमूदहइंद**—क्रि. दाखवीत आहां. -आफ. [ फा. ]

**नयाबन्दह**—वि. न. मिळालेला. -आफ. [ फा. ]

**नरडपेच**—पु. गळोटी; जनावराच्या गळयास होणारा रोग. [ नरडी+पेच ]

**नरनंदी**—पु. मनुष्य रूपानें वावरणारा बैल; नरपशु. 'नरनंदी हे लक्ष्मीनंदन त्याजभोवतीं तुम्ही जमतां।'-शारदा. [ नर+नंदी ]

**नरपुंगव**—पु. नरश्रेष्ठ; श्रेष्ठ पुरुष; मनुष्यांत वरचढ उत्तम, अग्रणी. [ सं. ]

**नरमगरम**—वि. १ मवाळ-जहाल. २ तेजी-मंदीचा.

**नरसोबा**—पु. ( ल. ) रागीट, तापट मनुष्य. नरसिंह ही देवता उग्र आहे यावरून.

**नरेंद्रमंडळ**—न. हिंदुस्थानांतील संस्थानिकांस सल्ला देणारी संस्थानिकांची एक सभा. -के १९.२.१९३७. [ सं. नर+इन्द्र+मंडळ ]

**नर्मसाचिव्य**—न. खुशामत; लाळघोटेपणा. 'असलें नर्मसाचिव्य आम्हीं केलें नाहीं.' -आगर १०४.

**नर्वादारी**—स्त्री. ( गुज ) खोतीपद्धतीप्रमाणें एक भडोच जिल्ह्यांत चालू असलेली धारापद्धति. यांत धारा शेतकऱ्यावर किंवा शेतावर प्रत्यक्ष न बसतां नर्वादाराबरोबर ठरविण्यांत येतो. [ फा. ]

**नवगडधा**—पु. जुलूमजबरदस्ती; दंगा; गडबड. 'सेटियावर जुलूम जाला. नवगडघा होतो म्हणून सांगावयासहि आले होते.' -पेद २२.२९५.

**नवचंदरी म्हैस**—स्त्री. ज्या म्हशीस चार पाय, एक डोळा, एक आंचूळ व तोंड, शेपटी आणि कपाळ हीं पांढरीं असतात अशी म्हैस. -नवाकाळ ७.३.१९३४. [सं. नव+चंद्र]

**नवदाई**—स्त्री. तंटा; बखेडा; विघ्न; हरकत. 'पैका सुरळीत देत नाहीं. नवदाई करितो, कुले फितावितो, ऐसे जाहीर जाले.' -पेद ३१.१५.

**नवनिगादास्ती**—स्त्री. नवीन देखरेखीकरितां ठेवलेले लोक, वगैरे तजवीज; पैरवीकरितां ठेवलेले नवीन लोक, वगैरे व्यवस्था. 'नवनिगादास्तीपैकीं कितेक लोकांच्या हजऱ्या आजपर्यंत नवत्या त्या जारी जाल्या.' -रा ७.७१. [ फा. ]

**नवमत**—न. नवीन मत; सुधारणावादी मत; अर्वाचीन मत. [ सं. नव+मत+वाद ]

**नवमतवाद**—पु. जुन्या मतांमध्यें सुधारणा झाली पाहिजे, समाजामध्यें नवे विचार, नवे आचार सुरू झाले पाहिजेत असें प्रतिपादणारें मत.

**नवमतवादी**—वि. नवीन नवीन मतें प्रतिपादन करणारा; सुधारक. [ सं. नव+मत+वादी ]

**नवरा**—पु. लंगडीच्या खेळांत पाय दमले म्हणजे आपल्याकरितां धांवावयास गडी मागून घेतात तो. -के २.३.१९४५. [ सं. नवमर ]

**नवशे ( प्रेक्षक )**—वि. नवीन; प्रथम आलेले; प्रथमतःच आलेले; नवठ. [ सं. नव. ]

**नवसा**—पु. मुलीचा मुलगा; मुलीकडून नातू. ' हिदायत मोहिदीनखान नवसा म्हणजे मुलीचा मुलगा लढत असतां त्या लढाईंत महंमदखान कडप्याचा नबाव यानें गोळी घालून नाशिरजंगास मारिलें.' -रा २.११९.

**नवसारणें**—अक्रि. ( महानु. ) सजविणें; भूषविणें. ' राउळगण विचित्रारंगीं नवसारिजेः ' -ध्यान नवसरणें पहा.

**नवाझिश**—स्त्री. मेहेरबानी; कृपा. नवाजीस पहा. -मुधो. [ फा. ]

**नवाह**—पु. सान्निध्य.

**नविश्त**—क्रि. लिहिला. -आफ. [ अर. ]

**नविश्तह**—अ. लिहून ;लिहिलेलें. -आफ. [ अर. ]

• **नवी नवरी**—स्त्री. नववधू; नुकतेंच लग्न झालेली स्त्री. [ नवी+नवरी ]

**नवें पाणी**—न. पावसाळा; बरसात. ' नव्या पाण्याच्या वेळीं बाहेर पडणाऱ्या कुत्र्याच्या विषाप्रमाणें चोहोकडे पसरला आहे.'

**नशावन्द**—क्रि. होऊं नये.

**नशिस्त**—क्रि. बसला. -मुधो [ अर. ] -**नशिस्तह**-अ. बसून.

**नष्ट**—न. नष्टाई पहा. दुष्टपणा; कपट; दगलबाजी. ' आम्हांसी नष्ट करावें ऐसें तुम्हास उचित नाहीं.' -रा ३.६. [ सं. नश्-नष्ट ]

**नष्टजातक**—न. ज्याची जन्मवेळ माहीत नाहीं अशा मनुष्याची जन्मपत्रिका करण्याचें शास्त्र. [ सं. नष्ट+जातक ]

**नष्टांश**—वि. निर्वंश; बेवारस; ज्याचा मागें कोणी वारस राहिला नाहीं असा. [ सं. नष्ट+अंश ]

**नसतरंग**—पु. गळ्याच्या शिरांवर वाद्य ठेवून शिरा फुगवून वाजविण्याचें एक वाद्य. [ नसा+तरंग ]

**नहुफ्त**—स्त्री. लपणूक. [ फा. ]

**नळनळणें**—अक्रि. तटाटणें; तरारून दिसणें; स्पष्ट दिसणें. ' त्याचें पोट भकाटीस गेलें होतें व त्याच्या गरगडया नळनळत होत्या.' -उपेअंत ६८. [ नळ ]

**नळीचें वस्त्र**—न. ( महानु. ) नळयांत ठेवलेलें सरूर वस्त्र. ' वस्त्र श्रावणीचें तथा नळीचेंः ' -प्रभा ७.

**नळीतेड**—निशोत्तर; एक वनौषधि.

**नक्षत्रबाण**—पु. बाण उंच उडाल्यावर तो फुटून त्यांतून निरनिराळ्या रंगाचे तेजस्वी गोळ निघतात असें दारूकाम. [ नक्षत्र+बाण ]

**नक्षत्रवृष्टि**—स्त्री. उल्कापात; आकाशांतून अनेक तारे तुटून पडणें. [ सं. ]

**नाक**—पु. नाईक याचें संक्षिप्त रूप. हें महार, बेरड वगैरेंच्या नांवापुढें लावतात. उदा. रामनाक, सिदनाक. [नायक]

**नाककरंटा**—वि. अभद्र; कंगाल; अपशी; नीच. ' आतां रडत आरडत बसायचीच ना या नाककरंटया धाकटया भावानं वेळ आणलीय ? ' -आभाळाची सावली २२२. [ नाक+करंटा ]

**नाकझाडणी**—स्त्री. कानउघाडणी; खरडपट्टी; फजीति. ' यामध्यें नाकझाडणी झाल्यासारखें झालें व त्याचा परिणाम पुढील चमत्कार घडून आला तो होय.' -वियाभिवृद्धि १६२. [ नाक+झाडणें ]

**नाकनिपट**—स्त्री. १ शब्दशः शेंबूड काढणें; नाक साफ करणें. २ ( ल. ) पश्चात्ताप; निस्तरानिस्तर; सावरासावर. ' भलत्याला भलतेंच काम सांगून तें बिघडल्यास आपल्यालाच नाकनिपट करावी लागते.'

**नाकपकड**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३४३.

**नाकफोड**—स्त्री. लाठीचा नाकावर केलेला वार. -लाखे. [ नाक+फोडणें ]

**नाकर चळवळ**—स्त्री. करबंदीची चळवळ; कर न देण्याविषयीं चळवळ. [ ना+कर+चळवळ ]

**नाकलंगडी**—स्त्री. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३१६.

**नाकिर**—मौक्तिक शुक्तींतील कालवाच्या शरीरांत मोत्या-प्रमाणें चमकणारा द्रव पदार्थ.

**नाखिव**—वि. ( महानु. ) कोरीव; खोदीव; कोंदणांतील. ' नाखिवें.' -ऋद्धी ५०.

**नाग**—पु. ( काश्मिरी. ) झरा. -काश्मीरचा प्रवास.

**नागनादिया**—स्त्री.अव. ( महानु. ) एक अलंकार; नागाच्या आकाराचें भूषण. ' कोण्ही रायमंडळीकु विन्हावे असती तेहि अंगणीं सरी, मुद्री, नागनादिया घालौनि पहाती.' -अज्ञातच.

**नागपुरी आंकडा**—पु. कापडावर, जिन्नसावर घात-लेला आंकडा. ज्यामध्यें कांहीं बाद आहे असा किंमतीचा आंकडा, संख्या.

**नागफड**—स्त्री. नागफणी पहा. फडया निवडुंग.

**नागमोडी शर्यत**—स्त्री. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३०६.

**नागरपाटा नेसणें**—( लहान मुलीस म्हणतात ) नग्न असणें.

**नागरिक दल**—न. नागरिकांचें संरक्षक सैन्य.

**नागरिक स्वातंत्र्य**—न. नागरिकांचें भाषण, लेखन वगैरे करण्याबद्दचे सर्व हक्क. 'नागरिक स्वातंत्र्यापलीकडे कॉंग्रेस कसलेंच धोरण स्वीकारीत नाहीं.' -के २७.९.१९४०.

**नागसंस्कृति**—स्त्री. नाग लोकांची संस्कृति. [ सं. ]

**नागहांन**—क्रिवि. एकदम. -मुधो. [ अर. ]

**नागीण**—स्त्री. हृदयाजवळील शिरेचा एक रोग. नागिणीचा वळसा पूर्ण झाला म्हणजे मनुष्य मरतो अशी समजूत आहे. [ सं. ]

**नाचण्यांची मळणी**—स्त्री. नाचण्यांची मळणी लवकर होत नाहीं, दाणे पडण्यास फार वेळ लागतो, यावरून रडगाणें, पिरपिर, तोंडाची टकळी, वगैरे.

**नाचपोचा**—पु. पोटरी व घोटा यांमधील भाग. 'पोटरी नाचपोचाच्या ७५ टक्के मोठी.' -के २६.१.१९३७.

**नाजिम**—पु. व्यवस्थापक. -मुधो. [ अर. ]

**नाजूक**—वि. अवघड; बंदोबस्तीची. 'येवेंक्रमेण जागा बहुत नाजूक. मोर्चेबंदी बरी मजबुत कोलिया विना गनीम आयास येणार नाहीं.' -पेद १५.८१.

**नाजूक संबंध**—पु. प्रेमसंबंध.

**नाझारती**—स्त्री. ( पुश्तु. ) अफगाणिस्तानांतील मंत्रिमंडळ. -सिंश.

**नाटक**—न. पराक्रमाचें कृत्य. 'लघूशी परी मूर्ति हे हाटकाची। करावी तया मारुती नाटकाची।' -रामदास, छत्रपतीस उपदेश. [ सं. ]

**नाटी**—स्त्री. ( महानु. ) नाट्यकाराची वृत्ति. -भाए. [ सं. नाट्य ]

**नाट्यकाव्य**—न. अनेक पात्रांच्या तोंडीं घातलेलें काव्य; संवादात्मक काव्य. [ सं. नाट्य+काव्य ]

**नाडलक्ष्मी**—स्त्री. कडक लक्ष्मी; मरी आई. [ नाडा+लक्ष्मी ]

**नाडहब्ब**—पु. नवरात्रोत्सव; भूमीचा उत्सव. 'नाडहब्ब म्हणजे नवरात्रोत्सव कर्नाटकांत अत्यंत उत्साहानें व सार्वजनिक रीतीनें साजरा केला जातो.' -के २४.१०.१९३९. [ का. नाड=देश+हब्ब ]

**नाडी**—स्त्री. ( ठाकरी. ) मासे मारतांना बुरदुलांत घालण्याची नळकांडी.

**नाडें**—न. शीड. -आंघइ ३७९.

**नाणें सांगणें**—चितपट करणें; ओली सुकी मागणें. ( एक नाणें वर फेंकून खेलतात व पुढची कीं मागची बाजू असें हेरण्यास सांगतात त्यावरून ). 'रामस्वामी यांनीं नाणें बरोबर सांगून पश्चिम हिंदुस्थान संघाला क्षेत्ररक्षणास पाठविलें.' -के.

**नात्रें**—न. मोहतुर; पाट.

**नाद**—पु. भोवऱ्याचें आपल्या भोंवतीं फिरणें. -व्याज्ञा १.१५७.

**नादानादी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखेपु १०७.

**नादुकर्णी**—स्त्री. तुणी; कुणी; काल; कालांतक. -मसाप ४५.४.

**नादौलतख्वाह**—वि. राज्याविषयीं अनिष्ट इच्छिणारा. -मुधो. [ अर. ]

**नांधा, नांदा**—पु. बैलाचें चित्र असलेला इंदुरी पैसा. [ नंदी ]

**नानकानासाहेब**—पु. नानक या शीख धर्मसंस्थापकाच्या जन्मस्थानीं असलेलें गुरुद्वार. -के ८.११.१९३५.

**नानागर्दी**—स्त्री. १८५७ सालचें युद्ध. या युद्धांत नानासाहेब पेशवा ( दुसरा ) प्रमुख होता यावरून. ( पानपतच्या भाऊगर्दीप्रमाणें प्रयोग ). 'नानागर्दीच्या वेळीं शिखांनीं प्रथम प्रथम उचल केली होती.' -ज्ञाको १७. 'मीरत शहरीं नानागर्दीचा स्फोट झाला.' -नाब.

**नानीचा भतीजा**—दूरचें नातें; दूरान्वयसंबंध. 'मुसलमानांना केवळ नानीचा भतीजा म्हणून नोकरीवर घेतलें जातें.' -के १.१२.१९३९. [ नानी+भतीजा ]

**नाफिजगश्तह**—काढून. -आफ. [ अर. ]

**नामआवर**—वि. प्रसिद्ध; नामवर. -आफ. [ फा. ]

**नामजाद**—पु. मामलेदाराची पदवी. -दिमरा. [ फा. ]

**नामधारी**—पु. दक्षिण कर्नाटकांत ताडांना खांचा पाडणारा. -उद्यम जाने. १९३६. ६०.

**नामना**—स्त्री. ( कर. ) प्रसिद्धि; लौकिक; कीर्ति. 'त्याची नामना कोल्हापुरा.'

**नामर्जी**—स्त्री. गैरमर्जी; नाखुषी; असंतोष.

**नामा**—पु. १ रोजनामा; दैनंदिनी; तवारीख; रोजनिशी. २ इतिहास; वंशेतिहास; उदा. शहानामा. 'पेशव्यांनी मोगल बादशहाप्रमाणें नामे लिहिले नाहींत.' -के १३.१२.४०.

**नामुनाहि**—वि. अनंत; अगणित. -आफ. [ अर. ]

**नामुरादी**—स्त्री. नाराजी; असंतुष्टता. 'डोंगरावर लोक व सरदार होते त्यानी नामुरादीने कौल मागितला.' -पेद ३७.२२५. [ फा. ]

**नामुसाअदत**—मदत नसणें. -मुधो. [ अर. ]

**नामेवाहि**—स्त्री. सूची. -के ९.६.१९३६.

**नामोहोर**—वि. गुप्त; तोंड दाखवीनासा; नाढळ; तोंड लपविलेला. 'नामोहोर जाले आहेत त्यास अहमदाबादेस

आहेत म्हणोन हुजूर विदित जाले.' -पेद १९.१०७. [ना+मोहरा]

**नाम्ना**—स्त्री. नामना पहा. प्रसिद्धि; लौकिक; नांव. 'ज्यांणीं परंपरेनें एकनिष्ठपणें सेवा करून या राज्यांत आपल्याला नाम्ना संपादिल्या.' -मराआ. 'राज्याधिवृद्धि करून आपली नाम्ना करून घेतली.' -बावडा दप्तर ८५.

**नायक**—पु. संगीतशास्त्र व कला यांत प्रवीण तो. -संशक २५.

**नायकवाडी**—पु. एक मुसलमानी जात. -के ३.६.४१.

**नार**—स्त्री. पाभरीची नळी; पाभरीची फण; पन्हाळ. पाभरींत एकपासून तों दोन, तीन नारी असे प्रकार आढळतात.' -ज्ञाको (क) ६७१.

**नारसिंह**—पु. फेंदरट; पसरट नाकाचा मनुष्य. (सिंह हा फार रुंदट नाकाचा दिसतो यावरून).

**नारळ देणें**—वधूपित्यानें वरपित्यास नारळ देऊन त्याचा स्वीकार झाला म्हणजे विवाहनिश्चय झाला व स्थलयोजना पूर्ण झाली असें मानण्याचा विधि.

**नाल**—स्त्री. विटीदांडूच्या खेळांतील एक डाव व चार ही संज्ञा. [का. नालकु=चार]

**नाल**—स्त्री. गरनाळ; तोफ. 'शुक्रवारीं माखजनीं येऊन पुढें नाला तोफा घेऊन जावें लागलें.' -पेद ३.११६.

**नालपीर**—पु. मोहरमांतील एक पीर. मोहोरमांत महंमदाच्या घोड्याच्या नालाची मिरवणूक काढतात व त्यावेळीं एखाद्या व्यक्तीच्या अंगांत संचार होतो त्यास म्हणतात. 'तो एक मनुष्य चालत नसून कपड्यांचीं ठाणें अंगावर चढविलेला नालपीर आहे असें वाटे.' -सयाजी १.२८८.

**नालपोचा**—पु. (कुस्ती.) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या घोट्याखालील पायाचा भाग खुपसून तोच पाय वर खेंचून आणणें.

**नालबंदी**—स्त्री. तैनातपैकीं कांहीं भाग अगाऊ खर्चास देणें त्यास नालबंदी म्हणतात. ती नालबंदी जात व फौज सरंजामासहि लागू आहे. -भारतवर्ष, मराठ्यांचें दप्तर १४.

**नालाचढ**—स्त्री. (मालवणी.) नाल्यास धरण बांधल्यामुळें त्याचें पाणी चढून त्या पाण्यानें भिजणारी जमीन. [नाला+चढणें]

**नांवनंग**—पु लौकिक; कीर्ति. 'हबसियास नातिजा थावा यात नांवनंग सर्व गोष्टी आहेत ऐसे बोलिले.' -पेद ३.१३७. [सं. नाम. म. नांव+नग]

**नांवानें धोंडे फोडणें**—नांवानें खडे फोडणें पहा. एखाद्याच्या नांवानें धोंडे आपटून परमेश्वरास गाऱ्हाणें घालणें. 'तिचेनि नांवें फोडिती धोंडे।' -भारा. अयोध्या १०.८८.

**नावाकिफ**—वि. गैर माहितगार. 'मीतर नावाकीफ यैसे बोलले.' -पेद ६.४२.; -मुधो. [अर.]

**नासवाब**—वि. उन्मार्ग.

**नासियह**—वि. तेजस्वी. -आफ. -मुधो. [अर.]

**नासिर**—पु. मदतगार. -मुधो. [अर.]

**नास्तालिक**—स्त्री. एक अरबी लिपि. -के ५.७. १९३५.

**नाहणी**—स्त्री. मोटेचें पाणी ज्यांत पडतें तो हौद, कुंडी. [स. स्ना-नहाणें]

**नाहाट**—क्रिवि. किनाऱ्यापासून दूर; समुद्रांत दूरवर आंत; पुष्कळ बाहेर; नाट पहा. 'फिरंगियाचें आरमार समाईन घेऊन बाहीर निघालें होतें. त्यास सहा दिवस पर्यंत नाहाट समुद्रांत होतें. तेव्हां चहुकडे बोली होती कीं वसईस गेलें.' -पेद १६.१५१.

**नाहींनाट**—पु. नायनाट; निकाल; शेवट; अखेर; निर्मूलन. -निबंधचंद्रिका ९.

**नाहो**—पु. नाह पहा. नाथ; पति. 'ओवाळिती नाहो। कमळेचा॥' -अभंग.

**नाळभिल्ल**—पु. भिल्लांची एक जात. 'नाळभिल्ल पळाले धांकेसीं।' -भारा. अयोध्या १५.२०. [नाळ=खिंड]

**निकर**—स्त्री. अर्धी विजार, पाटलोण. [इं.]

**निकावत**—स्त्री. मोठेपणा. -आफ.; -मुधो. [अर.]

**निकाशी**—स्त्री. निकाल. 'कोणी चांगला मनुष्य अथवा स्त्री पाहून त्याचे कानीं गोष्ट सांगून कामाची निकाशी करावी.' -नागपूरकर भोसल्यासंबंधी कागदपत्र १२.

**निखह**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. -प्रश १७.

**निगारष**—पु. अवलोकन. 'त्याचा दरजबाब कोसल कलान कलकत्तेकर यानी निगारष केला.' -रा १०.२३४. [फा. निगरस्तन=पाहणें]

**निगाहदास्त**—स्त्री. लक्ष्य ठेवणें. -मुधो. [अर.]

**निगोदास्तसिपाह**—स्त्री. लष्करभरती, शिपायांची भरती, पाहणी वगैरे. 'वजीर निगोदास्तसिपाह करितात.' -पेद २९.७३. [फा.]

**निग्रह**—पु. जातीबाहेर टाकणें; वाळींत टाकणें; निष्कासन. [सं.]

**निग्रह करणें**—जातिबाह्य करणें.

**निग्रह पत्र देणें**—जातीबाहेर टाकल्याबद्दल लेखानें प्रसिद्ध करणें.

**निघरा**—वि. (महानु.) घर नसणारा; उपऱ्या. म्हण-'निघरा जालें घर, घरचया गोसाव्या झाली वोसरी.'

**निचावणें**—सक्रि. हलकें ठरविणें; नीच करणें; खालीं आणणें. 'वेगीं चाप चढवी रामचंद्रा । निंचावी सुरां वीरां नृपवरां।' -भारा. बाल १९.११. [ नीच ]

**निचिति**—स्त्री. अखेर; शेवट. म्हण-'अखिति आणि सणांची निचिति.' [ निश्चिती ]

**निजग्रही**—स्त्री. नर्तकी प्रकार. 'कलावंत, धाडी, गवई, निजग्रही यांचें नित्य नृत्य गायन महोत्साहविरहित दरबारीं करूं नये.' -बावडा दप्तर १.९७.

**निजाम**—पु. व्यवस्थापक. -मुधो. [ अर. ] **निजाम-उद्दौलह**-राज्यव्यवस्थापक. **निजाम उल्मुल्क**-देश-व्यवस्थापक.

**निजा( झा )मत**—स्त्री. प्रांत; जिल्हा. 'झिंद संस्थानांत दोन निजामती आहेत.' [ अर. ]

**निढळीचें अक्षर, निढळीचा लेख**—नपु. ललाट रेषा; ब्रह्मलिखित. ब्रह्मदेव प्रत्येक मनुष्याच्या कपाळावर त्याच्या आयुष्यांतील घडणाऱ्या गोष्टी लिहितो अशी समजूत आहे तीवरून.

**नितळणें**—अक्रि. एखाद्या भांड्यांत ठेवलेला द्रव पदार्थ हळूहळू गळून जाणें. [ सं. नि+तल ]

**नितळा**—पु. सांका; एखादा पदार्थ वाहून गेल्यानंतर त्याचा खालीं राहिलेला अंश. 'शिवाय पाणी पितांना ज्या भांड्याचा आपण उपयोग करतों त्यांतच गार पाण्याचा इतका नितळा असतो कीं उकळलेलें पाणी त्यांत घेऊन पिणें साफ निरुपयोगी होतें.' [ सं. नि+तल ]

**नितांत पडणें**—बेशुद्ध होणें.

**नितांत रम्य**—वि. अतिशय सुंदर. [ सं. ]

**नितांतावस्था**—स्त्री. बेशुद्धि. [ नितांत+अवस्था ]

**नित्यकृत**—वि. नेहमींचा; चालू; रोजचा; दैनिक. 'हेहि येथून कांहीं नित्यकृत खर्चाची बेगमी करून कूच करणार.' -पेद २५.१८६. [ सं. ]

**निदर्शन**—न. प्रसिद्धपणें दर्शन; मिरवणूक; पताका, गर्जना इ. प्रकारें मतप्रदर्शन. विशेषतः विरुद्ध प्रसिद्धीकरण; निषेधप्रदर्शन. इं. डेमोन्स्ट्रेशन. 'मुस्लीम लीगनें ना. हक्क यांचे विरुद्ध निदर्शनें सुरू केलीं असून.' -के १६.९.१९४१. [ सं. ]

**निदानरेषा**—स्त्री. हुतुतूच्या खेळांतील मुख्य पाण-रेषेच्या दोन्ही बाजूंस ५० फुटांवर काढलेल्या रेषा. -व्याज्ञा १.१८८. [ सं. ]

**निधान**—न. निदान पहा. अखेर; शेवट. 'निधानी मुंबईहून हर कोठे निघोन जाईन.' -पेद ५.७४. [ सं. निदान ]

**निधोन पद्धति**—स्त्री. एक रासायनिक संशोधन पद्धति. ही पुणें येथील रानडे आर्थिक संशोधन संस्थेंतील रा. लिमये यांनीं शोधून काढली.

**निनणें**—सक्रि. ( महानु. ) आणणें; निर्मिणें; काढणें. 'तुर्के कोणी निनीले.' -वि ४. 'एकवीस विद्यावंत तिया खून सांघितली कोंभ कोणि निनीलें नातें ब्रह्मांडस्ता।' -वि ४४. 'चिंता प्रद्युम्न बोले रणउनि निनिले मात हे कूड तूझे.' -गस्तो २१७.; 'परितियासी तियेतें नीनुं नये.' -उच २६. [ सं. नी ]

**निपदरी**—वि. निर्धन; निराधार; उघडा; विवस्त्र. 'तूं उघडा बोडका निपदरी आणि लंघनि कोठून आलास?' -साब १०. [ नि+पदर ]

**निपरेठा**—वि. ( ठाकरी. ) बैलास तिसऱ्या वर्षीं म्हणतात.

**निपल**—न. स्टोव्हचें पेटता वायु वर येत असलेलें टोंक. [ इं. ]

**निपळंजी**—वि. पोकळ; दाणा नसलेली ( शेंग ). पळंज पहा.

**निपुण**—वि. पूर्ण; संपूर्ण; पुष्कळ; अतिशय; मोठी. 'सारांश बावाची कृपा निपूण स्वामीचे ठाई आहे.' -पेद ८.४२. [ नि+पूर्ण ]

**निप्रवसु**—वि. ( महानु. ) परवश; पराधीन. 'हें निप्र-वसु दुसंबळ राज्य करूं नेणे.' -अज्ञातच २४.

**निप्रांजल**—क्रिवि. स्पष्टपणें; निखालसपणें. 'घोरप-ड्यांची समजाविशीचा विचार निप्रांजल करून पुसिला.'-पेद ११.३०. [ सं. निष्प्रांजल ]

**निबंध काढणें**—धर्मग्रंथ पाहणें; शास्त्रार्थ पाहणें; निर्णय काढणें. 'तेही स्मार्त बोलविले: निबंध काढविले:' -लीच १.१२.

**निंबपाणी**—न. १ देवी येऊन गेल्यावर निंबाचे टहाळे घातलेल्या पाण्यानें स्नान घालतात तें. २ घरांत बाळंतीण आली म्हणजे दारांत निंबाचे टहाळे घातलेलें पाणी ठेवतात; तें पाणी बाहेरून येणारानें पायांवर घेऊन मग आंत यावयाचें असतें.

**निंबावळी**—स्त्री. पिवळ्या रंगाची साडी, लुगडें, वस्त्र.

**निभण घालणें**—निवणें घालणें; स्वस्थ बसणें; आळशासारखें बसणें; जेठा मारून बसणें. 'ओटीवरती एक स्वारी निभण घालून बसतेना रोज.' -खेस्व ५१. [ निवणें पहा. मडकें स्थिर रहावें याकरितां त्याच्या बुडाखालीं एक गवत किंवा चिंधी वगैरेची चुंबळ करून घालतात त्यास निवणें म्हणतात मनुष्यानें आपल्या पायांचें आसन करून बसणें ]

**निमगर्डी**—वि अर्धे. 'चालू साली ज्वारीचें पीक निमगर्डी आले ' [ निमें ]

**निमचा**—पु. आंखूड तरवार. -प्रश ३८. [ फा ]

**निमजगा**—पु. दर्गा; निमाज पढण्याची जागा. -टि १.३३६.

**निमताळा**—वि. ओशाळा. 'आपल्या कामांत नाना कोणाचेंहि फद्याचे निमताळे नसत.' -सह्या सप्टें १९३५.

**निमधल**—स्त्री निमथल पहा अर्धेल. -चित्रकृषि २.५.

**निमोना**—पु नमुना पहा. आराखडा; रूपरेषा. 'त्यावरून देवमंदिराच्या चित्राचा निमोना पाठविला आहे.' -पेद १८.५६. [ फा. नमूना ]

**नियाझमन्द**—पु. प्रार्थक. -मुधो. [ अर ]

**नियाबत** स्त्री. नायबी; मुतालिकी. 'सुभेदाराची नियाबत तुम्हाकडे मुकर केली.' -पेद १५.८६. [ अर. नायब ]

**नियुद्ध**—न. कुस्ती. 'अद्यापि कुस्ती म्हणजे नियुद्ध आणि लाठी यांचा प्रघात उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र आहे ' -व्याज्ञा १.३६. [ सं. ]

**निरंग ( लोह )**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २२. [ सं. ]

**निरमुस्त**—वि. निखालस; खास; निश्चित. 'त्याची निरमुस्त प्रमाण घेऊन चिंता नाहीं.' -पेद २४.१६२. [ ? ]

**निरवण**—स्त्री. ताकीद 'लोकांस निरवण केली होती.' -पेद २८.३७. [ मिरवणें ]

**निराजन**—वि. (महानु.) काळें नसलेलें; निष्कलंक; अज्ञानरहित. 'तो निराजन स्वरूप परमेश्वर:' -वच्छटी [ सं. निर्+अंजन ]

**निराणी**—वि. (महानु.) सुंदर; पवित्र. 'केली लीळा निराणी.' -गस्तो ८१.

**निरात**—वि. रातें नसलेलें; तांबडें नसलेलें ( भात ). [ सं. नि+रक्त ]

**निरा दम**—वि दमलेला; थकलेला; श्रमित. 'युसफ याचाही कित्येक पहिलवानाशीं कुस्ती करून निरा दम झाला आहे त्याच्याशीं कुस्ती कर.' - विबाइ, भारतवर्ष. [ निरा+दम ]

**निरुतर, निरुत्तर**—न. (चुकीनें) प्रत्युत्तर; उत्तर; 'यावरून बाबानी निरुतर केलें कीं ते समर्थच आहेत '; 'निरुत्तर द्यावयाविसी दोन दिवस विनंती करित होतों.' -पेद ३७.३ [ सं. निर्+उत्तर ]

**निरुता**—वि. (महानु.) बाजूस, अखेरीस असलेला; एकीकडचा. 'निरुतिया ठेलियाः' -उच २१७. [सं.]

**निरोप पोंचाविणें**—एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३४५.

**निरोपमपद**—न. ( महानु ) निरुपम पद; मोक्ष; मुक्ति.

**निरोपवणें**—सक्रि. निरवणें; स्वाधीन करणें; सोंपविणें. 'हीराइसेतें भटोबासीं मज निरोपवीले आन तयातें मीं सांडूनि आलां:' -वृद्धाचार ४.

**निर्दया**—स्त्री. निष्ठुरता; कठोरपणा. 'मातोश्रीनी निर्दया केली आहे.' -पेद २६.५२. [ सं.नि +दया ]

**निर्भीक**—वि. निर्भीड; स्पष्ट; असंदिग्ध; भयरहित; धीटपणाचें 'त्यांचें विषयप्रतिपादन निर्भीक असून.' -मनो मे १९४१.

**निर्मनस्कता**—स्त्री. विमनस्कता; उदासीनता. [ सं. ]

**निर्माया**—स्त्री. निष्ठुरता; कठोरता. 'तेथें कितेक विचारें बोध केला परंतु बहुतच निष्ठुरता करून निर्माया केली.' -पेद २३.८२. [ सं. निर्+माया ]

**निर्वासित**—वि. १ हद्दपार केलेला. -के १३.३.१९४२. २ मूळ वस्तीचें ठिकाण नाहींसें होऊन आश्रयास आलेला; आश्रयार्थी.

**निऱ्हाळी**—पु. निळारी पहा.

**निऱ्ही**—घाम.

**निवात**—स्त्री. वाऱ्याचा अभाव; शांतता; बिन वाऱ्याची वेळ ( समुद्रावर ). 'मारली पौर्णिमे आंतबाहेर निवाती पडतील त्या संधीस पाच गलबते सिलेपोस सजून खांदेरीच्या बंदरी ठेऊन उंदेरीची गलबते मान्यात गवसऊन पच्छाडतो.' -पेद ३३.२९. [ सं. निर्वात ]

**निवृत्त जीवन**—न. स्वस्थपणें सर्व कामें सोडून राहणें. 'प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें ते निवृत्तजीवन कंठूं लागले.' [सं.]

**निशाचर** पु. रात्रीचे पहारेकरी; रामोशी; राखणदार. 'पन्नास पाऊणशे निशाचर बरोबर घेऊन कागोरीस जाऊन ... चंदनवंदनास यावे.' -पुद २.२०२. [ सं. निशा+चर ]

**निशाण पकड**—स्त्री. (मल्लखांब.) दोरीच्या मल्लखांबावरील एक अढी. -व्याज्ञा ३.३९०

**निशाण पोंचाविणें**—न. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १ ३४७.

**निशात**—पु आनंद सुख. -मुधो. [ अर. ]

**निःशेष फळ**—न. संपूर्ण लाभ सर्व पुण्य; निष्कामतापूर्वक लाभ. 'पहिलेनि अर्पितां फळ। कार्य न साधे तत्काळ। निःशेष अर्पी फळ सकळ। खूण भूपाळ पावला।' भारा. बाल २४.३७. 'निःशेष फळ अर्पितां जाणा।' -भारा. बाल २४.३८. [ सं. ]

**निषस्त**—स्त्री. निशस्त पहा. बैठक. ‘ पांचसहा घटिका-पर्यंत निषस्त राहिली. ’ -रा ७. खलप १.२६. ‘ त्यानंतर यक घटिका निषस्त होऊन एक प्रहर पांच घटिकेस बरखास जालें. ’ -रा ७.१०१. [ फा. निषस्तन्=बसणें ]

**निषेधपक्ष**—पु आक्षेपक; विरोधी बाजू; खंडन करणारी बाजू. [ सं. निषेध+पक्ष ]

**निसरबोडी**—वि. निसटणारी: निसरून पडणारी. ‘ कैसी साहान सुद्ध पौळि चोखडी । बोदपात दृष्टि खेळे निसरबोडी । मन उचलौनि पडे आगडी । हाटाडी तें दुर्ग कवणां टाके ॥ ’ -नरुस्व ८६६. [ ? ]

**निसार**—वि. स्वाधीन; ताब्यांत. ‘ जो खजाना व माल आहे तो हजरतच्या निसार आहे. ’ -पेद २.४.

**निस्फ**—वि. अर्धा. -मुधो. [ अर. ]

**निस्तोष**—वि.क्रिवि. निखालस; पूर्णपणें; निःशेष. ‘तुमची प्रकृति आतां कसी आहे? निस्तोष आरोग्य जाल्याच ल्याहावें. ’ -रा ७. खलप. २.१८. [ सं. निस्तुष् ]

**निस्त्रिंश**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. -प्रश १७.

**निहमत**—स्त्री. धैर्य. -मुधो. [ अर. ]

**निहादह**—ठेवून. -मुधो. [ अर. ]

**निहार**—वि. सुंदर.

**निहाली**—स्त्री. निजण्याकरितां चटई. -सारुह ३.४४.

**निळता**—स्त्री. हेटाळणी; हेळसांड; अश्रद्धा. ‘ देवीं धर्मी निळता न व्हावी. ’ -वलो ७४.

**निक्षूनतेनें**—क्रिवि. साफ; स्पष्ट; निखालस. ‘ गणोजीस उत्तम प्रकारें शिक्ष्या करून काहडून देणें ऐसें निक्षूनतेनें पत्रीं विस्तारयुक्त लिा आहे. ’ -रा १३.२२. [ निक्षून ]

**निक्षेप**—पु. ( महानु. ) एकजीव; मिश्रण. ‘ एकी ठाईं निक्षेपु कैसा: जैसे वाळुमध्यें पाणी घालिजे आणि अवव्य.तें व्यापी तैसा निक्षेपुः ’

**निक्षेप करणें**—( महानु. ) १ मूठमाती देणें; गति देणें; २ पूर्णपणें व्यापणें.

**नीआमह**—क्रिवि. न येतां. -आफ. [ फा. ]

**नीख**—वि. निवळ; शांतिमय; अमिश्र; निखळ. ‘ ती नीख स्थिति पुन्हा मिळणार. ’ -निळापक्षी १३२.

**नीझ**—सुद्धां; ही. -आफ. [ फा. ]

**नीत**—स्त्री. गणती; मोजदाद; हिशोबगणना. ‘ दोन चारसे उंट लस्करांत आले. घोडयास नीत नाहीं. दहा पंधरा हती आले. ’ -पेद १९.८४. [ सं. गण्-गणती-गणित-गनती-नीत ]

**नीर**—पु. १ माग; अजमास; सुगावा; अंदाज. ‘ राजश्री कृष्णाजीपंतास सामील होऊन माहितगिरीनें केल्याचा नीर काढून अजम मुजफरखानहि जवारीवर उतरतील, परस्परें बातमी कलऊन कोल्याचे पारपत्य करणें म्हणोन आज्ञा. ’ -पेद ४०.११२. २ निकर; नेट; शह. ‘ यक महाड व बिरवाडी, पोलादपूर, नाते हे चार महालावर श्यामलाचा नीर आला. ’ -पेद ३३.५१.

**नील**—पु. एका जातीचें गवत. -चित्रकृषि २.६.

**नीलपिंड**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २२. [ सं. ]

**नीलकंठ खातें**—न. ( उप. ) पाणक्याचें खातें.

**नीस्त**—नाहीं. -आफ. [ फा. ]

**नुदर**—स्त्री. न्यूनता; उणीव; कमतरता. ‘ मागा आर-मारच्या वेढयास सिलसिल्यांची नुदर असल तरी वसई साष्टी प्रांतें माहेगिरया आहेत. ’ -पेद २४.२०४. [ कदाचित् नुपर असावें व मोडी वाचनाची चूक असावी ? ]

**नुपूर**—स्त्री. तूट; टंचाई; कमीपणा. ‘ म्हणून वर सांगित-लेल्या करामतीची नुपूर भरून येतेच. ’ -विद्याभिवृद्धि ४१. [ न+पुरणें ]

**नुमायद**—क्रि. दाखवावें. -मुधो. [ अर. ]

**नुमायान**—वि. व्यक्त; दाखविणारा. -आफ. -मुधो. [ अर. ]

**नुरा**—वि. लुटुपटीचा; खोटा. ‘ पंजाबी लोक पैशासाठीं नेहमीं नुरा कुस्त्या लढतात. ’ -के १८.१.१९३८.

**नुलथणें**—अक्रि. ( महानु. ) न उलथणें; उपटून न पडणें. ‘ हो का जे प्रलयकाळ खवळलेया काई । नुलथे महामेरु । ’ -जांस्व २४९.

**नुल्हाटणें**—अक्रि. ( महानु. ) न उल्हाटणें; न जिंकवणें; प्रतिबंध न होणें. ‘ मा ज्ञान इंद्रिया चें विषय नुल्हाटती । ’ -आचार भाष्य १३.

**नुस्रत**—स्त्री. १ मदत. २ विजय. -मुधो. [ अर. ] **नुस्रत करीन**-वि. विजययुक्त.

**नुह**—वि. नऊ. -आफ. [ फा. ]

**नूअ**—पु. प्रकार. -आफ. [ अर. ]

**नूज्दहुम**—वि. एकोणिसावा. -मुधो. [ अर. ]

**नून**—स्त्री. रोटी. [ अर. ]

**नूर**—पु. प्रकाश. -मुधो. [ अर. ]

**नृत्त**—न. नृत्य पहा. [ सं. ]

**नृत्यांगना**—स्त्री. कलावंतीण; नर्तकी. [ सं. ]

**नेई**—न. (उचले.) लोणी. -ज्ञाको (उ) ४. [सं. नवनीत]

**नेककिर्दार**—पु. सत्कर्मी. -मुधो. [अर.]

**नेकखाह**—वि. सुहृद; हितेच्छु. -आफ. [अर.]

**नेकबद**—स्त्री. नेकीबदी पहा. बरावाईट प्रकार; अस्मानी सुलतानी; हरामी; फितुरी. 'तुम्ही धाकटे नेकबद झाली तर काय करावे या करितां यांच्या नावे सनद आणली.' -पेद २८.९८. [फा. नेक+बद]

**नेकबंदगी**—स्त्री. प्रामाणिक सेवा. -आफ. [अर.]

**नेकमन्दी**—स्त्री. चांगुलपणा. [अर.]

**नेटून**—क्रिवि. (व.) निष्ठापूर्वक. 'माथां ठेवतां नेटून। जाते गुरूच्या कृपेनें । सारं दारिद्र फिटून।' -वलो १८. [नेटणें]

**नेत्र**—पु. तरवारीचे नेत्र म्हणजे तीवरील चिन्हें हीं २९ प्रकारचीं आहेत.-१ चक्र. २ खड्ग. ३ गदा. ४ पद्म. ५ डमरू. ६ धनुष्य. ७ अंकुश. ८ छत्र. ९ पताका. १० वीणा. ११ मत्स्य. १२ लिंग. १३. ध्वज. १४ इंदु. १५ कुंभ. १६ शूल. १७ शार्दूल. १८ सिंह. १९ सिंहासन. २० गज. २१ हंस. २२ मयूर. २३ जिव्हा. २४ दशन. २५ पुत्रिका. २६ चामर. २७ शैल. २८ पुष्पमाला. २९ भुजंगम. -प्रश ७१.

**नेत्रस्फुरण**—डोळयाची पापणी फुरफुरणें; नेत्रस्पंदन; डोळा लवणें. यावरून शुभाशुभ पहातात. [सं.]

**नेत्राचमन**—स्त्री. नेत्रस्पर्श पहा.

**नेप्ती**—स्त्री. नेपती पहा.

**नेमणें**—सक्रि. नियमन, नियंत्रण करणें; शासन करणें. 'नेमावया विंध्याद्रीसी ।शीघ्र दक्षिणेसी तुम्ही जावें।' -भारा. आरण्य ५.७९. 'नेमोनिया विंध्याद्री । तो निजवावा पृथ्वीवरी।' -भारा. आरण्य ५.८०. 'पुढती न करी उत्थान। ऐसा विंध्याद्री नेमून।' -भारा. आरण्य ५ ८३. [नि+यम्]

**नेमोत्तर**—न. निश्चय; नियत गोष्ट; ईश्वरी सूत्र. 'ईश्वरी नेमोत्तर उर्फ त्याचें कर्तव्य त्यास कळत नाहीं.' -मातीर्थ ४.३०४. [सं. नियम+उत्तर]

**नेवता**—पु. विधवा विवाह; पाट.

**नेस्ती**—स्त्री. (कुस्ती.) प्रतिपक्ष्याचा एखादा अवयव पकडून त्यास चीत करणें; कुस्तींतील पेंच, खुबी, डाव. 'कुस्तींतील नेस्त्या शिकवल्या पाहिजे.' -के २०.१२.१९३४.

**नैजेबाजी**—स्त्री. भाला फेंकण्याची, मारण्याची कसरत किंवा विद्या. 'तिरंदाजी व नैजेबाजी म्हणजे भाले मारण्याचा खेळ व शमशीर आदाजी म्हणजे तलवार मारण्याचा अभ्यास व पैलवानीचा अभ्यास बहुत यत्ने करून करीत होता.' -विबाइ. -भारतवर्ष ७. [फा. नेझा=भाला]

**नैर्बंधिक**—वि. कायदेशीर; नियमानुसार. 'राजबंद्यांना मागितलेल्या सर्व सवलती पूर्ण नैर्बंधिक आहेत.' -के ११.११.१९४१. [सं. निर्बंध-नैर्बंधिक]

**नोक**—स्त्री. (महानु.) टोंचणी; नेट; तगादा. 'त्यानी त्या कामी नोक लाविली.'

**नोकरचाकर**—गडीमाणसें.

**नोकरनामा**—पु. नोकराचा करार, लेख.

**नोकराचा खेळ**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे १४६.

**नोडती**—स्त्री. उत्तर दिशा. -वरामो.

**नोमथोम**—पु. (संगीत.) चीज गाण्यापूर्वी त्या रागाचा स्वरालाप गातात तो.

**नोर**—पु. (उचले.) चेहरा.-ज्ञाको (उ) ४. [अर. नूर?]

**नोरी**—स्त्री. समुद्रवेल. 'हिंवाळयांत बहुतेक लोक छोटया होडया घेऊन नोरी काढण्यांत गुंतलेले असतात.'—के १५.११. १९३८.

**नौक**—पु. संधि; सांधा; मिळण्याची जागा; ज्याप्रमाणें चार रस्ते मिळतात तो चौक त्याप्रमाणें.

**नौकाबंधन**—न. जहाजें बांधण्याचा धंदा; जहाजें तयार करणें. [सं.]

**नौखंडा**—पु. नऊ खणांचा दिवाणखाना. 'नवाब नौखंडे यांत दरबार करून बैसले होते.' -पेद २५.८४. [सं. नव+खंड]

**नौंदर-लौंदर**—स्त्री. (कुस्ती.) एक डाव. प्रतिपक्ष्याचा हात चढवून तो मुरगळून पाठीवर नेणें; हात चढविणें.

**नौनिगादास्त**—स्त्री. तयारी; बेगमी; सैन्याची नवीन भरती. 'परंतु प्रस्तुत नौनिगादास्त करीत आहेत. सुरतेकडून बंदुका वगैरे सामान येत आहे.' -रा १.२०. -वि. सज्ज; तयार; बंदोबस्तीचे; तयारीचे; बेगमीचे. 'दहा हजार स्वार नौनिगादास्त फरमाविले.' -पेद २५.८४. [फा.]

**नौरीकी**—वि. नोर घेऊन माल नेणारें (जहाज); भाडेकरू. 'दरीयामध्यें जहाजे नौरीकी उतारे मार्गे मोन्हेमागा जातात म्हणोन न म्हणावे जे मोन्हील मागीलचा वलावदार.' -पेद २४.१८३.

**नौला**—पु. झरा. 'अल्मोडयाच्या पाऊल वाटेवरून उतरून एका नौलापाशीं आम्ही गेलों.'—माहिम ८३.

**न्यायप्रविष्ट**—वि. ज्या गोष्टीचा न्यायालयांत प्रत्यक्ष न्याय चाललेला आहे अशी. (इं.) सब्ज्युडिस. 'ही बातमी न्यायप्रविष्ट खटल्याबद्दल असल्यामुळें त्यांत कोर्टाची बेअदबी होते.' —चित्रा १०.३.१९३८.

**न्याहरणें**—सक्रि. न्याहाळणें; निरखून पाहणें. 'वारंवार मुख न्याहरी । हरिखें लिंबलोण उतरी।' -भारा. बाल २४.६८.

**न्यूनगंड**—पु. हीन भाव; उणेपणाची जाणीव, वृत्ति; कमीपणाची भावना. (इं.) इन्फीरिऑरिटी कॉम्प्लेक्स. [सं. न्यून+गंड]

**न्यूनपदार्थें**—कमींतकमी. -वसमो. [सं.]

**न्होकणें**—अक्रि. (कुण.) लपणें; दडणें. [सं. न्हु]

**न्होकून बसणें**—लपून बसणें; दडून बसणें. [सं. न्हु= लपणें]

---

# प

**पा**—स्त्री. पातशाही (संक्षेप). -के ८.९.१९३९.

**पा**—स्त्री. पैवस्नी (संक्षेप).

**पई**—स्त्री. गोट्यांच्या खेळांत विंचण्यासाठीं बदीपासून दहाबारा फुटांच्या अंतरावर जी खूण करतात ती.' -व्याज्ञा १.१५२

**पई दरपई**—पै दरपै पहा. तावडतोब. 'सरकारचीं पत्रें पईदरपई लवकर दाखल होणें याविसी गेली असतां जाऊन दाखल झालें नाहीं.' -अलीबहादरास पत्रें' -मसाप १.

**पकडापकडी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १. ३४८.

**पकाईत**—स्त्री. पक्केपणा; निश्चिति. 'पहाडी राजाच्या भेटी करून पकाईत करून आलो.' -पेद ४२.८१.

**पंकातल्या गोष्टी**—बायकी गोष्टी. -पको घेप्र ६६. [बायका कांहीं ओळखण्यास सांगितलें असतां 'कशा पंखीं?' असें विचारतात त्यावरून?]

**पकार**—पु. (नंदभाषा) पंचवीस.

**पक्का माल**—पु. संस्कार घडून उपयोगावस्थेप्रत पोंहो-चलेली वस्तु; कच्चया मालावर योग्य क्रिया करून बनविलेली वस्तु.

**पक्की रसोई**—स्त्री. तुपांत तळून वगैरे केलेले पदार्थ. याच्या उलट कच्ची रसोई म्हणजे शिजलेले पदार्थ.

**पक्क्यावर चढविणें**—पक्क्या खात्यांत नोंदणें (कच्च्या कीर्दीवरून किंवा जांगड वहीवरून).

**पक्षान्नें**—न. अव. एक मुलींचा खेळ. -मखेपु १६८.

**पखा**—पु. पखना पहा.

**पंखाचा कोंबडा**—पु. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा २. ३८२.

**पग लावणें**—घोडयास चाल शिकविणें. [पग=पाय]

**पगड-डा**—पु. पक्ष; धंदा. 'बाहिरीली दों पौळी आंतु अनंताचा परिवास अनंतु। तेथ पगडया तिचा व्यापारू बहुतु। दिसतु असे॥' -नरुस्व ८७५.

**पगती**—स्त्री. पूर्णावस्था. [सं. पक्व]

**पगतीला येणें**—पूर्णपणें पिकणें; कापण्यास योग्य होणें. 'जोंधळा पगतीला आला आहे.' [सं. पक्व]

**पगदंडी**—स्त्री. पायवाट. 'डोंगराच्या पगदंडीवरून पहाडी मनुष्य उतरत येत असतांना दिसला.' -हिम ६८. [पग=पाय+दंड]

**पगापगानें**—क्रिवि. बाजूनें. [पग]

**पगी**—पु. जंगली श्वापदांच्या पावलांच्या खुणावरून त्यांचा माग काढणारा. -मनो. एप्रिल १९३७. [पग]

**पंचकला**—स्त्री. गुरज, गुप्ती, बंदुक, ढाल व संगीन अशा पांच हत्यारांच्या समावेशानें झालेलें हत्यार. -प्रश ३९.

**पंचकुळी**—स्त्री. पांच कुलांचा गट, समूह. 'भोसले, गुर्जर, शिर्के, मोहिते व महाडीक हीं पांच कुलें यांतच सोयरीक व्हावी असें उत्तरपेशवाईत ठरलें होतें.' -पंतप्रधान शकावली २ री.

**पचपच**—स्त्री. फजीती. 'चांगले खानदान घराणें पण परवाची वर्षश्राद्धाची पचपच माहीत आहेना तुला.' -खस्व ११३. [ध्व.]

**पंचतंत्रीनीति**—स्त्री. शत्रूस वेगवेगळे करून जिंकावयाची पंचतंत्रांत सांगितलेली युक्ति. पंचतंत्रांतील पहिलें तंत्र मोठें व मित्रभेद नांवाचें आहे यावरून. [सं.]

**पंचपर्व नाडीचक्र**—न. विवाह जमवितांना पहावयाचें नाडीचें चक्र. एकनाड हा एक दोष आहे. [सं.]

**पंचपितर**—पु. अव. जन्मदाता, अन्नदाता, भयत्राता, उपनेता व विद्यादाता. [सं. पंच+पितृ]

**पंचभद्र**—पु. गुळवेल, पित्तपापडा, वाळा, काडेचिराईत व सुंठ. [सं.]

**पंचभात**—पु. खड्ग; तलवारीचें नांव. -प्रश १७.

**पंचमहाशब्द**—पु. राजाची स्वारी निघते वेळीं वाज-वावयाचीं पांच वाद्यें. शिंग, ताशा, नगारा, शंख व जयघंटा. [सं]

**पंचमा**—स्त्री. पांचशक्ती. १ कृपा, २ अविद्या, ३ चैतन्य ४ महदा व ५ निद्रा. 'पाहे ऊचि जाणें ऊचे लागून। तेथें

मनाचें होय अमानपण । ते विकाराविरहित बरवेपण। पंचमा वागवितील। ' -योसं १.८२. [सं.]

**पंचरूढ**—वि. मिश्र; मिसळलेलें; अनेक जातीचें, वर्णाचें वगैरे; पंचभेळ. 'निदान लोक दोन अडीच हजार आहेत त्यांमध्यें कांहीं पंचरूढ आहेत. कांहीं टोपीकर आहेत.' -पेद ३४.११६. [पंच+रूढी]

**पंचहत्यारी तट्टु**—न. ज्याला चालविण्याकरितां बसणाऱ्यास दोन हात, दोन पाय व तोंड यांचा उपयोग करावा लागतो असें तट्टू; हरदासी तट्टू; वरचेवर अडखळणारें घोडें.

**पंचांग (झाडाचें)**—न. मूळ, खोड (अंग), फळ, फूल व पान अशीं पांच अंगें. [सं.]

**पंचानन**—पु. खंजिऱ्याचा पवित्रा. -प्रश १८.

**पंचादुही**—स्त्री. पांचामध्यें तीन व दोन या प्रमाणांत विभागणी. 'सालसीची पंचादुही पुरातन आंगरे याचे मुदतीपासून तह होऊन चालते.' -पेद २४.४३. तुलना-साठ चाळिसी. साठ चाळिसीचा तह भोसले व निझाम यांच्यामध्यें होता. [पंचद्वयी पहा.]

**पंचारणें**—अकि. बिघडणें; स्वैर होणें; पूर्ण मोकाट सुटणें. 'एकदां घरून पंचारून चाकर कुणबिणींच्या तालमींत तयार झाल्यावर मग त्यास कितीहि तुपांत तळून साखरेत घोळलें तरी तो कडुच राहणर.' -प्रति आत्म ३३१.

**पंचीसी**—स्त्री. सोंगट्यांचा खेळ. यांत दान टाकण्याकरितां सहा कवड्या वापरतात व त्यांपैकीं पांच उताण्या पडल्यास पंचवीस हें दान येतें. यावरून. [हिं. पचीस]

**पंचोत्रा**—पु. शंभर नगावर दिलेला पांच नगांचा वर्तीळा. [सं. पंच+उत्तर]

**पच्चपाणी**—न. ढपळवणी; शिजविलेल्या पदार्थांत वाजवीपेक्षां जास्त राहिलेलें पाणी; पचकवणी. [ध्व.]

**पच्छोडी**—स्त्री. एक विशेष हक्क. तुलना-पासोडी. -आफ. [फा.]

**पंज**—वि. पांच. -मुधो. [अर.]

**पंज**—पु. तेलांत बुडविलेल्या सरकी वगैरेचा पुंजा. **०पेटविणें**-अशा तऱ्हेचे सरकी, पेंड वगैरेचे पलिते पेटविणें. पूर्वी रात्रीच्या लढाईच्या वेळीं असे पंज पेटवीत.

**पंजाचोरी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखेपु १४८.

**पंजामुरड**—स्त्री. पतिपक्षाच्या हाताचे पंजे आपल्या हातांत धरून मुरडण्याचा व्यायाम -व्याज्ञा ४.१७८.

**पंजी**—पु. पंचा; पंजो पहा. 'जीर्ण पोत्याच्या घड्या काखेला घेऊन नाहींतर जुनं पंजी खांद्यावर टाकून रेंगाळत चाललेले दुबळे कुणबी एकदम सबळ झाले. -उपेअंत २१. [पंचा]

**पंजेकस**—स्त्री. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्षाच्या हाताचीं बोटें डाव्या हातानें धरून पंजामध्यें उजवा हात आडवा टाकून त्यानें त्याचा हात खालीं रेटून डाव्या हातानें उलटा दाबणें.

**पञ्जवा**—स्त्री. पजावा पहा. विटांची भट्टी.

**पट**—पु. (कुस्ती.) पाय; पवित्रा. **०काढणें**-प्रतिपक्षाचा पाय धरून ओढणें. प्रसिद्ध मल्ल गामा व झिस्को यांच्या कुस्तींत गामानें पट काढून झिस्कोस चित केलें. वास्तविक पेंच जाणणारा कोणीहि गडी आपला पट कधीं, काढूं देत नाहीं व याकरितां पवित्र्यांत उभा राहतो.

**पट**—पु. द्वार; दार; दरवाजा; कवाड. 'देवालयाचे पट खुलले अशी वार्ता आली.' -केदाखं ८४. [सं. पट]

**पट**—पु. (लठी.) कमरेपासून गुडघ्यापर्यंतच्या भागावर केलेला मार.

**पटकवि**—पु. चित्रपट कथानक लिहिणारा; चित्रपट लेखक; चित्रपटांची पद्यें करणारा. -के १४.२.१९४१. [पट+कवि]

**पटणी**—स्त्री. (व.) सरकारधारा; फाळा. 'त्यावर सरकार पटणीची जबाबदारी असल्यामुळें त्याची स्थिति फार खराब झाली आहे.' -के १५.७.१९३८.

**पटपट सावली**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -मखेपु ९९.

**पटाधिकार**—पु. वंशपरंपरागत, शिष्यपरंपरागत इत्यादि प्रकारें मिळणारा वारसाहक्क, मालकी, स्वामित्व. [सं. पट+अधिकार]

**पटालंबर**—स्त्री. सैन्याची तुकडी; सैन्यविभाग. 'हामेशा इंग्रेजी एक पटालंबर रानांत होतीच. मध्यें गडबड जाहली, ते वेळेस दोन हजार बार आणखी पाठविला.' -रा १०.३५१. [इं. बटालियन]

**पटावळी**—स्त्री. वंशावळ; वंशवृक्ष. 'गुजराथेंतील व मारवाडांतील वाण्यांची पटावळी पाहिली तर तींत क्षत्रिय पुष्कळ आहेत असें आढळतें.' -सुदेइ पृ. २२. [सं. पट+आवली]

**पटिंगा**—पु. जहाज; पगार. 'पैका तो घेतात तर मातबर पटिंगा घेऊन मार्ग सुरळीत करावा.' -पेद २४.१८३. तुलना-पतिंगा=मोठें वल्हें. [फा.]

**पटुलक**—न. खड्ग; तलवारीचा प्रकार. -प्रश १७.

**पट्टाधिष्ठित**—वि. गादीवर, तक्तावर असलेला राजा महंत, स्वामी [ सं. पट्ट+अधिष्ठित ]

**पट्टापान**—न. पट्टयाचें पातें. -प्रश ६९.

**पट्टिश**—पु. पट्टयासारखें एक हत्यार. 'या वरील शस्त्रास्त्राशिवाय लगुड, पट्टीश, शूल, खड्ग चालविण्याचे अनेक प्रकार असतात.' -व्याज्ञा १.६४.

**पट्टी देणें, भरणें**—टांच मारणें; पळावयास लावणें; भरधांव सोडणें. चौखुर सोडणें; पिटाळणें. 'तो एक स्वार केवळ पट्टी भरीत मागून आला व त्यानें जोरानें त्याच्या पाठींत आपला भाला मारला' -दुरं २२५. 'जगलों तर पायाशीं पुन्हां येईन असें म्हणून नारायणरावानें आपल्या घोड्यास पट्टी दिली.' -दुरं २२७.

**पठडी**—स्त्री. परंपरा; पद्धति; शाळा. 'अशीं निरनिराळीं वळणें दाखविणारीं त्यांचीं घराणीं अथवा पठडी यांची माहिती दिली आहे.' -सशांक. 'शाहूनगरवासी व किर्लोस्कर यांच्या दोस्त भगतांच्या कोल्हापुरांत दोन पठड्या होत्या.' -माभू ५८.

**पठाडी घेवडा, पठाणी घेवडा**—पु. रुंद व चपट्या शेंगांचा घेवडा.

**पठारा**—पु. तांडा; जमाव; थवा; टोळी. 'जयसिंगाने यासाठीं निरनिराळ्या ठाण्यांत फौजा ठेऊन सैन्याला धान्य पुरविणाऱ्या वणजाऱ्यांचे पठारे ज्या त्या मुक्कमापर्यंत सुखरूप पोचले जावे अशी तजवीज केली होती.' -ऐपो २८.

**पड**—स्त्री. १ नारळीच्या झाडावरून पडलेले एकंदर नारळ. -चापेकर. २ अडचण; ओढगस्ती; निकृष्टावस्था; विपन्नावस्था; विपत्काल. **०प्रसंग**-पु. अडचणीची वेळ; आपत्काल. 'आपण पड प्रसंगीं आहेत. आम्हांसाठीं खानदेश प्रांतीं एखादा महाल शेंदुरणी, लोहारें वगैरे हरकुणं एक महाल आम्हांसाठीं केला पाहिजे' -रा ३ ४६३. [ पडणें ]

**पड काढणें**—पडित जमीन लागवडीस आणणें. 'जमीन मुबलक व नवीन पड काढलेली असल्यामुळें कसदार असे.' -के ९ १.१९३७ [ पडणें ]

**पडगुली**—स्त्री. लहान पडगी. लांकडांचें अगदीं लहान पाळें. [ पडगा ]

**पडचाकर**—पु. एखाद्या नोकराचा दुय्यम नोकर; नोकराच्या हाताखालचा नोकर; ज्यास काम सांगितलें असेल त्यानें तें दुसऱ्यास करावयास सांगितलें म्हणजे त्यास म्हणतात. **चाकरास पडचाकर**-पु. एखाद्या नोकरास काम सांगितलें असतां तें त्यानें आपल्या हाताखालच्या नोकरास सांगावें हा प्रकार.

**पडछट्टी**—स्त्री. छत्री ठोकून मुक्काम करणें. 'स्मशानांत पडछट्टी आणि तळ देणें' -के २३.६.१९३९

**पड टाकणें**—अक्रि. लागोपाठ पीक काढलेली जमीन निकस झाल्यावर कांहीं वर्षे तशीच पीक न घेतां ठेवणें, पडित ठेवणें; लागवडीखालीं न आणणें. [ पडणें ]

**पडणी**—स्त्री. कडा; पडावयाची जागा. 'पडणीवरून घालून घ्यावें।' -दा २.६.३. [ पडणें ]

**पडदानशीन**—वि. गोषांतील [ फा. पडदा+निशीन ]

**पडणें**—अक्रि. रहित होणें; थांबणें. 'यापेक्षा अधिक गलबला ऐकल्यानें यात्रेस जावयाचा विचार पडेल असें दिसतें.' -पेद १७.५७. 'वारा अगदीं पडला. गलबतें खुंटल्यासारखीं झालीं.' -कोलंबस. [ सं. पत् ]

**पडथळा-ला** वि. ओझ्याचा; ओझे वाहणारा. 'शामजी नोकर यास पडथळा बैल तटू पाहिजे म्हणोन लिहिले तरी येव्हां येथून पडथळास काय द्यावे.' -पेद ३.२९६. [ पडतळ्या पहा ]

**पडथाळणें**—सक्रि. ओळखणें; खूण पटविणें. 'जाधव मोरे यांणीं दोघे स्वार पडथाळले. तिसरा मोहित्यांनीं मागून ओळखिला.' -शामव. भारतवर्ष २८. पडताळणें पहा. [ पड+तळ ]

**पडताळा**—पु. पडदळ; तलवार बांधण्याचा पट्टा. -प्रश ६८.

**पडपण**—न. पडप; भूषण; शोभा. 'राज्यास होती पडपण ती.' -ऐपो २.२३३. [ पडप ]

**पडपडकुडी करणें**—निजणें. 'आम्ही आपल्या घरीं जाऊन आपल्या फुटपाथवर पडपडकुडी केलें.' -स्मृ ३६. [ पडणें+कुडी=देह ]

**पडपोशी**—वि. पडखाऊ; मिळमिळीत; दुर्बल; भित्रा. 'आपण वजीर या नात्यानें रजपुतांशीं लढत असतां बादशहानें त्यांचेबरोबर स्नेह केलेला ऐकून महादजीस त्याच्या पडपोशी स्वभावाबद्दल फार राग आला.' -महादजी चरित्र २०९. [ पडणें+पोशा ]

**पडमरूपणा**—पु. भित्रेपणा; भ्याडपणा. 'हाहि एक प्रकार पडमरूपणाचा आहे.' -पेद ६.१४७. [ पडणें+मरणें ]

**पडमूत**—वि. दुर्बल; अशक्त. 'तो माणूस केवळ पडमूत नाहीं, बरा कर्तृत्ववान आहे.' -भूभ्र २७. [ पडणें+मूत्र ]

**पडवळी राजकारण**—न पडवळ ज्याप्रमाणें लिबलिबीत असतें त्याप्रमाणें मऊ व नेभळट राजकारण.' -के १८.७.१९३९.

**पडशें**—न. पत्रे जोडून केलेली लोखंडी कढई.

**पडाई**—स्त्री. शरणागति. 'गांधींनीं संस्थानी लढा बंद करण्याच्या पूर्ण पडाईची अंतिम सीमा गाठली. -के ९.६. १९३६. [पडणें]

**पडिक**—न. पड टाकलेलें शेत; न केलेलें वावर. 'सोन बाला जोंधळयाच्या पडितांत बोलतांना पाहिलें होतें.' -नानि.

**पंडितखाना**—पु. (उप.) तुरुंग; कैदखाना. -मशा फेब्रु ३७-५१.

**पडीवार**—पु. बडिवार; प्रतिष्ठा. बडीवार पहा. 'उदंड घेतले किल्ले काय या खेडयाचा पडिवार.'-ऐपो २.१००.

**पडेल, पड्या**—वि. एकवेळ कुस्तीमध्यें पडलेला (गडी). कुस्ती हरलेला.

**पंढरी**—स्त्री. पांढरी; करळाचें रान; गावचें शिवार. 'गांवाखालती पंढरी। नांगरली वखरली। तेथें रामानें पेरलीं।' -मुं. महारांचीं गाणीं, मसाप ९.४.९.

**पढियंती**—वि. आवडती; श्रेष्ठ; मानाची; प्रिय. 'कैकेयी म्हणे वसिष्ठाप्रात। मी तंव रायाची पढियंती । ज्येष्ठ भाग दे मज प्रति।' -भारा. बाल २.८६; २.११९. [पढियासणें पहा]

**पणाला लावणें**—एखाद्या वस्तूबद्दल पैज मारणें.

**पणज**—न. पावसाळयांत उगवलेलें गवत.

**पत जाणें**—बेअब्रू होणें.

**पत राखणें**—अब्रू संभाळणें.

**पतपातेज**—स्त्री. साक; सचोटी; अब्रू. 'आमच्या लष्करांत कोणी सावकार उरला नाहीं. पतपातेज राहिला नाहीं. -रा १०.१०६. [पत द्वि. पातेजणें=विश्वासणें]

**पतकी**—पु. समुद्रावरील जकात घेणारा अधिकारी.

**पतनतारिका**—स्त्री. हवाई छत्री. इं. पॅराशूट. [सं.]

**पताकास्थान**—न. एकाच्या तोंडून सहज आलेला शब्द व त्याच क्षणीं परक्याच्या हातून त्याचप्रमाणें घडणारी स्वतंत्रतः कृति; यास नाट्यशास्त्रांत पताकास्थान म्हणतात.' -केभा ३९. [सं.]

**पतीवरचा व्यापार**—१ सचोटीवर अवलंबून असलेला व्यापार. २ उधारीनें माल आणून केलेला व्यवहार.

**पत्र**—न. तलवारीचें पातें. [सं.]

**पत्रपंडित**—पु. वृत्तपत्रव्यवसायी; संपादक; वार्ताहर इत्यादि. इं. जर्न्यालिस्ट. [सं.]

**पत्रपांडित्य**—न. वृत्तपत्रव्यवसाय. 'हिंदुस्थानांत पत्रपांडित्य हाहि देशसेवेचा एक मार्ग आहे.' -के ९.१२.१९३९.

**पत्रापत्री**—स्त्री. उलटसुलट पत्रव्यवहार. 'म. गांधी व श्री. बोस यांची बरीच पत्रापत्री झाली असें वाटतें.' -के २५. ४.१९३९. [पत्र द्वि]

**पत्रावळीचें त**—न. निकस निरुपयोगी जिन्नस.

**पत्रिका जमणें**—वधूवरांचें गोत्र, ग्रह, नाडी, गण वगैरे जुळणें; वधूवर विवाहयोग्य असणें.

**पत्रिकाप्रेषण**—पत्र पाठविणें. 'गोसावी यांनीं क्षणाक्षणा येणाराबराबर पत्रिका प्रेषण करून संभाळ करीत जाणें.' -पेद ३.५४. [सं.]

**पथकें लष्कर**—न. सरंजामी सरदार व शिलेदार शिपाई वगैरे लोकांची जी नेमणूक ती खर्चीं घालण्याचें सदर. -भारतवर्ष, मराठ्यांचें दप्तर १५.

**पथिकाश्रम**—पु. प्रवाशास उतरण्याची व राहण्याची जागा. [सं. पथिक+आश्रम]

**पद**—न. (फलज्यो.) पाद; तीन तीन राशींचा गट. [सं.]

**पदन**—(महानु.) योग, गांठ, सलगी. 'पदनु पडो नेदावें.' -आचारभाष्य १४. 'या वेगळ मागील पदनाचे अर्थ ओळखी सहवासाचेः ऐसा पदनु पडिन्हः'

**पदप्रमय**—न शब्दशब्दार्थ. [सं.]

**पदसादृश्य प्रमाद**—पु. दोन पदें सारखींच एका पुढें एक आलीं असतां मधला भाग गळणें. [सं.]

**पदप्रवेश**—पु. शिरकाव; आगमन. 'किनाऱ्यावर पदप्रवेश करण्यास मोकळीक देण्यांत आली नव्हती.' -के ८.९. १९३९. [सं.]

**पदप्राप्ति**—स्त्री. एक खंजिऱ्याचा पवित्रा. -प्रश १८. [सं.]

**पदरज**—पु. पायधूळ. [सं. पद+रज]

**पदर धरणें**—गर्भवती होणें; पाळी चुकणें. 'श्रीमंतास कधीं पुत्र होईल तें देवास विचारून पाठवावें. उत्तरांत लिहीलें कीं आठ महिन्यांनीं पदर धरेल.' -आडिमहा.

**पदलालित्य**—न. सुंदर शब्दांची योजना; ललितशब्दयोजना. [सं.]

**पदसिद्ध**—वि. अधिकारपरत्वें; हुद्याच्या निमित्तानें. 'लॉर्ड लिनलिथगो हे पदसिद्ध अध्यक्ष राहातील.' -के १५.८.१९४१. [सं. पद+सिद्ध]

**पदातसेनाधर**—पु. पायदळाचा सेनापति. 'रा पिलाजी गोळे पदात सेनाधर याशी आज्ञा केली ऐसीजे.' -रा ३.६२.

**पदातिकुंत**—पु. पाईकाचा भाला. -प्रश १७. [सं. पद+कुंत]

**पदारूढ**—वि. गादीवरील; स्थानावरील; अधिकारावर असलेला. [सं. पद+आरूढ]

**पद्धत लावणें**—रीत लावणें; वळण लावणें. [सं. पद्धति; म. लावणें]

**पद्मबंधनासन**—न. ( मल्लखांब. ) वेताच्या मल्लखांबावर हनुमान पकड करून केलेली एक अढी. –व्याज्ञा ३.८१. [ सं. ]

**पद्मासन फिरकी**—स्त्री. ( मल्लखांब. ) बोंडाजवळ पद्मासन घालून करावयाची उडी. –व्याज्ञा ३.८०.

**पंधरावी विद्या**—स्त्री. जाहिरातबाजी. ' कलियुगांतील पंधरावी विद्या. ' –ज्ञाको ( ज ) २५१. चौदा विद्या प्रसिद्ध आहेत ( पहा ) त्यानंतर ही नवीन निघालेली म्हणून पंधरावी विद्या.

**पधीकपण**—न. उपाध्यायपणा; पौरोहित्य; पूजा वगैरे पुराहितानें करावयाचें कृत्य; उपाधीकपणा. ' तेथें कथा, आरती व पधीकपण होऊन प्रसाद घेऊन गणेश बागांत गेले. ' –भारतवर्ष अखबार दिनचर्या, १६. [ सं. उपाध्याय+पणा ]

**पनाह**—पु. आश्रयस्थान. –मुधो. [ फा. ]

**पन्नावणें**—अक्रि. ( व. ) ताणणें; लांबविणें. ' हातपाय पन्नावले. ' [ तन्नावणेंप्रमाणें ]

**पम**—क्रिवि. परोमध्यंदिन याचा संक्षेप, मध्यदिनानंतर अपराण्ह. ( इं. ) पी. एम्. यास प्रतिशब्द.

**परकाळा**—पु. पातळ चादर; लोकरीच्या वस्त्राच्या आंत जोडावयाचें पातळ सुती वस्त्र.

**परखाना**—पु. अहेरांत द्यावयाचा एक दागिना. ( कमरपट्टा ? ). ' महमुद्या, सिरपेच, परखाना. ' –मदरु २.५९.

**परची**—स्त्री. गलबताच्या बाजूचें लांकूड.

**परज**—स्त्री. तलवारीच्या मुठीची वाटी आणि टोचा यांस जोडणारा भाग; ओढा; बिनी. –प्रश ५३.

**परजकैद**—स्त्री. फरज कैद; सक्तीची कैद. ' अनिश्चित मुदतीची परजकैद भोगणारे लाला हरकिसनलाल होते. ' [ अर. ]

**परडी**—स्त्री. जोगतिणीची बुट्टी. **०पूजणें**-परडीची पूजा करणें. **०भरणें**-जोगतिणीची परडी दाण्यांनीं भरून देणें.

**परतणें**—अक्रि. मरणें; नाहींशीं होणें. ( भूक, इ. ) ' परतली भूक त्याला. ' –श्रुना १०८.

**परतणें**—न. उलथणें.

**परतपाळ**—पु. ( कुण. ) प्रतिपाळ; सांभाळ. –अरुणोदय. [ सं. प्रतिपाळ अप. ]

**परतभेट**—स्त्री. १ कोणाकडून एखादी भेट म्हणून आल्यास त्यास आपण एखादी वस्तु परत भेटीदाखल पाठविणें. २ एकानें आपणाकरितां एखादें कार्य केल्यास त्याकरितां आपण तसेंच करणें. ' हिंदुस्थानांत चीनदिन पाळण्यांत आला म्हणून १७ मार्चला चीनमध्यें परत भेट म्हणून हिंदुस्थान दिन पाळण्यांत येणार आहे. ' –के १३ ३.४२.

**परतवणें**—न. प्रभु लोकांत गृहप्रवेश विधीस म्हणतात. –लविसो १४१. [ सं. प्रति+आ-वृत्त ]

**परतारक**—वि. प्रतारक; फसविणारा; भुलविणारा; ' परतारक होये: परधर्म सांडवी । म्हणोनि देवें भवीं । सांडियेलें । ' –अभंग. [ सं. प्र+तृ-तर् ]

**परताळणें**—अक्रि. रागानें चवताळणें.

**परती**—स्त्री. परत जाण्याची क्रिया; पुन्हा मागें येणें; परत येणें; प्रत्यावर्तन. **परतीचें तिकिट**-न. पुन्हां परत प्रवास करावयाच्या वेळीं वापरावयाचें तिकिट–प्रवास पत्र.

**परंपरा राखणें**—काम पुढें चालू ठेवणें; जुन्या गोष्टी, वहिवाटी तशाच चालू राखणें.

**परप्रत्ययनेय बुद्धि**—वि. दुसऱ्याच्या बुद्धीप्रमाणें, तंत्राप्रमाणें वागणारा; दुसऱ्याचें ऐकणारा; स्वतः कोणत्याहि गोष्टीबद्दल निश्चित मत नसणारा किंवा स्वतंत्रपणें कृति न करणारा. [ सं. ]

**परभृत**—वि. दुसऱ्यावर अवलंबून असलेला; दुसऱ्याकडून पोसला जाणारा. ' आपला हिंदुस्थान गुलाम बनला, परभृत झाला. जित बनला. ' –सुकामार, महाराष्ट्र कुटुंब माला १९.२.१९४१. [ सं. पर+भृ ]

**परमान्न**—न. कांडलेल्या गव्हाची खीर. [ सं. परम+अन्न ]

**परलंबायमान**—वि. लांबलचक; पाल्हाळपूर्ण. ' परलंबायमान लिहिलें म्हणोन आलस न करावा ' –पेद ३९.२९. [ सं. पर+लंब ]

**परलोकविद्या**—स्त्री. मरणोत्तर जीवित अथवा मृतात्मे यांच्या संबंधी, भूतयोनीसंबंधी माहिती, ज्ञान. [ सं. पर+लोक+विद्या ]

**परवरदा**—वि. पोष्य, आश्रित; अवलंबून असलेला. ' स्वामीजीचे परवरदा आहो. त्याप्रमाणें कैदेनें वर्तणूक करावी. ' –पेद १५.४३.

**परवर्दा**—स्त्री. पालनपोषण; रक्षण. ' अपराध क्षमा करावयास व परवर्दा करावयास स्वामी समर्थ आहेत. ' –पेद २५.३६. [ पर्वर्दा पहा ]

**परवल**—स्त्री. संकेत; खूण. परवलीचा शब्द. [ इं. परोल ]

**परवर्षी**—स्त्री. पोषण; परामर्ष. ' दरम्यान साहेबानी बरखुरदाराची परवर्षी झाली पाहिजे यास्तव अर्जी ऐकोन पुणेंतील घरची मोकलीकहि केली. ' –पेद ४१.२६०. परवरीष पहा. [ फा. ]

**परश्या तट्टु**—पु. ओझ्याचें घोडें; कंठाळीचें घोडें. [पशु+तट्टु]

**परसक**—वि (महानु) ऐकणारा; श्रोता. 'कवीश्वराचे परसक. उपाध्यायेंचें शास्त्र परसक. [सं परिश्रु]

**परसर**—न. सरपण; सर्पणाकरितां तोडलेलीं झाडांचीं कोंवळीं लांकडें, बांड.

**परसवर्ण**—पु. पुढील शब्दांतील आद्यवर्णाच्या वर्गांतील अनुनासिक वर्ण. [सं. पर+स+वर्ण]

**परसापेक्ष**—वि दुसऱ्यास अनुलक्षून, उद्देशून. 'वर्तमान पत्रांतील लेखन हें स्वभावतःच परसापेक्ष असत.' –गतगोष्टी ६३३. [सं. पर+सापेक्ष]

**परा**—पु. रांग; क्रम. फरा पहा. 'सरकारचे कारकून तुम्हाजवळ आहेत त्याजकडून सारे एके दिवशीं खडे गणतीची चार चार दिवस अगोदर ताकीद करून उत्तम प्रकारे कोणाचा परा न फुटतां गणती सरकारची होती त्या रीतीनें देणें ऐसें आज्ञापत्र पाठवावें ' –पेद ३७.१४३.

**पराकोटी**—स्त्री. आत्यंतिक मर्यादा; अखेरी [सं. परा+कोटि]

**पराक्रमशीलता**—स्त्री. शौर्य; वीर्य; शरीराचा सुदृढपणा व अंतःकरणाचा निर्भयपणा. [सं.]

**पराण**—स्त्री. तबल्याची गत. 'हवी ती पराण अगदीं टांकी थापील, कशी सारखी खणाणत ' –विछ ९६. [?]

**परात्पर गुरु**—पु. परमगुरुचा गुरु. गुरु-परम गुरु-परात्पर गुरु अशी वरचढ परंपरा आहे. [सं.]

**परासीमा**—स्त्री. आत्यंतिक मर्यादा; अगदीं पलीकडील हद्द; कमाल मर्यादा. [सं. परा+सीमा] **०ओलांडणें**-कमाल मर्यादा गांठणें. –के २२.१०.३५.

**परिग्रह**—पु. (महानु.) सामान; गाठोडें. 'घ्या अवघा परिग्रह'; 'परिग्रह न होआवा' –लीलाच. [सं.]

**परिछिन्नवादे**—क्रिवि. निक्षून; साफ; स्पष्टपणें. 'आम्ही परिछिन्नवादे वरातदार फिरोन यावे तरी स्वामीची आज्ञा नाहीं.' –पेद २४.३८ [सं परि+छिन्न+वाद]

**परित्यक्ता**—स्त्री. नवऱ्यानें टाकून दिलेली स्त्री; सांड. [सं]

**परिंदा**—पु पक्षी. 'पांच परिंदाची शिकार करून आंबराईंतून आले.' –रा ७.१०४. [फा. परन्द=पक्षी]

**परिमाणानुवर्ती**—वि.वजनाप्रमाणें. याचे उलट मूल्यानुवर्ती=किंमतीप्रमाणें (जकात वगैरे.) 'ज्या जकातीची आकारणी मापानें आकारली जाते म्हणजे मालाची किंमत उतरली तरी जकात कायम रहाते ती अधिक मारक होते.'

**परियंदणें, पर्यंदणें**—अक्रि. अंगाई म्हणणें; गाणें म्हणून निजविणें. 'तिघां देवोनि स्तनपान। परियंदे पालखी.' –भारा. आरण्य २.४४. [सं. पारदेवन-विपर्यास]

**परिवंट**—पु. परवंट पहा. कमरेभोवतीं वस्त्राचा गुंडाळून बांधलेला पदर. 'सर्वांगीं रत्नांची शोभा। निढळीं चंदनाचा टिळा उभा। परिवंटु दाटिला राजवल्लभा। फुटेयाचा।' –नरुस्व १७२. [सं. परि+वृत्-वर्त]

**परिवंटु, परिवटु**—न. (महानु.) १ सामान; भांडीं वगैरे. 'परिवंटु घेती' –लीलाच पूर्वार्ध. २ परिवंट, वस्त्राचा एक पदर कमरेस बांधणें. 'मग साधे परिवटु बांधला तेंहीही परिवटु बांधला.' –उच ४०. [सं. परि+वृत्]

**परिवर्तन**—न. उलट फिरविणें; बदलणें. [सं. परि+वृत्-वर्तन] **०वादी**-वि. बदल घडवून आणणारा; फिरविणारा; क्रान्ति, बदल, पालट घडावा असें प्रतिपादन करणारा; सुधारणावादी. [सं. परि+वृत्]

**परिवृत्त**—वि वेष्टलेला. 'म्लेंच्छा लक्ष शतची परिवृते.' –गस्तो ६८. [सं.]

**परिशिष्ट** न. पुस्तकाच्या शेवटीं जोडलेलें एखाद्या विषयासंबंधी विशेष टिपण; पुरवणी; शेष; यादी; टांचण. [सं. परि+शेष-शिष्ट]

**परिश्रय**—पु. शौचविधी; परसाकडेस जाणें. 'गोसावी परिश्रयो सारीला।' –लीच ३ पृ. ११६. [सं.]

**परिस्थिति पराङ्मुखता**—स्त्री. सभोवतालच्या परिस्थितींतून कांहीं काळ दूर होणें; आजूबाजूच्या परिस्थितीकडे पाठ फिरविणें, तीपासून अलिप्त राहणें, तिकडे काणाडोळा करणें. [सं.]

**परिस्फुटता**—स्त्री. वाच्यता; प्रसिद्धि; बोभाटा. [सं.]

**परीकर**—वि. सुंदर. 'निद्रस्थेजन आणुनी परीकरी.' –गस्तो ६८. [सं. परिकर]

**परीघ**—पु. वेढा; गराडा. 'त्यानीं आपले तर्फेनें पदाति हशमाचा जमाव रा। अंताजी शिवदेव यांसमागमे पाठवून किले मजकुरास परीघ घातला.' –पेद ३१.१३०. [सं.]

**परुषारीति**—स्त्री. ओजोगुणयुक्त शब्दरचना. हिला गौडी अथवा कठोररीति असेंहि म्हणतात. [सं. परुषा+रीति]

**परेसगारी**—स्त्री. व्रत; नेमिष्टपणा; धर्मनिष्ठा. 'नीतिमान मौलवी आपली परेसगारी राखण्याकरितां जनावराचें मांस भक्षण करीत नाहीं.' [फा. पऱ्हेजगारी]

**परोटली**—स्त्री. (महानु) पोटळी; गाठोडी. 'तुमच्या परोटलींत आहे.'

**पर्के**—वि. दरिद्री; कंगाल. [ ? ]

**पर्की ताव**—पु. लिहिलें असतां शाई फुटणारा कागद. [? ]

**पर्गनह**—पु. पर्गणा पहा. -मुधो. [ अर. ]

**पर्गेटरी**—स्त्री. नरक; यमलोक. -ति २८८. [ इं. ]

**पर्दगी**—स्त्री. पतिव्रता. [ फा. ]

**पर्दाख्तन**—गढणें. -मुधो. [ अर. ] **पर्दाख्तह**-वि. गढून गेलेला.

**पर्दाझद**—क्रि. संपवावे. -आफ. [ अर. ]

**पर्दाख्तह**—वि. गढून गेलेला.

**पर्वतारोहण**—न. डोंगरी किल्ल्यावर कैदेंत ठेवणें. 'आम्ही येथेंच कैद करून पर्वतारोहण करीत होतों परंतु आपली आज्ञा नाहीं.' -पेद १२.८३. [ सं. ]

**पर्वतासन**—न. ( मल्लखांब. ) बोंडाजवल बद्धपद्मासनाप्रमाणें बसून हात वर करून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२३३.

**पर्वर्दह**—क्रिवि. वाढवून; पाळून; संरक्षण करून. -मुधो. [ अर. ]

**पर्वरिश**—स्त्री. वाढविणें; पालनपोषण. -मुधो. [ अर. ]

**पऱ्हाते**—क्रिवि. परते; दूर; परौते. 'आंतु सोनें केतकीचें आल्हातें । उदकाचे हार्थी ठेविले तेथें । पाणियांचिया धारा सुटेति पऱ्हाते। सोंडा एकमेकांचिये ।' -नरुस्व ४३०. [ म. परत ]

**पलकी**—स्त्री. हक्कविशेष. -आफ. [ फा. ]

**पलंगफरारा**—( मल्लखांब. ) अंगसफा करून मल्लखांबावर जाऊन बोंडावर उताणा तोल घेणें. -व्याज्ञा ३.२१९.

**पलंगसेवा**—स्त्री. संभोगसेवा; पर्यंक सेवा. [ सं. पर्यंक+सेवा ]

**पलटी**—स्त्री. १ कबूतराची गिरकी. २ उलटी; वांकडी वगैरे उडी. [ सं. परावृत् ]

**पलपल**—क्रिवि. क्षणांक्षणां; क्षणोक्षणीं; घडोघडी. [ सं. पल द्वि. ]

**पलव**—गलबताचा एक प्रकार. [ पाल ? ]

**पलाश दंड**—पु. उपनयन प्रसंगीं ब्राह्मण बटूनें हातांत घ्यावयाची पळसाची काठी. [ सं. ]

**पलवी**—स्त्री. कर्नाटक संगीत पद्धतींतील एक गान प्रकार. [ सं. ]

**पल्लीपतन**—न. अंगावर पाल पडणें. हें शुभाशुभ भविष्यसूचक मानण्यांत येतें. [ सं. ]

**पल्लीशब्द**—पु. पालीचे चुकचुकणें. हेंहि शुभाशुभसूचक मानतात. [ सं. ]

**पल्लेदहब्ब, पल्लेधाप**—पु. ( कर्ना. ) पौर्णिमेस बनशंकरीस साठ भाज्यांचा नैवेद्य दाखविण्याचें व्रत, सण. [ का. पल्ले=भाजी+हब्बा ]

**पल्हें**—न. शेत; पीक. 'दीसपडि पल्हें चरौनि कोणाचे ढोर जात असे पां:' -लीच ३ पृ ५२.

**पवड**—पु. शिरस्ता; धारा; मार्ग; पद्धति. 'तुम्ही ज्या सरदारास सांगाल त्याचे हुकूमांत साऱ्या गलवताच्या सरदारांनीं वर्तोन येका पवडानी चालावें नवदिगर करील त्याचे पारपत्य करावें.' -पेद २२.१३९. [ सं. प्र+वर्त् ]

**पव्हा**—पु. थवा; समूह. 'पव्हा द्वारावहा निगाला.' -लीच ३ पृ ५२.

**पशुपति**—न. नेपाळांतील एक प्रसिद्ध देवस्थान. [ सं. ] ०यात्रा-या देवस्थानची यात्रा.

**पशुपाल**—पु. १ पशूंचें पालन करणारा; धनगर; गुरें बाळगणारा. २ गोपाळकृष्ण. [ सं. ]

**पशुपालन**—न. पशुसंवर्धन; गुरें, गाई बैल, म्हशी, मेंढ्या, बकरीं वगैरे पशूंची जोपासना, वाढ इत्यादि करण्याची क्रिया, शास्त्र, विद्या वगैरे. [ सं. ]

**पशुवैद्यक**—न. पशूंस होणारे रोग बरे करण्याचें शास्त्र. [ सं. ]

**पशुसंग्रहालय**—न शिकारखाना; पशू ठेवण्याची जागा. [ सं. ]

**पशुसंवर्धन**—न. पशुपालन पहा. [ सं. ]

**पश्चात्क**—वि. नंतरचा; पाठीमागचा. [ सं. ]

**पश्चिमत्तानासन**—न दोन्ही पाय ताठ ठेवून त्यांचे आंगठ हातांनीं धरून डोकें ढोपरांस टेकणें. -व्याज्ञा ४.५००.

**पश्चिमवादी**—पु. प्रतिवादी; पश्चाद्वादी; अग्रवादीच्या विरुद्ध. 'अग्रवादी खलजी... पश्चिमवादी नेताजी.' -सनदा ११७.

**पश्चिमोत्तानासन**—न. ( मल्लखांब. ) मल्लखांबावर करावयाचें मोहनवेडी नंतरचें आसन. -व्याज्ञा ३.२४२.

**पष्टवादे**—क्रिवि. स्पष्टपणें. 'यावर बकाजी नाईक बोलले जे किला येक आमचे स्वाधीन कराल तर हस्तगत करून नाहींतर जातो ऐसे पष्टवादे सांगितलें.' -पेद ३.२१. [ सं. स्पष्ट+वाद ]

**पस**—क्रिवि. नंतर. [ सं. पश्चात् ? ]

**पसकी**—स्त्री. एक हक्क; फसकी. -आफ. पसलाई पहा. [ अर. ]

**पसडा**—पु. पैसा; दिडकी. 'एक अकरा वर्षांचा मुलगा तीन रुपयांचे पसडे घेऊन मामाकडे जातो.' -मशा नोव्हें १९३६. ८६. [ पैसा-क्षुद्रार्थी ]

**पसपा**—क्रिवि. दाणादाण; अस्ताव्यस्त; बेपत्ता; जिकडे तिकडे; सैरावैरा. 'कितेक फरारी होऊन पसपा जाले. त्यांचा पाठलाग सिंदे यांजकडील लोकांनीं केला.' -रा ७.; -खल ५१.२०.

**पसलाई**—स्त्री. पसामुठीचा हक्क. राशींतून पसाभर धान्य वगैरे घेण्याचा हक्क (बाजारामध्यें वगैरे). 'सींगसिंगोटी व हासील महसूल व पसलाई व सेव घेऊन.' -जुने कागद.

**पसेता**—पु. अशुद्ध अफू वाळवितांना त्यांतून जो पातळ पदार्थ येतो तो. [सं. प्रसव]

**पस्ताय**—पु. पश्चात्ताप; पस्तावा. 'श्रीमंत इंग्रजांचे वर्तणुकीचा विचार दिवसेंदिवस पाहून बहूतच पस्तायांत आहेत.' -पेद ५.७९. [सं. पश्चात्+ताप]

**पहाटाविणें**—अक्रि. (महानु.) पाहाट होणें; उजाडणें; प्रभात होणें. 'काईना भोजिया पहाटाविलें.' -उच ९. [सं. प्रभात]

**पहाता**—पु. देखरेख करणारा. [पहाणें]

**पहारा**—पु. भजनांत किंवा कोणत्याहि क्रियेंत खंड पडूं न देतां ती सतत कांहीं काळ चालू ठेवण्याची क्रिया. [सं. प्रहर]

**पहिलार-(म्हैस)**—वि. पहिल्यानें व्यालेली; प्रथमच दूध देणारी; पहिलटकरीण. -खेस्व १५५. [सं. प्रथम+पहिला]

**पहेल**—बि. गोटयांच्या खेळांतील प्रथम वाचक शब्द. -व्याज्ञा १.१५२.

**पहेला पहिल**—क्रिवि. प्रारंभीं; पहिल्याप्रथम; आरंभींच. 'चित्तांतील कर्म की पहेलापहिल तोंड लावावें मग जे होता होईल ते होतेसे दिसून येते.' -पेद २०.१६६. [पहिला द्वि.]

**पळंजी**—स्त्री. दाणा नसलेली शेंग; पोकळ शेंग; टरफल.

**पळपणें, पळिपणें, पळवैणें**—अक्रि. जळणें; दाह होणें. 'मोतीयांची ढीलौनि अळंकरणें । मग ओळगविलीं पोतासाचीं भूषणें । तियें अंगीं पळिपलीं केधवां नेणें । मग लेईली कळेकामां ॥' -नरुस्व ४५४. 'विरहज्वरें पान ऐसी कांपे । पावो ठेविता पाताळ पळिपें ।' -नरुस्व ४५२. 'झळवैली पळवैली' -नरुस्व. [प्रदीपन ?]

**पळवा**—पु. जळलेला पदार्थ; जळलेली वस्तु. तुलना अळवाचा पळवा. 'जेतुलें विडे देवों लागे । तेतुलेयां पानां धूं निघे । हडपिणीतें म्हणें रागें । पानें पळवा केलीं ॥' -नरुस्व ६८७.

**पळवाट**—स्त्री. सुटकेचा मार्ग; निसटण्याची युक्ति; बाहेर पडण्याकरितां मार्ग. [पळणें+वाट]

**पळविणें**—स्त्री. लांबवणें; हक्क नसतां नेणें. [पळणें प्रयोजक]

**पळाणें**—न. पळया ठेवण्याचें साधन. [पळी]

**पळीत**—वि. (महानु.) पलित; पिकलेले केंस. -वि १०६. [सं. पलित]

**पळीसांड**—वि. पळीवाढ पहा. [पळी+सांडणें]

**पळया**—वि. पळपुटा; पळणारा (विशेषतः लढाईतून). 'धाकटे मास्तर जागे होऊन आणि थोरले मास्तर पागोटयांतून हात काढून पडवींत येताहेत तोंच दोन तीन पळये सत्त्या आला सत्त्या आला करीत आश्रयासाठीं शाळेंत शिरले.' -उपेअंत १९. [पळणें]

**पळ्हा**—पु. (महानु.) चिखल.

**पक्ष (संन्यासी)**—पु. संन्याशाचे पक्षश्राद्ध भाद्रपद वद्य द्वादशीस करतात. [सं.]

**पक्षतिथि**—स्त्री. ज्या दिवशीं महालयश्राद्ध करावयाचें असतें ती तिथि. भाद्रपद वद्य पक्षांतील श्राद्धतिथि. [सं.]

**पक्षपत्र**—न. १ पाक्षिक; पंधरा दिवसांनीं निघणारें पत्र, नियतकालिक. २ विशिष्ट पक्षाचा प्रचार करणारें वर्तमानपत्र. [सं. पक्ष+पत्र]

**पक्षपंधरवडा**—पु. पितृपंधरवडा; भाद्रपद वद्य पक्ष. या पक्षांत महालय असतात [सं.]

**पक्षश्राद्ध**—पु. महालय; भाद्रपद वद्य पक्षांत पितरांस उद्देशून करावयाचें श्राद्ध. [सं.]

**पक्षोपपक्ष**—पु. पक्ष व त्यांतील पोटभेद. एक मुख्य बाजू किंवा विभाग व त्यांतील निरनिराळे फुटून निघालेले पोट पक्ष. [सं. पक्ष+उप+पक्ष]

**पा**—पु. पाय. -मुधो. [अर.]

**पाउटी**—स्त्री. सद्दी; जोर. (पुण्य वगैरेंची)

**पाउड**—पु. नजराणा; भेट; अहेर. 'नग लुगडीं लेणीं नानाविधें । देवी रत्नें वोपवी अगाधें । पाउडु धाडिला वेधें । श्रीकृष्णराया लागीं ॥' -नरुस्व ६९०.

**पाउलोपाऊलीं, पावलोपावलीं**—क्रिवि. प्रत्येक पावलास; क्षणोक्षणीं; दरक्षणास; पावलागणिक.

**पाउळ**—पु. पाळा; संघ; गण. 'कीं तें वसंताचें वेलाउळ । कीं मकरंदाचें जौळ । कीं देवाचिये वोळगे आलें पाउळ । वनदेवतांचे ॥' -नरुस्व ७२५.

**पाऊड**—पु. एक भिक्षेकरी. 'माणसास माणूस दिसावयाचे पूर्वी प्रथम पाऊड येतो. पाउडाच्या हाकाटया चाललेल्या असतानांच वासुदेव येतो.' -मुंवर्ण ३४०.

**पाऊस**—पु. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३४९. **पाऊसानें टाळा देणें**-अवर्षण पडणें.

**पाकट**—न. माशांचे पंख. -किर्लो. ऑक्टो १९३८.

**पाकट**—न. (ठाकरी.) एक जातीचा मासा.

**पाकट**—स्त्री. पाठलाग; माग; शोध. 'एका शिकारी कुत्र्यानें सशाची पाकट काढीत त्याला मैदानांत आणलें.' -शालाप जुलै १९३९.

**पाकवणें**—अक्रि. पदार्थ पाकांत टाकणें; एखाद्या पदार्थांत साखरेचा वगैरे पाक मुरवणें. [सं. पाक नामधातु]

**पाक-शास्त्र**—न. सूपशास्त्र; स्वयंपाक करण्याचें शास्त्र. [सं.]

**पाक-सिद्धि**—स्त्री. स्वयंपाक. [सं.]

**पाकस्थान, पाकिस्थान**—न. १ मुसलमानांना पवित्र असा देश. २ केवळ मुसलमानांनीं व्यापलेला प्रदेश. ३ अलग प्रदेश; सवतासुभा. 'अलस्टर प्रान्ताचें जें पाकिस्तान बनविलें गेलें आहे.' -के १६.७.१९४०. [अर. पाक+स्तान]

**पाकळपूजा**—स्त्री. पाखलपूजा पहा.

**पाका**—पु. भोरसंस्थानांतील पालीच्या आसपास आढळणारा खारीसारखा एक प्राणी. -मार्तीर्थ ४.६२.

**पाखंडमत**—न. १ कोणतेंहि पाखंड; मुख्य संप्रदायाचें मत सामान्यतः मान्य असून त्यामध्यें कांहीं बाबतींत मतभेद असल्यास त्यास त्या धर्माचें किंवा मताचें पाखंड म्हणतात. उदाहरणार्थ प्रॉटेस्टंट मत, हें ख्रिस्ती धर्मातील एक पाखंड आहे. २ मुख्य पंथ सोडून भिन्न मत प्रतिपादन करणारा पक्ष, धर्म, सिद्धान्त. [सं.]

**पाखंडवाद**—पु. मुख्य संप्रदायाशीं विसंगत असलेली, किंवा त्यास सोडून किंवा त्यापेक्षां कांहींशी विसंगत, निराळी मतप्रणालि. [सं]

**पाखंडवादी**—पु. पाखंडी; पाखंडमतास अनुसरणारा; मुख्यसंप्रदायाशीं किंवा मतप्रणालीशीं भिन्न असलेली मतप्रणालि धारण करणारा किंवा तिचें प्रतिपादन करणारा. [सं]

**पाखंदुळघा**—स्त्री. पाळण्याच्या दोऱ्या हातांत धरून तेथल्या तेथें हलवून दिलेले झोके; आंदुळणें. [सं. पक्ष+आंदोलन]

**पाखल**—न. (गो.) एक प्रकारचें कडधान्य

**पाखरी उड्या**—स्त्री. एक स्काऊट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३०५.

**पाखाला**—वि. (महानु.) शुद्ध; निर्मळ. [सं. प्रक्षालित]

**पाखाळणें**—अक्रि. (महानु.) प्रक्षाळणें; धुणें; स्वच्छ करणें. 'महात्मा काया पाखाळुजाः मग तें देहा पाखाळोनि आले.' -उच २३७. [सं. प्रक्षालन]

**पाखाळ**—पु. शौच. [सं. प्र+क्षाल्]

**पाग**—स्त्री. मासेमारी. -किर्लो. जून १९३८. ८८१.

**पागडी**—स्त्री. (हिंदी) पगडी; पागोटें.

**पागडीवाला**—पु. मराठा; हिंदु मनुष्य. 'पागडीवाला इकडील कोन्ही तरी वर न्यायासी इंग्रजानें मना केलें असे सबब तो तेथें खोटी होता.' -पेद ३४.१८७. [पगडी]

**पागा**—स्त्री. दोरी; कासरा. [पागा]

**पांगुळगाडा**—पु. स्काऊट मुलांचा एक खेळ. -व्याज्ञा १.३०२.

**पांगुळ येणें**—पांगुळ हा भिक्षेकरी पहांटे भिक्षा मागण्यास येतो यावरून पहांट होणें; अरुणोदय होणें. -मवाइ २.४५२.

**पागोटा**—पु.एक मुलींचा खेळ. -मखेपु २१५. -व्याज्ञा १.२९६.

**पागोटेवाला**—पु. पागोटें घालणारा; पागडीवाला पहा. हिंदु मनुष्य.

**पांचगुरू**—पु. (महानु.) १ माता, २ पिता, ३ सासू. ४ सासरा, ५ भ्रतार हे स्त्रियांचे पांचगुरू. 'या पाचाचे म्हणीतलें केलीया परम गोमटें.' -उच २१९.

**पांचट**—पु. पाणचट पहा.

**पांचवा स्तंभ**—पु. फितुरी लोक; देशद्रोही लोक. पंचम स्तंभ. (इं.) फिफ्थ कॉलम. स्पेन देशांतील यादवींत फ्रँको हा माद्रिदवर चाल करून येत असतां सैन्याचे चार स्तंभ करून चालून येत होता व आमचा पांचवा स्तंभ शहरांत आहे असें म्हणत असे, यावरून. 'पंजाब सरकारनें खाकसार पांचवे स्तंभ आहेत असें म्हटलें.' -के १५.११.१९४०.

**पांचशेरी**—स्त्री. पांसरी; पांच शेरांचें माप अथवा वजन.

**पांचसाली**—स्त्री. पांच वर्षांनीं एकदां येणारी पाळी. 'कुलकर्णीपणाची पांचसाली घरांत होती पण ती आणेवारीनें आमच्याकडे यावयाची.' -प्रति आत्म ६६.

**पाचारमणि**—पु. मोठें दुखणें येऊन गेल्यावर तें दुखणें उलटूं नये म्हणून हातांत बांधावयाचा मंतरलेला मणि. हा लांकडाचा अथवा पोकळ गवताच्या तुकड्याचा असतो.

**पाचार होणें**—१ दुखणें उलटणें. २ दृष्ट लागून अन्न नकोसें होणें.

**पाजणें**—अक्रि. पान्हवणें; दूध काढणें. 'म्हशीला पाजतांना कोंडा पुढें ठेवावा लागतो.' -खेस्व १७१.

**पांजरी**—पु. जहाजाच्या डोलकाठीवरील पिंजऱ्यांत उभा राहून टेहळणी करणारा. -ज्योत्स्ना सप्टें १९३८.

**पांजी**—स्त्री. ( महानु. ) वरील भाग; टोंक; शिखर. ‘ पोळीयेचीये पांजीवरी उभे. ’ –डोमेउ. लीला ६.

**पाट निघणें**—बोळा फिरणें; नाहींसा होणें; कलंक लागणें. ‘ खावंदाचे लौकिकावर पाट निघाला असतां वाकडी गोष्ट मनांत न आणली. ’ –पुद २.२०४.

**पाटका करणें**—१ बैल जनावर वगैरेस शिकविणें; शिस्त लावणें. ‘ बैल गाडीला जोडून पाटका कर म्हणजे हंगामांत अडचण पडणार नाहीं. ’ २ वश करणें; ताब्यांत आणणें. ‘ मी त्याला पाटका केला आहे. आतां तो माझ्या विरुद्ध जाणार नाहीं. ’

**पाटकें**—न. पासोडी, कांबळें वगैरेंचें एक पट्टें. [ सं. पट ]

**पाटकुळें**—क्रिवि. ( महानु. ) पाठीवर; पाठुंगळीस. ‘ पाटकुळें घेऊनि ऋद्धिपुरा नेलें ’ –भानखेडवर्णन ४१.

**पाटण**—न. पाठ; पाठाड; पाठीचा भाग. ‘ तलवारीच्या मुठीचा सणसणीत फटकारा त्याच्या पाटणांत लगावला. ’ –मशा जून १९३७. [ सं. पृष्ठ ]

**पाटदर**—पु. ( कों ) पाटाचें पाणी ज्या दोन बांधांमधून वाहतें त्या बांधावरून जाण्यायेण्यासाठीं बांधलेली चिरेबंदी वाट. [ पाट+दर ]

**पाटफुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. –मखेपु २२१.

**पाटली**—स्त्री. एक मुलींचा खेळ. –मखेपु ३३७.

**पाटवडी**—स्त्री. पाट नेण्याचा मार्ग. –आडिमहा ८०.

**पाटवणी**—न. पाटाचें पाणी. –स्त्री. पाटाचा मार्ग.

**पाटसर**—न. पाटाच्या बाजूनें केलेली वाट.

**पाटा**—स्त्री. एक जातीचा वेल; अंबष्टा. –मसाप ४५.३. अमर.

**पाटा बांधणें**—निखळलेलें किंवा मोडलेलें हाड बरोबर जोडून दोन्ही अंगांनीं फळया बांधून त्यांच्या दाबांत मोडलेला अवयव घट्ट बांधून ठेवणें; भाळी बांधणें.

**पाटांगण**—न. कागदपत्रांचें दप्तर ठेवण्याची जागा. –मवाइ २ [ सं. पट्ट ]

**पाटिमार**—स्त्री. फत्तेमार पहा. एक प्रकारचें गलबत.

**पाटी**—वि. लोखंडाचा एक प्रकार; साधें लोखंड. –प्रश २४.

**पाटी माजविणें**—लांकडाची फळी किंवा पाटी स्वच्छ धुवून तीवर ओल्या मातीचा अगर खडूचा पातळ लेप देणें. –आत्म ६७.

**पाटें**—न. जमिनींत धान्य पेरल्यानंतर जमीन सारखी करावयाचें हत्यार. –चित्रकृषि २.६.

**पाटेलु**—पु. कागदपत्रांचें दप्तर ठेवणारा अधिकारी, पाटील. –मवाइ २.

**पाठ**—स्त्री. तलवारीची बोथट बाजू. –प्रश ५३.

**पाठखर्डा**—पु. पाठकोरा कागद; एका बाजूस लिहिलेला कागद. [ पाठ+खर्डा पहा. ]

**पाठमोरणें**—अक्रि. पाठमोरें होणें; पाठ फिरविणें; परतणें; मागें फिरणें. ‘ ती जड पावलानें पाठमोरली. ’

**पाठशिवणी**—स्त्री. १ एक लहान मुलांचा खेळ. यांत एका मुलानें दुसऱ्या मुलाच्या पाठीमागून धांवत जाऊन त्यास शिवावयाचें असतें म्हणजे त्याची हार दुसऱ्या मुलावर जाते. २ ( ल. ) एकामागून एक एक गोष्ट घडत जाणें, येणें. ‘ सुख व दुःख हीं जगांत पावसाळा व उन्हाळा याप्रमाणें एकमेकांशीं पाठशिवणीचा खेळ खेळत असतात. ’ –के २४.१०.१९३९. [ सं. पाठ+शिवणें ]

**पाठाडें**—न. आढ्यावर घालण्याचें मोठें कौल; ढापा. –आडिमहा १० [ पाठ ]

**पाठाळ**—वि. रुंद पाठीचा. ‘ हीं घोडीं पाठाळ नसतात तर सडपातळ असतात. ’ –भूभ्र ३५. [ पाठ ]

**पाठीवर्ण**—क्रिवि. ( महानु. ) पाठमोरें; पाठ दाखविणें. ‘ अठराविये वेळा पाठीवर्ण करिती झाले. ’ –उच ९. [ पाठ+वर्ण ]

**पाठीस लागणें**—खोगिरामुळें वगैरे हत्ती किंवा घोड्यांच्या पाठीस जखम होणें. ‘ त्याणें हत्ती पाठीस लागून खराब जाहाले. ’ –पेद ४२.२.

**पाड**—पु. अनुग्रह; कृपा. ‘ माझ्या बचावाबद्दल मला फक्त ईश्वराचाच पाड मानला पाहिजे. ’ –मसाप १२७. [ सं. प्रति ? ]

**पाडप**—न. पाडा; पाडण्याची क्रिया; पाडण्याचा मोसम, हंगाम. ‘ एखाद्या बागेंत नारळाचें पाडप सुरू असलें कीं. ’ –पांढरे टग ७०९. [ पाडणें ]

**पांडर**—न. एक नीरंग लोहाची जात, पोलाद. –प्रश २२. [ पांडुर ? ]

**पांडव करणें, घालणें**—दिवाळींत शेणाच्या पांडवांच्या मूर्ती करून त्यांची पूजा करणें.

**पांडव घरावर ठेवणें**—( वर पहा ) सदरहू मूर्ति पांडव वनवासास गेले असें समजून घरावर ठेवणें.

**पांडव पंचमी**—स्त्री. कार्तिक शुद्ध पंचमी.

**पांडा**—पु. तिबेटच्या सरहद्दीवर क्वचित आढळणारा अस्वलासारखा एक प्राणी. –के २१.१.१९३६.

**पाडा उडणें**—गाईशीं पाड्यानें संभोग करणें.

**पाडा दाखविणें**—गाईस पाड्याकडे नेणें.

**पाडाव करून आणणें**—जिंकून आणणें; जिंकणें; पराभव करून धरून आणणें. [ पाडणें ]

**पांढरा कोळसा**—पु. वीज दगडी किंवा लाकडी कोळसा काळा असतो त्यापासून उष्णता व शक्ति मिळते त्या प्रमाणें वीज चमकणारी असून तीपासूनहि शक्ति मिळते यावरून. 'महाराष्ट्रामध्यें खनिज संपत्ति कमी असली तरी सह्याद्रीमुळें वीज अर्थात पांढरा कोळसा मुबलक मिळण्यासारखा आहे.' -के २.१.१९४२.

**पांढरी पांडे**—पु. ग्रामवस्तींत कर वसूल करणारा ग्रामाधिकारी; पांढरीचा कुळकरणी. -के १०.३.१९४२. [ पांढर पहा. पांढर+पांडा ]

**पांढरी मुंड**—स्त्री. पाटीलकीच्या कामाबद्दल पाटलास पांढरीपैकीं दिलेली इनाम जमीन.

**पांढरी शालजोडी**—मोठा बहुमान, सन्मान करणें. हिंदूस पांढरी व मुसलमानास हिरवी शाल देण्याची प्रथा असे -हब १५.

**पांढरें होणें**—१ उत्कर्ष होणें; उन्नति होणें. काळें होणें नायनाट होणें याच्या उलट. 'कॉंग्रेस सरकार अधिकारारूढ होतांच हरिजनांचें त्यांच्या पांढऱ्या पोशाखाबरोबर पांढरें झालें आहे.' -के १७.३.१९३९. २ (उप.) अपकर्ष होणें; अवनति होणें.

**पाणकळा**—पु. पावसाळा; पाऊस; वर्षाऋतू; पर्जन्याचा हंगाम. 'पाणकळा जर चांगला झाला तर काळया चिकणमातींत पाणी इतकें धरतें कीं दोन साल तें विहिरींना पुरतें.' -पाणकळा १.

**पाणकावळी**—स्त्री. (ठा.) एक जातीचा मासा.

**पाणकोंबडा**—पु. एक मुलांचा खेळ. -मखे ९७.

**पाणघाट**—पु. नदीचा घाट; पाणवठा; पाणी भरण्याची जागा. 'यशोदा मायबाई। कृष्ण तुझा मोठा धीट। गवळयाच्या राधिकेचा। रोखतो कां पाणघाट।' -वलो ५. [ पाणी+घाट ]

**पाणरेषा**—स्त्री. हुतूतूच्या मैदानाच्या मधोमध मारलेली रेषा. -व्याज्ञा १.१९३. [ पाणी+रेषा ]

**पाणसुरंग**—पु. पाण्यांत विशेषतः समुद्रांत गलबतें फोडण्याकरितां घालावयाचे सुरुंग.

**पाणसुसर**—स्त्री. पाणतीर पहा. 'तुमचीं जहाजें युद्धमान राष्ट्रांना मनाई केलेला माल पुरवतील तर आम्ही तुमच्या जहाजावर पाणसुसर सोडूं.' -के ६.१०.३९. [ पाणी+सुसर ]

**पाणहत्ती**—पु. हिपोपोटेमस; एक आफ्रिकेमध्यें आढळणारा पाणी व जमीन यांवर राहणारा हत्तीसारखा प्राणि; पाणघोडा. [ सं. पानीय+हस्ती ]

**पाणितुळी**—स्त्री. पाण्याचें भांडें. 'फुलांचे वोवरे खणोखणीं। आंतु पाणितुळिया कवणीं। पाचियाभिंत भंगीयाणी। कुसुम कळियांची।' -नरुस्व ४२६. 'वरी मकरंदाची पाणितुळी.' -नरुस्व ४६१.

**पाणिपात्र**—पु.न. १ पाणी म्हणजे हात एवढेंच ज्याच्याजवळ भांडें आहे असा २ हातांची ओंजळ हेंच पात्र. ३ (लक्ष) भिक्षा; करतलभिक्षा. तुल. करपात्री महाराज. 'कांतिएसि पाणिपात्र करावेया नगरामध्यें बीजें केलें.' -लीला १.१०. 'वोरंगळ प्रदेशीं गांवीं एकी पाणीपात्रासि बिजें केलें.' -लीला १.१७. [ सं. पाणि+पात्र ]

**पाणिप्रवाह**—पु. हस्तप्रयोग; मारामारी; हातानें मारणें. 'राजश्री स्वामी इतराज होऊन पाणिप्रवाह मुखावरी होऊन आबरू घेतली ऐसा प्रसंग येथील आहे.' -पेद १७.९९. [ सं. पाणि+प्रवाह ]

**पाणीकोंडा**—पु. (महानु.) राळयाच्या धापट्यांत पाणी घालतात. शिंत खालीं बसतात व वर कोंडा येतो या कोंडयास म्हणतात.

**पाणीभात**—पु. (महानु.) पाणी घातलेला भात. कृतिः तें मडकें धुतिः भातु निवडितिः पाणी घालिती निवोनीचें पानः सगळें निवु मग तोंड बांधितिः ती दीसां पालटीतिः पाणी वाघरीतिः तें पाणी भातु. 'पाणीभातु साचवा आतां तुमतें येथ अभ्यागतें येतील, पाणी भाताची आरोगणा।' -लीलाच. पू. रात्रीं पाण्याच्या डेऱ्यांत भात भरून ठेऊन तोंड बांधतात. सकाळीं त्यांतील पाणी निथळून त्याला जिऱ्यामिऱ्याची फोडणी देतात. हें पाणी भाताशीं खातात.

**पातणें**—सक्रि. संरक्षण करणें. [ सं. पा=रक्षण करणें ]

**पातशाहागर्दी**—स्त्री. राज्यक्रांति; बंडाळी. 'हा न येता वार्ता फुटतीच तर तेथें पातशहा गर्दीच होती.' -पेद २८.१६. [ फा ]

**पातळ उतळ**—वि. विरळ; थोडथोडे; अधूनमधून; कमीअधिक. 'परशिका पावेतों पातळ उतळ राऊत तलाव्यास पाठवीत जाणें, कल्याणास एकंदर न राहणें.' -रा १०.१५६. [ पातळ द्वि. ]

**पातळ पाणी**—वि. अतिशय पातळ; पाण्यासारखी पातळ; केवळ पाणीच. 'आजची आमटी अगदीं पातळ पाणी झाली आहे.'

**पातळ होणें**—दाटी कमी होणें; गर्दी कमी होणें; विरळ होणें.

**पाता**—पुं. संरक्षक; पोशिंदा. 'पाता त्या उभयास मी मज विधी घातास योजीतसे।' -नलोपा. [सं. पा=रक्षण करणें]

**पाताळ घड**—पु. पाण्यांतील जिन्नस बाहेर काढण्याचा घड.

**पाताळ लव्हाळा**—पु. बारीक लव्हाळा. -चित्रकृषि २.६.

**पातें लवणें**—डोळयाच्या पापणीची उघडझांप होणें.

**पातेरा**—पु विश्वास. 'मुस्तभखानानें शहाजीराजास पातेरा होईजेसे स्नेह नित्य नूतन वाहडवीत आला.' -तंजा शिला २२.

**पात्रापात्र**—वि. योग्य अयोग्य. 'सर्वांभूतीं अन्नवस्त्र द्यावे। पात्रापात्र विचारुन.' [सं. पात्र+अपात्र]

**पांथकार**—पु. १ प्रवासी; वाटसरू. २ (गो.) महालाचा ब्राह्मण. [सं. पथ-पथिक]

**पादतीर्थ**—न. पायांचें तीर्थ. एखाद्या श्रेष्ठ, पूज्य व्यक्तीचे पाय धुवून तें पाय धुतलेलें पाणी तीर्थ म्हणून घेण्याचा प्रघात आहे. [सं.]

**पाददर्शन**—न. (पाद=पाय) पायांचें दर्शन; एखाद्या मोठया व्यक्तीची भेट.

**पादधूलि**—स्त्री. पायधूळ; पादरज. [सं.]

**पाद-पूरक**—वि. पद्यामध्यें वृत्ताच्या चरणांतील अक्षरसंख्या पुरी करणारें. [पाद=चरण+पूरक=पुरें करणारें]

**पादपूरणार्थ**—वि. चरणांतील अक्षरसंख्या पूर्ण करण्याकरितां योजिलेलें. [सं. पाद=चरण+पूरणार्थ=पुरें करण्याकरितां योजलेले]

**पादवंदन**—न. पाया पडणें. [सं.]

**पादशहानह**—वि. बादशाही योग्यतेचा. -आफ.; -मुधो. [अर.]

**पादस्पर्श**—पु. वंदन; नमस्कार. [सं.]

**पादांगुष्ठासन**—न. एका पायाच्या टाचेवर बसून दुसरा पाय त्यावर आडवा घेणें. -व्याज्ञा ४.५००.

**पादावगुंठन**—न. १ पाय झांकण्याकरितां वापरावयाचें वस्त्र. २ पायांस मारलेली मिठी; पाय धरणें; पाय झांकणें. [सं.]

**पाद्यपूजा**—स्त्री. संन्यासाची पूजा.

**पानकणीस**—न. पाणकणीस पहा. रामबाण.

**पानका**—पु. (कर्ना.) पन्हें.

**पाणखर**—स्त्री. झाडाचीं पानें गळून पडण्याचा काळ. [सं. पर्ण+क्षर]

**पानगळ ऋतु**—पु. झाडांचीं पानें गळून पडण्याचा काळ. पानखर पहा. 'पानगळ ऋतु असल्यानें पिकलेलीं व सुकलेलीं जीर्ण पानें सकाळपासून संध्याकाळपर्यंत निरंतर गळून पडत असत.' -उभि २. [पान+कळणें]

**पानडी**—स्त्री. १ पाच रत्न. २ पाच अत्तर.

**पानफुंकणी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. एक पान उपडें टाकून त्यावर माती टाकतात. ती माती प्रत्येकानें पाळीनें फुंकरानें उडवावयाची. ज्याच्या फुंकरानें पान उघडें पडेल त्यावर राज्य. त्यानें इतरांस धरावें. पळणारांनीं पान, दगड, गवत वगैरेवर उभें रहावें. -मखे ६१.

**पानपणें**—अक्रि. (महानु.) मुरगळणें; मुरडणें. 'पाय पानपले.' -पैंच ५५.

**पानवई**—स्त्री. (महानु.) पाणी ठेवण्याची जागा. 'पानवैयेवरि.' -पैंच ५४.

**पानसळ करणें**—जमीन एका पातळींत आणणें; खांचखळगे काढून जमीन सपाट, सारखी करणें. [पानसळ]

**पानारी**—पु. विड्याचीं पानें विकणारा. [पान]

**पानें**—न.अव. एक मुलींचा खेळ. -मखे ३३८.

**पानें पुसणें**—एक मुलींचा खेळ. -मखे ३४०.

**पानोळी**—स्त्री. (व.) पानगी; पानावर भाजलेली लहान भाकरी. 'भाऊ खुणावे डोळयांनी। वाढ वहिणीला पोळी। बोले वहिनी आतूनि। केली मोहाची पानोळी।' -वलो ३०. [पान]

**पान्सद**—वि. पांचशें. -आफ. [फा.]

**पापकर्म**—न. पातक; दोष; अपराध; कुकर्म; अनैतिक आचरण. [सं.]

**पापडी**—स्त्री. फरसबंदी. 'अवघी आळी राखोंनि चोखडी। दाळिली चंद्रकान्ताची पापडी। तें पाणी सैंभ पडे पाखाडी। मुखचंद्री प्रमदाच्या।' -नरुस्व ७८१.

**पापणीपूजक**—पु. प्रार्थनासमाजी; प्रार्थना करताना हे डोळे मिटतात. 'आम्ही पापणी पूजक नाहीं असें लिहून देणारांनीं गणपती उत्सवास सहाय्य कां करूं नये.' -टिच १.४२४. [पापणी+पूजक]

**पापद्रव्य**—न. अन्यायानें मिळविलेली संपत्ति. [सं.]

**पापनिरसन**—न. पातकाचें निराकरण; पातक दूर करणें. [सं.]

**पापनिष्कृति**—स्त्री. पापाचें परिमार्जन, निरसन. [सं.]

**पाबोडी**—न.अव. कमलबीज. [सिंधी]

**पायगोवा**—पु. १ माग. २ गुंता; अटकाव; अडथळा. –शको पहा. [ पाय+गोवणें ]

**पायचळ**—स्त्री. चाहुल; पावलांचा आवाज. [ सं. पद+चलन ]

**पायचीं माणसें**—न.अव. पायदळः पदाति. –हब ६९. [ पाय ]

**पायटा**—पु. टांग्याला चढण्या–उतरण्यासाठीं पाय ठेवण्याची असलेली पायरी; पावंडा. [ पाय ]

**पायटेक**—स्त्री. एक डुकाऊर मुलांचा खेळ. –व्याज्ञा १.३१२.

**पायडी**—स्त्री. (अव. **पायड्या**) जिना; निसण; सोपान. [ सं. पद; म. पाय ]

**पायदळणी**—स्त्री. पायमल्ली; पायाखालीं तुडविणें. [ सं. पद=पाय+दलन ]

**पाय(ये)दामी**—पु. जाळयानें पक्षी धरणारा; फासे पारधी. 'पायेदामी यास आम्हीं विचारलें कीं कडुसांत कोणत्या पाटलाचे घरीं बदकाचा जोडा आहे त्याचें नांव सांगणें.'–पेद १८.१४.

**पायधूळ झडणें**—थोर माणसाच्या पायांची धूळ आपल्या घरीं पडणें; पायधूळ पडणें. एखाद्या मोठया व्यक्तीचें आगमन होणें.

**पायनाम**—वि. सेवक; अधीन. 'वरकड सर्व आपले आज्ञेमध्यें आहेतच.' –पेद २८.२८. [ फा. ]

**पायनाळ**—न. (गो.) तसबीर. इं. पॅनेल.

**पायपाखाणा**—स्त्री. वरघोडा; वरयात्रा. वरास वधूगृहीं नेण्याकरितां वधूकडील मंडळी व वधूपिता व इष्टमित्रादि जातात त्यांस पातागेप्रभूंत म्हणतात –ज्ञाको १७ (प) २०९. [ सं. पादप्रक्षालन ]

**पायरव**—पु. पावलाचा आवाज; पाऊल. 'आपण पायरव काढला म्हणजे पळून गेलों तर आपली दुष्कीर्ति होईल.' –ऐपो २.१४. [ सं. पद+रव=आवाज ]

**पायलोक**—पु. पायदळ; पदाति. [ पाय+लोक ]

**पायवठणी**—स्त्री. पायानें कापसाची सरकी काढणें. ही जुनी पद्धत आहे. [ पाय+वठणें ]

**पायसर**—पु. पादचारी; पाय असणारा. 'रायाच्या निशानीं घाव पडिला. तो पायसरेंहि जाणितला आणि पांगुळेंहि जाणितला.' –महानुभावी म्हणी.

**पायह**—पु. १ भव्यता, २ पदवी. –मुधो. [ अर. ]

**पायाड**—न. परांच्या; पहाड; इमारत बांधतांना साधनभूत म्हणून बाहेरच्या बाजस लांकडांची शिडयांसारखी रचना करतात ती. 'त्या देवालयाचें शिखराचें काम चालू असतां त्याला जें पायाड बांधलें होतें त्या पायाडाच्या लांकडांचा पुढें वाडा बांधला.' –गोरा इ २४.

**पायाळ-ळी**—वि. पायदळ; पायानें चालणारा. 'पायाळी महीमंडळी.' –गस्तो ९८.

**पायेजामियाखालीं पडणें**—ताब्यांत घेणें; हस्तगत होणें; पायतळीं येणें. 'तो मुलूख पायेजामियाखालीं पडेल.' –वसमो.

**पारगी-ग**—स्त्री. (व.) खेप; पाळी; वेळ. 'या पारगीं फक्त कांदा भाकरच मिळते व दुसऱ्या पारगीं पुरें जेवण असतें.' आरगी पारगी पहा.

**पारंग्याचीं वाहिलें**—न. अव. तरून जाण्यासाठीं पारंग्याचे केलेले सांगाडे. [ पारंगा+वाहणें ]

**पारठा, पारठो**—वि. (ठाकरी.) बैलास वयाच्या दुसऱ्या वर्षी म्हणतात.

**पारद**—पु. पारा. [ सं. ]

**पारदभस्म**—न. पाऱ्याचें (औषधि) भस्म. [ सं. ]

**पारदलिंग**—न. पाऱ्याचें लिंग. [ सं. ]

**पारदशुद्धि**—स्त्री. पारा शुद्ध करण्याची क्रिया. [ सं. ]

**पारदादि मलम**—न. पारा घालून केलेलें मलम. [ सं. पारदादि+अर. मलम ]

**पारमांडल्य**—पु. (महानु.) एक महानुभावी आम्नाय; पंथ; शाखाभेद. [ सं. ]

**पारहेरा**—वि. सविस्तर; विस्तारपूर्वक. 'सारांष बाजारू गप्पा ऐकूं नयेत. कारण इतका तपसील पारहेरा त्याहावा लागतो.' –रा १८.१२५.

**पारा**—पु. घायपात. 'कुंपणाला पारे पुष्कळ असतात.' –आत्म ६२.

**पारा चढविणें**—१ आरशाच्या कांचेवर पाऱ्याचा लेप देणें. २ भांडयावर मुलामा देणें.

**पारा फुटणें**—पाऱ्याचें औषध घेतल्यानंतर अंगावर फोड येणें.

**पारा मारणें**—पारा स्थिर करणें; पारा पातळ असतो त्याचा घट्ट गोळा बनविणें.

**पारिजातक**—पु. एक मुलींचा खेळ. –मखेपु ३०७. [ सं. ]

**पारितोषिक न्यायालय**—न. लढाईत धरलेल्या शत्रूच्या जहाजांसंबंधी निर्णय देणारी न्यायकचेरी. –के ३.११.१९३९. इं. साल्व्हेज कोर्ट. [ सं. ]

**पारिश्रमिक**—पु. लेखनादि श्रमाचें काम करणारा. [सं.]

**पारीपळ**—विं. (महानु.) पळालेला; फरारी; ग्रामगत; परागंदा. 'तो पारीपळ असे.' –उच २०८.

**पार्श्वभूमि**—स्त्री. सभोंवतीचें वातावरण; भोंवतालची परिस्थिति; आजूबाजूची सजावट. [सं. पार्श्व=बाजू+भूमि]

**पाल**—न. एक प्रकारचें गलवत (लढाऊ).

**पालक**—न. करमुक्त; करमाफ. 'येक घराची घरपट्टी व एक म्हैसीची ठाण पालक दिल्ही असे.' –पेद ३९.१३२. [सं पाल=पाळणें]

**पालक रैतावा**—पु. मालकानें कुळास जमीन खंडानें द्यावयाची तींत घालमेल न करतां रयतवारीप्रमाणें नियमित खंड देऊन उपभोगावयाचा हक्क. [पालक+रयत]

**पालखी काढणें**—पालखी फिरविणें.

**पालखीची सेवा**—देवाची मूर्ति पालखींत घालून फिरविणें.

**पालखींतला देव**—उत्सवमूर्ति.

**पालग्रहण**—न. पालन; संरक्षण. 'राज्यांतील लोकांचें पालग्रहण करणारा आपणाविरहित कोणी आहे ऐसें नाहीं. –पेद ३.१८४. [सं. पालनम्+ग्रहणम्]

**पालट**—पु. १ (लाठी.) घोव्यावरील मार. २ फरीगदक्यामधील घोव्यावरील वार. –व्याज्ञा ४.३८७.

**पालथा दादर**—पु. लोंबतां पूल; ओढतां, काढतां येण्यासारखा पूल. 'नगरच्या किल्ल्यांत दरवाज्याचे वाटेंतील पुलास पालथा दादर करविला ' –पेद ४१.९८.

**पालणें, पाळणें**—अक्रि. (महानु.) संपणें. 'अन्न अवघें पाललें: वड आणि तूप असे: होका: घेऊनि या: ' –लीला ३ पृ ८१.

**पालमांडे**—न. (महानु.) आरतीचें तबक. 'अहो हातीचें पालमांडे थरारिले देखौनि ' –पूजा.

**पालवा**—पु. बोकड. [?]

**पालव्याचें कातडें**—तबला, मृदंग, वगैरेस लावावयाचें बोकडाचें कातडें.

**पालाश**—पु. (शाप.) एक रासायनिक मूलद्रव्य. (इं.) पोटॅश

**पावगी**—पु. खानदेशांतील अक्राणी परगण्यांतील रानटी लोक.

**पावटळ**—स्त्री. पाणमोटळी. ॰**फुटणें**-बाळंतीण होण्याच्या आधीं पाणमोटळी फुटणें.

**पावड्या**—स्त्री. एक मुलांचा खेळ. –व्याज्ञा १.२३०. [पाव=पाय]

**पावड्यावर धरणें**—चाल शिकविणें.

**पावणेबारा होणें**—गोंधळ; घोटाळा होणें; गडबड, दंगल होणें. 'परस्पर काय पावणेबारा होत आहेत ते होऊं द्या मग काय करावयाचें तें ठरवूं.' –के ७.११.१९३९.

**पावता करणें**—यात्रेहून येतांना देव बरोबर येतो अशी समजूत आहे. त्याप्रमाणें बरोबर आलेल्या देवास नैवेद्य दाखवून नारळ प्रसाद देऊन परत पाठविणें.

**पावन-ना**—पु. ब्रह्मदेशांतील ब्राह्मण जाती. या तीन आहेत: १ आराकानी. २ मणिपुरी. ३ मदये. –मनो १९३३.

**पावलागणिक**—क्रिवि. पावलो पावलीं; दर पावलास; प्रत्येक पावलास.

**पावलीमर्द**—पु. नामर्द; गृहशूर. –विविध ७.१२. १९४१.

**पावलोक**—पु. पायदळ; पदाति. [सं. पाद+लोक]

**पावशी**—वि. पावसांत भिजलेला. उदा. पावशी माल, पावशी मिरची, पावशी भात. [पाऊस]

**पावित्र्यविडंबन**—न. पवित्र वस्तूंची विटंबना. पूज्य गोष्टीबद्दल अनादराची भाषा, वागणूक, इ.

**पाव्हणेपणा**—पु. (ग्रामीण.) नातें; आप्तसंबंध. 'तुमचा त्येचा पाव्हणेपणा हाय जनूं.' –दौ ४४. [पाहुणा]

**पाशवी विचार**—पु. पशूच्याच मनांत येतील, मनुष्याच्या मनांत सहसा येणार नाहींत किंवा येणें योग्य नाहीं असे विचार; दुष्ट विचार; पातकी विचार; आसुरी इच्छा, हेतु, विचार. [सं.]

**पाशवी शक्ति**—स्त्री. पशूंमध्यें ज्याप्रमाणें बुद्धीऐवजीं क्रियाशील असें केवळ अंगबळ असतें तसें बळ; अचाट, आसुरी सामर्थ्य; नाश करणारें सामर्थ्य; पशुतुल्य वर्तन. [सं.]

**पाशुपतास्त्र**—न. (ल.) निकराचा अखेरचा उपाय. अर्जुनास श्रीशंकरापासून पाशुपतास्त्र मिळालें होतें तें अमोघ होतें व त्याचा फक्त आणीबाणीच्या प्रसंगीं उपयोग करावयाचा असे, यावरून. [सं.]

**पाष**—पु. पाख; पखवाज; पक्षवाद्य; एक प्रकारचें वाद्य. 'तैं पाष वाजैनी। बाणसुरें रीझविला।' –उषा ७.६५. [सं. पक्ष=पाख, पाष]

**पाषाणधारी**—पु. लिंगायत. हे गळ्यांत पाषाणाचें लिंग धारण करतात यावरून. [सं. पाषाण+धृ-धारण]

**पाष्टा**—पु. (व.) चाकाचा आरा. 'चाकाचे दोन पाष्टे फुटले ते नवे घाला.'

**पास**—पु. पाहरा. -मुधो. [ अर. ]

**पासवान**—पु. पहारेकरी. -मुधो. [ अर. ]

**पाहड-पाड वल्ली**—स्त्री. एक प्रकारची वेल; पाटा; अंबष्टा. -मसाप ४५.३. अमर.

**पाहाटविण**—अक्रि. (महानु.) प्रभात होणें; पाहाट होणें; उजाडणें. 'काइणा भोजेया पाहाटीविलें.' [पहाट]

**पाळक**—पु. १ निर्बंध. २ कांहीं न करण्याचा दिवस. [ सं. पाल् ]

**पाळणा**—पु. १ एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९७. २ एका कडींत पाय व दुसऱ्या कडींत पोट अडकवून शरीर लांब करून राहणें. -व्याज्ञा ३.४१८. [ सं. पालख ]

**पाळणूक**—स्त्री. १ एखाद्या मंत्राचें साधन करीत असतां किंवा तो प्राप्त झाला असतां सामर्थ्ययुक्त राहावा म्हणून जे आचार नियम पाळावयाचे असतात ते. २ एखादें औषध घेत असतां पथ्यादि नियम पाळावयाचे असतात ते. [ सं. पालन ]

**पाळनेत**—न. पिंवळें रेशमी वस्त्र ( पाठारे प्रभूंत हें नवरी नेसते ). -ज्ञाको १७ (प) २४९.

**पाळेगण**—न. सैन्य; समूह; जमाव. 'उंचपण देखौनि तेजाचें। दांग उमळलें प्रकाशाचें। कीं पाळेगण उभले अरुणाचें। देवाचिये भेटीलागीं॥' -नरुस्व ७११. 'दक्षिणे उभिले पाळेगण। राजवनांचें॥' -नरुस्व ७०६. [ सं. पाल्+गण ]

**पिकवणीचा**—वि. कृत्रिम उपायानें पिकविलेला. [ सं. पच्-पिकविणें ]

**पिगल**—वि. पिंवळा ( कबूतराचा डोळा. ) [ सं. पिंगल ]

**पिंगा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखेपु २३२.

**पिचाटी**—स्त्री. शेंडी; झिपऱ्या [ सं. पिच्छ ]

**पिचाटया आवळणें**—मुसक्या बांधणें.

**पिचाटी**—स्त्री. घरदार न करतां रानावनांत भटकणारी एक जात. [ पिसाट ]

**पिंजर**—न. पेंढा; गवत; तृण. 'कँपांत दोन दिवस अगोदर पाऊस झाल्यानें प्रत्येक तंबूत भाताचें पिंजर पसरलें होतें.' -आनंद, आक्टो. ३५.

**पिंजर**—पु. लहान मुलांच्या दस्ता पिंजर या पाणी घालण्याच्या खेळांतील एक संज्ञा; दोन ही संख्या. -व्याज्ञा १.४१२.

**पिंजरा**—पु. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३४३.

**पिंजरी**—स्त्री. जाळीचें कपाट. 'पैसे लागतील तुला ते पिंजरीवर ठेवले आहेत.' -श्रुना ९९. [ सं. पंजर ]

**पिंजारी गुंड**—पु. जाळीचा मणि. [ सं. पंजर ]

**पिंजाह**—वि. पन्नास. -मुधो. [ अर. ]

**पिंजीरानह**—वि. विचारणीय. -मुधो. [ अर. ]

**पिंजेची**—स्त्री. पिंजरेची, विशिष्ट प्रकारच्या नकशीची ( नथ ). 'कोण चुनखडी मारी पिंजेच्या नथीवरी।' -वलो ३.

**पिटणें**—सक्रि. पुकारणें; जाहीर करणें; वाद्य वाजवून प्रसिद्ध करणें. उदा.-दवंडी पिटणें; डांगोरा पिटणें. 'करारे हाकारा ! पिटारे डांगोरा !' -कहाण्या. **पिटविणें**-सक्रि. दवंडी; डांगोरा वगैरे पिटून जाहीर करणें; हाकारा करणें.

**पिठवनी**—स्त्री. एक वनस्पति; सिंहपुच्छी; कलशि धावनि. -मसाप ४५.३. अमर. पिठवण पहा.

**पिंडाण**—न. १ (व.) पिंड; पिंडाचें अन्न; भात. 'भरल्या गंगेंत। पिंडाण पाडी एक। पुतण्या केला लेक।' -वलो ६४. [ सं. पिंड+अन्न ]

**पिढलें**—न. लांकडाचा ठोकळा; ओंडका; पिढें पहा. -इयाआ.

**पितृत्रयी**—स्त्री. बाप, आजा व पणजा. [ सं. ]

**पितृदिशा**—स्त्री. दक्षिण दिशा. 'सुटला पितदिशेचा वारा.' -राराविं. [ सं. ]

**पित्त गांधी**—स्त्री. पित्तामुळें शरीरावर उठणारे फोड. [ सं. पित्त+ग्रंथि ]

**पित्त पाडणें**—ओकारी आणणें; वमन करणें.

**पित्त्या**—पु. १ वाईट कर्मांतील साथीदार; दोस्त. २ भिडू; पोटांतील गडी.

**पिदर**—पु. बाप. -मुधो. [ फा. तु० सं. पितर ]

**पिपळा**—पु. तरवारीच्या टोंकाकडील भाग; हा कांहीं मध्यें दुधारी असतो. -प्रश ५३.

**पिपाणी, पिप्पी**—स्त्री. पिंकाणी पहा.

**पिराणी**—पु. सुरत-बार्डोलीकडील एक अर्धवट मुसलमानी पंथ. -के २४.१२.१९४०. [ पीर ]

**पिरामिड**—न. १ मनोरा; बहुभुज पायावर रचलेली निमूळती इमारत. ईजिप्तमधील प्रसिद्ध इमारती. २ कसरतीचा एक प्रकार: मनुष्यें एकमेकांवर निरनिराळ्या आकारांत व स्थितींत उभीं करून रचलेला मनोरा. [ इं. ]

**पिरोजी**—वि. एक रंग. [ फा. पिरोज ]

**पिलंगावणें**—अक्रि. पिळणें; मुरडणें; फिरवणें; मिटणें. 'मयूर पिलंगावी पिस।' -भारा. बाल २६.९. मोरानें पिसें मुरडणें हा अपशकून मानीत.

**पिलाई**—स्त्री. जिनावर कापूस वटविणें; कापसांतील सरकी काढणें.

**पिलावा**—पु. एक रेशमी वस्त्र.

**पिलू**—स्त्री. झुडपांची जाळी; रहाटी. 'त्यांनीं आम्हास एका पिलूमध्यें बसलेला मोठा डुक्कर दाखविला.' -रत्ना. जुलै १९२६.

**पिशाच्च गण**—पु. भुतांचा समुदाय. [सं.]

**पिशाच्च वृत्ति**—स्त्री. पिशाच्चासारखी वागणूक, राहणी.

**पिशाच्च साधन**—न. पिशाच्च वश करून घेणें.

**पिसर**—पु. मुलगा. -मुधो. [अर.]

**पी पाण्याचा नेम**—पु. कोणीं सांगितल्याशिवाय पाणी प्यावयाचें नाहीं असें व्रत. -खेस्व ६४.

**पीकदाव**—पु. भरलेलें पीक; पीकपाणी. 'जेथे पीकदाव व वस्ती आहे तेथें बंदोबस्त केला आहे.'-पेद १६.७७.

**पीक धरणें**—न. शेतांत पीक किती होईल याचा अंदाज करून धारा, खंड ठरविणें; अभावणी करणें. -ज्याआ. [पीक+धरणें]

**पीकपत्रक**—न. पिकाचा हिशोब. असा हिशोब केलेला कागद. [पीक+पत्रक]

**पीकाची आणेवारी**—स्त्री. पिकाचा अंदाज. उत्तम पीक आलें असतां तें सोळा आणे आलें असें समजून जें प्रत्यक्ष पीक आलें असेल ते त्याचा कितवा अंश किंवा किती आणे असतील तें ठरविणें.

**पीकसाल**—न. फसली वर्ष; ज्या वेळीं पिकें येतात त्या वेळीं आरंभ होणारें वर्ष. हंगामी वर्ष. [सं. पीक+फा. साल]

**पीठदान**—न. नवग्रहांसंबंधीं एक दान.

**पीठमीठ (करणें)**—न. कसेंतरी भागविणें; गरीबीचा संसार चालविणें; कशीबशी व्यवस्था. 'थोडेबहुत पीठमीठ केले ते खर्च करूं परंतु बिदाईचें संकट पडलें आहे.' -पेद ४०.६९. [सं. पिष्ट+मिष्ट]

**पीठवांगें**—न. हरभऱ्याच्या पिठाचें मसाला भरलेलें वांग्याच्या आकाराचें खाद्य. [पीठ+वांगें]

**पीठस्थ**—वि. पीठाधिष्ठित; पीठावर असलेला. [सं.]

**पीठाधिष्ठित**—वि. अधिकारारूढ. [सं. पीठ+अधिष्ठित]

**पीठारूढ**—वि. अधिकारारूढ. [सं.]

**पीठारोहण**—न. पीठाधिष्ठित होणें; पीठावर येणें; बसणें. [सं.]

**पीडापीड**—स्त्री. संकट परंपरा. [सं. पीडा द्वि]

**पीरान**—वि. वैराण जमीन; जिराईत जमीन; ज्या जमिनींत विहीर नाहीं अशी जमीन. अडाण पहा. 'त्या काळीं पीरान जमिनीचा एक ते दीड व अडाणाचा चार ते पांच असा दर होता.' -देवी अहिल्याबाई (संक्षिप्त चरित्र) १८. (पीरान हें वीरानबद्दल चुकीचें वाचन असावें ?)

**पुआड**—पु. दद्रुनाशक वनस्पति; तराटा; टायखिळा; दद्रुघ्न; प्रपुन्नाड; एडगण. -मसाप ४५५.

**पुंख**—न. बोर.

**पुख्खा**—पु. फुक्का पहा. -के २९.६.१९३७.

**पुंगळी**—स्त्री. पानाची सुरळी; अंकुर; सुयरा; ऊंस बेणें लावल्यावर त्यांतून निघणारी पहिली उंसाच्या पानाची सुरळी.

**पुच्पुच् रंगण**—न. एक मुलांचा खेळ. -मखेपु १२५.

**पुंजणें**—अक्रि (महानु.) जमविणें; गोळा करणें; वेचणें. 'सेन पुंजिता.' -पैली ७३. [पुंजी]

**पुजी**—स्त्री. बिगार; वेठ.

**पुट चढणें**—पातळ थर जमणें.

**पुट देणें**—पातळ लेप देणें.

**पुटाचें सोनें**—न. शुद्ध सोनें.

**पुट्टू**—पु. काश्मीरांत तयार होणारें लोंकरीचें जाड कापड.

**पुट्टू**—वि. लहान (गाडी, घोडा, वगैरे लहान मुलांचीं खेळणीं). [का. पुट्ट]

**पुट्टी**—स्त्री. (कुस्ती.) एक डाव; प्रतिपक्ष्यास वर उचलून ढुंगणावर हबकणें. -के १३.१२.१९३८.

**पुड्याचा**—वि. आकाराचा; बांध्याचा.

**पुडवें**—न. (गो.) धोतर.

**पुडिव**—वि. आंतील; गाभ्यांतील; पुडांतील भाग. 'तयांमाजि रुक्मिणीचें रूप। जैसें सिद्ध रसाचे लेप। कीं चंद्राचें पुडिव निकोप। कांडारिलें।' -नरुस्व ८६. [सं. पुट]

**पुडेदार कलमदान**—न. खण असलेलें कलमदान.

**पुढारणें**—सक्रि. (महानु.) पुढें वायदा करणें; भविष्यकालीन आशीर्वाद देणें; वर देणें. 'मज गोसावी पुढारलें असतिः' -उच.

**पुण्य**—वि. पवित्र. 'पुण्या सेव्या पतीसी.' -गस्तो २०. [सं.]

**पुतला, पुतळा**—पु. तरवारीच्या मुठीचा परजेच्या बाजूचा पकडींत धरावयाचा भाग. -प्रश ५५.

**पुतळी**—स्त्री. शेणी; गोवरी. म्हण-'शेरभर सुतळी तेराचें पुतळी.'

**पुत्रावा**—पु (महानु) पुत्रधर्म; पुत्राचें कर्तव्य. 'तुम्ही सोभाग्यानें हांसत असाः तरि मेलेया काइ करालः जी जीः पुत्रावो जे तें करीनः' -लीच ३. पू. १८.

**पुन**—शअ. ( कु. ) पासून. ' कवापून. '

**पुनरोख्त, पुनरुक्त**—क्रिवि. पुन्हां; दुसऱ्यांदा; वरचेवर. ' पुनरोख्त येथें येऊन साहेबाकडील लहान मोटी कामे असतील तितकी विल्हे लाऊ. ' -पेद ८.३८. [ पुनर्+उक्त ]

**पुनवडी**—स्त्री. पुण्याचें जुनें नांव; पुणें. -नि ९. [ पुणें+वाडी ]

**पुन्नाक**—स्त्री. वाळलेल्या खोबऱ्याचें तेल काढल्यानंतर शिल्लक राहिलेली पेंड. -ज्ञाको ( न ) २३६.

**पुर**—वि. पूर्ण. उदा. -खाजानपुर. -मुधो. [ अर. ]

**पुरकस**—स्त्री. वास्तपुस्त; पुरस्कार; बढती. ' माझी दरबारी पुरकस होय तो अर्थ योजिला पाहिजे. ' -रा १३. २२. -वि. पूर्ण; पोख्त; पुरेसा. ' नवी सिबंदी ठेऊन जमाव पुरकस करून श्रमसहास करून खिचराचें पारपत्य करणें; बंदोबस्त करणें. ' -पेद २१.१८९. [ सं. पुरस्+कृ ]

**पुरणपाटली**—स्त्री. आंत तांबें किंवा एखादी हिणकस धातु घालून वर थोडें सोनें लावून तयार केलेली पाटली; सबंध सोन्याची नसणारी पाटली. [ पुरण=पाटली ]

**पुरतर**—वि. प्रकाशपूर्ण.

**पुरबिया**—पु. उत्तर हिंदुस्थानांतील पूर्वेकडच्या बाजूस राहणारा; पुरभय्या; परदेशी. ' मग आम्हांस अविंधार्णा पुरबिया केवलरामास भेटविले. ' -पेद १४.१०२. [ सं. पूर्व, पूर्वीय ]

**पुरभय्या**—पु. परदेशी; युक्तप्रान्तांतील; उत्तर हिंदुस्थानी; पूर्व देशांतील. ' कांहीं कांहीं पुरभय्या कुटुंबें इकडच्या टापूंत कायम झालीं होतीं. ' -उपेअंत ६. [ सं. पूर्व; पूर्विया ]

**पुरवठ्याचा**—वि. सर्वांस पुरण्यासारखा. ' श्रीखंड व पुरी हें पुरवठ्याचें पक्वान्न नव्हे. ' [ पुरणें ]

**पुरवत**—स्त्री. आपली कुवत; आपणास पुरें पाडतां येईल अशी स्थिति; परवड; ऐपत. ' पुरवत पाहून माल खरेदी करावा. ' [ पुरणें ]

**पुराण गाणें**—रडगाणें लावणें; पुराण हें ज्याप्रमाणें एक सुरांत सांगितलें जात असल्यामुळें कंटाळवाणें वाटतें त्याप्रमाणें तीच तीच गोष्ट सांगणें; रडकथा सांगणें.

**पुरातत्त्व खातें**—न. पुराण वस्तु संशोधन खातें. (इं.) आर्किऑलॉजिकल डिपार्टमेंट. [ सं. फा. ]

**पुरोगामी**—वि. पुढें जाणारें; प्रगतिपर; उत्कर्षकारक; विकासप्रवण. [ सं. ]

**पुरोगामी वाङ्मय**—समाजोत्कर्षकारक वाङ्मय; प्रगमनशील, प्रवर्तक वाङ्मय; ध्येयमार्गावर पुढें नेणारें वाङ्मय.

**पुलिका**—स्त्री. ( महानु. ) पुळी; पुटकळी. ' खांडुका पुलिका मृगांके काई होयेः '

**पुलीवाल**—पु. खंजिऱ्याचा पवित्रा. -प्रश १८.

**पुश्चळत्व**—न. ( महानु. ) व्याभिचारीवृत्ति. ' पुश्चळत्त्व स्वरूपी न वर्ते. ' -सिसू वि. ९५.

**पुश्त**—स्त्री. पुस्त पहा.

**पुष्पावरोध**—पु. विटाळ बंद होणें. स्त्रियांस रजोदर्शन होत नाहींसे होणें. [ सं. ]

**पुष्पिका**—स्त्री. ग्रंथाच्या अध्यायाच्या अखेरीस समाप्तिवाक्य. ' अध्यायाच्या शेवटच्या पुष्पिकेमध्यें अध्यायांतील विषयाचा निर्देश केलेला नीलकंठीय पाठांतून दिसतो. ' -के १७.१०.१९४१. [ सं. ]

**पुस**—पु. ( बायकी. ) पौष महिना. [ सं. पौष ]

**पुसका**—वि. फुसका पहा. [ ध्व. ]

**पुसव**—पु. ( सोनारी. ) तार ओढण्याकरितां वापरतात तो चिमटा. [ सं. प्र+सू-सव ? ]

**पुस्टपत्र**—न. साहाय्य; मदत; पाठपुरावा. ' आम्ही स्वामीचें प्रतापें मोरचे लावून चऊ दिवसा घेऊ परन्तु मागील पुस्टपत्र पाहिजे येदनिमित्त घडून येत नाहीं. ' -पेद १.१२७. [ सं. पुष्टि+पत्र ]

**पुस्तकगृह**—न. ग्रंथालय; ग्रंथसंग्रहालय. ' पुस्तकगृह हें सुधारणुकीचें एक मोठें कलम आहे. असें जाणून त्याची स्थापना लहान सहान गांवांतून सुद्धां झाल्याचें वरचेवर वाचण्यांत येतें. ' [ सं. पुस्तक+गृह ]

**पुस्तक संन्यासी**—पु. प्रत्यक्ष गुरूपासून उपदेश न घेतां ग्रंथावरून उपदेश किंवा दीक्षा घेऊन झालेला संन्यासी. ' श्रृंगेरी मठांत अशी परंपरा आहे. ' [ सं. पुस्तक+संन्यासी ]

**पुंस्त्वहरण**—न. खच्ची करणें; प्रजननाक्षम करणें; ( बैल ) बडविणें; ( कोंबड्याचें ) जननेंद्रिय काढून टाकणें. -ज्ञाको ( क ) ७५६. [ सं. ]

**पूज्य**—न. १ शून्य; टिंब. ' विद्येच्या नांवानें पूज्य. ' [ सं. ]

**पूज्यवार**—पु. गुरुवार. ' काल पूज्यवार त्यामुळें स्वामीचें दर्शन घेतले नाहीं. रवाना शुक्रवार हे विनंति. ' -पेद ३९. १२२. [ सं. पूज्य+वार ]

**पूर्णधनुरासन**—न. ( मल्लखांब. ) मल्लखांबापासून थोडें दूर उभें राहून पूर्ण कमान टाकून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.६५. [ सं. पूर्ण+धनु+आसन ]

**पूर्व**—न. पूर्वसंचित; पूर्वजन्मार्जित; मागील जन्मीं जें सत्कृत्य किंवा दुष्कृत्य केलें असेल तें. [ सं. ]

**पूर्वकालीं**—क्रिवि. प्राचीन कालीं. [ सं. पूर्व+काल ]

**पूर्वदत्त**—वि. १ मागील जन्मीं केलेल्या क्रियांस अनुसरून मिळणारें; पूर्वीच्या जन्मांत केलेल्या क्रियांप्रमाणें जें देवानें दिलें असेल तें; प्राक्तन. २ पूर्वजन्मीं कांहीं दान केलेलें असेल त्याप्रमाणें या जन्मीं मिळणारें (फल). [ सं. पूर्व+दत्त ]

**पूर्वपक्ष**—पु. (मूळ शको पहा.) पूर्वग्रह; एखाद्या गोष्टी-बद्दल प्रथमदर्शनी झालेलें मत. [ सं. ]

**पूर्वरंग**—पु. कीर्तनांतील पहिलें तत्त्वविवेचन, निरूपण. कीर्तनांत पूर्वरंग व उत्तररंग अथवा आख्यान असे दोन विभाग असतात. पहिल्या भागांत एखाद्या पद्याच्या अगर अभंगाच्या आधारें तत्त्वज्ञानात्मक विवेचन करण्यांत येतें व उत्तर भागांत त्या तत्त्वास अनुसरून एखादा पौराणिक अगर ऐतिहासिक कथाभाग सांगण्यांत येतो. [ सं. ]

**पूर्वाषाढा लागणें-सुरू होणें**—( सांके. ) हगवण लागणें; रेच होणें. सामान्यतः आषाढ महिन्यांत हा विकार होण्याचा संभव विशेष असतो यावरून. [ सं. पूर्वाषाढा ]

**पृथगात्म(क)**—वि. निराळा; स्वतंत्र. 'एखादी पृथगात्म वाङ्मकृति उजेडांत आल्यानंतर तिचें ताबडतोब यथायोग्य महत्त्वमापन झालें असें आपल्याकडे क्वचित् होतें.' –प्रतिभा ४.२. [ सं. पृथक्+आत्मन् ]

**पृथ्वीचिन्ह**—न. (मुद्रण.) ऋकाराचें चिन्ह; अक्षराच्या पायाशीं अर्धचंद्रात्मक ऋकार चिन्ह काढतात तें. 'दीर्घाची जरूर पडल्यास दोन पृथ्वीचिन्हें एकापुढें एक जोडावीं.' –के १६.४.१९३७.

**पेच**—पु. पतंगांची लढाई. –व्याज्ञा १.१६२.

**पेचप्रसंग**—पु. अडचणीची स्थिति; बिकट प्रसंग, सनद-शीर कारभारांत आलेली अडवणुकीची वळ; कारभार स्थगित होण्यासारखी स्थिति, घटना. [ पेच+प्रसंग ]

**पेचिंदी**—स्त्री. एका जवानाबरोबर अनेक जवानांनीं एक-दम करावयाची कुस्ती. –व्याज्ञा ४.३७५. [ ? ]

**पेज-पेजेनें पोसलेला**—वि. दुबळा; बुळा; अशक्त.

**पेजा**—पु. वरचष्मा; वरचढपणा. 'हिंदुस्थानच्या हिंदु जनतेवर मुस्लीम वर्चस्वाचा पेजा रोवलेला पूर्णपणें दिसूं लागेल.' –के २५ १०.१९३५.

**पेट**—स्त्री. बनाव; घटना. 'आलपिष्टन यानीं उत्तर केले कीं, आमचे राजकारणाची चाल आतून पेट वेगळी असती.' –मदरु २.४४. [ फा. पेटा ]

**पेटकटारी**—स्त्री. कट्यारीनें पोट फाडून घेणें; आत्म-हत्या. 'तेव्हां बापूजीबावा पेटकटारी करून घेत होते.' –पेद ६.४६. [ पेट+कट्यार ]

**पेटकरी**—पु. (व.) पटवेकरी. 'आलं पहिल्यानं न्हाण। सांगा बाई पेट करा । साज तुरीयाला करा ॥' –वलो १२७.

**पेटंट**—न. विशिष्ट हक्काची सनद. [ इं. ]

**पेटतें पाणी**—न. (ल.) दारू; मद्य. 'आजपर्यंत ज्यांनीं जनतेच्या नरड्यांत पेटतें पाणी ओतण्याचें पाप केलें.' –के १.८.१९३९. [ पेटणें+पाणी ]

**पेटा**—पु. १ उजव्या कमरेपासून वर डाव्या बरगडीकडे केलेला वार. –मवि ९.११. २ तरवारीच्या पात्याचा मुख्य भाग. –प्रश ५३. [ पेट ]

**पेटारणें**—अक्रि. शेताची जमीन साफ करणें; जमीन समपातळींत आणणें. 'पावसानें शेत वाहून गेल्यास हाच बैल शेत पेटारण्यास उपयोगी पडतो.' –के ३.११.१९३६. पेटारें पहा.

**पेंठ-पेंड पोहोंचविणें**—स्त्री. रानटी लोकांच्या टोळ्या गांवोगांव फिरत असतात. अशा टोळ्या गांवांत वस्ती करूनहि राहिल्यास त्यांच्या बंदोबस्तास शिपाई असतो. तो ते तेथून दुसऱ्या गांवास गेल्यावर त्यांस पोहोंचवून पावती घेतो त्यास म्हणतात. [ पेंठ=पेण ? ]

**पेठहुंडी**—स्त्री. मूळ हुंडी हरवली तर द्यावयाची दुसरी हुंडी.

**पेंड पोहोंचणें**—अक्रि. (चुकीनें) पेणें पोहोंचणें; लोण पोहोंचणें; वस्तु जेथें जावयाची त्या जागीं पोचती होणें.

**पेंडसा घेणें**—घरावर पेंढा शाकारणें; गवतानें घर शिवणें, आच्छादणें. –पेंकुत्र १४.

**पेंढियाची घागर**—स्त्री. देवतेची स्थापना केलेला घट; कलश; पीठाची घागर. 'त्याजवरून मांगाचें डोईवर पेढि-याची घागर देऊन गांवाभोंवती टोणगा फिरविला.' –पेद २२.३७९ [ पीठ ]

**पेंड्या**—स्त्री. एक मुलींचा खेळ. –मखेपु ११७.

**पेणचा**—पु मिरवणुकींतील पालखी ज्याच्या घराजवळ उभी राहते तो; पेणावरचा; जेथें पेणें होते त्या ठिकाणचा. [ पेणें ]

**पेणापेणानें**—क्रिवि. पेणें करीत करीत; थांबत थांबत; मुक्काम करीत; मजलदरमजल; टप्प्याटप्प्यानें. [ पेणें ]

**पेणावणें**—अक्रि. थकणें; दमणें; पेणें करण्याच्या, थक-ण्याच्या अवस्थेस प्राप्त होणें. 'जैसा अन्नाविण प्राणी पीडला। पंथीं चालतां पेणावोन भागला।' –योसं १४ १२.

**पेणोवेणा**—क्रिवि. (महानु.) तडक; थेट; पेणें न करतां; न थांबता. 'पणोवेणा जावें: उपेणें न करावें:' –लीच ३० पू. ६०. [ पेणें+विना ]

**पेद्रेल**—पु. फिरंगी; तोफा ओतणारा. 'प्रस्तुत येक पेदरेल आला म्हणजे येथे दोन आहे व तो येसे तिघे मिलोन भटीचें काम चालवितील.' -पेद ३४.१०३. [पोर्तु. पेड्रो]

**पेनणें**—अक्रि. परिधान करणें; नेसणें; धारण करणें; अंगावर घेणें. 'त्यानें चिलखत पेनून भुजबंद आंवळले.' -फांतब ९. पेहरणें पहा.

**पेरणी**—स्त्री. नाटकें वगैरे करणारी एक जात. 'फोंडे महाल व सासष्टी या भागांत जागर म्हणून करतात. त्या दिवशीं पेरणी जातीचें लोक एक नाटक करतात. 'महिषासुराचें सोंग पेरणी या जातीचा माणूस घेतो.' -रा. ना. केळकर, मांद्रिलेख.

**पेलवानी**—स्त्री. पाचपेच; डाव. 'पेलवानीस व युक्तीस न चुकतां हारीस नेटबाजी बोलीचालीची करून नडो न देणें.' -रा ६.८८. [पहिलवान]

**पेवली**—स्त्री. (व.) खाण. 'सासरामोती दाणा। सागु रतन माऊली। नवरत्नांची पेवली।' -वलो १. [पेव]

**पेवाचा पायखाना**—पु. एक खोल खड्डा करून केलेली शौचाची व्यवस्था. यांत मीठ ओतून तो स्वच्छ ठेवतात. असे पायखाने कर्नाटक वगैरे दक्षिण भागांत असतात.

**पेश**—क्रिवि. पुढें. -आफ. मुधो. [फा.]

**पेश अंदेशी-आंदेशी**—स्त्री. दूरदृष्टि; एखाद्या गोष्टीचा पूर्वीच अंदाज करणें. 'पेशआंदेशी न करतां उगेच संवशये चित्तांत आनावे हें आपणास उचित नाहीं.' -पेद २०.१९८. [फा. पेश+अंदेशी]

**पेश-पेष आमद**—स्त्री. १ प्रवेश; अवसर; अवकाश. 'कसेंहि करून पेष आमद करावी म्हणून बोलावयास जातात.' -रा ५.५. २ बढती; वाढ; पुरस्कार. 'आपले जातीचे पेष आमदेवर दृष्ट दिलियास खावंदाचे दौलतीस धक्का बसेल.' -रा ५.७५. [फा. पेश+आमद]

**पेशवाई**—स्त्री. सामोरें जाणें; पुढें जाऊन स्वागत करणें; पुढें होणें. 'हुजुरांचे आज्ञेप्रमाणें मी सर्व गोष्टींची व्यवस्था ठेवून त्यांजला दिल्ली शहरांत घेऊन येऊन हुजुरास त्यांचे पेशवाईकरितां सूचना केल्यावरून त्याणी दरवाजापावेतों येऊन उभयतांनी एकमेकांचे हात धरून सत्कार केला.' -रा ३.४४५. [फा. पेश=पुढें]

**पेशानी**—स्त्री. कपाळावरील वार. -भाव ९.११९. [पेश]

**पेशी**—स्त्री. सेंद्रिय पदार्थांतील मूळ घटक भाग; रक्त-गोलक, रक्तपिंड. [सं.] **०जाल**-न. शरीर घटक; पेशींचें जाळें; पेशीसमूह. [सं. पेशी+जालक]

**पेशी**—स्त्री. चौकशी. 'एकदां पेशीला बेड्या घातलेल्या पैकीं पंधरा लोक गेले होते.' -के १८.१९३९. [फा. पेश] **०करणें**-काम समजावणें; पुढें मांडणें. 'दुसरा कोणताहि अंमलदार पेशी करण्यास नव्हता. -शिआत्म ३५७.

**पेशीद्रव**—पु. शरीरघटक द्रवपदार्थ; पेशीरस.

**पेशीन**—वि. मागील; पूर्वीचा. -आफ. [अर.]

**पेश्तर**—वि. पुढें. पेस्तर पहा.

**पेश्वा**—पु. पुढारी. -मुधो. [अर.]

**पेहरनगी**—स्त्री. देखरेख; नजर. 'यास्तव दोहों दर-वाजांस दोघे कारकून ठेवून आल्या गेल्याचा झाडा तुमचे व खाजगी पेहरनगीनें होत जाईल.' -रा १०.१५०. [फा.]

**पेहरावणी**—स्त्री. मानपान, हुंडा, पोशाख वगैरे आहेर. 'लग्नांत पेहरावणी फक्त सव्वा रुपया आणि नारळ देण्यांत आला.' -के २३.५.१९३९. [पेहरणें]

**पेहेलणें**—अक्रि. पेलणें पहा. 'लांकडें फोडणारा महारहि भली जाड तुंब्यांची कुऱ्हाड हजारदां वरखालीं पेहेलतो.' -उपेअंत ७५.

**पेहलवी टोपी**—स्त्री. इराणी टोपी; पुढें अर्धचंद्र लाव-लेली गोल टोपी. आशियांत पेहलवी हें एक जुनें राष्ट्र असून त्यांच्या भाषेस पेहलवी असें नांव आहे. ही अवेस्तापासून निघालेली आहे [पेहलवी-फारसी; तुल० सं. पह्लव]

**पेळू**—वि. दुबळा मनुष्य. कापसाची पेळू अगदीं लवचिक व लिबलिबीत असते यावरून. [म. पीळ]

**पै, पैपाहुणा**—पु पहीपाहुणा पहा. पाहुणारावळा; अतिथिअभ्यागत. [सं. पथिक+प्राघूर्णक]

**पैकड**—स्त्री. बुरशी. [?]

**पैकाआडका**—पु. द्रव्य. [पैका पहा. सं. अर्धक अडका]

**पैगंबरवासी**—परलोकवासी; मृत. हा शब्द महंमदा-नुयायी मृत झाला असतां उपयोगांत आणतात. परंतु तो चुकीचा आहे. हा वैकुंठवासी, कैलासवासी या शब्दांशीं सादृश्य भावनेनें बनविण्यांत आलेला आहे. परंतु वैकुंठ व कैलास हे जसे लोक म्हणजे प्रदेश आहेत तशी कल्पना पैगंबर या शब्दानें व्यक्त होत नाहीं; कारण पैगंबर म्हणजे प्रेषित. तेव्हां पैगंबर लोकवासी असें वाटल्यास म्हणावें. तसेंच ख्रिस्ती व महंमदी लोकांच्या कल्पनेप्रमाणें सर्व मृत व्यक्ति निर्णय-दिनाच्या दिवशीं पुन्हां जिवंत होणार आहेत व त्यांचा न्याय झाल्यानंतर त्यांस स्वर्ग किंवा नरक प्राप्त होणार आहे. तेव्हां न्यायदिनाच्या पूर्वी त्यांचा लोक निश्चित होत नाहीं.

**पैचुडी**—स्त्री. एक प्रकारचा पतंग. -व्याज्ञा १.१६१.

**पैठ बसणें-बसविणें**—जम बसणें, बसविणें; बस्तान बसणें, बसविणें. [सं. प्र+तिष्ठ ?]

**पैठणकांठ**—पु. साधे बिननक्षीचे कांठ. पैठण येथील पद्धतीचे कांठ. [पैठण-प्रतिष्ठान नगर]

**पैबंदी करणें**—सैन्याच्या प्रगतीला पिछाडीवर हल्ले करून अडथळा करणें; पायबंदी करणें; पगबंदी करणें. [पाय+बंदी]

**पैवस्त**—क्रि. पोंचला. -मुधो. [फा.] पैवस्ती पहा.

**पैवस्तद**—क्रिवि. १ पोंचून. २ हमेशा. -मुधो. [फा.]

**पैशाचा बाजार**—पु. पैसा गुंतवूं इच्छिणारे व पैसा कर्जाऊ घेणारे यांचा गट; नाणेबाजार; पैशाची देवघेव.होण्याचें ठिकाण. -व्याउ.

**पैशाची**—स्त्री. काफरिस्तानांतील एक भाषा; एक प्राकृतभाषा. या भाषेमध्यें; मूळ बृहत्कथा हा ग्रंथ गुणाढ्यानें लिहिला अशी दंतकथा आहे. [सं. पिशाच]

**पैशाचें पीक**—न. जें पीक खावयास उपयोगी नाहीं पण ज्याचा केवळ विकून पैसा करतां येतो असें पीक. उदा. तंबाखू, कापूस, अफू. इ.. 'तंबाखू हें पैशाचें पीक आहे. त्याच्या वाढत्या खपामुळें त्याकडे लोकांचें बरेंच लक्ष वेधलें आहे.' -के ३.११.१९३६.

**पैस**—पु. यत्न; प्रयास; प्रयत्न. 'नावेकु घालौनि उसासु। बोलावया केला पैसू। म्हणें हा वैरिया मिनला दिंसु। केधवास्तवैल॥' -नरुस्व ४४५. [सं. प्रयास]

**पोई जमीन**—स्त्री. भरतीचें पाणी खाडीच्या कांठावर ज्या जमिनींत भरतें ती जमीन.

**पोकळी**—स्त्री. १ झाडाची ढोली. २ डोंगरांतील गुहा. [पोकळ]

**पोका**—पु. फोड; भाजल्यामुळें येणारा फुगा.

**पोकाचें वांगें**—न, मुरटलेलें वांगें; वांग्याचा मुरटा; चांगलें न वाढतां वक्र झालेलें वांग्याचें फळ.

**पोकारणें**—सक्रि. पुकारणें; मोठ्यानें ओरडणें. 'ऐसा जाजावे नृपवरू। धांवा थोर पोकारी।' -भारा. बाल ४.९५. [ध्व.]

**पोक्ता पुरवता**—वि. प्रौढ; समंजस; दूरदर्शी. 'लॉर्ड रोजबरी संबंधानें एका इतिहासकारानें म्हटलें आहे. तो पोक्ता पुरवता केव्हांच झालाच नाहीं.' -स्वचि ९०.

**पोखर**—पु. १ (लाठी.) प्रतिपक्षाच्या उजव्या बगलेवर केलेला वार. २ उजव्या बरगडीपासून डाव्या बरगडीपर्यंत केलेवा वार. -मवि ९.११. [पोखरणें]

**पोखारा**—स्त्री. गुहा पोखरून केलेली जागा. [पोखरणें]

**पोख्तकार**—वि. विचारी; प्रौढ; जाणता; समंजस. 'पुढेंहि आतां मातबर पोख्तकार तुम्हीच आहांत.' -पेद २५.१०५.

**पोख्ती**—वि. भरपूर; चांगली; पुरेपूर. 'पोटाची बेगमी पोख्ती असतां अशीरकर येकाएकी असा येतो असें नाहीं.' -वसमो. [पोख्त]

**पोंगळी**—स्त्री. नळी. पुंगळी पहा.

**पोचपान**—य. पन्ना रत्नाची हातांत घालावयाची पोची. 'संभाजी महाराजांनीं आपले अंगावरील भरगच्ची पोशाख, जवाहीर, मोत्याची कंठी, दंडपेट्या, पोचपानें, गजिरा, वगैरे मातबर जवाहीर घातलें.' -शामब. भारतवर्ष ५४.

**पोटउकाला**—पु. १ पोटांतील खळबळ बाहेर टाकणें. २ (ल.) मनांतील विचारांस प्रसिद्धि देणें; पोटांतील मळमळ ओकून टाकणें. 'समारोपाच्या वेळीं तेवढा त्यांनीं पोट उकाला करून घेतला.' -के १८ ४.११३९. [पोट+उकलणें]

**पोटगी भत्ता**—पु. एखाद्या कामगारास किंवा नोकरास कामाकरितां दुसऱ्या गांवीं पाठविलें असतां त्यास प्रवासांत लागणारा अन्नखर्च द्यावा लागतो तो. [पोट+भत्ता]

**पोट चालणें**—१ पोट जाणें; जुलाब होणें; रेच होणें; हगवण लागणें. 'परंतु बरें वाटत नाहीं. पोट चालतें म्हणोन जाणें होणार नाहीं.' -पेद ४०.६६. २ योगक्षेम चालणें; पोट भरणें.

**पोटतिडीक**—स्त्री. कळवळा; कळकळ; सहानुभूति; आपलेपणा. 'हैदराबादचा हैदरी सरहद्दीवरच्या आफ्रिडीबद्दल पोटतिडीक दाखवितो.' -के १९.३.३.१९४०.

**पोटनर**—पु. (यंत्र) आंतील पड्याच्या आंत असलेला नर.

**पोटाकरितां, पोटाकारणें, पोटासाठीं**—क्रिवि. अन्नाकरितां; उदरनिर्वाह व्हावा यासाठीं; भुकेकरितां. 'पोटा-(अन्ना)साठीं दाही दिशा। आम्हा फिरविसी जगदिशा।' -व्यस्तो. 'या पोटा कारणें गा झालों पांगिळा जना:'

**पोटाखालला, पोटाखालचा**—वि. विवाहाबरोबर पूर्वीच्या नवऱ्याचें आलेलें मूल. 'सासरा मेला अन् हिच्या सासूनें लगोलग म्होतूर लावला तवा पोटाखाल्ला झाला त्यो.' -सह्याद्री जाने १९३९. पोटाखालीं जाणें पहा.

**पोटाळ**—वि. दुसऱ्याच्या अन्नानें पोसलेला. [पोट+आलुच् प्रत्यय]

**पोटीं**—क्रिवि. पोटांत; आंत; लगत; मध्यें; बरोबर. 'पोटीं कागद ठेविले आहेत.'

**पोटीं येणें**—पासून जन्मास येणें; उदरीं येणें; विशिष्ट (स्त्री अथवा पुरुष) व्यक्तीपासून जन्म पावणें.

**पोठर**—पु. पोटरी पहा.

**पोण्या**—पु. पाऊण कागदाचा पतंग. -व्याज्ञा १.१६१.

**पोत**—वि. १ रोख. २ चालू; पोतेच,ल. 'त्यापासून रुपये तीनशें पोत वसूल घेतले' -आडिमहा ६६.

**पोत**—पु. (ठाकरी.) जन्मलेल्या मुलाच्या ढुंगणावर निळा डाग असतो तो; लास. [पोत=डाग. भाजण्याचा डाग]

**पोतणें**—अक्रि. सारवणें; रंग देणें; सफेती करणें. 'त्याची झोंपडी प्रशस्त असून पोतलेली असे.' -स्यूसों १०५. [सं. पू=शुद्ध करणें]

**पोत्रांगुल**—पु. खंजिऱ्याचा पवित्रा. -प्रश १८.

**पोंद**—न. कुल्ले; ढुंगण.

**पोपट**—पु. पेटीचे खिळे काढावयाचें दांडा असलेलें पोपटाच्या आकाराचें यंत्र.

**पोपटनेत्री**—वि. (महानु.) डोळ्यांत लाज नसणारा; निर्लज्ज. म्हण-'पोपटनेत्री: विलक्षण सूत्री:'

**पोफळगांठी**—वि. परवंटाचें (नेसणें). पदर वर खांद्यावर किंवा डोक्यावर न घेतां कमरेस गुंडाळून नेसण्याची पद्धत. अशा नेसण्यास पुढें दिलेल्या गांठीस पोफळ गांठ म्हणतात. 'साऊले वेढोनि पोफळगांठी । वाखोरेया देऊनि वायगांठी । येकी ताणूनी कुचतटीं । खांदेसी अंशुक आणिती ॥' -नरुस्व ८४२. [पोफळ+सं. ग्रंथि]

**पोमी**—स्त्री. बसावयाची पातळ गादी.

**पोयतें**—न. (खा.) पोवतें पहा. 'लग्नांत हळद लागल्या-वर नवरानवरीच्या गळ्यांत पिंवळी केलेली सुताची लडी घालतात ती.' -संशोधन त्रैमासिक, एलेच २७७. [सं. पवित्र]

**पोयाची माशी**—स्त्री. पोळयाची माशी. एक जातीची लहान मधमाशी. पोयें पहा.

**पोराटकी**—स्त्री. पोरवडा; पोरखेळ. 'पुढें महाराष्ट्राच्या दुर्दैवानें मोठमोठे कर्ते पुरुष, सरदार, मुत्सद्दी व खुद्द पेशवे सुद्धां थोडक्याच काळाच्या अंतरानें मृत्युमुखीं पडल्यानें सर्व पोराटकी होऊन.' -महादजी चरित्र २०८.

**पोरेंटोरें**—न. अव. लहानमोठीं मुलें; पोरें बाळें. 'पोरें टोरें लागतीं पाठीं।' -शारदा. [पोर द्वि.]

**पोली**—स्त्री. देवाच्या प्रभावळींत देवावर जी छत्री असते तिला अडकविण्यास असलेली सांखळी. -आडिमहा १३७.

**पोलो**—पु. घोडयावरून खेळण्याचा एक चेंडूचा विलायती खेळ. -के २२.९.१९३६. [इं]

**पोवळी**—पु. गवळी. 'आम्ही मुना पोवळयाच्या । आमचे पोवळी दारुण।' -मुं. महारांची गाणीं. -मसाप ९४.८. कदाचित् गोवळी असा मूळ पाठ असेल?

**पोव्हाणी**—स्त्री. पोहण्याची विद्या. -श्याआ. [पोहणें]

**पोसखाना**—पु. खाणावळ. पोस्तखाना पहा. 'पूर्वी त्यांचे खाण्यापिण्याचे पोसखाने लोकांच्या भरवस्तींत होते. -भूवर्णन ३१६. [म. पोसणें+खाना फा. फोझखाना]

**पोस्तखाना**—पु. खाणावळ; आश्रम. 'गांवांतील एका पोस्तखान्याचे अंगणांत गेलों. एथें आम्हीं गाडीतून उतरलों.' -राणीचें पुस्तक १४९. [पोसणें+खाना]

**पोस्तीन**—न. मेंढ्यांचें सकेश चर्म. -मुमुक्षु. तुल० पश्मीना. [गुरुमुखी]

**पौंड**—पु. ३९ तोळे भाराचें एक वजन; रतल. [इं.]

**पौष्णांत बिन्दु**—पु. रेवती योगताऱ्यापासून क्रांतिवृत्ता-वर टाकलेला लंब क्रांतिवृत्तास ज्या बिंदूंत मिळतो तो बिंदु. -के १२.११.१९३५. [सं.]

**प्रकटीकरण**—न. जाहीर करणें; प्रसिद्धि. [सं.] २ नव्या करारांतील (बायबलमधील) रिव्हीलेशन प्रकरण.

**प्रकाशन**—न. १ प्रसिद्धि. २ प्रसिद्ध केलेला ग्रंथ वगैरे; प्रकाशित ग्रंथ.

**प्रकाशसंप्रदाय**—पु. नाथसंप्रदाय; नाथपंथ. [सं.]

**प्रकाशांत आणणें**—प्रकट करणें; ज्ञात करणें.

**प्रकृतिगुणधर्म**—पु. स्वभावधर्म; अंगाचा गुण. 'जयाचा जो आहे प्रकृति गुण लोपे नच कदा।' [सं.]

**प्रकृतित्रय**—न. तीन प्रकृति: १ अपरा. २ परा. ३ स्वयंप्रकृति. [सं.]

**प्रकृतिवशता**—स्त्री. सृष्टिधर्माची अनिवार्य प्रबलता. [सं.]

**प्रज**—पु. प्रजा; कुळ. 'जमीन हद्द महदूद घालूनु प्रज नेमून देउनु हुजूर खबर लिहिणें.' -रा.१५.३९२. [सं. प्रजा]

**प्रजापति**—पु. सूर्यमालेंतील एक ग्रह; युरेनस. [सं.]

**प्रजापर्यग्र**—न. जनावराच्या अंगावरील स्वाभाविक व कृत्रिम खाणाखुणा, रंग, शिंगामधील अंतर, वगैरे नोंदून ठेवण्याची पद्धत. -के १०.११.१९३६. [सं.]

**प्रजापालन**—न. लोकांचें संरक्षण; नागरिकांचें संवर्धन, रक्षण, इत्यादि. [सं.]

**प्रजावत्सल**—वि. लोकांस प्रेमानें वागविणारा. [सं.]

**प्रजासभा**—स्त्री. लोकसभा. [सं.]

**प्रणयक्रीडा**—स्त्री. प्रेमाचे खेळ; प्रेमचेष्टा. [सं.]

**प्रणयभंग**—पु. प्रेमी माणसाकडून होणारा आशाभंग; प्रेमनाश. [सं.]

**प्रतिकोश**—पु. मोबदला; प्रतिमूल्य; एका वस्तुऐवजीं दिलेली दुसरी वस्तु. 'शेजारील वाडेयामध्यें आमचा अंश आहे तो तुम्हास प्रतिकोश दिल्हा असे.' -रा २०.११३. 'तुमचा प्रतिकोशावरी आम्ही इमारती बांधूनी सुखी असावें व आमच्या ठायावरी तुम्ही इमारती बांधोनतु सुखी असावें.' -रा २०.११३.

**प्रतिपक्ष**—पु. पाठपुरावा; मैत्री; साहाय्य; कुवत; मदत. 'जनारालाचें पत्र नबाबास जावें कीं, आम्हीं श्रीमंतांचा प्रतिपक्ष करितों तेव्हां तुम्ही श्रीमंतांचें नोकरांसी मिळोन जुंजास येणें हे गोष्ट उचित नाहीं.' -रा १२.१०७. [सं. प्रति+पक्ष]

**प्रतिभवि**—स्त्री. (महानु.) सृष्टि; संसार. [सं. प्रति+भू-भव होणें]

**प्रतिशोध**—पु. बदला; सूड. 'तुझ्या हत्येचा प्रतिशोध घेणें हें आमचें कर्तव्य आहे.' -के २०.१२.१९४०. [सं.]

**प्रतिष्ठामुद्रा**—स्त्री. अर्धप्रतिमा; अर्ध पुतळा. [सं.]

**प्रतिज्ञालेख**—पु. कागदांत लिहिलेला मजकूर खरा असल्याबद्दल खालीं लिहावयाचा स्वदस्तुरचा लेख. [सं.]

**प्रतोद**—पु. पक्षांतील लोकांस सूचना देणारा. (इं.) व्हिप.

**प्रत्यक्षिप्रक्रिया**—स्त्री. प्रतिसंवेदना; डोळ्याजवळ विघ्न आलें असतां ते एकदम मिटणें, इ.. [सं.]

**प्रत्यापन**—न. निराकरण. -नि ८२८. [सं.]

**प्रत्याहार**—पु. संक्षेप; अनेक अक्षरें अगर प्रत्यय यांचें विवेचन थोडक्यांत करण्यासाठीं त्यांचा एकावयवी शब्दांत केलेला समावेश. -नि ४१६. [सं.]

**प्रदिप्ता**—स्त्री. उघडपणा; प्रसिद्धि; वाच्यता. 'तेव्हां प्रदिप्ता फार जाहली.' -रा १०.२५१. [सं. प्रदीप्त]

**प्रदीर्घ**—वि. फार लांब; फार दूर, विस्तृत. [सं.]

**प्रदीर्घकाल**—पु. १ फार दूरचा काल; लांबची मुदत. २ बराच काल; फार अवकाश. [सं.]

**प्रदेयागमा**—स्त्री. १ एम्. ए. च्या बरोबरीची महिला विद्यापिठाची पदवी. २ ही पदवी धारण करणारी पदवीधर स्त्री. जी स्त्री गृहीतागमा (बी. ए.) स्त्रीस विद्या शिकवूं शकते अशी स्त्री. [सं.]

**प्रधानपद**—न. मुख्य मंत्रिपद; दिवाणगिरी; पेशवाई; प्रधानकी; प्रधानगिरी. [सं.]

**प्रधानांग**—न. शरीराच्या सर्व गात्रांत प्रमुख असें गात्र; शिर; डोकें. [सं.]

**प्रपंचपाश**—पु. संसारबंधन; प्रपंचाचा गुंता; संसाराचा पाश. [सं.]

**प्रपंचसाधन**—पु. निर्वाहाचें साधन; संसार चालविण्यास लागणारी सामुग्री. [सं.]

**प्रबंध**—पु. तजवीज; व्यवस्था. 'तुम्ही पालखीचा प्रबंध करून शांतिपुरास राची मातेस घेऊन यावें.' -गौरांगच. उ. ६७. [सं.]

**प्रभाचक्र**—न. १ तेजोवलय. (इं) हॅलो. २ सूर्येंदयीं प्रभा चमकते त्याप्रमाणें चमकणारें दारूकाम वगैरे. -पेम ३६३. [सं.]

**प्रभामंडळ**—न. तेजोवलय; प्रभाचक्र. देवमूर्तीच्या मुखाभोंवतीचें किरणांनीं दाखविलेलें तेजोवर्तुल. [सं.]

**प्रमथन**—न. उठाव; चळवळ; खळबळ; आंदोलन. 'आपल्या न्याय्य हक्कासाठीं आपण जोरानें प्रमथन करावें असें आजचा संवत्सर आपणास सांगत आहे.' -के २८.३.१९३९. [सं.]

**प्रमाणिक**—पु. विश्वासु मनुष्य; खात्रीचा मनुष्य. 'अंतस्ते प्रमाणिकाचे मुखें वर्तमान ऐकिलें कीं श्रीमंतानीं उदग्रह काढिलें कीं, नानावर यख्तियार टाकिला त्यामुळें गर्व फार जाला.' -पेद ३९.६४. [प्र. प्रामाणिक]

**प्रयोग**—पु. उपनयन, विवाह, वगैरे विधी करावयाचे मंत्रमंत्र इत्यादि. [सं.]

**प्रयोगी**—वि. वाक्यांत योजावयाचे; वाक्यांत येणारे. [सं.]

**प्रवाळकीटक**—पु. पोवळ्यांचा दगड बनविणारे किडे. [सं.]

**प्रशस्तिपत्र**—न. शिफारसपत्र; प्रमाणपत्र. (इं.) सर्टिफिकेट. [सं.]

**प्रशस्ती**—स्त्री. १ मायना; लिहिण्याची पद्धत; लेखनाचा शिरस्ता. २ कागदाचा समास. 'प्रशस्ती सोडून लिहा.' ३ ग्रंथारंभीं ग्रंथ-ग्रंथकर्त्यासंबंधी जो मजकूर असतो तो; प्रस्तावना. [सं. प्रशस्ति]

**प्रश्नपत्रिका**—स्त्री. परीक्षेंत विचारलेल्या प्रश्नांचा कागद. (इं.) क्वश्चनपेपर. [सं.]

**प्रश्न पाहणें**—भविष्य वर्तविणें; कोणत्याहि गोष्टीसंबंधी तत्कालीन लग्न वगैरेवरून पुढील परिणामसंबंधी अनुमान करणें.

**प्रश्न विचारणें**—एखाद्या गोष्टीबद्दल भविष्य विचारणें.

**प्रश्नोत्तरपद्धति**—स्त्री. प्रथम प्रश्न देऊन त्याचें पुढें उत्तर लिहावयाचें अशा रीतीनें केलेलें विवेचन. [सं.]

**प्रसंग ओढवणें**—संकट येणें; गुदरणें.

**प्रसंगाला तोंड देणें**—प्राप्त स्थितींतून धैर्यानें मार्ग काढणें.

**प्रसंगाला पाठ देणें**—१ परिस्थिति मुकाट्यानें सहन करणें. २ तोंड चुकविणें.

**प्रसव**—पु. (महानु.) परिणाम; फल. 'मागील जन्माचा प्रसव उभा ठाकला.' 'प्रसव मोडा, प्रसव वाढला, प्रसव माजला.' [सं.]

**प्रसवी**—वि. (महानु.) कारस्थानी; अवडंबर करणारा. 'हा मोठा प्रसवी आहे.' 'त्या प्रसवीयासी काय बोलता.'

**प्रसादसेवा**—वि. (महानु.) नित्यपूजा-पारायण; देव-पूजा.

**प्रसिद्ध करणें**—प्रकाशांत आणणें; जाहीर करणें.

**प्रस्तावणें**—अक्रि. पस्तावणें; पश्चात्ताप पावणें. -सारुह ३.४४. [पस्तावणें]

**प्रस्थ**—न. एक प्रमाण (औषध वगैरेचें). [सं.]

**प्रहसित**—वि. हर्षित; आनंदित; प्रमुदित. 'प्रहसित नगरासी येऊनी स्वस्थ मानी।' -गस्तो. [सं.]

**प्राकृत**—न. प्रकृति; निसर्ग; प्राक्तन; दैव; परमेश्वरकृत सृष्टिक्रम. 'प्राकृतापुढें उपाय नाहीं.' -पेद २५.२३. [सं. प्राक्+कृत]

**प्राजक**—वि. प्रजासत्ताक. [सं. प्रजा]

**प्राण दाटणें**—प्राण कंठाशीं येणें.

**प्राणपणानें**—क्रिवि. प्राण पणास लावून; जिवावर उदार होऊन; प्राणाची पर्वा न करतां.

**प्राणपणास लावणें**—जीवाची पर्वा न करतां एखादी गोष्ट करणें; जीवावर उदार होणें.

**प्राणाची सांडणी करणें**—प्राणार्पण करणें; प्राण देणें; प्राण खर्च करणें; एखाद्या कामांत प्राण समर्पण करणें; एखादें काम करतांना मृत्यु पावणें. 'सेवा करावी हाच आमचा धर्म, सेवेवर प्राणाची सांडणी करावी ते वडिलानी केली.' -भारतवर्ष, पत्रें यादी ६४.

**प्राणावर बेतणें**—जीव धोक्यांत येणें; प्राणसंकट येणें.

**प्राणांतिक उपवास**—मरण येईपर्यंत उपवास.

**प्राणायाम करणें**—(ल.) निमूटपणें बसणें; स्वस्थ बसून सहन करणें. 'हिंदीप्रसाराच्या ठरावावरील अनुकूल भाषणाच्या वेळीं त्यांना असाच प्राणायाम करावा लागला.' -के १८.४.१९३९.

**प्रांतिक स्वायत्तता**—प्रत्येक प्रांतास अंतर्गत व्यवस्थेचें पूर्ण स्वातंत्र्य. (इं.) प्रॉव्हिन्शिअल ऑटॉनमी.

**प्रातिनिधिक**—वि. निवडक; प्रत्येक विशिष्ट वर्गांतील किमान व्यक्तीचा समावेश करणारा; अनेक वर्गांचा कमीअधिक अंतर्भाव करणारा; वेंचक; उत्कृष्ट. 'विष्णुशास्त्री यांच्या सर्वोत्कृष्ट प्रातिनिधिक लेखांचा संग्रह.' -के १०.३.१९३९.

**प्रात्यक्षिक**—न. विशिष्ट गोष्ट; वस्तु, पद्धति, वगैरेचें सोपपत्तिक व सोदाहरण प्रदर्शन, विवेचन, वगैरे. प्रत्यक्ष करून दाखविण्याचा प्रयोग; क्रिया; सोदाहरण, सोपपत्तिक दिग्दर्शन. [सं.]

**प्राथम्य**—न. अग्रेसरत्व; पुढारीपण; पहिल्या पदाचा मान; प्रथम स्थान, इ. 'श्री महाकाली पंचायतनांत प्रत्येक ठिकाणीं श्रीनगरेश्वराचें प्राथम्य आहे.' -आदिमहा ७५. [सं.]

**प्रादेशिक**—वि. स्थानिक; विशिष्टस्थलमर्यादित; एखाद्या विशिष्ट प्रदेशापुरतें किंवा ठिकाणापुरतें. [सं.]

**प्रादेशिक एकता**—स्त्री. प्रत्येक प्रदेशांत एक तऱ्हेची रचना, घटना, इ.; स्थानिक ऐक्य, समता.

**प्रार्थनासमाज**—पु. महाराष्ट्रांतील एक एकेश्वरी पंथ. या पंथामध्यें मूर्तिपूजा मानीत नाहींत. ईश्वर एक असून त्याची उपासना प्रार्थना, भजन वगैरे साधनांनीं करतात. दर रविवारीं मंदिरांत जमून प्रार्थना करण्याची यांच्यांत पद्धति आहे.

**प्रासदीप्ताग्र**—पु. एक प्रकारचा बाण. -प्रश २०.

**प्रेश**—पु. प्रैष पहा.

**प्रोष्ठ**—न. (महानु.) बोलणें. 'काठीन प्रोष्ठ नाईकतां राजस तामस ठाय चुकविताही रज उपजतें कां ?' -शतप्र ८४.

**प्रौढासन**—न. (मल्लखांब.) बोंडावर पायावर पायाची अढी घालून व वरील पायास हातांची गोफण बांधून बसणें. -व्याज्ञा ३.२३७. [सं.]

---

# फ

**फ**—वि. खोटें. [तुल० गो. फट. फटू=खोटें; खोटी गोष्ट]

**फ बोलणें**—खोटें बोलणें.

**फकडी**—स्त्री. फाक; फोड; कापलेला तुकडा. 'वाळकीची एक फकडी दे.' [फाकणें=फाडणें ! सं. स्फट्]

**फकाट**—वि. मोकळें; स्वच्छ; स्पष्ट.

**फकाट उजाडणें**—स्वच्छ उजाडणें.

**फकाणणें**—अक्रि. फक्की मारणें; खाणें. 'शरयूताईनीं मुलामुलींना थोडें कांहीं तरी फकाणायला दिलें.' -उपेअंत ३६.

**फकिस्त**—वि. फटिंग; पोटापाण्याची पंचाईत असलेला; निर्धन. [फक]

**फज्जा**—पु. ठराविक अंतर; टप्पा. [अर. फजीह]

**फज्जा करणें**—टप्पा करणें.

**फज्जाला पोंचणें**—१ ठराविक ठिकाण गांठणें. २ शेवट करणें; तड लावणें. [ अर. फजीह ]

**फज्जाला पोंचविणें**—शेवट करणें; तड लावणें. [ अर. फजीह ]

**फज्ल**—प्रवीणता. -मुधो. [ अर. ]

**फटकाल**—वि. फटकळ; खराब; बाईट; अनिष्ट. 'ईश्वरें गोष्ट बहुत फटकाल केली.' -पेद २.७९. [ सं. स्फट+काल ]

**फडकणें**—अक्रि. पुढें होणें; बोलूं लागणें. 'आवडिचेनि भावें अडके । सर्वेचि फडके गजबजला।' -भारा. बाल. २. २०. [ ध्व. ]

**फंडगुंड**—पु. सार्वजनिक फंड जमवून त्याचा अपहार करणारा.

**फडणिशी वर्ष**—न. जमाबंदीचें वर्ष.

**फडावर शड्डू मारणें**—कुस्तीस आव्हान देणें.

**फडपोशा**—वि. हजरजबाबी; वाटेल ती कामगिरी बजावणारा. [ फड+पोसणें ]

**फडफडणें**—अक्रि. जवळची पुंजी खलास होणें. 'ती असामी फडफडली आहे.' [ ध्व. ]

**फडी धरणें**—एकजूट करून जोर करणें; शेर बनणें. 'त्यामुळें कितेक रजपूत राजे मोगल व जमिदार फडी धरतात.' -पेद २.१९. [ फड ]

**फणशा**—वि. आकारानें मोठा. [ फणस ]

**फणशी प्रेम**—न. वरून रूक्ष परंतु आंतून सांद्र, मधुर असें प्रेम; फणसाच्या फळाप्रमाणें वरून खडबडीत पण आंतून गोड असें प्रेम. फणसाला जरी वरून कांटे असतात तरी पण आंत मधुर असे गरे असतात यावरून.

**फणारें, फणेरें**—न. (महानु.) १ फणी; केश विंचरण्याचें साधन. २ करंडा, फणी, आरसा वगैरे ठेवण्याची पेटी, पिशवी इत्यादि. 'तथा त फणारे.' -प्रमा १६. [ फणी ]

**फणी**—स्त्री. गलबताचा एक प्रकार.

**फतह**—स्त्री. फते पहा. विजय. -मुधो. [ अर. ]

**फत्तरपूजा**—स्त्री. मूर्तिपूजा. [ सं. प्रस्तर+पूजा ]

**फत्तरफूल**—न. दगडफूल पहा.

**फत्तेजंग**—पु. विजयी युद्ध; जय मिळवितां येईल असें युद्ध. 'गेली फत्येजंगाची बाजू देवा काय केलें।' -ऐपो २. २१३. [ फा. ]

**फत्तेशिकस्त**—स्त्री. यशापयश; विजय-पराजय; जयापजय. 'सर्व मिळून चालून घेऊन, फत्तेशिकस्त ईश्वराचे स्वाधीन आहे.' -हिंद ९०. [ फा. ]

**फंदरंद**—पु. लबाडी गडबड; घोटाळा. 'अकोलियाचे मुकामी केवल गोष्ट विथर पैन्यामुळे जाहालीं. त्यांत फंदरंद दिसले.' -पेद ५.६२.

**फरखती**—स्त्री. फारखत पहा. बेदावापत्र; पूर्ण भरपाईची पावती; कर्जफेडीची वगैरे पावती. 'दहावीस वर्षांचे मामलदार येकनिष्ठ फरखत्या घेतलाले त्याजवर तकरीर करावी.' -पेद ३९.१६३.

**फरज**—स्त्री. १कर्तव्य; आवश्यक गोष्ट. २करण्याची शक्ति. 'हुकुम उठविण्याची माझी फरज आहे असें मी सांगितलें.' -शिं आत्म. 'परंतु कोणावरहि अशी फरज पाडण्यांत आली नव्हती.' -कित्ता ८९. [ फा. ]

**फरफरमास**—पु. फरमास द्विरुक्ति. कुळाकडून हक्कानें येणारा नजराणा वगैरे. 'कारकारसाई व फरफरमास तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें.' -आठइति १४९. [ फरमास फडफरमास पहा ]

**फरशी**—स्त्री. नदीतून जाण्याकरितां सामान्यतः पाण्याच्यावर येणारा फरसबंदी रस्ता; सांडवा; साकू. 'दिघंची नजीक माण नदीवर फरशी नसल्यानें रहदारीस होणारी अडचण दूर करून.' -के ३०.४:१९४०.

**फराजिन्दह**—पु. उभारणरा. -मुधो. [ अर. ]

**फराटिम**—वि. एकत्र झालेला; जमलेला. -मुधो. [ अर. ]

**फरार**—पु. (मल्लखांब) मल्लखांबावरील तोल. -व्याज्ञा ३.२११.

**फरावर**—क्रिवि. अधिक लवकर. -मुधो. [ अर. ]

**फरासी गजवेल**—न. पोलादाची जात. -प्रश २४.

**फरूग, फरोग**—पु. तेज. -मुधो. [ अर. ]

**फरेवान**—स्त्री. किनारी; कांठ; सभोंवतीची पट्टी. 'दुलई किनखापी लाल अस्तर पिवळा ताका चिलाई फरेवान हिरवी याप्रमाणें सिद्ध करून पाठविली असे.' -रा ३.२५२. [ फेर ]

**फर्माविशी**—स्त्री. बंदोबस्त; ताकीद; आज्ञा. [ फर्मावणें ]

**फर्रा**—पु. चौकोनी कापडाच्या तुकड्याचा लंगोट. -व्याज्ञा ५.४७४.

**फर्सा**—वि पोंचविणारा. -मुधो. [ अर. ]

**फलक**—पु. आकाश. -मुधो. [ अर. ] **०इश्तिवाह**-वि. आकाशसदृश. **०दव्वार**-पु. आकाश चक्र.

**फलटणी पारायण करणें**—(महानु.) पूर्ण उच्चार न करणें; तोंडांतल्या तोंडांत म्हणणें. [ फलटण हें महानुभावांचें एक दैवतस्थान आहे. ]

**फलपूट**— ? 'कोट व फलपूट सोडून मुलूख खराब झाला.' -बमो.

**फलात्कार**—पु. फलादेश; लाभ; प्राप्ति; फळ; परिणाम. 'वडिलानी श्रमसाहस करून जागा जोडिली होती कीं पुत्रपौत्रादि कार्यास येईल, त्याचा फलात्कार याप्रकारें जाला.' -पेद २३.८२. [सं. फल+आकार]

**फलिया**—पु. (भिल्ल.) डोक्याला बांधण्याचा फेटा. [सं. पल्लव]

**फल्ला**—पु. सोगा; शमला; डोक्यावरील रुमालाचा पाठीवर सोडलेला पदर. 'मुकटा डोक्यास गुंडाळून ते झोकदार सोडलेले फल्ले.' -नि ३२१. [सं. पल्लव]

**फसकी**—स्त्री. पाण्याची लहरी; पाण्याचे तुषार. 'वायेंच एकादी फसकी आली पान्याची तर आवंदां घाबरलांव तुमी.' -किर्लो.

**फसकी**—स्त्री. बाजारांत विक्रीस ठेवलेल्या मालांतील बचक भरून घेण्याचा हक्क. (क्रि० उचलणें). -शको पहा.

**फसगंमत**—स्त्री. लबाडी; फसवणूक; ठकबाजी. 'यांत कांहींतरी फसगंमत झाली आहे असा त्यांस संशय आला आहे.' -के १७.६.१९४१. [फसणें+गंमत]

**फसालत**—स्त्री. लबाडी; कपट; दंगा; गडबड; फिसाद. 'कोकणांत लखम सावंत फसालत करून वसाहत होऊं न देई.' -रा ३.१५७. [फा.]

**फांकडे**—मराठ्यांच्या इतिहासांत तीन व्यक्तींस ही शूरत्वदर्शक पदवी लावीत: १ कोन्हेर त्रिंबक एकबोटे, २ मानाजी शिंदे, व ३ इस्टुर फांकडा (कर्नल स्टुअर्ट).

**फाकाफाक**—स्त्री. दाणादाणा; उधळून गेलेली अवस्था; जत्रा वगैरेंतील मंडळी इतस्ततः गडबडीनें विसकटून जाणें; पांगापांग होणें. [फांकणें]

**फांजणें**—न. आरडाओरड; दमदाटी; तणतणणें; दम भरणें. 'इकडे सावकाराचें फांजणें चालूच होतें.' -निबंधचंद्रिका ४७.४८.१९.

**फांजीव**—वि. (चित्रकला.) वेलपत्रीचे; नक्षीचे. 'कोणतेंहि पौराणिक चित्र पाहिलें तर आधुनिक फांजीव कामाचे आंगरखे त्यांनीं काढले आहेत.' -प्रति आत्म ४७१.

**फांट**—पु. कढत पाण्यांत औषधें घालून ठेवून निवाल्यावर त्यांचा गाळून घेतलेला सौम्य काढा.

**फाटकें**—नपु. अव. (अहिराणी) फांद्या; तुकडे; फांटे. 'आरकाटी म्हणून शमीचा एक प्रकार आहे त्याचीं फाटकें आणून मांडून ठेवतात.' -अहिराणी भाषा व संस्कृति ३८. [फाडणें]

**फापडा**—पु. विड्याचें रुंद व पसरट पान. याच्या उलट कळीदार पान.

**फापशी**—स्त्री. कुंभ्याच्या सालीचा वाक. -चित्रकृषि २६.

**फायकह**—वि. योग्य. -मुधो. [अर.]

**फारगत**—न. गलबताचा एक प्रकार. 'इंग्रज बोलीप्रमाणें आला. तीन फारगते आली. राहिली ती आज उद्या येतील.' -पेद २४.११५. [इं. फ्रिगट]

**फारिग**—वि. मोकळा. -मुधो. फारिक पहा. [अर. फारिघ] ०**उलवाल**-काळजीपासून मुक्त झालेला.

**फारिद्**—वि. फारिक पहा. १ मुक्त; मोकळा. २ कर्ज इ. वारलेला; ऋणमुक्त. 'राजश्री बाजी विठ्ठल यास ही त्याच्या गुजारतीचे कर्जवाम फारिद करावे.' -पेद १९.१११. फारिग पहा.

**फावडे**—न. हस्तक्षेप; दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ. 'ज्याचा कारभार त्याचे हाते घ्यावा. फावडे करूं नये.' -पेद ६.९९.

**फांसा टाकून प्रश्न पाहणें**—फांसा टाकून त्यावरील आंकड्यांवरून ग्रंथांत दिलेल्या वचनानुसार भविष्य वर्तविणें.

**फाहाडपसारा**—पु. (कदाचित् फापडपसारा-बद्दल चुकीचें वाचन). फापट पसारा पहा. गोंधळ; गडबड; अस्ताव्यस्त स्थिति; अव्यवस्थित कारभार. 'किल्याची जागा आणि वस्ती मोठी. फाहाडपसारा आणि आवया याप्रमाणें पडतात आणि खासा स्वारी मागें सरली आहे.' -पेद ३७.२२. [पसारा द्वि.]

**फाळणी नंबर**—जमिनीच्या पोट नंबरापेक्षां लहान विभागणीस दिलेला क्रमांक.

**फाळापट्टी**—स्त्री. जमिनीच्या तुकड्यावरील सारा, कर.

**फाळियें**—न. अव. (गु.) फेटे; पागोटीं. 'त्यांनीं आल्याबरोबर आपलीं फाळियें गवतावर ठेवलीं.' [फल्ला पहा]

**फिकरा**—पु. लेख; पत्र; लिखित. 'त्या खात्यांतील फिकरा पारसी व त्याचा तरजुमा हिंदवी करून पाठविला आहे त्याजवरोन मुफसल मुषहुद होईल.' -रा १०.२२४. [अर. फिक्रा=ओळ, वाक्य]

**फिटुक नळी**—स्त्री. फटुक नळी. फटक फळी पहा. -ज्याआ.

**फितना**—पु. एक सुगंधी द्रव्य. हें अत्तराप्रमाणें हातास लावतात. [फा.]

**फित्नह**—पु. भांडण; कज्जा. -मुधो. [अर.] ०**फर्दाझी**-स्त्री. भांडणांत गढणें.

**फिद्वियत**—स्त्री. चाकरी. -मुधो. [अर.] **फिद्वी**-पु. चाकर.

**फिरका**—पु. पंथ; जमात; संघ. 'मुसलमानांमध्यें बहात्तर फिरके असूनसुद्धां ते आपणाला एक समजतात '-के २१. १०.१९३८. 'नागपुरामध्यें कासाराचा फिरका मोठा आहे.' -पेद २०.३४. [फिरणें-फेरा]

**फिरकी**—स्त्री. कोष्ट्याचें सूत उकलून गुंडाळण्याचें साधन. [फिरणें]

**फिरंग रोग**—पु. उपदंश; गरमी. हा रोग प्रथम हिंदुस्थानांत फिरंगी लोकांनीं आणला यामुळें यास हें नांव पडलें.

**फिरती घडी**—स्त्री. विवाहसमारंभांत एक घडी केलेलें लुगडें किंवा पागोटें देणगीदाखल वारंवार वधूपक्षाकडून वरपक्षाकडे व वरपक्षाकडून वधूपक्षाकडे दिलें जातें त्यास म्हणतात. -लविसो १३३.

**फिरिस्तादन्द्**—क्रि. पाठविलें. -मुधो. [अर.]

**फिरोजमंदी**—स्त्री. यशस्विता. -आफ. [फा.]

**फिर्दोस**—पु. स्वर्गीय उद्यान. -मुधो. [फा.]

**फुंकणी**—स्त्री. (अशिष्ट, कुण.) नखरेबाज स्त्री; झोकबाज स्त्री.

**फुंकणें (सापानें)**—अक्रि. (गो.) साप चावणें. 'इतक्यांत झिलावाला सापानं फुंकल्याचं वर्तमान आलं.' -अंधारांतील वाट.

**फुंकर मारणें**—१ तोंडानें मंत्र म्हणून फुंकणें. २ मंतरलेली राख फुंकरानें उडविणें. ३ मंत्रतंत्र करणें. [फुंक]

**फुंका, फुका**—पु (सिंधी.) गायीनें सर्व पान्हा सोडावा म्हणून तिच्या योनींत फुंकर घालावयाचा क्रूर प्रकार. -के २७.११.१९३६. [फुंका]

**फुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -मखेपु २१७. हिचे प्रकार-१ एका हाताची फुगडी. -मखे २१७; २ दंड फुगडी. -मखेपु २१६.; ३ चौघींची फुगडी. -मखेपु २१५.; ४ दोन हातांची फुगडी. -मखेपु २११.

**फुगाव**—पु. (नाविक.) गलबतांतील स्वयंपाक करण्याची जागा. -किर्लो. आक्टो १९३८.२७४.

**फुंजणें**—अक्रि. उजळणें; स्फारणें. 'धवधवीत दैवीः चहुकडे उधाय। तेणें फुंजताय: दाही दिशा।' -ऋ ११४.

**फुटक्रिया**—स्त्री. (महानु.) दैव; भाग्य; कर्म; संचित. 'फुटक्रिया थोर आहे.' 'फुटक्रिया संपली कुंठली. 'फुटक्रिया जोपर्यंत आहे तोपर्यंत राज्य.' [सं. स्फुटक्रिया]

**फुटिक**—पु. फटिक; स्फटिक. 'मना तूं श्वेत फुटिक ज्वालावर्ण।' -योसं १८१८. [सं. स्फटिक]

**फुडकें**—न. तुकडा; चोंढा; भाताच्या शेताचा तुकडा; चार बांधांमधील भाताचें शेत. 'आम्ही शेत करूं लागल्यास मोजणी होऊन फुडकीं पाडिल्याशिवाय शेतें करूं नये म्हणून शेतें करूं दिलीं नाहींत.' -आठइति १९६. [सं. स्फुट]

**फुडी, फुडा**—क्रिवि. पुढें. 'त्यास पूर्वी स्वामी फुडी होते.' -पेद १७.५४. [पुढें]

**फुदगी**—स्त्री. उहाणू-उंबरगांवाकडील एक जात.

**फुरडें**—न. मुस्ता; चूडाला; चकारा; उच्चरा; एक वनस्पति. -मसाप ४५.५.

**फुलगा**—पु. १ शिजविलेला भात. 'नुसत्या फुलग्यानें पोट भरत नाहीं.' २ फुगलेली पातळ लहान पोळी: फुलकी.

**फुलचेरी**—स्त्री. पांडिचेरी. -पेम ५०८.

**फुलझडी**—स्त्री. १ (कुस्ती.) कौशल्यावरून निर्णय लावावयाची कुस्ती. -के २९.११.३८. २ (लाठी.) पूर्वसंकेतानुरूप चढाईच्या व बचावाच्या सांखळ्या करण्याचा प्रदर्शनी प्रकार. यास घाई असेंहि म्हणतात.

**फुलडौल, डौल**—पु. फुलांनीं सजविलेल्या डोलाऱ्यावर काढलेली देवाची मिरवणूक. -के १९.९.४१. [फूल+दोला; म. डोलणें]

**फुलफुल**—स्त्री. (व.) वार्ता; वदंता; अर्धवट बातमी. 'त्या मुलाला कोड असल्याची फुलफुल आमचे कानीं आली.'

**फुलवाजा**—पु. (ठाकरी.) नाचाची काठी व नाच. यास कोळणीचा नाच असेंहि म्हणतात.

**फुलवर**—पु. १ फुलकोबी. २ पत्त्यांतील एक काळा रंग; किलावर. [इं. फ्लॉवर]

**फुलसरा**—स्त्री. दारू; मद्य. 'ठाण्याच्या पाणबुरुजावरील शिपायांना फुलसरा पाजून गाफील करूं.'-वसमो. [फूल+सरा]

**फुलाची जायपत्री**—स्त्री. हलकी, पातळ जायपत्री.

**फुली देणें**—डाग देणें.

**फुली मारणें**—पाट, दार, वगैरेस धातूचे फुलाच्या आकाराचे पत्रे ठोकणें.

**फुलोरा**—फुलांची परडी. 'तात्यांनीं थोडीं फुलें फुलोऱ्यांत घातलीं व ते आंत आले.' -सत्यकथा, जाने. १९४२.

**फुल्लार**—स्त्री. (महानु.) देवपूजा.

**फुल्लारकर**—देवपूजेचा पसारा मांडणारा.

**फुल्लारी माता**—स्त्री. इष्टदेवता.

**फूटपट्टी**—स्त्री. एक फूट लांबीची वर इंच व त्यांचे भाग दाखविणारी लांकडाची पट्टी. फुटाची मापणी. [इं. फूट+ म. पट्टी]

**फूल**—न. तलवारीच्या मुठीच्या वाटीवर वाटोळा भाग असतो तो. यासच बतासा म्हणतात. -प्रश ८३.

**फेक**—स्त्री. फेकण्याची क्रिया; भाला वगैरे मारण्याची क्रिया; भाल्याचा मार, डाव, हात. [ फेकणें ]

**फेटें**—न. हरकत; बाधा; अडचण. 'विमा कंपन्या मयताच्या वयाचा दाखला वगैरे पुरावा मागून नसतीं फेटें काढतात.' -विवि १५ ऑगष्ट १९३७.

**फेणीचें तेल**—न. हातघाण्यावर किंवा खोबरें किसून त्याचें हातानें पिळून काढलेलें तेल.

**फेतोरी**—स्त्री. ( फॅक्टरी या शब्दाचा अपभ्रंश ). कारखाना.

**फेंदरट**—वि. चपटें; बसकें ( नाक ).

**फेरणी**—स्त्री. पैमाशी कामगार जमीनीची मोजणी करून पुन्हां आकार बसविणारा. 'फेरणीचा मुक्काम आल्यापासून कोंबड्यांची संख्या कमी होऊं लागली.' -पाणकळा. ( इं. ) रिव्हिजन सर्व्हे.

**फेरिस्ता**—वि. फिरणारा; भटक्या. 'मग हे फेरिस्ते कातकरी त्यांच्या तावडींतून कसे सुटतील.' [ फा. ]

**फैजमाब**—वि. कृपापूर्ण; दयाशील; दयाळू 'अर्जी बजनाब फैजमाब हजरत आलेपेटनसाहेब.' -पेद ४१.२४२. [ अर. फैज+म+आब ]

**फैला**—पु. बखेडा; घोटाळा. 'त्याचे चौदा महाल श्रीमंताच्या विभागाचे तितकेच्या सनदा आणिल्या आहेत तो फैला कामाचा नाहीं.' -पेद ३६.८०. फैल पहा.

**फैलावणी**—स्त्री. व्याजाचा हिशोब, आकारणी.

**फोकटा**—पु. नारळाचें कोंवळें फळ.

**फोडती**—पु. किल्ले. -वसमो.

**फोडा**—पु. मणि. 'फोडे सुमार४०दाखले एकूण वजन.' -रा ३.७८. **फोडासारखा जपणें**-अतिशय काळजी घेणें. हातावर फोड झाला असतां त्या जागेस स्पर्श झाला तर दुःख होतें; याकरितां आपण त्यास फार जपतों यावरून. [ फोड; सं. स्फोट ]

**फोंडामाळ**—पु. फक्त दगड असलेली माळ जमीन.

**फोडी लागणें**—क्रि. सुपारी लागणें. सुपारी खाल्ली असतां घशांत बांध बसून शहारे येतात व जीव कासावीस होतो त्यास म्हणतात. 'ते सेजेवरी लोटली बाळा । देखौनि धाकुटिया होती व्याकुळा । म्हणेति काई इये वेळोवेळां । फोडी लागताये॥' -नरुस्व ३९९. [ फोड ]

**फोडू**—वि. फितुरी, भेद करणारा. 'सर्वांनीं येकनिश्चित राहावे याप्रमाणें करार करून आठच्यार रोज निखालसपणें वर्तणूक केली. त्यावर मागती वाड्यांतील लोक फोडू वाडा बदलावा, तें वर्तमान आम्हास व जिवबास कललेवर चौकशी केली' -पेद २४.१७. [ फोडणें ]

**फोणी**—स्त्री. शिडाची दोरी ओढून घेण्यासाठीं लावलेली लहान कपी. -आंघइ ३७९.

**फोती**—मयत. [ फौत ]

**फोतूल**—न. शेणाचा पो. -वि. लठ्ठ व पिसपिशीत अंगाचा; फतकल पहा.

**फोदेपिस्साट**—वि. ( अश्लील. ) अतिशय विषयी, कामी; नेहमीं बायकांमागें फिरणारा; स्त्रियांचें वेड लागलेला.

**फोलारा**—पु. १ फूल; पुष्प. फुल्लार पहा. २ फुलासारखा दागिना. 'फोलार वाजती सार।' -ऐपो २.१९६.

**फौक**—पु. श्रेष्ठता; उच्चता. -शअ. वर; पलीकडे. -मुधो. [ अर. ]

---

# ब

**ब**—अ. ला; योगें. -मुधो. [ अर. ]

**बं ! बं !**—उद्गा. भैरवाचे भिक्षेकरी उच्चारतात तो शब्द; बं महादेव ! [ ध्व. ]

**बऊभात, बहुभात**—पु. बंगाली लोकांत लग्नाच्या विवाहहोमाच्या दुसऱ्या दिवशीं वरपक्षाच्या जेवणावळींत वधूनें भात वाढणें. [ बऊ=वधू+भात ]

**बकणणें**—अक्रि. बकाणा भरणें; मुठीमुठीनें तोंडांत घालणें. [ सं. भक्ष्-बक ]

**बकबक ( सुटणें )**—पोटांत खळखळा उठणें.

**बकबक्या**—वि. अतिशय खादाड.

**बकऱ्यांची दावण वाहणें**—एखाद्या देवास १०-१२ बकरीं एकदम बळी देणें.

**बकलणें**—भकलणें पहा. खूप खाणें; गट्ट करणें.

**बकाअ**—सखल जागा. -मुधो. [ अर. ]

**बकासन**—न. ( मलखांब. ) घोड्याचा फरारा करून मलखांबावर पाय टेकून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२२९. [ सं. बक+आसन ]

**बकोटी**—स्त्री. ( कों. ) खांद्याचा सांधा; बाहुटा. 'बापुरावांनीं आंधळ्याला धक्का दिला. मुलाची बकोटी धरली गेली.' -आंधळा आणि पोर; -श्याआ. बखोटा, बगोटा पहा.

**बकोटी अढी**—स्त्री. ( मलखांब. ) मलखांब बगलेंत धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.५२.

**बखैर**—वि. सकुशल; स्वास्थ्यासह. 'त्याची (त्यानी) महालीची बखैर व सनगाप्रमाणें बजिनस जाविता पाठविला त्याप्रमाणें पावलियाचे उत्तर यावयां आज्ञा केली, पाहिजे.' -पेद ७.२१. [ अर. ब+खैर ]

**बगल**—स्त्री. खांद्यापासून कमरेपर्यंतचा भाग, बाजू.

**बगलगिरी**—स्त्री. विशिष्ट पाहुण्यांना देण्यांत येणारा आलिंगनाचा मान; भेट. [ बगल+गिरि ]

**बगलचीर**—स्त्री. बगलेमध्यें खालून वर मारीत नेलेला मार. -मवि ९.११. [ बगल+चिरणें ]

**बगलबंडी**—स्त्री. बाराबंदी; बगलेंत बंद असणारी बंडी.

**बगलडूब**—(कुस्ती.) एक पेंच; प्रतिपक्षाच्या बगलेंतून डोकें काढून त्याच्या पाठीमागें येणें.

**बगलदंड**—पु. दंडाचा एक प्रकार; यांत जोर काढल्यावर डोकें क्रमानें उजव्या डाव्या बगलेंत न्यावयाचें असतें. -व्याज्ञा ४.५३.

**बंगला**—पु (नाशिक.) माडीवरील पुढील दिवाणखाना. -स्मृतिचि १.१०.

**बगल्या वकील**—पु. विनसनदी वकील; मुखत्यार वकील; वकीलाचा हस्तक. 'तिच्या मावशीचा नवरा कायसा बगल्या वकील आहे.' -आपव [ बगल+वकील ]

**बगी**—पु. लिंगायत लोकांतील जंगमेतर लोक.

**बंगी**—स्त्री. मुलांना शाळेंत पुस्तकें वगैरे नेण्यासाठीं शिवलेली पिशवी. -गतगो ११५. (इं.) बंग. -शको पहा.

**बंगोपंतांचे भाचे**—पु. अतिशय कृपण माणूस.

**बचत**—स्त्री. शेष; ऊर; ऊर्वरित भाग; बाकी; वांचलेला जिन्नस. [ सं. बच्; हिं. बचत ]

**बच्चा**—पु. नदीकांठचें सतत पाण्यांत जगणारें एक झाड. -चित्रकृषि २६.

**बच्चा**—पु. नुकसान; बट्टा.

**बजरबट्टू**—पु. काळा कुळकुळीत मनुष्य; बुटका, लठ्ठ मनुष्य. [ बजरबट्टूमणि असतो त्याप्रमाणें ]

**बजो**—स्त्री. वचा; वेखंड. -मसाप ४५.३.

**बघा-घ्या**—पु. नुसता पाहणारा; केवळ गंमत पाहण्याच्या उद्देशानें आलेला. (अव) **बघे**-पाहाणारे. 'विचकत जमा झालेले बघे दूरच्या दूर पळालें.' -उपेअन्त २०. [ बघणें ]

**बट**—पु. (व.) १ फांटा; टाळा; अभाव. 'जेवणाला आज बट दिला तेव्हां पोटाला जरा बरें वाटलें.' २ सोनें चांदी वजन करावयाचे दगड.

**बट**—स्त्री. कुंभ्याच्या मुळीचा वाक.

**बटछपन्नी**—स्त्री. वजनांवरील कर.

**बटाकी वाजवणें**—थाळी वाजविणें; दौंडी पिटणें. 'खेड्यांत बटाकी वाजवून हा हुकुम जाहीर झाला पाहिजे.' -के ३०.४.१९३७.

**बटायंदा**—पु. भरणा; जमा. 'शेतसारा जो अर्धा बटायंदा केला आहे तो पूर्णपणें बटायंदा करावा.' -ज्ञाप्र ८.४.१९४२. [ अर. ]

**बटिकु**—पु. नोकर; दास; सेवक. 'बटिकु धाडिला.' -अज्ञातच १००.

**बटेबाज**—वि. लबाड; शठ; धोकेबाज. 'श्रीमंत नानासाहेब येकवचेनी, हे बटेबाज.' -पेद ५.८५. [ बटा, बट्टेबाज पहा ]

**बट्टा खातें**—न. बटावाचा हिशोब; नाणें पारखणावळ; चेक वटविण्याची कसर.

**बट्या**—पु. पत्त्यांतील गुलाम.

**बंडा**—पु. भिंतींतील मोठा कोनाडा; बळद. 'झांशी शहरांत बीजन शुरू झालें. लोक वाड्यांतील बंड्यांत व इतरत्र लपून राहिले.' -ज्ञाको (झ) २९.

**बतासा**—पु. तलवारीच्या मुठीच्या वाटीवर वाटोळा भाग असतो तो. -प्रश ५५.

**बत्ताडा**—वि. मोठा; रुंद.

**बंद**—ठेवी. -दा १६.३.११. -पु. बंदी; कैदी. 'सेंभर बंद रांडापोरे नेली.' -पेद ३४.१९.

**बद अवलादीचा**—वि. जारज; संकरज. [ फा. ]

**बंदगान**—पु. अव. चाकर. -मुधो. [ अर. ]

**बदचाल**—स्त्री. वाईट चाल; गैरशिस्त वागणूक.

**बंदबस्त**—बंदोबस्त पहा. -मुधो. [ अर. ]

**बदभाऊ**—पु. १ वडील भाऊ; वृद्ध भाऊ. 'आपले बदभाऊ विशाळगडी वृत्ती खातात त्यास घेऊन येतो ते वृद्ध आहेत.' -आठइति ५६.

**बंदर पकड**—स्त्री. (मल्लखांब.) एक हात जमिनीवर ठेवून व एका हातानें मल्लखांबास धरून मारावयाची वांदरासारखी उडी. -व्याज्ञा ३.६०. [ बंदर+पकड ]

**बंदरसमा**—स्त्री. बंदरामध्यें पूर्ण भरतीची स्थिति. या वेळीं खाडींत भरती असतेच असें नाहीं. -मातीर्थ ४.६.

**बदर(रा)हा**—क्रिवि. गैरमार्गानें; कुमार्गी; भलतीच. 'पुण्यातील वगैरे कितेकानी फितूर करून बदराहा वर्तणूक करू लागले.' -पेद २०.२२४. [ फा. बद+राह ]

**बंदरी तेल**—न. परदेशांतून आलेलें तेल; बंदरांतून आलेलें तेल.

**बंदरी वजन**—न. रत्तली वजन.

**बदला**—पु. वायद्याच्या धंद्यामध्यें पटावटीच्या वेळीं वायदा पुढें ढकलण्याकरितां द्यावा लागणारा बटाव, फरक.

**बदला करणें**—अक्रि. चालू वायद्याचा व्यवहार कायम ठेवून तो फक्त बदलून पुढील वायद्याचा करून घेणें. -उद्यम जुलै १९४१.

**बदल्याचा गाळा**—पु. बदला करून घेण्याकरितां द्यावा लागणारा फरक. 'तीन टक्क्याच्या नोटेचा बदल्याचा गाळा तीन ते चार टक्के होता.' -के २१.१.१९३६.

**बदल्याचा धंदा**—पु. एका बाजारांत वायदा विकत घेऊन दुसऱ्या बाजारांत तितकीच वेचाण करणें. (इं.) स्ट्रॅडल.

**बंदवान**—न. बंदी; अटक केलेलें माणूस; कैदी. 'बंदवानें पिलाजी जाधव यांणीं सोडविलीं असेत.' -रा ६, पृ ६६. [सं. बध्; फा. बंदी]

**बदामपाक, बदामरोटी**—पु.स्त्री. बदाम आणि इतर मसाला घालून केलेला पौष्टिक पाक व तशीच रोटी.

**बंदाष्टमी**—स्त्री. पौष शुद्ध अष्टमी. या दिवशीं बनशंकरीचें नवरात्र सुरू होतें. [सं. वन-बन+अष्टमी]

**बदीसा**—पु. कपट; कुभांड; डाव. 'त्यानी गतवर्षी आम्हावरी बदीसा केला. त्याचें निवारण स्वामींनी करून पूर्ववत प्रमाणें रक्षण आमचें केलें.' -पेद २०.२२४.

**बंदुवा**—पु. बंदी; कैदी. 'स्वामींनी किले मजकुरावरी बंदुवे पाठविले ते किले मजकुरीं अटकेंत ठेवले.' -पेद ३०.१२. [बंदी]

**बदू**—त्याला. -मुधो. [अर.]

**बंदेजास्त**—पु. बंदोबस्त; बंदिस्ती. 'उंदेरकरावरी शह पडल्यावरी खाडीत रखवालीस लोक ठेवावे तरी इंग्रेजाच्या बंदेजास्त व शामलाचा पैस खाडींत व्हावयाचा लाइलाज.' -पेद २४.१४०. [फा. बंदेज पहा]

**बंदेश**—पु.कुस्तींतील व लाठींतील एक डाव. प्रतिपक्षाचा मार लाठीनें बंद पाडून त्याच्या हातांतील लाठी हिसकावून घेणें.

**बद्धपरिकर**—वि कमर वगैरे बांधून तयार; सज्ज; सिद्ध; सन्नद्ध. [सं. बद्ध+परिकर]

**बद्धभुज**—वि. ज्याचे हात बांधले आहेत असा. 'बहु ताडुनि करुनि बद्धभुज गवळी।' -मो उत्तरगोग्रहण. [सं.]

**बधाई**—स्त्री. १ धन्यवाद; प्रशंसा; पुरस्कार. 'त्यांस बधाई देण्याचे प्रसंग परवां आले तेव्हांहि मीं कसूर केली नाहीं.' -प्रतिभा नोव्हें १९३६. २ बक्षिसी; (इं.) बोनस. [सं. वृद्धि]

**बनवून सांगणें**—तिखटमीठ लावून सांगणें. [बनविणें]

**बनशंकरी**—स्त्री. एक देवी. (चुकीनें बलशंकरी). हिचें नवरात्र पौष शुद्ध ८ ते पौर्णिमेपर्यंत असतें. या अष्टमीस बंदाष्टमी म्हणतात. हिचें देवालय बदामीस आहे. [सं. वन+शंकरी]

**बनाई**—स्त्री. सोयरीक. 'माने व जाधव यांची बनाई कशी होईल.' [बनणें]

**बनी**—पु. (कर्ना.) शमीचें झाड.

**बंपार**—न. तोरंजन फळ व त्याचें झाड.

**बंपारा**—पु. (कर.) पपनस.

**बंब**—पु. पोत्यांतील दाणे काढण्याचें हत्यार; बंब्या. बोम पहा.

**बर**—वर. -मुधो. [अर.]

**बरखा-खी**—पुस्त्री. गोवारी, गोवारीण.

**बरखुरदार**—पु. उपभोग घेणारा; फलभोगी. 'दरम्यान साहेबांनी बरखुरदाराची परवर्षी जाली पाहिजे यास्तव अर्जी ऐकोन पुणेंतील घरची मोकलीकहि केली.' -पेद ४१.२६०. [फा.]

**बरगा**—पु. बरग पाहा. -चित्रकृषि २६.

**बरंगाळ**—स्त्री. पर्जन्यधारा. 'वसंतु ना ते रितु पाउसाळी। कोकिळांचे नि गाणें परागांचा जौळीं। वरि खत मकरंदाचिया बरंगाळी। श्रीमंत चातकावरी॥' -नरुस्व ७३९. [सं. वर+गल्]

**बरयाब**—क्रिवि. पुढें; समोर; पेश. 'प्रहर दिवसा खिलवतेत आले ... फकरुदी हुसेनखां व मीर कवा(री)मुदीखां बरयाब झाले. जाबसाल करून दो प्रहरा बरखास्त.' -पेद २५.१७१. बारेयाब, बार्याब पहा.

**बरा**—पु. कोवळा दुंबा; एक लठ्ठ शेंपटाचा मेंढा. -शिश.

**बराकिण**—न. एक प्रकारचें गलबत.

**बराड**—वि. बिनडोक्याची. 'त्याच्या बाजूंस बराड चुका बसवाव्या.'

**बराडी**—स्त्री. माची; मेटें. 'पायेचे माणूस सोभागसिंग घेऊन किल्ल्याचे बराडीस जाऊन तीतर्फा मोर्चेबंदी केली.' -पेद २८.१२. [बराड]

**बराबद**—स्त्री. उपस्थित; आगत. 'छ १३ रोजीं नबाबांनी शिकारीस जाण्याची सिद्धता केली बराबद जाले.' -रा ७.१११. [फा. बरामद होना=येणें; उपस्थित होणें; चढणें]

**बरी**—यावर. -मुधो. [अर.]

**बर्ग**—पान. -मुधो. [अर.]

**बल देणें**—साहाय्य करणें; मदत, उपराळा करणें. 'एतद्विषीं राजश्री वासुदेव जोशी यांसहि बल देणें व महादोबास बल देऊन खामखा कार्य करणें.' -पेद ३.११५.

**बलगी, रणबलगी**—स्त्री. एक वाद्य. -शिदि ५७.

**बलदंड**—वि. मजबूत; बळकट. 'काठ्या उंच धरून चाललेल्या कांहीं बलदंड मांगांच्या आश्रयानेंच म्हातारा व बाई चालली होती.' -उपेअंत ५३. [बल+दंड]

**बलफल**—पु. नेट; जोर. 'परंतु आली महमदखान रोहिला वगैरे पठाणांहि बलफल धरला. जमाव बहुत करून युध्यास सिध्य जाला आहे.' -पेद २१.३१.

**बलशालित्व**—न. शक्तिमत्व; सुदृढता; वीर्य 'चित्र-कलेचा परामर्ष, तरुणांच्या बलशालित्वाबद्दल साष्टांग खटपट इत्यादि गोष्टींबद्दल श्रीमंतांची ख्याती आहे.' -प्रतिभा २१. [सं.]

**बलक्ष**—पु. शुद्ध पक्ष. [सं.]

**बलात्कार**—पु. जबरी संभोग [सं.]

**बलावणें**—सक्रि. बळकट करणें; बळावणें; मजबूत करणें. 'तुम्ही आम्ही येकत्र होऊन जागा बलाऊन राहूं.' -पेद ३.१२३. 'मोर्चे बलाऊन पुन्हा शामलास तंबी पोहचाऊ.' -पेद ३.१२३. [सं. बल]

**बलेंबलें**—क्रिवि. कसेंबसे; कसा तरी जोर धरून; बळेंच. 'बलेंबलें शाहमात्र आजपर्यंत राखून आलो आहो.' -पेद ६.१६६. [सं. बल द्वि]

**बल्यांव**—न. एक प्रकारचें गलबत. -ज्ञाको २१ ३५३.

**बल्लम**—पु. भालदार. 'शेंकडों भालदार, चोपदार, बल्लम वगैरे ललकारत होते.' -महादजी चरित्र २४९. [बल्लम=भाला]

**बल्हो**—पु. बोल; एकतंड बोलणें; अस्खलित भाषण; विस्तारानें भाषण; निर्णयविस्तार.

**बवजह**—रूपानें. -मुधो. [अर.]

**बव्वार**—पु. नाश. -मुधो. [अर.]

**बष्टांच**—क्रिवि. (गो.) व्यर्थ; विनाकारण; निरर्थक. पोर्तु. ? इं. बेस्ट]

**बसई**—वि. सर करण्यास कठिण; मजबूत; घेण्यास कठिण. 'अन्यथा वसई बसई होती.' -ब्रप. [ब+सई]

**बसका**—स्त्री. (गो.) एक धार्मिक विधि. 'सांतेरी देव-स्थानांत श्रावण महिन्यांत बसका नांवाचा एक तीन दिवसांचा कार्यक्रम असतो. बसकेचा विधि प्रत्येक गांवांत थोड्याफार फरकानें असतो.' -अंधारांतील वाट.

**बसंती**—पु. एक प्रकारचा पांढुरका तांबडा रंग.

**बसफुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३७६.

**बसवी**—स्त्री. वेश्या. 'जाणोजी सेवाले याचे हवेलीजवल येक बसवी राहत होती तिचे घर लुटुन आनले.' -पेद ६.५. [सं. वेश्या; वसु=बैल; बसवी=गाय]

**बसळा**—पु. पोई; उपोदका. -मसाप ४५.५.

**बसा**—वि. पुष्कळ. -मुधो. [अर.]

**बसाबस**—स्त्री जम; बस्तान. [बसणें द्वि.]

**बसून बसणें**—कांहीं उद्योग न करतां आळसांत दिवस घालविणें.

**बस्त**—पु. निर्बंध; व्यवस्था; ठाकठिकी; स्थिरता. 'श्रीमंत नानासाहेब व भाऊसाहेब मागे चांगला बस्त केला म्हणून स्वामीची येश कीर्ति विस्वतोमुखी वाखाणीजेल.' -पेद ३८. २८. [फा.]

**बस्तनपर**—क्रिवि. हिशोबाप्रमाणें. 'याचे बस्तनपर अडीच टकेप्रमाणें पांच हजार टकीयाचे तनखियाचा इनाम वंशपरंपरा.' -राघोबाचें पत्र.

**बस्तह**—बांधून दिलेलें. -मुधो [अर.]

**बस्ता**—पु. कमरेभोंवती गुंडाळण्याचें एक वस्त्र. [फा.]

**बस्ताबंदी**—स्त्री. बंदोबस्त; व्यवस्थित बांधणी. 'माल काळजीपूर्वक बस्ताबंदी करून पाठवूं.' [फा.]

**बस्ती**—स्त्री. वेष्टन; गठ्ठा; रुमाल. 'आपण पाहून चिट-निसाजवल देऊन पत्रें लिहून बस्त्या लाऊन रवानगी करावयास आज्ञा करावी हे विज्ञापना' -पेद ३७.१०६. [फा.]

**बहदा**—पु. अमल; सत्ता; वर्चस्व. 'येंदा अंतरवेदीचा बहदा उठला.' -पेद २१.९६. [फा.]

**बहबूदी**—स्त्री. उत्कर्ष. -मुधो. [अर.]

**बहरणें**—अक्रि. बहार येणें; भर येणें; झाडास फुलें येणें.

**बहरह**—पु. तुकडा. -मुधो. [अर.] ०अंदूज-पु. तुकडे गोळा करणारा.

**बहरोझी**—चांगले दिवस असणें; उत्कर्ष. -मुधो.

**बहादर, बाहदर, बाहादर**—पु जामीन. 'गोविंद-रावबाबा याजपासून बदाहर घेऊन मग लस्करात आले.' -पेद ३६.११३.; 'येविसी बाहदर यावे म्हणजे आपण येऊन पठाणास उठवून देतो.' -पेद ३६.२८९. [फा.]

**बहार**—पु. वसंत. -मुधो. [अर.]

**बहारवाटिया**—पु. वाटमारू; दरोडेखोर; काठेवाडांतील लुटारू. -के १३.५.१९३४. बाहेरवट्या पहा.

**बहाल**—बक्षिस. -मुधो. [अर.]

**बहिय्यह**—वि. विभूषित; सुंदर; प्रकाशमान. -मुधो. [अर.]

**बहिरट**—वि. बहिरा. [सं. बधिर अल्पार्थे]

**बहिरी परिंद्याचे शिकारी**—बहिरी ससाणा या पक्ष्याच्या साहाय्यानें शिकार करणारे शिकारी. 'दाहा बहिरी परींद्याचे सिकारी सिकाकोल राजबंदरीहून येणार त्याचें एक दस्तक एकून दोन दस्तकें देवावीं.' -रा ७. -खलप १.३.

**बहिर्जकात**—स्त्री. परदेशीं निर्गत किंवा तेथून आयात होणाऱ्या मालावरील जकात. इं. कस्टम्स. [ सं. बहिः+अर. झकात ]

**बहिर्भूमीची व्यथा**—स्त्री. भूतबाधा. 'राजश्री आपास बहिर्भूमिची व्यथा झाली आहे.' -पुद ९२.

**बही**—उत्कर्ष. -मुधो. [अर.]

**बहीरबुनगें**—न. बुणगे वगैरे किरकोळ लोक; सैन्याबरोबरचे फालतू लोक. 'मुक्कामाचे झेंडे उभे करून बहीरबुनगे उतरवून फौजा चहूंकडे मिसली वरच उभे आहेत.' -पेद १. १३. [ बहीर+बुनग व तत्सम लोक ]

**बहीरवास**—पु. (महानु.) धोतर; नेसण्याचें वस्त्र. बाहेरील वस्त्र. -पूजाव. [ सं. बहिः+वास ]

**बहुडा**—पु. निरोप; रजा; रुखसत; रवानगी. (क्रि. देणें) 'येणेंप्रमाणें उभयतां अग्रवादी व पश्चात्वादी यांचे राजीनामे लिहून घेतले आणि उभयतांस बहुडा दिला.' -सनदा ११७. -वि. १ खलास; समाप्त. 'त्यावर दरबार बहुडा होऊन राजश्री वाड्यांत गेले' -पेद १२.७६. २ खोटे; हिणकस. 'राजश्री राघोपंत रुपये १९८० पाठविले त्यापैकीं वजा बहुडा रुपये २० बाकी जमापोत रुपये १९६०.' -रा ६ पृ. १६२. 'रुपये ७४० पाठविले. त्यापैकीं बहुडा रुपये ३ बाकी जमापोता.' -रा ६ पृ १६८.

**बहुडाविणें**—अक्रि. कृपादृष्टीचा वर्षाव करणें; मोठेपणा देणें; मानसन्मान करणें. 'साहेबीं ... आपली मिरास आपले दुमाला करून लिखा मन्हामत केला. तश्रीफ देऊन बहुडाविलें.' -सनदा ६२. [ सं. बहु=मोठा ]

**बहुताभातेन**—क्रिवि. अनेक प्रकारें; अनेक प्रकारच्या गोष्टी सांगून. 'येते समयी तुम्ही त्यान्या घरास जाऊन त्याचे बहुताभातेन समाधान करून त्याचा बहुमान करून त्याला समागमे दर्शनास घेऊन येणें म्हणून आज्ञा केली.' -पेद १७.६०. [ बहुत+भात ]

**बहुतेरे**—वि. अनेक प्रकारचे; निरनिराळे; तऱ्हेतऱ्हेचे. 'येथें कांहींच न राहावें ऐसे दिवस गुजरले. बहुतेरे उपाय केले. निकडीचे वेळेस सर्वांपेक्षां अगोदर येऊन जें घडलें तें सर्व प्रसिद्ध आहे.' -भारतवर्ष पत्रें यादी ७. [ हिं. बहुतेरे ]

**बहुनाइकी**—स्त्री. अनेकांच्या हातीं कारभार असणें; बारभाई; अनेकसत्ता. 'बालनाइकी, स्त्रीनाइकी, बहुनाइकी जाहली.' -हिंद १८०. बालनाइकी पहा.

**बहुबेटी**—स्त्री. (व.) १ सूनलेक. २ मूलबाळ. 'वाटच्या वाटसरा तुझी नजर पाप्याची । भल्याची बहुबेटी । काय तुझ्या रे बापाची॥' -वलो ७१. [ सं. वधू+पुत्री. हिं. बहू+बेटी ]

**बळकव्वा**—स्त्री. (कर्ना.) एक अनार्य देवता.

**बळवंडे**—क्रिवि. (महानु.) बळेंच; जुलमानें; जबरदस्तीनें. 'तुम्ही ऐसें काइं करीता? मज बळवंडें पाप घडवीताः' -वृद्धाचार १.

**बळस खोळणें**—जनावर वोपेला येणें; जनावरास संभोगेच्छा उत्पन्न होणें.

**बळेंवळें**—क्रिवि. ओढूनताणून; कसेंबसें; जोर धरून; अवसान आणून. [ बल ]

**बा**—सद्द; शौं. -मुधो. [ अर. ]

**बाअस**—स्त्री. कारण. बाईस पहा. -मुधो. [ अर. ]

**बाइला**—स्त्री. अने. (महानु.) स्त्रिया. 'बाइलांची खितिखीति न मिटे.' -उच २७८. [ बाईल पहा ]

**बाऊल**—पु. एक हिंस्र पशु.

**बांगड**—पु बांगड्या विकणारा; बांगडी कासार. -ज्ञाको (क) ४३.

**बागडा**—वि. (महानु.) शेलका; वेंचकः उत्कृष्ट. 'बारारी घोड्यामधीः बागडा ब्रह्मचारीः उत्तरें केली स्वारी; वेडाबागडाः' -ओवी.

**बागणें**—अक्रि. (व.) वांकणें; खालीं लोंबणें; नम्र होणें. 'पाणी वरून पडतें । तूर बारावर आली । बागल्या फांद्या खालीं।' -वलो २१. [ सं. वक्र ]

**बागला**—पु. एक गलबताचा प्रकार.

**बागवान**—पु. एक मुसलमानांची जात (बाटलेली). -के ३.६.१९४१.

**बागाठी**—स्त्री. बकोटी; बाहुवटी; दोन्ही खांद्यांपासून हात. 'टवकारिला पर्णकुटी । उचलोनिया बागाठी ।' -भारा. बाल २२९.

**बांगी**—पु. बांग देणारा; मुसलमानांस निमाजासाठीं मशिदींत हांक मारणारा; पुकारा करणारा.

**बागे**—क्रिवि. (महानु.) योगानें; मुळें. 'विधीचेनि बागेः' -प्रसादसे. 'तयाचेनि विधि बागे तर कार्यांचि पुरतेंः' -आचारभाष्य १४.

**बाचुकणें**—अक्रि. भिणें; घाबरणें. 'ही थोडी करडी समज कानीं पडतांच तीं बिभिस्ती माणसें बाचुकलीं?' -उपेअंत ३१. [ बाचकणें; बिचकणें ]

**बाच्छागर्दी**—स्त्री. पातशहा गर्दी पहा. अराजक; बंडाळी; राज्यक्रांति; अंदाधुंदी. 'परंतु बाच्छागर्दी कोणास कोणी पुसेना.' -बोधले बखर. -मसाप ३.३५१.

**बाज**—क्रिवि. पुन्हां; फिरून. ०**खाणें**-झोके खाणें; पलटी खाणें; हिसके खाणें. 'चहूंकडील राजकारणें येऊन बाज खात आहेतच.' -पेद ३८.१३५. [ फा. बाझ ]

**बाज**—स्त्री. तबला, सारंगी वगैरे वाजविण्याची पद्धत, सारणी.

**बाजागारी**—स्त्री. लबाडी; धूर्तता. बाजिंदगिरि पहा. ' ऐसा बाजागारी हुन्नर बंदी करून चुकवितो. '-रा १५.५५.

**बाजार धारणा**—पु. बाजारभाव; बाजाराचें धोरण. ' धान्यादि वस्तूंची बाजार धारणा पूर्वी इतकी अजून वाढलेली नाहीं. '-के १५.८.१९४१.

**बाजिंदगिरी**—स्त्री. लबाडी; फसवणूक; धूर्तता. ' बाजिंदगिरी करून गेले. परंतु पाठीलाग लवकर जाला. सांपडणें न सांपडणें ईश्वरी इच्छा. ' -पेद ३७.७७. [ बाजिंद पहा. ]

**बाजिंदी**—स्त्री. लाचारी; दीनपणा. ' सेवकहि या दिवसांत यासी बाजिंदी फार करितो. ' -पेद १०.९५. [ बाजीद पहा ]

**बाजीकार**—वि. कारस्थानी; घालमेल करणारा; मुत्सद्दी. 'नबाबा जवळ बाजीकार प्रस्तुत मोरोपंत आहेत. '-पेद २८.२८. [ बाजी पहा ]

**बाजेबाजे**—क्रिवि. निरनिराळे; पृथक् पृथक्; मधून मधून; वेगवेगळया ठिकाणीं. ' लोकानी घोडे बाजे बाजे घातले, परंतु हत्यार लागले नाही. ' -पेद १.२. [ फा. बअझि ]

**बाजवाला**—पु. वाद्य वाजविणारा. [ वाजा ]

**बाझ**—खेळणारा. -मुधो. [ अर. ]

**बाट**—पु. संच; गंज.

**बाटिला**—पु. बतेला पाहा.

**बांड**—वि. वांझ; दाणे न भरलेलें ( कणिस ).

**बाडबिस्तरा**—पु. सामानसुमान.

**बाडवैद्य**—पु. वैद्यकीचें पद्धतशीर व शास्त्रीय शिक्षण न घेतां केवळ जुनें बाड पाहून त्यावरून औषध देणारा ( अशिक्षित ) वैद्य. [ बाड+वैद्य ]

**बाणकोट**—पु ( व. ) गलबताचा एक प्रकार ( बाणकोट येथील ).

**बाणी**—स्त्री.(हिंदी.) स्तुतिपर कवन;गीत.' वधुवरांकडील मान्यांस ठाकरानें उच्च स्वरानें आहेर करणाऱ्याच्या नांवाचा त्याच्या देणगीसह उच्चार करून आहेर करण्याची चाल आहे. या वेळीं ठाकर हिंदुस्थानी भाषेंत रामकृष्णादिकांच्या बाण्या म्हणत असतो. ' -भात्रै ९४.८.

**बाणी**—स्त्री. ( व. ) प्रकार; तऱ्हा.' आतां आपण मास्तर बाणी खेळूं. ' [ बाण ]

**बाद, बादगड**—वि. निरुपयोगी; नित्याच्या व्यवहारास न लागणारें; अडगळीचें.

**बांद**—स्त्री. बंदोबस्त; घटना; घडण. ' ते तुम्ही येकरूप जालियाणे कामाची बांद येथास्थित होईल. ' -पेद २४.२६१. [ सं. बन्ध् ]

**बांदन**—न. जघन. -मसाप ४५.६.

**बादशाह**—पु. खंजीराचा एक पवित्रा. -प्रश १८.

**बांदाबुंदी**—स्त्री.पावसाची भुरभूर. [ बिंदु ]

**बादी**—स्त्री. वस्त्राची दशी. -मसाप ४५.६.

**बांदी**—स्त्री. बंदा; वृंक्षादनी; जीवंतिका; एक वनस्पति. बांडगूळ. -मसाप ४५ ३.

**बाधअवई**—स्त्री. बाजारगप्प; गटार बातमी; केवळ ऐकीव व अर्धवट माहिती. बाधावाई पहा. ' केवल बाधअवईचे वर्तमान सेवेसी काय ल्याहावें. '-पेद २५.११७. [ सं. बाधा+ फा. आवई पहा ]

**बांधरा**—पु. बांधः धक्का; मोर्चा. ' कीं भीमकिये सारखिये धुर । कुसुम बाणांचें हाथियेर गोरें । तया बांधले बांधरे । मदनें मेळैनि पैं ॥ ' -नरुस्व ५२४. [ सं. बंध् ]

**बांधवडी**—स्त्री. बंधन; कैद. ' सुटेल तेव्हांची बांधवडी । ' -भारा बाल ३.३३५; ५.१९. [ सं. बन्ध् ]

**बाधा**—पु. गुजरायेंत विवाह करूनहि स्त्रीसमागम वर्ज करून राहण्याचा एक प्रकार.

**बाधावाई**—वि. अफवाई, वाऱ्यावर आलेली उडतउडत (बातमी ). ' परभारे इकडे मनस्वी बाधावाई खबऱ्या आल्या कीं, सिंदे, होळकर याणी श्रीमंताचें लक्ष्य सोडून तिकडे मिळाले. ' -रा १९.१२५. बाधअवई पहा.

**बांधोळी**—स्त्री. लहान बांध. -चित्रकृषि २.५. [ बांध ]

**बाध्यस्त**—वि. जबाबदार.

**बानगी**—स्त्री. बानगी; भवानी; दुकान उघडल्याबरोबर प्रथम होणारी विक्री, व्यवहार. [ सं. भवानी+गी ]

**बाप्पा**—पु. १ बाबा; पिता २ वडील मनुष्य; आदरणीय व्यक्ति, देवता वगैरेस उद्देशून वापरतात. उदा. देवबाप्पा; बाप्पा मोरया. [बाप-बाबा ]

**बाबडा**—वि. ( व. ) निष्फळ; निकामी. ' योग्य पथ्य न पाळल्यामुळें आमचा विंचवाचा मंत्र बाबडा झाला.' [ बापडा. बावडा ? ]

**बाबती**—स्त्री. एक मराठेशाहींतील कर ' सरदेशमुखीचा ऐवज वजा जाता राहिलें तें स्वराज्य. त्यापैकी शेकडा २५ रुपये बाबतीचा अमल होय. हा विभाग गादीच्या मालकीचा. ' -भारतवर्ष नानाफ प. इ. ७ टीप.

**बाबतीवाला**—वि. वतनदार; हक्कदार. 'त्यांच्या कमकुवतपणामुळें यांचा वगैरे मनस्वी उपसर्ग गांवास लागला.'

**बाबरी**—स्त्री. अजवला; पर्णास वृक्ष.

**बाबागाडी**—स्त्री. लहान मुलांस आंत बसवून फिरावयास न्यावयाची गाडी. [बाबा=लहान मूल+गाडी]

**बाबाशाही**—वि. बडोद्यास प्रचलित असलेलें (नाणें).

**बाबु**—पु. १ बंगाली पुरुष. २ कारकून. उत्तर हिंदुस्थानांत बाबू हें सन्मानार्थक उपपद आहे. हे बाबू लोक इंग्रजींत कारकून नेमले तेव्हां त्या पेषाचा वाचक शब्द बनला.

**बाबेलचा मनोरा**—पु. बाबेल (बाबिलोन) शहरीं बांधण्यांत येणारा एक मोठा मनोरा. हा होऊं नये म्हणून परमेश्वरानें येथील कामगारांच्या भाषाबाहुल्यानें घडवून आणलेल्या गोंधळानें अर्धवट पडला, अशी बायबलमध्यें गोष्ट आहे यावरून गोंधळाची स्थिति; अर्धवट अवस्था; बजबजपुरी.

**बामणी कावा**—चातुर्यानें केलेली लबाडी. ब्राह्मण हे हुशार असतात व त्यामुळें आपल्या बुद्धीनें कारस्थानें करून दुसऱ्यास फसवतात अशी समजूत ब्राह्मणेतरांची आहे तीस अनसरून.

**बामणी कासोटा**—पु. निऱ्या करून घातलेला सैल कासोटा. घट्ट कांचा मारलेला नव्हे असा. पोकळ कासोटा. गबाळपणा, दुर्बलपणा याचा द्योतक.

**बायद्**—क्रि. जरूर आहे. -मुधो [अर.]

**बाया**—स्त्री. (कों.) बाई; बहीण. बहिणीस बाया, बायो म्हणून हांक मारतात. बायक्या; असाहि शब्द आहे. श्रीमती आनंदीबाई कर्वे यांस बाया असें नांव रूढ आहे. 'बाया लेंक मागें आली । तिला साकशी रहाहो ।' -भंडारी लग्नांतील गाणें. -मसाप ५.१५९.

**बार**—स्त्री. परवानगी. 'बार पुसल्या खेरीज हे किन्हीस गेले आहेत.' -पेद ६.११. [फा.]

**बारखळी**—स्त्री. इनाम, बक्षीस वगैरे रूपानें दिलेली जमीन. या जमिनीवर कर माफ असतो. बडोद्यास बारखळी दप्तर म्हणून जुन्या दप्तराचा एक भाग आहे.

**बारजा**—पु. एक प्रकारचें गलबत.

**बारडी**—स्त्री. एक जातीचें गवत. -चित्रकृषि २५.

**बारदान**—न. (ल.) भांडवल; कार्याचा पसारा; मालमत्ता वगैरे. 'त्या व्यापाऱ्याचें बारदान फार मोठें आहे.'

**बारदानी**—वि. माल वाहणारी. 'नेरळहून बैलगाड्या मिळतात पण त्या बिन छपराच्या व बारदानी असतात.'

**बारयाब**—पु. ओझें वाहणारा. -मुधो. [अर.] **बारयाबान**-वि. ओझें वाहणारे.

**बारयाब, बारेयाब**—वि. प्रवेश मिळालेला; सन्मुख; समोर; सामोरें; दरबारप्रविष्ट; पेशीमध्यें असलेला; दरबारीं हजर. 'खोजे आवदूल वाहा दरबान बारेयाब जाले.' 'समसामुदौला बारेयाब जाले' -पेद ८.१२३. 'मीरमुक्तदाखान व मुस्तेदखान बारेयाब जाले.' -पेद २५.१७५. बार्याब पहा.

**बारा टक्क्याचा दुष्काळ**—पु. भयंकर दुष्काळ. प्रत्येक गोष्ट बारा टक्क्या खेरीज मिळत नाहींशी होणें. बारा टक्क्यास पायलीप्रमाणें धान्य महाग होणें. पांचावर धारण याप्रमाणें. 'बारा टक्क्याचा दुष्काळ पडला. माणसास अन्न खावयास मिळेना, माणसें मेली.' -सनदा १४८.

**बारिणी**—स्त्री. छत्र धरणारी. 'सर्वे कर्पूरिका हडपिणी। चंद्रिका चवरढाळिनी। सिरगिरी धरी बारिणी। मयूरिका॥' -नरुस्व १०२. [सं. वारणम्]

**बारी**—पु. चवरी वारणारा; चामरधर. 'इंद्र बारी चंद्र छत्रधारी। यम पाणी वाहे घरीं।' -भारा. अयो. ३.५.

**बारी**—स्त्री. पाळी; रांग; मनुष्यांचा मोठा जमाव झाला असतां एक एकानें रांगेंत जाण्याची पद्धत (देवदर्शनासाठीं, स्टेशन वगैरेवर). इं. क्यू. [बारी-वारी]

**बारीदार, बारेकरणी**—पुस्त्री. पाळीचे नोकर; निरनिराळ्या ठराविक वेळीं काम करणारे नोकर. 'हलकी माणसे बारेकरणी व बारीदार वगैरे यांच्या तोंडीं बिलकूल लागूं नये.' -नागपूरकर भोसले यांच्या संबंधाचें कागदपत्र १२. 'अशाच क्रमानें चाकरीच्या बायकोनें अगर बारीदारें हुजऱ्या असेल त्यानें वेळेवर आणून मातुश्रीजवळ पाजण्यास द्यावें.' -प्रतिआरम १७१.

**बारे**—न. रेतीचा बांध; वाळूचा दांडा. 'अफाट जीवन सागर खवळे फुटती बाऱ्यावरी लहरी गर्जुनि।' -नवजीवन आक्टो १९३८.१०.

**बार्हा**—क्रिवि. रीतीप्रमाणें; पद्धतीप्रमाणें. 'त्यात एक तर यांचे बोलण्यांत भाव असा पडला कीं पेशजीपासून या दौलतींत मुसदी वागणार मोंगलाईकडील व श्रीमंताकडील बार्हा मोंगलाची दौलत या सरकारचे कह्यांत आली असतां नबाब यांची मर्यादाच केली.' -पेद ४१.१६२. [ब+रहा=रीती, राह]

**बालकाठी**—स्त्री. लहान मुलांकरितां हातांत अडीच फूट लांब काठी धरून करावयाची कवायत व व्यायाम. -व्याज्ञा ४.४१९.

**बालदिन**—पु. गांवांतील शाळांतील लहान मुलें एकत्र आणून करावयाच्या समारंभाचा दिवस व तो समारंभ. हा

समारंभ १५ जानेवारी या दिवशीं करण्याची प्रथा पुणें येथें आहे. [ बाल+दिन ]

**बालनाइकी**—स्त्री. बालसत्ता; बालराज्य; मुलांच्या हातीं कारभार. (ल.) अंदाधुंदीचा कारभार. ' बालनाइकी, स्त्रीनाईकी जाहली ' -हिंद १८०. ' अनायके न वस्तव्यं न वसेद्बहुनायके। स्त्रीनायके न वस्तव्यं न वसेद्बालनायके ॥ ' -सुर १५४.३६.

**बालपरवर्षी**—स्त्री. मुलाचें पोषण; लढाईंत पडलेल्या मनुष्याच्या मुलाच्या संरक्षणास खर्च कांहीं रोख अथवा जमीन वगैरे देत असत त्यास म्हणत. -भारतवर्ष, मराठ्यांचें दप्तर १५.

**बालवीर**—पु. स्वदेश, स्वप्रभु व परमेश्वर यांस एकनिष्ठ राहून लोकोपकारक कृत्यें करण्याची प्रतिज्ञा घेतलेला बालक. बालवीर संस्थेचा सभासद. ही चळवळ बेडन पावेल यानें बोअर युद्धाच्या वेळीं काढली. [ इं. बॉय स्काउट ]

**बालादस्त**—वि. उंच. ' किले यास बिंडे दोन आहेत. येक उत्तरेकडील उंच बालादस्त आहे. ' -पेद २५.६६. [ फा. बाला पहा. ]

**बालाबंद**—पु. एक पट्टा (बहुधा शिरोवस्त्रावर बांधावयाचा). ' दुषाला, दुपटा, कमरबंद, बालाबंद ' -मदरु २. ११८. [ फा. बाला=उंच+बंद=पट्टा ]

**बालाहिसार**—पु. बालेकिल्ला; सर्वांत उंच असा किल्ल्याचा भाग. ' इतर इमारतीचे पडित भाग सर्वत्र पसरले आहेत फक्त बालाहिसार मात्र अद्यापि टिकला आहे. ' -ज्ञाको (ग) २३७.

**बालिंगा**—पु. लठ्ठ मेंढा; लहान मेंढा; पोसलेला मेंढा. ' धनगराचा कळप बिगर परवाना गांवांत चरणीस आला कीं पांढऱ्या ठिपक्यांचा ओव्हरकोट घातलेला वालिंगा मेंढवाड्यांत त्या दिवशीं परत जात नसे. ' -पाणकळा १२.

**बालिची**—स्त्री. (व.) एक प्रकारची साडी. ' बंधु बोलवण करी। गंगासागर बालिची। बसे चाव्याच्या दुकानीं। हिंडे पेठ नगरीची॥ ' -वलो ५०.

**बालेखणी**—स्त्री. सज्जा. इं. बाल्कनी.

**बालेभोक, बालभोक**—पु. लांब मानेचा, बारीक पायांचा, फिकट काळ्या पंखाचा, नदीकांठीं आढळणारा कोंकणांतील एक पक्षी. -ज्योत्स्ना आक्टो १९३८.

**बालोद्यान शिक्षणपद्धति**—स्त्री. बालस्वभावास अनुसरून असलेल्या गोष्टींचा उपयोग करून खेळत खेळत मुलांस शिकविण्याची पद्धत. ही फ्रोबेल यानें काढली. इं. किंडरगार्टन.

**बांवची**—स्त्री. कालमेषी;पूतिफली; एक वनस्पति.-मसाप ४५.३.

**बावजबुन**—पु. वादळ; सोसाट्याचा वारा; झंझावात ' दीन गाईब जाला. बावजबुन सुटला. गरद बहुत उठला. ' -रा १.२५. [ फा. बाव+जबुन; हिब्रू बाळझबूब ? इं. बीएलझबब ? ]

**बावराव**—पु. बोभाटा. [ बभ्रा ]

**बावली देणें**—बाहुली देणें पहा. थापा मारून अपकृत्यास प्रवृत्त करणें; ठकविणें; फसविणें; दुष्कृत्यास उद्युक्त करणें. ' अलीज्याह यास बावली देऊन सदाशिव रड्डी घेऊन गेला. ही गोष्ट नालायक केली. ' -रा ५.७९.

**बाशद**—क्रि. व्हावें; असावें. -मुधो. [ अर. ]

**बाष्कीळ**—वि. अनिष्ट; प्रतिकूल; दोषयुक्त; चुकीचें. बाष्कळ पहा. ' नर जोशियाची नात लालपाणीहून आणिली होती. ती मुळाची म्हणून बाष्कील निघाली यामुळें फिरावली. ' -रा ६. पृ ९९. [ सं. बाष्कल ]

**बासतरंग**—पु. एक वाद्य; बांबूच्या नळ्यांचें वाद्य.

**बासिक**—वि. उंच. -मुधो. [ अर. ]

**बाहादारी**—स्त्री. बाहीदारी पहा. हमी; जिम्मा;पाठिंबा; पुरस्कार. ' येविशी इंग्रज सरकारची बाहादरी तुम्हांस आहे ती सरकारांत मंजूर आहे. ' -भारतवर्ष महा मंड. बखर १६.

**बाहिर**—वि. व्यक्त. -मुधो. [ अर. ]

**बाहिरा**—पु. १ (लाठी.) प्रतिपक्षाच्या उजव्या कानशिलावर मार. -मावि ९.१५. २ फरी गदक्याचा कानशिलावरील वार -व्याज्ञा ४.२८४.

**बाहिरो**—पु. (खा.) धनगराचा लग्नविधी. -संशोधन, ऐलेच पृ २६८.

**बाहीर, बाहेर**—स्त्री. सैन्याबरोबरचे बिनलढाऊ लोक, बुणग्यांसारखे सैन्याबरोबरचे लोक. ' बाहीरीचे लोक जाधवा मागें जात होत. त्याचे मागें स्वार पाठवून बाहेर माघारे फिरंविली. ' -पेद २५ ८८. बाहिर, बाहीरबुणगें पहा.

**बाहीरवास**—न. उपवस्त्र; अंगावर पांघरण्याचें वस्त्र. ' बाहीरवासोत्तम " -प्रमा ९. [ सं. बहिः+वासस् ]

**बाहे**—पु. परस्परांच्या दंडांस धरून ढकलण्याचा व्यापार. -व्याज्ञा ४.१०७.

**बाहे**—स्त्री. बाजू; पक्ष. ' आपण बाहे धरली आहे तों सर्वयथास्थित आहे. ' -भारतवर्ष पत्रें यादी १०२. [ बाही ]

**बाहे**—क्रिवि. बाजूनें; तर्फे. ' मज आपले बाहे देशमूख देसकुळकर्णी मजकूर यांनीं इलतमस केली की पटेल मजकूर थोराताचे चाकर होता खरे. ' -पेद ७.१४.

**बाहेरचा पाय**—पु. नित्य प्रवास.

**बाहेरपण**—न. विटाळसपण; अस्पर्श अवस्था. -ज्ञाआ.

**बाहेरवटा**—वि. वाटमाऱ्या; लुटारू; दरोडेखोर. 'पूर्वी कोणावर जुलूम होऊन अन्यायानें त्याचें वित्तहरण झालें अथवा राजानें कोणाची वृत्ति किंवा अधिकार काढून घेतला म्हणजे ज्याच्या संबंधानें असा अन्याय झाला असेल त्यानें आपला गांव सोडून त्याच्या आसपास कोठेंतरी लपून राहावें व संधि सांपडेल तेव्हां गांवांत येऊन आपल्या पक्षाच्या लोकांच्या मदतीनें दंगा व लूटफाट करावी असा पूर्वी संप्रदाय होता. वर उल्लेखिलेली कृति करणाराला बाहेरवटया (बंडवाला) म्हणण्याचा परिपाठ असे.' 'बादशहाचा हा जुलूम सहन न होऊन व रोजी व जेडोजी या दोघांनीं बंड करून ते बाहेरवटे झाले.' -सुदेइ पृ १२९. बहारवाटिया पहा.

**बाह्यांगीं**—क्रिवि. वरवर; वरपांगीं.

**बाळंतें**—न १ लहान मुलांचें चिरगूट. २ (ल.) पोरचेष्टा; चाळे. 'त्या बुड्या बाळाचीं बाळंतीं अजून सुटलीं नाहींत.' -विकारविल ४९.

**बाळाणें**—न. खिडकी; झरोका. 'कैसीं गवाक्षें खणोखणीं। तैसीचिं विचित्रें बाळाणीं। तेथ विराजे ते राणी। श्रीमंताची॥' -नरुस्व ४१९.

**बाळाणें, बाळी**—स्त्री. (व) एक जातीचें लुगडें. 'पहिल्यानं आलं न्हाणं। फेडा हौस पुरी बाई। आणा बाळी पुणे शाई।' -वलो १२१; 'कीं बहु बालाणां नटली।' -नरुस्व ४१८.

**बिंगळी**—स्त्री. (ठाकरी.) एक चवळी एवढें (आंबट) फळ.

**बिंगे-गा**—वि. वांकडें; वर्मी झोंबणारें (भाषण इ.). [सं. व्यंग]

**बिघोटी**—स्त्री. बिघ्याच्या उत्पन्नावरील आकारणी. [बिघा]

**बिछाद**—स्त्री. बिछायत पहा. असामी; मालमत्ता. 'लहान थोर कुल बिछाद तीन चार आहेत.' -पेद १५.२५. [फा.]

**बिछाली**—स्त्री. बिछाना; आंथरूण. 'जनावरांच्या खालीं पालापाचोळा वगैरे पसरून बिछाली करावी.' -ज्ञाको (द) ११४. [बिछावणें]

**बिजली बत्ती**—स्त्री. विजेचा दिवा.

**बिट्टी**—स्त्री. वेठ; बिगार. [सं. विष्टि]

**बिडरपणें**—क्रिवि. छातीठोकपणें; निर्भयपणें. [बि=विना+डर+भीति]

**बिडलोण**—बिडलवण पहा.

**बिडें**—शेतें.

**बिढरी**—पु. बिऱ्हाडी; भाडेकरी; भाडूत. 'आपला कसबा घरठाव पुरातन आहे त्यास रामभट सफरे बिढरी ठेविले होते ते हाली कथला करितात.' -रा २१.४.

**बिदव**—पु. आरंभ. -मुधो. [अर.]

**बिंदाण, बिंदाणें**—न. दोन गांवाची हद्द. 'खोर मुपे बिदाण थोटवड तरडादेवीचा त्रिशूळ दाखविला.' -रा १८.४. 'यादी बिंदाणे सिवेची मौजे पीसोई ताा कऱ्हे पठार व मालशिरस दोही गावीची बिंदाणे बितपशील.' -रा १८१.

**बिदानंद**—क्रि. जाणावें. -मुधो. [अर.]

**बिनचूक**—क्रिवि न चुकतां; अचूक; नेमकें; बरोबर. [विना+चूक]

**बिनटीक**—वि टीप दिल्याशिवाय; विवेचन केल्याशिवाय; स्पष्टीकरण न करतां. 'बुद्धिमानांनीं सामान्य बुद्धीस सुद्धां कधींहि न पटण्यासारख्या गोष्टी आपल्या ग्रंथांत बिनटीक व भाबडेपणानें कां लिहाव्या?' -परशुराम चरित्र.

**बिनपगारी**—वि. पगार न मिळतां; अवेतन (रजा वगैरे).

**बिनबोभाट**—क्रिवि. आरडओरड न करतां; गाजावाजा, बोभाटा न करतां; निमूटपणें.

**बिनाअन अलैह**—म्हणून. -मुधो. [अर.]

**बिनोली**—स्त्री. सरकी.

**बिपट्या**—वि. (व.) बिबट्या; ठिपके असलेला. 'बाई वाघिणी गे! तुझा सांभाळ बिपट्या वाघ। माहापारधी नेणता। गेला कालवडी माग॥' -वलो ५१. [बिबट]

**बिंबग्राही**—वि. अल्प; मर्यादित. 'दैनिक वर्तमानपत्राचे संपादक म्हणजे बिंबग्राही मानवी बुद्धि आणि विद्युत् वेगानें धांवणारा काळ यांमधील चुरस.' -मीआले.

**बिभिस्त**—वि. भित्रा. 'तीं बिभिस्त माणसें बाचकलीं.' उपअंत ३१ [सं. भी-बिभी]

**बिभीषा**—स्त्री. भीति; धाक. 'त्याजवरून बिभीषा जाली कीं हे पाठलाग करून तलावर राहिले रात्रीं दगा करतील.' -पेद २६.१५१. [सं. भी=भिणें]

**बियाळ**—वि बेंबिळ; वेडेवांकडे; बोबडे; निरर्थक. 'तैसे देवाचां गुणीं बिसंवतां। मी बियाळ बोलें उसणतां। भावो वोळखावा श्रोतां। प्रेमगर्भ॥' -नरुस्व ३७. [धा]

**बिरंजी**—स्त्री. मुसलमानांतील एक पक्वान्न (साखरभाताप्रमाणें).

**बिरद बांधणें**—(कुण.) हातांत किंवा गळ्यांत दोरा बांधणें; गंडा बांधणें. [बिरुद; ब्रीद]

**बिरमदेव**—पु. ( कुण. ) ब्रह्मदेव. [ सं. ब्रह्मदेव ]

**बिरमुटा**—पु. मुलगा. 'त्या बिरमुटयाचे शब्द मला झणझणले.' –वेटिंगरूम.

**बिराडू**—पु. भाडेकरी; बिन्हाड करून राहणारा; भाडूत. 'कसब्यांत वाडयांत बिराडू ठेविले होते त्यांचे हातुन आग लागली.' –रा २०.२८९. [ बिन्हाड पहा ]

**बिन्हा**—पु. एक जातीचें फळझाड. याची लागवड सातारा जिल्ह्यांत होतें. इं. Quinee. –के २६.३.१९३७.

**बिलइख्तिसास**—विशेषतः. –मुधो. [ अर. ]

**बिलंगर**—वि. नांगर टाकलेलें; नांगरलेलें. 'हे बारा जहाजे बिलंगर करून देवणापाटणा समीप राहिले.' –पेद २८. ८७. [ बि+लंगर=नांगर, सांखळी ]

**बिलफैल**—क्रिवि. खरोखरीच; प्रत्यक्ष. 'बिलफैल सुभेदार नाईक याचा शोध लाऊन तंबी करतात.' –रा ७.११३. [ अर. बिलफील ]

**बिल्वदळ**—न. बेलाचें पान. [ सं. बिल्व+दल ]

**बिसगपरिया**—स्त्री. कुई. –मसाप ४५.५.

**बिसालतपन्हा**—पु. स्नेही. 'सिद्धी मशारनिल्हे आरमार देखील येत असतील तर त्यास मुंबईस नेऊन आपणाजवळ ठेऊन बिसालतपन्हा सिदीसाद यांस मोहिबी कलमी करावे.' –पेद ३.५ अ. [ फा. ]

**बीज**—स्त्री. बीजक पहा. माल पुरविलेला असेल त्याची किंमत यादी; पट्टी. 'पो मा।री गोसावी याची सावुकारी बीज नगदी वगैरे येणें आहे.' –रा १०.५९८.

**बीजखवाई**—स्त्री. बियाकरितां व खाण्याकरितां धान्य, दाणा दुणा वगैरे. 'याची लावणी व्हावी या निमित्य बीजखवाई देऊन लावणी केली.' –पेद २९.२१५. [बीज+खाणें]

**बीजाकार**—पु. बीजोत्पन्न; उद्भवलेला. 'विसाजीपंताचें होळकर सुद्धां डोकें कापून गडास पाठवीन तर राणोजी शिंद्याचा बीजाकार.' –पेद ५.८५. [ सं. बीज+आकार किंवा बीज+अंकुर ]

**बीजाचा**—वि. अवलादीचा; रक्ताचा; वीर्याचा; औरस. [ बीज ]

**बीड**—पु. १ एकाच वेळीं केलेला फळांचा तोडा. २ फळांची तोड करण्याची वेळ, पाळी.

**बीद**—पु. बेत; जम; सख्य; बस्तान; घडी. 'आम्हास कळेल त्याप्रमाणें तुमचा त्याचा बीद बसवून देऊं ऐसें सांगितलें.' –पेद ६.१६३. [ बीत पहा. ]

**बीनाई**—पाहणें. –मुधो. [ अर. ]

**बीबिर**—पु. एक हिंस्र पशु. 'हेला मागून मारून त्याची एक टांग वाघानें नेली आहे. बीबिर असतो तो पुढून मारतो.' –पुरुषार्थ नोव्हे. ३९.१११. [ बिबट ? ]

**बीरमाल**—पु. पवाडा; शौर्यगीत; पराक्रमगीत. 'बीरमाल राजाचा गाइला।' –ऐपो २२. [ हिं. सं. वीर+माला ]

**बीशुमार**—वि. अगणित. –मुधो. [ अर. ]

**बीस्त**—वि. वीस. –मुधो. [ अर. ]

**बुआड**—स्त्री. बोबडी. 'एके एके स्थळीं चौऱ्याशी लक्ष वेडी। सांगता बुआड वळी।' –योसं २०९. [ ? ]

**बुकिश नाटकें**—न. अव. इंग्रजी नाटकांच्या धर्तीवर रचलेलीं गद्य नाटकें. उदा. मनोरमा, तारा, रमा. हीं अव्वल इंग्रजीत रूढ झालीं. [ इं. बुकिश+नाटक ]

**बुक्काभेट**—स्त्री. रुखवताच्या वेळीं वरमातेचा वधूमातेकडून सन्मान होऊन त्यावेळीं बुक्का उधळला जातो त्यास म्हणतात. –लविसो १३३.

**बुक्का लावणें**—( पंढरपुरी. ) फसविणें; बनविणें; चाट लावणें.

**बुगडी**—स्त्री. कुलूप. 'दाराला बुगडी घालून बाहेर जा.'

**बुटी लावणें**—स्त्री. गुडघे टेकून खालीं वांकून पाण्यास तोंड लावणें. 'पळत पळत सारे जाऊ। पाणी बुटी लावून पिऊं।' –न्याहारी बाबामा ३.

**बुझर्ग**—पु. म्हातारा. –मुधो. [ अर. ] **बुझर्गान**–म्हातारे. [ बुझर्ग अव. ]

**बुडका**—पु. बुडखा पहा.

**बुडणें**—अक्रि. ( लाक्षणिक. ) संपणें; खलास होणें; आटोपणें. 'यावरून समजाविशीचा विचार परिछिन्न राहिला येैसे उभयपक्षीं जाले. दरबार बुडाला.' –पेद ११.३०.

**बुडती**—स्त्री. १ पूर. –सह्या ३०५. २ नुकसान; तोटा ( व्यापारांत ). [ बुडणें ]

**बुडतें कूळ**—न. पैसे वसूल न देणारें, पैसे बुडविणारें कूळ.

**बुण्णी**—स्त्री. ( कर्ना. ) लहान मुलाचें शिस्न.

**बुत्ती**—स्त्री. ( कर्ना. ) प्रवासांत बांधून देतात तो दह्यांत कालविलेला भात. [ सं. वृत्ति ? ] °**पुजा**–स्त्री. दहीभाताची; देवाची बांधलेली पूजा. [ सं. वृत्ति+पूजा ]

**बुदबुदाबादचे नवाब**—पु. खुशालचेंडू; ऐदी मनुष्य, पोकळ डौल दाखविणारा मनुष्य; ज्याचें स्थान बुडबुडयाप्रमाणें क्षणभंगुर किंवा अस्थिर, पोकळ आहे असा. 'आम्ही बुदबुदाबादचे नवाब बनून हातांत फुलांचे गजरे घालून हिंडलो असतों.' –महाविस्तार मार्च ४२. [ बुदबुद=बुडबुडा ]

**बुंदाळा**—पु. भांड्याला बुडाशीं बाहेरून दिलेलें राखेचें लेपण. -ज्ञाको ( ब ) १७.२८८. [ बुंध=तळ+आळें=लेपण ]

**बुद्दु**—वि. मठ्ठ; जड बुद्धीचा. ' असा बुद्दु गाढव मी नाहीं, समजलांत. ' -सख १००.

**बुध्दि गहाण ठेवणें**—समजत असूनहि अडाण्याप्रमाणें वागणें; प्रज्ञाहत असणें.

**बुध्दिचापल्य**—न. बुद्धीची तीव्रता; बुद्धीचें कौशल्य; बुद्धीचे निरनिराळे गुण प्रकट करण्याच्या इच्छेची अवस्था. -हाविमी २१४.

**बुध्दि चोरणें**—मतिभ्रंश करणें; गैरसमज करणें. ' त्यांनीं माझी बुध्य चोरली कीं गुराखी खेलायाचा किला आहे कांहीं मातबर नाहीं म्हणून हातरोखा केला. ' -पेद ६.५२.

**बुध्दिदौर्बल्य**—न. सुसंबद्ध ज्ञानपरामर्ष न होण्याची अवस्था; बुद्धिमांद्य. -हाविमी.

**बुध्दि पालटणें-फिरणें**—विचार बदलणें; विचार पालट होणें.

**बुध्दिवाद**—पु. १ चर्चा; विचारविनिमय; वादविवाद. ' डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं दोन्ही तुरुंगांत जाऊन बुद्धिवाद केला. ' -के १.८.१९३८. २ बुद्धिप्रामाण्यवाद. इं. रॅशनॅलिझम.

**बुध्दिस्वातंत्र्य**—न. स्वत:च्या बुद्धीस योग्य दिसेल तसें बोलण्याची व करण्याची मोकळीक.

**बुधाजी**—पु. वृद्धि. ' जिवाजी शेखदार बुधाजी कारकून परगणे शरीराबाद. ' -एकनाथ भज.

**बुरकाम**—न. वादळांत लावावयाचें शीड. -आंघइ ३७९.

**बुरकंत**—न. लहान शीड. -आंघइ ३७९.

**बुरजा**—पु. फजीती; बोजवारा. ' टिळक स्मारक मंदिरांत लपंडाव बोलपट व कादंबरी यांच्या चर्चेचा बुरजा वाजला. ' -वित्र १.९.१९४०.

**बुरडी**—स्त्री. नारळ, बेलफळ वगैरेचा डहु; गर काढून केलेलें पात्र.

**बुरडी बोलणें**—खोटें बोलणें.

**बुरणुस बुद्धि**—स्त्री. जडबुद्धि; मंदबुद्धि; जीर्णबुद्धि. ( बुरणुसांत खिळा खुपसून वर काढला तरी भोंक राहत नाहीं यावरून ). ' हा ठराव वाचल्यावर अगदीं बुरणुस बुद्धीच्या माणसाला कळेल. ' -के १९.१२.१९३९.

**बुरदबारी**—स्त्री. प्रौढता. ' लेंकूरपणाचा स्वभाव टाकून बुरदबारी अंगी ठेवावी. ' -नागपूरकर भोसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र १२. [फा. ]

**बुरदुल**—न. लहान तोंडाची बुरडी.

**बुर्द**—क्रि. वाहून नेलें. -मुधो. [ अर. बुर्द=नेणें ]

**बुर्दबारी**—स्त्री. धीर धरणें; नेट धरणें; दम धरणें; धीमेपणा; सबूरी. ' आपण थोर आहांत बुर्दबारीच करणें आपणांस योग्य, मीहि सेवेसी येऊन पावतों तोंवर उतावळी न करावी. ' -पेद २.१६. [ फा. बुर्द-बारी=धीर, सबूरी ]

**बुलबुलतरंग**—पु. एक वाद्य.

**बुलन्ददर्जेह**—वि. उच्च इयत्तेचा. -मुधो. [ अर. ]

**बुलभट्टी**—स्त्री. विटा भाजण्याकरितां जमिनींत केलेली भट्टी.

**बुलूंबुलूं**—क्रिवि. ( व. ) बोबडे बोल काढणें. ' तानें ग लेंकरूं । करतें हें बुलूंबुलूं । बोल त्याचे किती झलूं । ' -वलो ८७. [ ध्व. ]

**बुहारी**—वि. ( व. ) दुष्ट. ' पुरी नजर बुहारी । कोण्या पापिणीची बाई । तानी कोमावली माही । मिठाची झाली लाही । ' - वलो ८१. बोहरी पहा.

**बुळगें**—न. मेंढ्यांचें रायतें. हें बुळबुळीत असतें यावरून.

**बुळबुळ रडणें**—मुळूमुळू रडणें.

**बुळ्ळू**—स्त्री. लहान मुलाची लघवी. [ ध्व. ]

**बूज**—स्त्री. बुजण्याची, भिण्याची वृत्ति; भित्रेपणा. ' अशा रितीनें त्याची बूज मोडीत असत. ' -के ३.८.१९३७. [ बुजणें ]

**बूज**—स्त्री. तूर, मसूर, वाटाणा वगैरेचा पाला व सड यांची बुकणी. -चित्रकृषि २.७.

**बूद**—पु. ( कर्ना. ) धान्याची रास करून त्याजजवळ एक शेणाचें बाहुलें ( पांडव ) करून बसवितात त्यास म्हणतात. [ अर. बूत ? ]

**बूदन**—क्रि. होणें; असणें. -मुधो. [ अर. ]

**बूदन्द**—झालें. [ अर. ]

**बूदह अन्द**—झालेले आहेत. [ अर. ]

**बृहन्महाराष्ट्र**—पु. सलग मराठी भाषा प्रचलित असलेल्या प्रदेशापलीकडील पण महाराष्ट्रियांची वस्ती असलेला प्रदेश. [ सं. ]

**बेइस्तिकलाल**—वि. घाबरा; कमजोर; नेभळा. ' फौज आवाई खाऊन बेइस्तिकलाल झाली. ' -पेद २८.२८. [ फा. ]

**बेखल**—वि. निर्धास्तपणें; बिनहरकत; विना कटकट. ' चाकरीची सरबरा ठेवाल तों पावेतों जहागीर बेखल चालेल. ' -भारतवर्ष महाराष्ट्र मंडळाची बखर १६. [ बे+खळ ]

**बेखलश, बेखलस**—वि. बिनदिकत; बेअंदेशा; निखालस. ' पहिलेपासून दोस्ती बेखलश परन्तु अलीकडे चार वर्षांपासून व्यत्यय इंग्रजी कामगाराकडून येत चालले. ' -पेद

४२.४७. 'आजपर्यंत दोन्ही सरकारची दोस्त बेखलस चालली.' -पेद ४२.४७. [फा.]

**बेगडी**—स्त्री. मातीची घागर; घडा. 'गुर्जर स्त्रिया डोक्यावरून हात न लावतां तीन तीन बेगडी घेऊन रस्त्यानें बोलत जात असतात.' -शि आत्म ३२०.

**बेगलगष**—वि.क्रिवि. बिनतकार; कोणतीहि अडचण न येतां; बिनहरकत; विनाव्यत्यास. 'पावणे दोन लाख रुपये बेगलगष सरकारी अम्मल त्याप्रमाणें साल फडच्या व्हावा, ऐसा इनायतनामा झाल्यास घ्यावा.' -रा ५.१०५. [फा. बे+गलगष]

**बेगोंद**—वि. गोंद न लावलेली; न डकवलेलीं; न चिकटवलेलीं; बंद न केलेली. 'येकूण चार पत्रें खुलीं बेगोंद पाठविलीं आहेत.' -रा ७. खलप २.८.

**बेचकें**—न. नदीमुख प्रदेश; नदीच्या मुखाजवळील त्रिकोण प्रदेश. इं. डेल्टा. 'मुखाजवळ हिचें पात्र फार बेचकें सारखें वाटत आहे.' -ज्ञाको (प) १७.१८३.

**बेची करणें**—क्रि. विकणें; बेचन करणें; तबदील करणें. 'ठेवीच्या पावत्या दुसऱ्या कोणच्याहि नांवें बेची करतां येणार नाहींत.' [सं. व्यय; म. वेचणें]

**बेज्या**—वि. अनुचित; अयोग्य; अकालीन; फाजील; अन्यायी. 'कांहीं बेज्या हरकत त्यापासून अमलात आल्यावर श्रीमंत स्वामीस विनंती करूं' -पेद २०.९२. [फा. बेजाह]

**बेटाच्या(?)चें दर्णे**—न. आंग्रे यांनीं बांधून दिलेल्या गलबतावर बसविलेली भाड्यासारखी जकात. -आंघइ.

**बेंड**—पु (ल.) तगादा; लकडा. 'सावकाराचा बेंड मागें लागला आहे' [इं. बँड ?]

**बेडका बेडका पाय धर**—एक मुलींचा खेळ. -मखेपु २८१.

**बेडकी**—स्त्री. एक औषधी वनस्पति. हिचा पाला बहुमूत्रावर देतात.

**बेडा**—पु. १ बेहडा पहा 'त्याचे जातवार बेडे असत.' -शिआ ३००. २ लष्करी लोकांचें पथक; चौकी.

**बेडी**—स्त्री नौका; जलवाहन. 'तेथ तरिया तारवे दोणी प्रव्हाणें। नावा होडी बेडिया जंगे विस्तीर्णें। जयाचेनि न दीसति उंचपणें। मेघ अंतरालिचे॥' -नरुस्व ७२०.

**बेडी-बंदखाना**—पु. तुरुंग; कारागृह; कारावास. 'सरकार चाकरीबद्दल बेडी बंदखाना.' -मदरु २ १११. [बेडी+बंदीखाना]

**बेडूक उड्या**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १. ३५९.

**बेत**—पु. बैत पहा. दोहरा. -प्रश २९.

**बेतीन**—कोंकणी ख्रिश्चन लोक गळ्यांत कापडाचा चौकोनी तुकडा बांधतात तो. -महाशारदा सप्टें १९३६.१२.

**बेतू**—स्त्री. (सोनारी.) खणांची पेटी.

**बेंदर**—बेंदूर पहा. बेंदरी पौर्णिमा. (कर्ना.) कांहीं ठिकाणी ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा.

**बेदरीग**—वि. निष्ठुर. -मुधो. [अर.]

**बेफाट**—वि. अफाट; भयंकर; अतिशय मोठें; विस्तृत. 'भाऊजी लक्ष्मना। पोटी तुमच्या कपट। नोहे माहेरची वाट। बघत घावडणें बेफाट॥' -वलो ११. [बे+फाटणें]

**बेबूज**—वि. अज्ञान; अडाणी; निर्बुद्ध. 'परंतु लौकिकीं शिवाजीचा नातू खिजमतगारी करितो, तुझी अप्रतिष्ठा, मी बेबूज असें होऊन दोघांचा दुर्लौकिक होईल.' -शामब. भारतवर्ष १८. [बे+बूज=बुद्धि]

**बेमवसर**—वि. नादार; सामर्थ्यहीन; असमर्थ; नालायक. 'त्यास आपण बेमवसर दरबार खर्च करावयास टका मिळाला नाहीं.' -पेद ३१.१९. [अर. बे+मुवस्सल]

**बेरजा**—पु. बेभरंवसा; धास्ती; भय. 'सरकारचे सनदेस मानीत नाहीं यामुळें रयतीस बेरजा वाटतो. तेणें करून वस्ती कैसी होती?' -पेद २९.१०१. [बे+रजा]

**बेरा**—पु. पाभरीचें भोंक बुजणें. -चित्रकृषि २.७.

**बेरून**—बाहेरचें स्थान. -मुधो. [अर.]

**बेलचा**—पु. पावड्यासारखें हत्यार; विलायती पावडें; खोरें.

**बेलटें**—न. नारळ, बेलफळ यांतील गर काढून घेऊन केलेलें पात्र; बेलें.

**बेला**—पु. गोळा. 'उन्हाळ्यांत चिंचेचे बेले करून वाळवून ठेवावेत.'

**बेलाग**—वि. दुर्गम; दुःसाध्य; जाण्यास अवघड. 'रायगड किल्ला बेलाग आहे.' -मातीर्थ ४.८३. [बे+लाग]

**बेलुकांड**—न. बेलकडें; खेंकडा. 'तंव मार्गीं वन तें नवखंड। तेथोनि उसळलें बेलुकांड।' -भारा. बाल १.७३.

**बेलेपटी**—स्त्री. एक धर्मदाय स्वरूपाचा कर. बेलें पहा. 'त्यावरी तेच वख्ती बेलेपटीचे फर्मान सादर जाहाला.' -पेद ४९.३.

**बेल्या**—पु. एक वेल; म्हैस वेल -मसाप ४५.४.

**बेसराक**—पु. तरुण उंट.

**बेसरें**—न. बहिरी ससाणा. -सारुह ३.४७.

**बेहडा**—पु. अडचणीची जागा; उंचसखल जागा; खाचखळग्याची जागा. 'त्याजकडील माणसें बहुत मारली

गेलीं. तेव्हां पलोन नदीच्या बेहडांत गेला. ' -पेद २१.२९.; ' अंधारी रात्र बेहडाची जागा. शेवटी पलोन गेलो. ' -पेद २१.२९. ' वेत्रवतीचे कांठीं मोठमोठे बेहडे म्हणजे खांचा हजारों फौज राहील अशा पडलेल्या आहेत. ' माप्र ९४. बेहेडा पहा. [ हिंदी-बीहड. सं. विकट ? ]

**बेहेडाखतावणी**—स्त्री. प्रत्येक सालांत तयार करावयाचा महालवार व इसमवार आवर्जा. यांत सर्व रोख वसूल पोते जमा म्हणून तारीखवार जमा धरून वराता दिलेल्या रकमेचा तपशील खामुदगी सदरांत जमा असतो व सनदा व ताकीद पत्रें दफाते सदराखालीं बार असतात. -भारतवर्ष मराठ्यांचें दप्तर ११.

**बेहेडा नेमणूक**—पु. अजमास; मामलतदारास मामलत सांगितल्या वेळेस हुजुरचे मखलासीसुद्धां यावयाचा कागद. यांत एकंदर महालाचा आकार त्यापैकीं दुमाले गांव वगैरे वजा जातां बाकी निवळ जमेचा आकार यांतून मुशाहिरा शिबंदी खर्च देवस्थान, धर्मदाय वगैरे वजा करून निवळ रसद सरकारास कितो यावयाची याचा तपशील असे. -भारतवर्ष मराठ्यांचें दप्तर १३.

**बैठक मारणें**—( खा. ) अंगांत देव आणून घुमणें. हा भगतांचा धंदा असतो. -संशोधन ऐलेच २६०.

**बैतुलमल**—पु. कोषः द्रव्यनिधी.

**बैरागी**—स्त्री. अव. बैरखी; निशाणें; झेंडे. ' पुढें चालती बैरागी जरीपटका आघाडीला जी। ' -ऐपो २.२६२. [ मूळ-बैरक अप. अर. ]

**बोकड रासणें**—अक्रि. पाठारेप्रभु लग्नांत कुलस्वामिनीस बोकड अर्पण करतात त्यास म्हणतात.

**बोंकणें**—अक्रि. लिंपणें. ' तोंडावर कणकेचा गोळा ठेऊन बोंकुन टाकणें. ' -औसं.

**बोगारदुःख**—न. अंतःकरणापासून नसून वरवर केलेलें दुःखाचें प्रदर्शन.

**बोजवार**—पु. दारू गाळणारे बाटलेले मुसलमान दलाल. -के ३.६.१९४१.

**बोजा-झा**—पु. बंगाली चार मण वजनाचें ओझें.

**बोजेदार**—वि. भरदार; घोसदार. ' एखाद्या जंगली श्वापदाप्रमाणें खोल बोजेदार आवाजांतला भूः भूः असा त्या कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज कानीं आला म्हणजे. ' -फडके शाकुंतल १०. [ बोजा ]

**बोज्यां बारज्यां**—क्रिवि. निरर्थक; व्यर्थ. ' जागे जतन व्हावे स्वामींचे पदरीं असावे याकरितां ज्यांचें सांपडेल त्यांचे वित्त विषय घेऊन पोटास खाले व खर्चेले ते बोजां बारज्यां न म्हणता सर्व माफ करावें. ' -पेद १९.३२.

**बोझा**—पु. अर्क; रस ' इंद्रनिळाचेनि रावणें। बोझा काढविती चादिणें। कुमोदासि घालविति घालणें। विरह सूर्याचे॥ ' -नरुस्व ६०३. [ फा. बोजाह ]

**बोझारा**—पु इनाम; बक्षीस.

**बोटलणें**—अक्रि. बोटानें उकरणें; बोटानें खळगी करून त्यांत नाचणीचें रोप लावणें. आवटणें याच्याविरुद्ध. [ बोट ]

**बोटी**—स्त्री. गोळी. ' म्हाळसा काकींनीं सपिटाच्या चार बोट्या करून. ' [ बोटी=गोळी ]

**बोटोळा**—पु. ( व. ) बोटवा; गव्हला. (हे बोटानें वळून करतात यावरून). ' सेवया बोटोळयांनीं। उतरंड्या आगाशीं। भाऊ निघाला उपाशीं। ' -वलो ४७. [ बोट ]

**बोडण**—न. ( लाक्षणिक ) फजीति. बोडण पहा.

**बोंड विडा**—पु गोविंद विडा. बोंडाप्रमाणें वर आकार असतो यावरून. ' या समयीं वरास एक मोटा बोंडविडा चावावयास देतात. ' -लविसो.

**बोद**—स्त्री. दोन पोतीं एकत्र शिवून उभा केलेला लांबट थैला.

**बादा**—स्त्री. भिंत पुढें आल्यामुळें तीवर कांहीं वस्तु ठेवण्यास जागा होते ती.

**बोंदास**—पु. मासे पकडण्याचें जाळें. ' कुणब्याच्या बाळानं बोंदास केला तेव्हां बाळांनीं विचार केला तेव्हां बाळानीं मासा उचलला. ' -लिंबाचीं गाणीं. -मसाप १५.१६८.

**बोधभाषा**—स्त्री. शिक्षणाची माध्यम भाषा; ज्या भाषेंत शिक्षण देतात ती भाषा. इं. मीडियम.

**बोधे बरगे**—पु. अव. जाणतेनेणते; लहान मोठे. ' या वलणांत लोक असतील ते बोधेबरगे तमाम चांगले चांगले दोन चारसे आठाचौ रोजाचे अवकाशें पाठवावे. ' -पेद २६. ७६. [ सं. बुध-बोद्धा. बुजरुग-बुरगा. तुल० का. बुरगुंडा=मुलगा; गो. भुर्गा=मुलगा ]

**बोंब**—पु. बंब्या पहा. पोत्यांतील धान्य नमुन्यासाठीं काढावयाचें हत्यार.

**बोयाचें जाळें**—न. डोलीच्या जाळयासारखेंच खुंटांस बांधावयाचें मोठें मासेमारीचें जाळें.

**बोऱ्या(खजुरी)**—खजूर बांधून आलेलें शिंदीचें बारदान यावर निदान माशा तरी बसतात.

**बोऱ्या( बदाम )**—बदाम बांधून आलेलें बारदान. यावर माशाहि बसत नाहींत; याकरितां हा अधिक कंगाल, दरिद्री समजतात.

**बोर्स्टेल पध्दति**—स्त्री. अल्पवयीन गुन्हेगारास एक तऱ्हेच्या शाळेंत ठेऊन सुधारण्याची पद्धति. लहान मुलांचा शिक्षणयुक्त तुरुंगवास.

**बोर्स्टेल स्कूल**—अशा प्रकारची शाळा. लहान मुलांचा तुरुंग.

**बोलबाव्हलेपणा**—पु. बोलघेवडेपणा; वाचाळता. 'काशीनाथ तूं बोलबाव्हलेपणा करतां उपयोगी नाहीं.' –विजयजिगीषा २०१.

**बोलाई**—स्त्री. एक देवता.

**बोलाईची सागुती, -चें मांस**—स्त्रीन. १ बोलाईस अर्पण केलेली सागुती, मांस. २ फक्त बोकडाची सागुती, मांस. [ बकरीचें मांस निषिद्ध मानतात म्हणून फक्त बोकडाचेंच मांस विकण्याचीं स्वतंत्र दुकानें असतात. ]

**बोलाईचें दुकान**—न. फक्त बकऱ्याची सागुती विकण्याचें दुकान.

**बोलाऊं**—न. आमंत्रण; पाचारण; बोलावणें. 'यांत मागती रजपूत जाट एक वजिरानीं करावें ऐसा करार करून सर्वास बोलाऊं गेलीं, बहुधा सर्व येतील.' –पेद २१.५५. [ बोलावणें ]

**बोलूकाका**—पु. नुसता बडबडया मनुष्य; वावदूक मनुष्य. 'बोलूकाका मेळा काय करणार?' –धुला.

**बोवारीण, बोहारीण**—स्त्री. जुने कपडे, मोड, वगैरे घेऊन त्यावर सुया, गळेसर, बारीक सारीक भांडीं वगैरे देणाऱ्या फेरीवाल्या स्त्रिया. [ व्यवहारीण ]

**बोवाळ**—पु. लग्नकार्यादिकामुळें घरांत असणारी गडबड.

**बोहनड**—न. (अहिराणी.) बोणें; बोणें पहा. नैवेद्य. 'आसरांच्या या दहीभाताच्या नैवेद्याला बोहनड म्हणतात.' –अहिराणी भाषा व संस्कृति ४९. [ का. बोन=भात ]

**बोहेरी**—स्त्री. पट्टी; कर. 'येथें सरकारच्या हवेल्यांस फाटक बंदीची बोहेरी रयेत बरोबर लाविली. दरमहा सहा आणेप्रमाणें हवेलीस येणेंप्रमाणें देणें लागते.' –पेद ४३.६३.

**बोळा**—पु. गोळा; कापूस वगैरेचा लहानसा पिंड, गोळा. 'कापूस बाजारांत कापसाचे गाडीवर बोळेवाल्यांना बोळे वेचूं देऊं नयेत असें ठरविलें.' –सकाळ २५.११ १९३८.

**बौद्धिक गुलामगिरी-दास्य**—स्त्री. दुसऱ्याच्या मताप्रमाणें वागणें; दुसऱ्याच्या बुद्धीप्रमाणें वागणें; परप्रत्ययनेय अशी बुद्धीची अवस्था; स्वतंत्र प्रज्ञेचा अभाव. –के १४.७. १९३६.

**बौद्धिक गोत**—न. एकाच विचाराच्या लोकांचा गट. –के २५.९.१९३६.

**ब्रह्मकपाळ**—न. (खा.) फार मोठा आकार.

**ब्रह्मचारी**—पु. अविवाहित राहण्याचें व्रत घेतलेला. याचे प्रकार चार आहेतः उत्तर-आनंद, दक्षिण-चैतन्य, पूर्व-प्रकाश, पश्चिम-स्वरूप.

**ब्रह्मवाक्य**—ब्राह्मणाचे शब्द; सत्यवाचा; वठणारी वाणी. पुढें पाहा. 'ब्रह्मवाक्यं जनार्दनः'

**ब्रह्मवाचा, ब्रह्मवाणी**—स्त्री. (महानु.) अटळवाणी. 'ब्रह्मवाचा काई: अन्यथा जाईल.' [ सं. ]

**ब्रह्मसमाज, ब्रह्मोसमाज**—पु. बंगाल्यांतील हिंदूमधील एक धर्मसुधारक पंथ.

**ब्राहुई**—स्त्री. बलुचिस्थानांतील एक द्राविडी भाषा.

**ब्राह्मी**—स्त्री. एक अशोककालीन लिपि.

**ब्रीद**—स्त्री. बीत पहा. बीत; जम; बस्तान; बस; स्थिरता. 'दादासाा ही समाधान पावतील. पुढेंहि दिवसांदिवस आपली ब्रीद होईल ऐसेहि भाव आहे.' –रा १०.१०२.

---

## भ

**भ**—न. (फज्यो.) भवन; राशि.

**भकणें**—अकि. तोंडास येईल तें बडबडणें.

**भक्कड**—वि. नीरस; भिकार; क्षुद्र. 'खेडवळ शेतकऱ्याच्या कसणीनें येणाऱ्या भक्कड पिकापेक्षां पुष्कळ सरस निसत्वर निघूं लागलें.' –किर्लो. जून १९३६.

**भक्तगण, भक्तजन**—पु. भक्त लोक; भक्तांचा समुदाय.

**भक्तशिरोमणि, भक्तश्रेष्ठ**—पु. मुख्यभक्त; भक्तांतील प्रमुख.

**भगण**—पु. (छंदःशास्त्र.) एक तीन अक्षरांचा समूह. यांतील आद्य अक्षर गुरु असतें (रावण).

**भंगार**—स्त्री. चुरा; मोडतोड. 'जपानला अमेरिकेकडून लोखंडाची भंगार, पेट्रोल, इ. निर्गत होते.' –के ३०.१. १९४२. [ सं. भंग ]

**भगवा**—वि. ज्याचा रंग विटून गेला आहे असा (कपडा). म्ह० तगवी तिला भगवी.

**भगवान भात**—पु. गूळ घालून केलेला नारळी भात; गुजराथी वगैरे लोकांत शुभप्रसंगीं हा शकुनाचा म्हणून मुद्दाम करतात.' –खेस्व १११.

**भगळ**—स्त्री. जमिनीस पडलेली भेग. –चित्रकृषि २.५. [ भंग ]

**भंजक**—पु. उतारा (एखाद्या पदार्थावरील). [ सं. भज ]

**भजणूक**—स्त्री. भजणें; भक्ति करणें; आराधना; जोपासना. 'हत्यारमात्रांची भजणूक विद्या संपादून वरचेवर वर्धिष्णु करीत जावी।' -बावडा दप्तर १.९७.

**भजनमार्ग**—पु. भजनभक्तीचा संप्रदाय. परमेश्वराचें गुणगान; भजन रूपानें उपासना करण्याचा संप्रदाय. [सं.]

**भजनी भारुड**—न. भजनोपयोगी अनेक पद्य विषयांचा संग्रह.

**भट**—पु. गोमांतकांत सारस्वतेतर ब्राह्मणांस म्हणतात.

**भटकटा**—स्त्री. एक वेल. प्रचोदनी; कुली; क्षुद्रा. -मसाप ४५.३.

**भटकी जात**—नेहमीं फिरत राहणाऱ्या लोकांची जात. (इं.) नोमाड. [भटकणें]

**भटाळलेला**—(निंदार्थी प्रयोग) ब्राह्मणी वर्चस्वाखालील; ब्राह्मणांचा विशेष संपर्क झालेला; ब्राह्मणाप्रमाणें आचारविचार असलेला (ब्राह्मणतर). [भट]

**भटीगंध**—न. आडवें गंध; बहुधा भिक्षुकब्राह्मण आडवें गंध लावतात व गृहस्थ उभें गंध लावतात यावरून.

**भटीण**—स्त्री. (बहुधा निंदार्थी.) भटाची बायको.

**भटारा**—पु. नागरमोथा; मुस्तक. -मसाप ४५.४.

**भट्टा**—पु. मुलांच्या खेळांत इतर लहान वस्तूंस मारण्याकरितां घ्यावयाचा मोठा दगड, कोय, बी, वगैरे; गट्टा. [ध्व.]

**भट्टी उतरणें**—सिद्धीस जाणें; साधणें; समाप्त होणें. 'हेंच शाश्वत राहोन परिणामां भट्टी नीट उतरली पाहिजे.' -रा १०.३६१.

**भडबुंजा, भडभुंजी**—भटभुंजा पहा.

**भंडवाण**—स्त्री. फजीती. -दा १२ २.१३.

**भडवेगिरी**—स्त्री. (शिवी.) भडव्याचे, कुंटणपणाचें काम.

**भंडारा**—पु. डाव्या बरगडीपासून उजव्या बरगडीपर्यंत केलेला वार. -मवि ९.११.

**भंडारी**—पु. एक महाराष्ट्रांतील दर्यावर्दी लोकांची जात. हे आपणांस क्षत्रिय मानतात. [भांडें=गलबत]

**भडाळ्या**—वि. सैल हाताचा; उधळ्या.

**भद्दें उडणें-होणें**—वाटोळें होणें; सर्वथैव नुकसान होणें.

**भद्रजाती**—पु. हत्ती; उत्तम जातीचा प्राणी. 'ब्राह्मणां आला भद्रजाती। आम्हा न पोसवे निश्चितीं। मग तो देऊनियां घेती। वाहावया पोथी वृद्ध ढोर॥' -एभा १८.३४८. [सं.]

**भद्रेश्वर**—पु. (सामान्यतः अनिष्टार्थी) (शारदा नाटकांत हे भिक्षुकाचें पात्र वृद्ध नायकाचें लग्न जमविण्याच्या कामांत मध्यस्थी करतें यावरून) लग्नाची जुळवा जुळव करणारा मध्यस्थ. [सं.]

**भद्रेश्वरी**—स्त्री. मध्यस्थी. (शारदा नाटकांत भद्रेश्वर दीक्षित हा मध्यस्थी करतो यावरून.) 'जायच्या आधीं शहाण्यांच्याजवळ भद्रेश्वरी करावयाला तुला सांगावयाचें.' -चढाओढ २०.

**भनंग**—पु. (महानु.) भणंग; भिकारी; कंगाल; दरिद्री. 'तया तया भनंगा होउनि जन्म देयावे:' -वि ११२. [भणंग]

**भयाभंग**—वि.क्रिवि. दाणादाण; अस्ताव्यस्तपणा; नाश. 'ऐसा भयाभंग जाहाला.' -रा ३.१७२. [भय+भंग]

**भय्यत**—भैय्याद; भायघात पहा. [भाई]

**भरडा**—स्त्री. भात भरडण्याचें जातें; घरट. [भरडणें]

**भरतवाक्य**—स्त्री. समाप्ति; शेवट अखेरी. (नाटकाच्या शेवटीं भरतवाक्य म्हणतात यावरून). 'कलकत्ता परिषदेनें भरतवाक्य होतें न होतें तोंच वर्किंग कमिटीमधील गांधी गटाच्या राजीनाम्यांच्या नाटकाची नांदी सुरू केली.' -के. १४.२.१९३९.

**भरपाई-यी**—स्त्री. परतफेड; पूर्णपणें देऊन टाकणें; पुरें करणें; पूर्ण करणें. [भरणें]

**भरमटें**—वि. भक्कम; जाड; लठ्ठ. 'त्यानें अंथरुणावर अंग टाकलें आणि अंगावर भरमटें पांघरूण घेतलें.' -मकक. यगोजो. अग्रणी १६.९.१९३९.

**भरमाप्पा**—पु. ब्रह्मदेव. [सं. ब्रह्म+का. आप्पा]

**भरल्या चुड्याची**—वि. सौभाग्यवती. (सौभाग्यवती स्त्रिया हातांत चुडे घालतात यावरून.)

**भरवान**—न. भरवण; वजन; माल. 'ती सातआठशें भरवान उठावणारी लहानशी महागिरी होती.' -किर्लो. ऑगस्ट १९३७. [भरणें]

**भराका**—पु. भरती; भरभराट; चालता काळ. [भरणें]

**भरिभार**—पु. जोखीम; जबाबदारी; कार्याचा व्याप; कारभार. 'म. गांधींच्या मनाविरुद्ध कॉंग्रेसचा भरिभार वाहण्याच्या कामीं सहकार्य करण्याची आपली तयारी नसल्याचें श्री. बाबू सुभाषचंद्र बोस यांस कळवलें आहे.' -विविध १२.९.१९३९.

**भरीत**—न. वांगीं भाजून किंवा भोपळा, बटाटा, वगैरे उकडून त्यांत दहीं वगैरे कालवून करतात तें तोंडी लावणें. [भरणें]

**भरून येणें**—अक्रि. भरतें येणें; दाटून येणें; दुःखानें ऊर, गळा, वगैरे दाटणें.

**भलाई**—स्त्री. चांगुलपणा; भलेपणा; बाहेरगांवीं जातांना सर्वांची भेट घेणें, आशीर्वाद घेणें, वगैरे शिष्टाचार. 'सासऱ्याला जातां। गणगोतांचा मालन। भेटी भलाईनं सारा। गेला दिवस करून ॥' -वलो ११४. [ भला ]

**भलपण**—न. चांगुलपणा.

**भलेरभाई**—पु. खर्चिक; उधळ्या; थोडया स्तुतीनें हुरळून जाणारा.

**भल्लातक कल्प-पाक**—पु. बिब्याचें केलेलें औषधी कल्प, पाक. [ भल्लातक=बिब्बा; भिलावा ]

**भवन** —न. ( फज्यो. ) भुवन; घर; राशि. [ सं. ]

**भवाल**—पु. **भवालीन**—स्त्री. महानुभावी उपदेशी; शिष्य-शिष्या. -जुनी ऐतिहासिक माहिती.

**भस**—न. भक्ष्य. 'नेला काळाच्या भसे।' -एपो २४४. [ सं. भक्ष्य ]

**भस्त्रिका**—स्त्री. योग पद्धतींतील व्यायामाचा एक प्रकार. [ सं. ]

**भाईपंथी**—वि. ( समाजसत्तावादी परस्परांस भाई म्हणून संबोधतात यावरून ) सजाजसत्तावादी. -के ९.१२.१९४१. [ भाई+पंथ ]

**भाकडकथा**—स्त्री. ( ठाकरी. ) देवादिकांच्या कथा सोडून इतर गोष्टी. देवादिकांच्या कथा त्या शास्त्रकथा.

**भाकर**—स्त्री. बैलाच्या मानेवर घट्टा पडून बनलेलें राठ कातडें. 'बैल तरी किती गुणी, त्याचे मानेवर भाकर होती.' -पाणकळा ३९.

**भाख**—स्त्री. भाषा; बोली. [ सं. भाषा ]

**भाग**—पु. देवास अर्पण करावयाची वस्तु; देवतेचा अंश. 'तिनें हातांतल्या बांगड्या देखील भाग म्हणून काढून ठेविल्या.' -विविध १६.८.३६.

**भागदार**—पु. जमिनीचे एक प्रकारचे वतनदार; इनामदार; खोत; सरकारी वसुलांतून आपल्या हिश्याची रक्कम काढून घेणारे वतनदार.' -सयाजी १.३३८.

**भागबटाई**—स्त्री. जमिनींतील पिकाचा ऐन जिनसी भाग महसुलासाठीं घेण्याची पद्धत. -सयाजी १.३३९.

**भागेला**—पु. निजाम राज्यांत जमीन धारण करणारा एक वर्ग. [ भाग, भागीदार ]

**भागेली**—पु. १ शेतींतील सरकतदार; बटाईदार. २ नारळाची बाग राखणारा धन्यानें ठेवलेला माणूस. यास पिकाचा कांहीं अंश मजूरी म्हणून मिळावयाचा असतो. [ भाग ]

**भागोटा**—पु. भागवटा पहा. शीण. [ भागणें ]

**भाग्यस्थान**—न. कुंडलींतील एक (दहावें) स्थान. [सं.]

**भाग्येश, भाग्याधिपति**—पु. भाग्य स्थानचा, कुंडलींतील दहाव्या स्थानाचा अधिपति, स्वामी. [ सं. ]

**भाचरा**—पु. ( लाडिक. ) भाचा.

**भाजाकार**—पु. छळवाद. 'मुलानें भाजाकार मांडला आहे.' [ भाजणें ]

**भाटवा**—पु. थोरल्या बहिणीचा नवरा.

**भाटिया**—पु. भाटया पहा.

**भांडतें आरमार**—न. लढाऊ आरमार. 'आमचें भांडतें आरमार आहे त्याचे वाटेस जाऊं नये.' -वसमो.

**भाडभवई**—स्त्री. अनीतीचा व्यवहार; हरामखोरी. 'ही दौलत आमच्या वडिलांनीं भाडभवई करून मिळविली नाहीं.' -ज्ञामं आक्टो १९३६.

**भांडाईत**—पु. भांडीवाले. 'भांडाईत भारवाहक। घोड शिंपी नटनाटक।' -भारा अयोध्या १२.५८.

**भांडें**—न. १ तोफ. २ गलबत; नाव; बोट; तारूं. ३ बांधलेली विहीर असल्यास त्या विहिरीचें पात्र.

**भांडें पाणी**—न. समायिक विहीर व त्या विहिरींतून पाणी काढण्याचा अधिकार, हक्क. 'समाईक विहिरींतील भांडेपाण्यांतील भाऊहिश्यासुद्धा या जमीनी आमच्या अशील याच्या मालकी वहिवाटीच्या आहेत.' -दै काळ ४.३. १९४२. [ भांडें=विहिरीचें पात्र+पाणी ]

**भाण**—न. एकपात्री नाटक. [ सं. ]

**भाणूस उतरणें**—वधूवरांची वरात वराच्या घरीं आल्यावर व्हावयाचें लक्ष्मीपूजन झाल्यानंतर एका उतरंडींत अलंकार असतात ते वधूनें उतरंड उतरून अंगावर घालण्याचा विधि. -लविसो १४३. [ भानवस ]

**भातकूट**—पु. भातकण पहा. तांदुळांत आढळणारा तुसासकट दाणा.

**भात मारणें**—( मालवणी. ) भात झोडणें. भाताच्या जुड्या घेऊन लांकडी ओंडयावर आपटणें.

**भान हरणें**—बेभान होणें.

**भानावर नसणें**—बेशुद्धींत असणें.

**भानावर येणें**—शुद्धीवर येणें.

**भांवुर्डा**—पु. समुद्रकांठच्या वाळूंतील काळसर पांढरा मोठा खेंकडा. लहानास चिरमुली म्हणतात.

**भामटा**—पु. ( ठाकरी. ) एक जातीचा खेकडा.

**भारदारी**—स्त्री. लवाजमा; जडसामान. 'वाटेस पोटास मात्र घावें. वर भारदारी बहादुर बिंडियांत टाकावी.' -पेद २८.१३९.

**भारदारी**—स्त्री. वाहतुक. -के ३.४.१९३६.

**भारभरदारी**—स्त्री. लवाजमा; सरंजाम; जमाव सैन्य, वगैरे. 'विनंती केली की आज्ञेप्रमाणें भारभरदारी आणली आहे. येथें चारा नाहीं अवकास असेल तर माघारें पाठवू म्हणतात' -पेद १०.७९. भार पहा. 'परंतु आपली भारभरदारी कैसी चालते.' -पेद २८.१३९.

**भारसिंग**—न. सांबर; चितळ. 'पुढा चौकड ते कस्तुरी मृग। चवारियाचे पाडे उभसिंग। ते सडकि सींसा बळियें सेंग। भारसिंग कोंतेकार॥' -नरुस्व ७४५. [सं. भारशृंग]

**भारसूद**—वि. (व.) भारदस्त; प्रौढ; गंभीर; वजनदार. 'त्याची बायको वयानें लहान आहे पण पोरकट न दिसतां भारसूद दिसते.'

**भारेजावणें**—सक्रि. (महानु.) भारणें; मंत्रानें मुग्ध करणें. 'ना भारेजावना:' -वि ११४.

**भाल**—पु. (कोळी.) मोठा चिकाचा पडदा. लहानास साठा म्हणतात.

**भालचंद्र**—पु. शंकर. याच्या कपाळावर चंद्र आहे म्हणून. [सं.]

**भालेभाला**—पु. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १ ३९६.

**भावखाड**—न. बावखड; बाहुटा. 'नायकांनीं जोडयाचा योकच तडाखा दिला तर त्याचं भावखाड मोडून त्यो खालता पडला.' -उअं १५.

**भाव खाणें**—१ महाग होणें; दुर्मिळ होणें. २ अतिशय मोठेपणाचा आव आणणें. 'तुमच्यासारखा मी तीन मिनिटें वेळ आहे, दोन मिनिटें वेळ आहे असें म्हणून भाव खाणार नाहीं.' -चित्रा २५.४.१९३७.

**भावगीत**—न. मनांतील भावना उत्कटतेनें व्यक्त करणारा आटोपसर काव्यप्रकार. (इं.) लिरिक. [सं. भाव+गीत]

**भाषणवाले**—पु. अव. (सांकेतिक.) राजकीय कैदी. 'राजकीय कैद्यांना जेलमधील सामान्य कैदी भाषणवाले म्हणतात.' -उत्तरे भिंती २४.

**भासळणें**—अक्रि. लुप्तप्रभ होणें; दिपणें; तेजानें झाकोळणें 'आंगी बाळवयसा असे। परि लावण्य तिहीं लोकांवरी दिसे। जयाचे या रूपाचेनि प्रकाशें। भासळोत चंद्रसूर्य॥' -नरुस्व ३३०. [सं. भा]

**भिकणें**—न. जकातीवरील पट्टी. 'हक दोहीकडे दोन यावे. भिकणे दोहीकडे देऊ नये म्हणून आज्ञा.' -पेद १३. ४७.

**भिकारी**—वि. १ उदरनिर्वाहाकरितां भिक्षा मागणारा. २ (ल.) क्षुद्र; क्षुल्लक; हलकी (वस्तु पदार्थ वगैरे). [सं. भिक्षा]

**भिंग**—पु. (ठाकरी.) एक जातीचा मासा.

**भिडकणें**—अक्रि. तडफडणें. 'अन्नालागीं भिडकली।' -दा ३.५.७.

**भिडावणें**—अक्रि. धजणें. 'उत्तर देण्यासहि भिडावत नाहीं.' -के ११.६.१९३७.

**भिडू**—पु. १ यार. २ दोस्त; जार. [भिडणें]

**भिंतभंग**—पु. एका खोलीच्या दालनाचे दोन भाग करणारा पडदा, भिंत, वगैरे. 'फुलांचे बोवरे खणोखणीं। आंतु पाणि तुळिया कवणी। पाचिचां भिंतभंगीवाणी। कुसुमकळियांची।' -नरुस्व ४२६. [भित्ति+भंग]

**भिन्नवणें**—अक्रि. पतंग गरगर फिरूं लागणें. -व्याज्ञा १.१६४.

**भिलमाड**—पु. (गो.) भिर्लमाड; सुरमाड

**भिवई चढविणें**—रागानें, संतापानें पाहणें; कपाळास आठ्या घालणें.

**भीड**—स्त्री. दाटी: जमाव; सैन्याची झुंड. 'त्यांची कार्यें सिद्धी होऊन गाडे जोतून जात होते तो आपली भीड पोहोंचली.' -पेद २९.२०९. [भिडणें]

**भीडभांडा**—पु. तोफा वगैरे सामान. 'तेथील भीडभांडा येईल तर उत्तम आहे.' -पेद १.६. [भांडें द्वि]

**भीत**—पु. खड्ग. तलवारीचें नांव. -प्रश १७. [सं.]

**भीमसेनी बाजरी**—स्त्री. आफ्रिकन बाजरी. हिचा दाणा, झाड वगैरे मोठें असतें.

**भीलकवडी**—स्त्री भील लोकांस द्यावयाचा एक कर. कदाचित् हा पूर्वी कवडयांच्या रूपांत देत असावे. 'आसपासच्या लोकांचा माल जेव्हां या गोंड लोकांच्या हद्दींतून जात असे तेव्हां त्या जाणाऱ्या येणाऱ्या लोकांवर कांहीं कर असे त्यास भीलकवडी म्हणत.' -देवी श्री अहल्याबाई ९२०.

**भुईभुई**—स्त्री. गडबड; वर्दळ; आवाज; येजा; व्यापार. 'आपल्या किनाऱ्यावर बोटींची भुई भुई नुकतीच सुरू झाली होती.' -किर्लो. ऑग ३७.४९. [ध्व.]

**भुईनेत**—न. मुंगळ्याचें घर.

**भुईफुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३७८.

**भुकबग**—वि. उपाशी; निर्धन; जवळ कांहीं नसलेला. 'अपजी परभू रघूजी बाबास म्हणाला जे आमचे लोक भुकेबग आहेत तर तूर्त आपणांस दोन लक्ष रुपये नालबंदी द्या.' -पेद २०.६२. खालीं पहा. (चुकीचें वाचन). [भूक+बाग]

**भुकेबाग**—वि. बुभुक्षित; कंगाल; दरिद्री. 'भुकेबाग आहेत. लाखाचे लाख गडप होतात.' -पेद २९.२७७. [भूक+बाज]

**भुत्या**—पु. भोप्या; देवीचे उपासक; कवड्यांच्या माळा घालणारा व हातांत पोत घेऊन नाचणारा देवीचा भक्त.

**भुरकुंडें**—न. मक्याच्या कणसाचे दाणे काढल्यावर राहणारा दांडा. 'कणसें खाऊन भुरकुंडें आम्ही बाहेर फेंकून देऊं.' -शिआत्म ६०.

**भुरभुरी**—स्त्री. तुरींतील कीड.

**भुरभुरें**—न. भजें.

**भुर्रभुस्स होणें**—अक्रि. नासधूस होणें.

**भुलाई, भुलाबाई**—स्त्री. आश्विन महिन्यांत स्थापन करावयाची एक देवता. या देवतेपुढें रोज सायंकाळीं मुली गाणीं म्हणतात. भोंडल्यासारखी देवता.

**भुवनेश्वरी**—स्त्री. खड्ग. तलवारीचें नांव. -प्रश १७.

**भुक्तभोगी**—पु. अनुभव घेतलेला; अनुभवी. 'त्यास हरतऱ्हेचा त्रास कसा सोसावा लागतो हें भुक्तभोगीच जाणतो.' -के २०.१२.१९४०.

**भुंगा**—पु. लांकूड पोखरणारा एक किडा. [ सं. भ्रमर ]
**घराला भुंगा लागणें**-घराचें लांकूड. सामान पोकळ होणें.
**शरीरास भुंगा लागणें**-काळजीनें शरीर जर्जर होणें.

**भुगुली**—स्त्री. एक बोराएवढें फळ.

**भुजआढी**—स्त्री. ( मल्लखांब. ) वेताचा मल्लखांब हाताच्या लवणींत धरून केलेली अढी.' -व्याज्ञा ३.३४५.

**भुजंगी**—स्त्री. चणे. कुरमुरे, भुईमुगाचे दाणे, वाटाणे, वगैरे मिळून तयार केलेलें खाद्य; भेळ. [ भुजणें=भाजणें ]

**भुजबंद**—पु. बाहूवर घालावयाचा दागिना; सिंहकड्यासारखा किंवा बाजूबंदासारखा एक दागिना. 'तेसमई शर्कुदौला यांस दरबारास बोलावून नेऊन लटकण व भुजबंदी दिले.' -पेद ३९.१५० [ सं. भुजबंध ]

**भुजबंद उडी**—स्त्री. ( मल्लखांब. ) मानेच्या मागें फुलीसारखे हात बांधून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.१०५.

**भुंडी**—वि. कांठ नसलेली किंवा बाह्या नसलेली. 'ती कापडाचो तंग चोळी घालते आणि ती सुद्धां भुंडी हो!' -खेस्व ५५.

**भुलावा**—पु. फसवणूक; झुकांडी; हिसका; चकवा.' जर भुलावा देऊन गेले तर मोठा उपद्व्याप करतील. '-रा ३.३८२ A. [ भुलणें, भुलविणें ]

**भूक, भूकहरताळ**—पु. उपास; अन्नत्याग; अन्नसत्याग्रह. 'एक एक दिवसाचे भूक हरताळ सुरू झाले.' -के १.८.१९३९.

**भूत गाडणें**—भुतास बांधून पुरणें; मुक्त करणें.

**भूत लागणें**—भुताची झडपण होणें.

**भूमंडळ**—न. खड्ग; तलवारीचा प्रकार. -प्रश १७. [ सं. ]

**भृगुकच्छ, भृगुतीर्थ**—न. भडोच. [ सं. ]

**भें**—न. ( सिंधी ) कमळाचा देंठ; ढेंस.

**भेजा**—न. मेंदू. 'आपला भेजा खलास झाला तरी बेहत्तर पण सोन्याचें काम फत्ते करावयाचेंच.' -किर्लो आक्टो १९४०. [ फा. ]

**भेटा**—पु. भारा; गंजी. 'गवताचे भेटे व कवळाचे भारे दिसावयाचे.' -मशा जून १९३५.

**भेगर्डी**—लोत झुडपाचा कांदा. याचे वडे करतात.

**भेरड उतरणें**—भेलगा उतरणें पहा.

**भैंबाई**—स्त्री. ( महानु. ) भैं भैं असें ओरडणें;कोलाहल; ओरड. -उच ९. [ ध्व. ]

**भैय्याद**—स्त्री. मायाद; भाईबंद; नातेवाईक. 'ही सर्व घराण्याची भैय्याद आहे.' -के २८.६.१९३८.

**भैरव**—स्त्री. शेंदूर लावून बनविलेला पाषाणाचा देव. 'अंगण वजा मोकळया जागेंत कच्च्या ओठ्यावर एक भैरव होता.' -के ३.१०.१९४१.

**भैरवघाटी**—स्त्री. एकीकडे उंच पर्वत व एकीकडे कडा तुटलेला असा पहाडांतील रस्ता. -हिमा प्र. [ भैरव घाट ]

**भैरवपंथी**—पु. दंडांत पितळी मूर्ती, अंगाला राख व शेंदूर फासणारे बैरागी, भिकारी, भैरवाचे उपासक. [ भैरव+पंथ ]

**भैऱ्या**—पु. बहिरोबाचा कुणबी जातीचा भक्त. हे जोतिबाच्या नांवानें भीक मागतात. [ भैरव ]

**भोकर**—न. कानांतील एक दागिना.

**भोकशी**—(ठाकरी.) तागाचें निमुळतें जाळें.

**भोकाळणें**—अक्रि. भोंक पडणें; छिद्र पडणें. [ भोक ]

**भोग**—पु. देवतेस अर्पण करावयाचा नैवेद्य, बळी. 'लग्नांत पाताणे कुलस्वामिनीस बकऱ्याचा भोग देतात.' -ज्ञाको ( १७ ) २४८.

**भोगरा**—पु. भोंवरा.

**भोग रामाची मूर्ती**—वि. (महानु.) (ल.) साजरागोजरा, केवळ गणोबा, दिखाऊ.

**भोगविणें**—सक्रि. देवास अर्पण करणें; देवाच्या अंगास लावणें; देवास वाहणें. 'त्याची सेवा करूं लागला. शेंदूर भोगविला. चार पांच वरसें तेथेंच पूजा करीत होता.' -रा ६, पृ ४३. [ भोगणें प्रयोजक ]

**भोंगाळें**—न. एक जातीचें जाडें भात.

**भोगी**—स्त्री. नारळाचें दूध. 'श्रीमुगुटी भोगी बोळगविली.' -लीच ३ पृ ११६. [सं. भोग]

**भोगी**—स्त्री. देवाचा भोग; नैवेद्य; देवतेस अर्पण करावयाच्या वस्तु. 'आम्ही किनईस जाऊन श्रीस भोगी करून आलों. औंधासहि श्रीमूळपीठ श्रीयमाईस भोग्या केल्या.' -प्रति आत्मच ३०१. [सं. भोग]

**भोंगी**—स्त्री. (ठाकरी.) लहान ठेंगणें घर.

**भोज**—न. ज्वारी व भांगेपासून केलेलें पेय. यास सिद्धि असेंहि म्हणतात. [सं. भुज्=खाणें]

**भोतोड**—न. (ठाकरी.) एक मासे पकडण्याचें जाळें.

**भोपळी**—स्त्री. (कों.) सकाळचें कोंवळें ऊन.

**भोतिया**—पु. भूतानांतील रहिवाशी.

**भोप्या**—पु. देवीचा भक्त. कवडयांच्या माळा घालून हातांत पोत घेणारा देवीचा उपासक.

**भोंब**—स्त्री. १ तिवडा. २ तिवडयाजवळचें मळणींतील पहिलें जनावर. [सं १ भू, भूमि २ भ्रम्]

**भोंबी पुनव**—स्त्री. आश्विन पौर्णिमा. या दिवशीं कांहीं शेतकरी गांवातून आपल्या शेतावर रहावयास जातात. [भोंब+पूर्णिमा]

**भोमगति**—पु. खंजीराचा एक पवित्रा. -प्रश १८.

**भोर भेंडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९५.

**भोरी**—स्त्री. ढेप (गुळाची).

**भोंवडो**—स्त्री. रान घेरणें; हाका मारणें; पारध करणें वगैरे. -सह्या पा ३०६.

**भोंवती**—स्त्री. प्रदक्षिणा. 'भोंवतीनंतर.' -आडिमहा प्र १०.

**भोवसा**—क्रिवि. बहुवसा; अनेक प्रकारें. 'तुका म्हणे कसा आट पाडिला भोवसा।' [सं. बहु+त्रस]

**भोंवरा**—पु. (गो.) नदीच्या लगत राहणारा एक पांढरा पक्षी. -सह्या पा ३०६.

**भोळसट**—वि. भोळा.

**भोळाभाबडा**—वि. भोळा.

**भौपल वज्र**—न. पोलादाची एक जात. -प्रश २२.

**भौवणी**—स्त्री. गलबताचा एक प्रकार. 'हिरोजी नाईक याची दोन व आपली तीन व भौवणी घेतली ती ऐसी सा गलबतें मालवणावर आलीं.' -पेद २४.५४.

**भ्रष्ट पडणें**—बाटणें; जातींतून बाहेर पडणें.

**भ्रांत होणें**—मोताद होणें; न मिळणें; वाण पडणें; 'त्याला मध्यान्ह काळाचीहि भ्रान्त आहे.' [सं. भ्रम्-भ्रान्ति]

# म

**मअ**—शअ. सह. -मुधो. [अर.]

**मअनी**—स्त्री. अर्थ. -मुधो. [अर.]

**मअरक**—स्त्री. लढाई. -मुधो. [अर.]

**मअरज**—अर्जाचें स्थान. -मुधो. [अर.]

**मअरूज**—वि. लिहिलेले. -मुधो. [अर.]

**मअलूम**—वि. ज्ञात. -मुधो. [अर.]

**मआरिक**—लढाई. -मुधो. [अर.]

**मऊ पडणें**—नरमणें; आवेश कमी होणें; राग वगैरे ओसरणें.

**मऊ भात**—पु. लहान मुलांकरितां शिजविलेला गिजगुडा भात.

**मऊहात**—पु. प्रेमळ हात; प्रेमाचा हात. 'मग बरा तुझा मऊ हात.' -शारदा.

**मकतब**—स्त्री.मशिदींत भरणारी मुसलमानी शाळा. [अर.]

**मकर**—पु. या राशींत उत्तराषाढा नक्षत्राचे शेवटचे तीन चरण; श्रवण नक्षत्र व धनिष्ठा नक्षत्राचे पहिले दोन चरण यांचा समावेश होतो. [सं.]

**मकर चेष्टा**—स्त्री. बतावणी. मगर हा भक्ष्यास प्रथम खेळवतो या समजुतीवरून किंवा मर्कटचेष्टा याचा अपभ्रंश. [सं.]

**मकरध्वज**—पु. एक रसायन मात्रा.

**मकारिण**—वि. जवळ असलेलें. -मुधो. [अर.]

**मकडाफ**—वि. जीर्ण; जुनें. -मुधो. [अर.]

**मखरांत बसणें**—नहाण येणें; प्रथम ऋतु प्राप्त झालेल्या स्त्रीस तीन दिवस मखरामध्यें बसविण्याची चाल आहे यावरून.

**मख्दूम**—वि. चाकरी केलेला. -मुधो. [अर.]

**मंग**—पु. (सिंधी) सिंध प्रांतांत घरामध्यें वारा येण्याकरितां घरांवर केलेली चिमणीवजा रचना.

**मगरबी**—स्त्री. एक तरवारीचा प्रकार. -प्रश ४०८. [मगरेब=संध्याकाळ; मगरब-मोरोक्को]

**मगरूबी**—स्त्री. मगरूरी; उर्मटपणा; चढेलपणा. 'संपदा कांहींच नसता इतुका घण धरितात व मगरूबीच्या गोष्टी सांगतात हे काय?' -पेद ५.७४. [अर. मग्रूर]

**मंगळ असणें**—जन्मकुंडलींत मंगळ लग्नापासून १२, १, ४, ७ व ८ यांपैकीं एकाद्या स्थानांत असणें, हा अशुभ मानतात

**मंगळ-मंगळें**—न. मंगलदायक वस्तु; शुभ चिन्ह; ताईत वगैरे अशुभहारक वस्तु. 'इंद्र निघतां वृत्रवधासी। मंगळें केली त्यासी। तीं मंगळें तुजपाशीं। अहर्निशीं तिष्ठोत।' -भारा अयो ६.३२. 'गरुड जातां अमृतासी । विनतें मंगळें केलीं त्यासी । तीं मंगळें तुजपासी।' -भारा अयो. ६.३३-३५. [ सं. मंगल ]

**मंघ**—पु. सिंध, हैदराबाद वगैरे शहरांत उन्हाळयांत घरांत हवा खेळावी म्हणून घराच्या माथ्यावर धुराडयासारखें साधन करतात तें. यांतून वर वाहणारी हवा खालीं थंड होऊन येते. मंग पहा.

**मच्ची**—स्त्री. ( आट्यापाटया ) कोंडी धरली असतां पाटीवाल्याच्या समोरची पाटी.

**मच्चीस लागणें**—कोंडींतून पाटीवाल्याच्या समोरच्या पाटीवर मृदंगाची पाटी ओलांडून जाण्याचा प्रयत्न करणें.

**मछली पकड फिरकी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाच्या बोंडाजवळ पाय वर करून पुन: फिरवून खालीं आणून मारावयाची अढी. -व्याज्ञा ३.१७२.

**मच्छली चक्र**—न. माशाप्रमाणें चक्राकार उडया मारण्याची कसरत. -व्याज्ञा ३.४२६.

**मजकूर**—पु. ( ल. ) दिरंगाई; बोलाचाली; केवळ वाटाघाट. 'प्रस्तुत मजकूरच आहे.' -पेद ३७.११९. -क्रिवि. यथातथा; बेताचा.

**मजगी**—स्त्री. डोंगराच्या उतारावर शेती करण्याकरितां मधून मधून बांध घालून निरनिराळया पायऱ्यांवर सपाट जमीन करतात त्यांस म्हणतात. पायरी; उतारावर मधून मधून तयार केलेली सपाट जमीन. 'रॅकेट प्रवाह हा पहिल्या दोन प्रवाहांपेक्षां लहान आहे. तो खडकाच्या मजगी मजगीवरून हळूहळू व मंद आवाज करीत दरींत जाऊन पडतो.' -भाटे प्रवास पत्रें ५२. 'हा ( देविमनी ) घाट हुबळी कारवार रस्त्यावरील आरबेल घाटापेक्षां कमी कठीण व कमी चढणीचा आहे. कारण तो पर्वताच्या पायऱ्यांसारख्या मजगीवरून नेण्यांत आला आहे.' -भाटे प्रवास पत्रें ५५.

**मजरा**—पु. मोल; किंमत; गौरव; चीज. 'आमचे सेवेचा मजरा होऊन आमचे उर्जित होये, ऐसे सविस्तर वर्तमान आपणास दाखल व्हावे.' -पेद १६.१६.

**मंजिरा**—टाळ. -व्याज्ञा १.४१७.

**मंजिरीचा गरबा**—पु. गुजराथेंतील गरबा नृत्याचा एक प्रकार. -व्याज्ञा १.४१७.

**मजालसी**—वि. शोभेचा; दिखाऊ. 'मजालसी दारूचा मक्ता.' -के २६.३.१९३७. [अर. मज्लीस ]

**मंजु**—स्त्री. कटिशृंखला; करदोडा; कमरेची साखळी. -मसाप ४५.६.

**मंजुभाषिणी**—वि. गोड बोलणारी. [ सं. ]

**मंजूर**—वि. पाहिलेलें. -मुधो. [ अर. ]

**मज्कूर**—वि. स्मरलेलें; वर आलेलें. पूर्वी उल्लेखिलेलें. -मुधो. [ अर. ]

**मज्मूई**—स्त्री. वसुली. -मुधो. [ अर. ]

**मांझेलत**—स्त्री. आश्रयस्थान. -मुधो. [ अर. ]

**मझीद**—वि. अधिक. -मुधो. [ अर. ]

**मट्ट करणें**—गट्ट करणें; खाऊन टाकणें. 'रामरावांनीं त्याची इस्टेट सर्व मट्ट केली.' [ ध्व. ]

**मट्टा**—पु. ( चट्टामट्टा या शब्दांत विशेष उपयोग ) खाणें; चट्टा मट्टा करणें=खाऊन संपविणें; फन्ना करणें.

**मठळणें**—अक्रि. लाटणें; गडप करणें; स्वतःच्या ताब्यांत घेणें. 'दुनिया उपासमारानें मरत असतां येवढं धान्य मठळण्याची मला काय जरूरी?' -पाणकळा ६१.

**मठी**—स्त्री. १ लहान मठ; साधूचें निवासस्थान. २ एकान्त दूर जागा. ३ व्यसनी लोकांचा अड्डा; चांडाळ चौकडी बसण्याची जागा. [ मठ ]

**मड**—न. मडकें.

**मंडलग्न**—न. खड्ग; तरवारीचें एक नांव. -प्रश १५.

**मंडी**—स्त्री. वज्रमुष्टीचा व्यायाम. बैठक मारून क्रमानें एक हात व एक गुडघा जमिनीवर टेकून करावयाचा व्यायाम. -व्याज्ञा १.९५.

**मंडीअढी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबावर उडी मारतांना मांडी घालून पकडींत धरण्याचा डाव. -व्याज्ञा ३.७९.

**मंडूकासन**—न. (मल्लखांब) घोडयाचा फरारा करून दोन्ही पाय मल्लखांबाच्या मागें लावून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२९९.

**मढेपीक**—न. बेसुमार पीक; अतिशय पीक; सुळसुळाट; अतिशयता. 'वरदक्षिणेचें मढेपीक.' -विविध २७.६.१९३७. [ मढें ]

**मढेरू**—न. जीवंत मनुष्याची प्रेतयात्रा. पूर्वी मुरुड येथें काढीत असत, ज्येष्ठ वद्य १४ स. -आत्म २३. [ मढें ]

**मणकी**—स्त्री. मणाचें वजन; मणभर वजनाचा लोखंडाचा गोळा, दगड वगैरे [ मण ]

**मणिबंध**—पु. १ मनगट. २ मनगटावर केलेला वार. -मवि ९.११. [ सं. ]

**मत-भरण-भारण**—न. अधिक मतें देणें. [ मत+भरणें ]

**मतलबानें बोलणें**—स्वार्थ साधण्याच्या दृष्टीनें केलेलें भाषण. मतलबाचें, मतलबी भाषण; ढोंगी, कपटी भाषण.

**मताअ**—स्त्री. मत्ता पहा. -मुधो. [ अर. ]

**मतिहीन**—वि. मंदबुद्धि, जड. [ सं. मति+हीन ]

**मत्स्य**—पु. १ नदीवर बांधलेल्या पुलाच्या कमानीच्या खांबाचा तळचा भाग, हा दोन्ही बाजूंस निमुळता असतो. २ नदीच्या घाटावरील पाण्यांत असणारे बुरुज. -पुरु जुलै १९३८. [ सं. ]

**मत्स्यदंड**—पु. वज्रमुष्टीचा व्यायाम. एका जागेवर बसून एकदम दंड काढणें व तसेंच पुढें किंवा वर उडणें व फिरणें. -व्याज्ञा ४.१०७. [ सं. ]

**मत्स्यवेध**—पु. मत्स्ययंत्रांतील माशास बाण मारणें. -पुरु जाने. १९३९. [ सं. मत्स्य+विध्-वेध ]

**मत्स्यासन**—न. ( मल्लखांब ) मल्लखांबाच्या बोंडावर ताजवा करून नंतर हात डोक्याखालीं व पायांची मांडी करून राहणें. -व्याज्ञा १.२४२. [ सं. मत्स्य+आसन ]

**मंत्र**—पु. १ गुरूपदेश. २ चहाडी. [ स. मन्-मंत्र ]

**मंत्र घालणें**—मंत्राचा उच्चार करून फुंकर घालणें, भस्म लावणें वगैरे क्रिया.

**मंत्ररामायण**—न. निरनिराळ्या मंत्रांची आर्यांत रचना केलेलें मोरोपंती रामायण.

**मंत्रसंहिता**—स्त्री. निरनिराळ्या विधींत लागणारे मंत्र एकत्र देणारी संहिता, संग्रह, मंत्रसंग्रह. [ सं. ]

**मंत्रसामर्थ्य**—न. मंत्राची शक्ति. [ सं. ]

**मंथर**—वि. प्रचुर; युक्त. 'प्रौढ अलंकार मंथर भाषाशैलीचा केलेला उपयोग उचितच वाटेल.' -नकुमं ५.

**मथरावणी**—स्त्री. ( गो. ) हट्ट; दिरंगाई; रेंगाळणें. -सह्या पा ३०६. [ सं. मन्थर ]

**मथ्थेदार**—वि. एक प्रकारचा पतंग. -व्याज्ञा १.१६२.

**मंदगमना**—स्त्री. स्त्री. 'मंद मंद गमना करिणी किम्' [ सं. ]

**मदघर**—न. माजघर. [ सं. मध्य+गृह ]

**मददमावला**—पु. साहाय्य; कुमक; मदत. 'त्यांनीं आम्ही इत्यफाकानें राहून मुफसद नाइकडे आदि करून यांचे तंबी विषई तर्फैन मददमावला करण्याचा ईर्षाद.' -रा ७. ११३. [ अर. मदद द्विरुक्ति ]

**मदन**—पु. गुऱ्हाळांत गूळ करतांना आटत असलेला रस. -ज्ञाको ऊ २८.

**मदनगृह, मदनालय**—न. योनि. [ सं. ]

**मदनांकुश**—पु. शिस्न. [ सं. ]

**मदनचाप**—न. मदनाचें धनुष्य; पुष्प. [ सं. ]

**मदनछत्र**—न. मकदाणा. [ सं. ]

**मदनदहन**—पु. शंकर. [ सं. ]

**मदनपीडा**—व्यथा; कामपीडा. [ सं. ]

**मदनवृक्ष**—पु. गेळीचें झाड. मरुबक; श्वसन; करहाटका, शल्य. -मसाप ४५.३. [ सं. ]

**मदनशर**—पु. कामपीडा; मदनाचा बाण. 'मी तप्त जरी मदनशरें विनय सोडुं का.' -शापसंभ्रम. [ सं. ]

**मंदाग्नि**—पु. १ प्रखर नसलेला विस्तव. [ सं. मंद+अग्नि ]

**मदपोय**—न. एक फुलझाड. -पेम.

**मदांग**—न. खड्ग; तरवारीचें नांव. -प्रश १७.

**मदाम**—वि. कायम. -मुधो. [ अर. ]

**मदारउलमहाम**—पु. कामांचा मध्य; मुख्य प्रधान, ही पदवी निझामानें नाना फडणविसांस दिली होती. -मुधो. [ अर. ]

**मदारिज दर्जे**—पायऱ्या. -मुधो. [ अर. ]

**मदभरणाचा**—वि. मध्यम प्रतीचा. 'शंभरपासून सात-आठशेंपर्यंतचीं खेडीं मदभरणाचीं म्हणजे मध्यम प्रतीचीं असत.' -भूप्र ११. [ सं. मध्य+भरण ]

**मंदिली**—वि. जरीच्या काडीचें ( कापड ).

**मंदीवाला**—पु. वायद्याची विक्री करून वायद्याच्या मुदतींत उतरलेल्या भावांत खरेदी करून मधला फायदा मिळवूं पाहणारा. -उद्यम सप्टें. ४१.

**मद्द**—वाढ. -मुधो. [ अर. ]

**मद्रसा**—स्त्री. मुसलमानांची शाळा. [ अर. ]

**मद्रासी प्राणायाम**—पु द्राविडी प्राणायाम पहा.

**मधांत**—क्रिवि. मध्यें; अन्तर्भागीं. 'उभ्या मांडवाचे दारीं। बोहले सवा हात। लाल झालरी छताला । शोभे कारंजें मधांत॥' -वलो ११०. [ मध्य ]

**मधिलेमालीं**—क्रिवि. मधल्यामध्यें; दरम्यान; मध्येंच. 'हें सामान साहेबांचे पदरींचे मधिलेमालीं जाया होतें.' -पेद १९.६५. [ मध्य. ]

**मधुमुख**—पु. तोंडावर गोड बोलणारा; ज्याचें केवळ तोंड गोड आहे असा; दिखाऊपणाचें गोडभाषण करणारा, [ सं ]

**मधुरा**—पु. बारीक पुळया; पुरळ.

**मधुवन**—न. कुंजवन; कृष्णानें क्रीडा केली तें वन. [ सं. ]

**मधुसूदन**—पु. मधुदैत्यास मारणारा; विष्णूचें एक नांव. [ सं. ]

**मध्यमक्रम**—पु. मधला मार्ग; तडजोडीचा मार्ग; तारतम्यानें काढलेला निर्णय. -के २४.९.१९३७. [सं.]

**मध्यमग्राम**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २३.

**मन अंतर्मुख करणें**—स्वतःच्या कृतीकडे दोषांकडे वगैरे लक्ष्य देणें.

**मनकर**—वि. मनोहर; मन रमविणारा; रम्य; सुंदर. 'मोतियांचा भांगु मनकरू । जैसा श्रृंघार गंगेचा अवतारू। आला जीवऊं अनंग सगरू । वादे चंद्रमौळीसी।' -नरुस्व ९७. [सं. मन+कर] **मन गांगरणें, गोंधळणें**-घाबरणें; सुचेनासें होणें. **मन घाबरणें**-भीतिग्रस्त होणें. **मन घोटाळणें**-मनाचा निश्चय न होणें; गुटमळणें. **मन चरकणें**-मनाला धक्का बसणें; घाबरणें; मागें घेणें. **मन चळणें**-दुसऱ्याच गोष्टीकडे लक्ष्य लागणें; भलत्याच मार्गाला लागणें. **मन धावणें**-ओढ लागणें. **मन फिरणें**-बेत बदलणें; विचारांत बदल होणें. **मन बदलणें**-मन फिरणें. **मनमुदा**-वि. मनमुराद; यथेच्छ; मनमुक्त; हवातेवढा. 'जमाव मनमुदेसारखा असिला पाहिजे म्हणून लष्करांत राजश्री संताजी जाधवराव व दुर्गोजी भोइटे यांस कागद लेहून येथून गुणाजी गुजर पाठविले.' -पेद ३.११६. [सं. मन+मुदा] **मन वळविणें**-एखाद्यास आपल्या मनाप्रमाणें वागावयास लावणें; एखाद्याची समजूत करणें; आपणांस अनुकूल करून घेणें; प्रवृत्त करणें. **मनांत येणें**-विचार येणें. **मनांत येऊन जाणें**-क्षणिक स्मरण होणें; एखादा विचार येऊन जाणें. **मनाला झोंबणें**-मनाला चरका बसणें; मनास लागणें; दुःख होणें. **मनाला येणें**-पसंत पडणें. **मनाला लागणें**-टोंचणें; दुःखदायक होणें. **मनींचा हेतु**-उद्देश; मनांतील इच्छित गोष्ट. **मनींचा मांडा**-मनांतील आवडती गोष्ट. **मनीं येणें**-कल्पना होणें; विचार येणें; वाटणें. **मनींचा हेतु**-इच्छा.

**मनगटांतील माशा मारणें**—स्वस्थ बसणें: असमर्थ असणें; दुबळें बनणें.

**मनगट चावून घेणें**—संताप करून घेणें; चडफडणें.

**मनगटाचे जोरावर**—स्वत.च्या सामर्थ्यावर.

**मननीय**—वि. विचार करण्यासारखें.

**मनःप्रसाद**—पु. शांति; शांतता. 'आपला मनःप्रसाद कधीं ढळूं देत नाहींत.' -स्वचि १७.

**मनभूल**—स्त्री. मनाला होणारा भ्रम.

**मनवर**—न. लढाऊ गलबत. इं. मॅन ऑफ वॉर.

**मनावणें**—अक्रि. साजरा करणें; संपादणें; पार पाडणें. 'निःशस्त्र प्रतिकारकांचा सत्कारसमारंभ तारीख ३ रोजीं मनावला.' -के ८.९.१९३९. [मानणें]

**मनासिब**—स्त्री. मन्सब अव. -मुधो. [अर.]

**मनीअ**—वि. बळकट. -मुधो. [अर.]

**मनीषा**—स्त्री. इच्छा. ०**पुरविणें**-इच्छा पूर्ण करणें.

**मनोनुकूल**—वि. मनाप्रमाणें; मर्जीनुरूप.

**मनो मनस्वी**—वि. इच्छेस येईल तसें वागणारा.

**मनोविश्लेषण**—न. भावनांचें पृथक्करण; मनांतील व्यापारांचें विशदीकरण; पृथक्करण. [सं. मन+विश्लेषण]

**मन्वादि**—पु. मन्वंतराच्या आरंभींचा दिवस. [सं. मनु+आदि]

**मन्सब**—स्त्री. भाग, वाटा. -मुधो. [अर.]

**मन्सा**—स्त्री (व.) मनीषा; इच्छा. 'पहिल्यानं गरवार । मन्सा खाण्यावर नाहीं । पुरवितो भरतार। नऊ महिने मिठाई।' -वलो १००. [सं. मनीषा]

**मन्सूर**—वि. विजयी; मदत झालेला. -मुधो. [अर.]

**मफसल**—वि. स्पष्ट; पूर्ण तपशीलवार. 'बाजीरावसाहेब यांस दौलतीवरून मवकूफ केलें मजकूर मफसल लिहून' -रास्ते गोखले २९. [अर.]

**मफसूद**—पु. मकसूद बद्दल चुकीचें वाचन; हेतु; हकीकत; अभिप्राय 'तूं जरूर गळा पडतोस तरी तुझा काय मफसूद तो सांगणें.' -रा १५.१०. [अर. मकसूद पहा]

**मफासला**—पु. अंतर. 'राजश्री नारायणराव घोरपडे व मानाजी पायगुडे वाडीहून मागारे येऊन चिकोडीकरावर शाह देऊन आठा कोसाच्या मफासल्याने राहिले होते.' -पेद ६.१४९. [फा.]

**मफ्तूह**—उघडलेलें. -मुधो. [अर.]

**मंमं**—न. (लहान मुलांत) १ जेवण. २ भात; अन्न. [ध्व.]

**ममरेज**—पु. मेंब्रेज पाहा. टांचखिळा. 'घोडयास ममरेज लावून गर्दीतून निघून गेला.' -शिआत्म ७१.

**ममालिक**—पु. देश. -मुधो. [अर.]

**मम्लिकत**—स्त्री. देश. -मुधो. [अर.]

**मय**—पु. एक असुर. [सं.]

**मयसभा**—स्त्री. मयासुरानें धर्मराजाकरितां बांधलेलें सभागृह. त्यांत पाण्याच्या ठिकाणीं जमिनीचा व जमिनीच्या ठिकाणीं पाण्याचा भास होत असे. [सं.]

**मयूर वज्र**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २२. [सं.] ०**सेवक**-पोलादाचा प्रकार. -प्रश २२. [सं.]

**मयूरासन**—न. (मल्लखांब) बोंडावर कोंपरें बेंबीस लावून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२.३१. [सं. मयूर+आसन]

**मयेआखबरात**—क्रिवि. बातमीबरोबर. ' दोन पत्रें मये आखबरात सेवेसी पाठविली होती पावलीं असतील.' -पेद २९.१४३. [ फा. मइ+आ+खबर ]

**मरई**—लक्ष दिलेलें -मुधो. [ अर. ]

**मरग**—पु. मरगी; रोग; रोगाची सांथ. ' थोर थोर देवालयें होतीं. तींहि मोडून तलफ केलीं होतीं. त्याकरतां गांवांत मरग सुटला माणसें मरूं लागलीं.' -सनदा १६३. [ सं. मृ=मरणें ]

**मरगट्टा**—पु. ( अल्पार्थे ) मराठा.

**मरझड**—स्त्री. मरणें किंवा गळणें ही क्रिया; मरामर. ' म्हणून मरझड बाद होऊन तेथें दोनतीन झाडें एकत्र वाढलेलीं आढळतात.' -के ४.४.१९३९. [ मरणें+झडणें ]

**मरमततलब**—वि. दुरुस्ती करण्याची आवश्यकता असलेली; दुरुस्तीलायक; नादुरुस्त. ' जागा मरमततलब आहे सबब दुरुस्ती करावयास माणसें लावून मागती उभयतां आंबराईंत जाऊन राहिले आहेत.' -रा ७.२१९. [ अर. मरम्मत+तलबा ]

**मरवडा**—पु. अपशब्द. ' ती सदूलाच मरवडे घालून त्यालाच बदाबद मारी.' -नादनि.

**मरसिया**—पु. शोकगीत; मृताबद्दलचें गाणें; मुसलमानांत ताबुतासमोर हीं गीतें म्हणतात. ' तीन घटिका परियेंत मरसीये ऐकून स्वारी वाड्यांत गेली.' -पेद ४१.२९६.

**मरसूल**—पु. पत्र; कागद; चिठ्ठी. ' सरकारचें मदारुल महाम यांनीं खतूत मरसूल केलें.' -रा १०.२३४. [ अर. मुरसला=पत्र ]

**मरहमत**—स्त्री. कृपा. -मुधो. [ अर. ]

**मराठे तीळ**—पु. तांबूस रंगाचे तीळ; यांस पुरबग्या तीळ असेंहि म्हणतात.

**मराहिम**—कृपा. -मुधो. [ अर. ]

**मरुशाद्वल**—न. हिरवळ; वाळूच्या रणांतील पाणी असलेली जागा; ओलवण. [ सं. मरु+शाद्वल ]

**मरो पुरेसें करणें**—नकोनकोसें करणें; पुरेपुरेसें करणें. ' केव्हां केव्हां थट्टामस्करीनें मरोपुरेसें करी.' -अपूरा ६५.

**मर्कम**—वि. लिहिलेला. -मुधो. [ अर. ]

**मर्ग**—पु. मृत्यु. -मुधो. [ अर. ]

**मर्जीनुरूप**—क्रिवि. मनाप्रमाणें.

**मर्तबत**—स्त्री. मान्यता, दर्जा. -मुधो. [ अर. ]

**मर्तबा**—क्रिवि. वेळ; वेळीं. ' सिदोजी सूर्यवंशी याजबरोबर तीन मर्तबे पत्रें पाठविलीं ती पावलीं.' -पेद २६.१३४. [ फा. ]

**मर्तबा**—पु. पदवी; योग्यता; दर्जा; मान्यता. ' तुम्हावर कुंपणी सरकारची सरफराजी होईल आणि मर्तबाहि मोठा होईल.' -पेद ४१.२७४. [ अर. मर्तबत ] मर्तबात पहा.

**मर्दअफगत**—मनुष्याला टाकणारा. -मुधो. [ अर. ]

**मर्दाई**—स्त्री. शौर्य; पराक्रम; मर्दपणा. [ मर्द ]

**मर्दान**—पु. मनुष्यें. -मुधो. [ अर. ]

**मर्दानगी**—स्त्री. शौर्य. -मुधो. [ अर. ]

**मर्दी**—स्त्री. शौर्य. -मुधो. [ अर. ]

**मर्दुम**—पु. मनुष्य. -मुधो. [ अर. ]

**मर्माघात**—पु. नाजूक ठिकाणीं घाव. [सं. मर्म+आघात]

**मर्यादरेषा**—स्त्री. हुतुतूच्या मैदानांतील प्रत्येक अर्धभागांत मारलेली रेषा. -व्याज्ञा १.१९.३.

**मर्यादा सोडणें**—अतिक्रमण करणें.

**मर्यादी( देऊळ )**—वि. वैष्णव मंदीर; वल्लभाचार्याच्या पद्धतीप्रमाणें पांच वेळ पूजा व पांच वेळ ठराविक वेळीं दर्शन मात्र व्हावयाचें असून इतर वेळीं जें देऊळ बंद असतें त्यास मर्यादी देऊळ म्हणतात. जेथें सर्व काळ दर्शन होतें त्यास स्मार्त रीतीचें देऊळ म्हणतात. -मुवन ३.१.

**मर्यादेंत वागणें**—नियमाप्रमाणें वागणें; आपल्या अधिकाराप्रमाणें वागणें; अतिक्रमण न करतां वागणें.

**मलफुक**—वि. वास्तविक मलफूफ पाहिजे. गुंडाळलेलें; आंत घातलेलें; संगृहीत. ' संध्याकाळीं पत्र बाबासाहेबाचे पत्रांत मलफुक करून पाठविलें तें पाऊन सविस्तर अवगत जालें.' -रा १.११२. [ अर. मलफूफ ]

**मलिक**—पु. मालक; धनि. -मुधो. [ अर. ]

**मलिदा चारणें**—१ पौष्टिक खुराक खाऊं घालणें. लांच देणें.

**मल्झूम**—वि. आवश्यक झालेलें. -मुधो. [ अर. ]

**मल्ल**—पु. एक प्रकारचा बाण. -प्रश १९. [ सं. ]

**मल्ल**—पु. नावाडी. मल्लाह पाहा.

**मल्लगिरी**—स्त्री. पहिलवानाचा पेशा, धंदा.

**मल्लविद्या**—स्त्री. कुस्ती वगैरेचें पहिलवानास लागणारें ज्ञान.

**मल्लीनाथी**—स्त्री. टीका; स्पष्टीकरण; विस्तार. मल्लीनाथ नामक एक प्रसिद्ध टीकाकार होऊन गेला. यानें कालिदासाच्या काव्यांवर टीका लिहिल्या आहेत यावरून.

**मवाजआत**—स्त्री. गांवें. -मुधो. [ अर. ] [ मौज़अ=गांव अने. ]

**मऽकअ**—वि. माहित झालेलें; वसलेलें. -मुधो. [ अर. ]

**मऽकूअह**—स्त्री. मऽकअ.

**मख्दिदे**—उतरण्याची जागा. -मुधो. [अर.]

**मउरूशी**—वि. आनुवंशिक. -मुधो. [अर.]

**मश्गूल**—वि. गढलेला.

**मसकला**—स्त्री. सहाण. -प्रश ८७. [फा.]

**मसणखई-मसणखाई**—स्त्री. स्मशानांतील गर्ता; प्रेत पुरण्याकरितां खोदलेला खड्डा. [स्मशान+खात]

**मसब जमीन**—वि. लाल पांढुरकी अशी जमीन. -शाको. उ १९९.

**मसम**—स्त्री. (गो.) मोझांबिक या पूर्व आफ्रिकेंतील पोर्तुगीज वसाहतीवरून. -सह्या पा ३०६.

**मसमसित**—वि, काळेभोर; मसीवर्ण. 'चंचुपुटें मसमसित.' -भारा अर. ६.१०. [मसी]

**मसाद**—स्त्री. मसादा पहा. मदत; मदतीदाखल दिलेला पैसा. 'पन्नास लाख रुपये पातशाहा मसाद देविली आहे ते मामची आम्हास देवावी कलम.' -पेद १०.१. [अर. मुसाअदा]

**मसारिक**—पु. उधळया; खर्च करणारा. -मुधो. [अर.]

**मसीमलीन**—न. काळेंकुट्ट; काजळासारखें. 'श्रीमंतांच्या कीर्तीस मसीमलीन करून ठेवलें.' -निर्जनग्राम.

**मसुर घोडी**—स्त्री. मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.१४७.

**मसुरी**—स्त्री. तलवारीच्या धारेचा प्रकार. -प्रश १९.

**मस्तक नमविणें**—लीन होणें; नम्र होणें.

**मस्तक पटी**—स्त्री. नासा. -मसाप ४ .२.

**मस्तकमाला**—स्त्री. रुंडमाला. [सं.]

**मस्तकावर अक्षता पडणें**—विवाह होणें; विवाहप्रसंगीं वधूवरांच्या मस्तकांवर अक्षता टाकतात यावरून.

**मस्तूर**—हि. लिहिलेलें. -मुधो. -मुधो. [अर.]

**मस्दूद**—वि. कोंडलेला. -मुधो. [अर.]

**मस्रूफ**—वि. खर्चलेला; ताब्यांत असलेला.-मुधो.[अर.]

**महज**—क्रिवि. पूर्णपणें. -मुधो. [अर.]

**महंत**—पु. (उप.) शठ; लबाड मनुष्य.

**महतकदीम**—वि. फार पूर्वीचें; फार प्राचीन. 'येकूण देहे चार व देशमुखी वतन महतकदीम राजश्री स्वामी आहे.' [महत्+कदीम] महतकदम पहा.

**महदनर्थ**—पु. मोठें अरिष्ट; भयंकर संकट. [सं.]

**महनीय**—वि. मोठा; श्रेष्ठ; आदरणीय; प्रतिष्ठित; योग्यतेचा. [सं. महत्]

**महबालग**—वि. अतिशय मोठें; फार; मुबलक. 'पुढें हिशेब पाहून लोकांस पैका द्यावा, आणि निघोन विठ्ठलपंत व आपण येक होऊन गाठ घालावी त्यास दोन वर्षाचे हिशेब व लोकांचे देणें महबालग. यैवज थोडका.' -पेद ५६०. [अर. मुबलग]

**महमद पर्वत न्याय**—पु. पर्वत जर महमदाकडे येत नसेल तर महमदानेंच पर्वताकडे गेलें पाहिजे. दुसरी व्यक्ति जर आपणाकडे येणें अशक्य असेल तर आपणच तिच्याकडे जाऊन आपलें कार्य करून घेतलें पाहिजे.' -के १२.४. १९१८.

**महरम**—गुप्त गोष्ट. -मुधो. [अर.]

**महसल लावणें**— 'तेथील पैसे नेले आहेत भरणे म्हनौन बहुत इतराजी केली महसल लावले.' -पेद ३१.११६.

**महसली करणें**—अक्रि. पाठविणें; धाडणें. 'वरचेवरी हुजरे महसली करून उष्ण कालांत गला येऊन पावे तें करावें.' -पेद १६.४३. [अर. मु+हासल]

**महला**—पु. जमाव; समूह. 'ते त्याचे घरास आले. महला स्वारांचा पाहिला. त्याचे पुत्रास तरवार दिल्ही.' -पेद १५.५६. [फा.]

**महा अवस्थान**—न. एक पासून बारा वर्षेपर्यंत वसती [सं. महत्+अवस्थान]

**महाक्लेश**—पु. अतिशय दुःख. [सं.]

**महागमनी**—वि. नीच; हलकट; कपटी. 'हे सर्वांनसर महागमनी आहे.' -पेद २४.१९३. [सं.]

**महागिरी**—स्त्री. महत् पहा. मोठें गलबत.

**महागडा**—वि. अतिशय महाग; महागरा.

**महाखड्ग**—न. खड्ग; तरवारीचें नांव. -प्रश १५. [सं.]

**महाजन वाडी**—स्त्री. विशिष्ट जातीचीं सार्वजनिक कार्ये करण्याची जागा. ही महाजनांच्या ताब्यांत सामान्यतः असे यावरून.

**महाजबी शीख**—अस्पृश्यता निवारणासाठीं पंजाबांतील चांभारांनीं शीख पंथ स्वीकारला ती जात. -के १७.४. १९३६.

**महाजाब**—पु. धर्म; धर्मपंथ; महजब पहा. 'यासी कोणीहि हिंदु मुसलमान जे कोणीहि इस्कील करतील त्यांस आपल्या महाजाबाची आण असे.' -सनदा १६४. [महजब]

**महातामसी**—वि. अतिशय रागीट. [सं.]

**महाद्वेषी**—वि. भयंकर द्वेष करणारा. [सं.]

**महान**—न. गरवें; उशीरा होणारें भात. -चित्रकृषि २०७. [सं. महत्]

**महापात**—पु. (फज्यो.) रवि चंद्राची युति झाली असतां दोन्ही ग्रहांची क्रांति समान असेल व दोन्ही ग्रह

एकाच दिशेला असतील तर या योगास महापात म्हणतात' [सं.]

**महापूजन**—न. मोठी पूजा. [सं.]

**महाफिल**—स्त्री. सभा. -मुधो. [अर. महफिल अने.]

**महाभारत**—न. (महाभारतांत भारती युद्धाचेंच मुख्यतः वर्णन आहे यावरून लक्षणेनें) युद्ध; लढाई; रणकंदन. 'पण १८ दिवसांच्या महाभारतानें त्यांचे डोळे उघडले असतील.' -के २२.९.१९३९.

**महाम**—कामें. -मुधो. [अर. मुहीम अने.]

**महायान**—पु. बौद्ध लोकांतील व तत्त्वज्ञानांतील एक पंथ. हा उत्तरकालीन असून हीनयान हा प्राचीन आहे. [सं.]

**महारगुंज**—स्त्री. ढोर गुंज; अश्वगंधी. [महार+गुंज]

**महारागीट**—वि. अतिशय रागीट.

**महाराणी**—स्त्री. महाराजाची पट्टराणी; मुख्य राणी. [सं. महा+राणी]

**महारोगी**—पु. रक्तपिती झालेला मनुष्य. [सं. महा+रोग]

**महाली**—वि. तात्पुरता (नोकर). [अर. महल]

**महास्थान**—न. बारापासून शंभर वर्षापर्यंत वसती. [सं.]

**महिपति**—पु. राजा. [सं. महि=पृथ्वी+पति=स्वामी]

**महिष**—पु. खड्ग; तरवारीचें नांव. -प्रश १५. [सं.]

**महीन**—वि. (व.) मोठा; थोर. 'जंगल काळा कीट। नाहीं कशी मुंगी खिळे। बहिणीच्या जीवासाठीं। घोडा महीन्याचा पळे.' -वलो ४९. [महत्]

**महैसवाथर**—पु. (महानु.) एक मृदु काळया रंगाचा पाषाण, याच्या मूर्ती घडतात.

**महोदार**—वि. अतिशय उदार.

**महोत्कंठ**—वि. अतिशय उत्सुक.

**मळ**—पु. मल पाहा.

**मळद्वार, मळमूत्र**—मलद्वार, मलमूत्र पाहा.

**मळफ**—स्त्री. जमीन न भाजतां केलेलें रोप. -चित्रकृपि २.७.

**मळगी**—स्त्री. (कर्ना.) मळई; मळीची जमीन [सं. मल]

**मळवटा**—पु. (महानु.) मर्दन्या; अभ्यंग घालणारा; अंगास उटणें लावून तेल मर्दन करून स्नान घालणारा. [सं. मर्दन. म. मळणें]

**मळकटा**—पु. जमीन न भाजतां रोप करण्याची जागा. -चित्रकृषि २.७.

**मळाटळा**—पु. मळा वगैरे जमीन; शेत वगैरे. [मळा द्वि.]

**मळी**—स्त्री. मळईची जागा; नदीकांठचा गाळाचा प्रदेश. 'ढवळपूरचे मळीस मुक्काम असतां सवाई जयसिंग माळवे प्रांताचा सुभेदार त्याची भेट नानासाहेबांनीं घेऊन बोलणें होऊन तहाचें बोलणें ठरलें.' -रा २. पेश ९१. [मल]

**मळींत**—न. मळणी. 'पिकाचें मळीत तुमच्या हिश्शाचे तारोतर तुमच्या घरीं आणून देईन.'

**मळीनलेवा**—वि. मलीन वस्त्रें धारण करणारा; मळके कपडे घालणारा; अस्वच्छ वस्त्रांचा. 'एक भवने एक नागवे। वल्कलधारी मळीनलेवे।' -आरा. अर. ४.४.

**मा**—आम्ही. -मुधो. [अर.]

**माकड खोकला**—पु. डांग्या खोकला.

**माकड नारिंगी**—स्त्री. एक वनस्पती. हचा पाला डांग्या खोकल्याबर देतात.

**माको**—स्त्री. एक क्षुद्र देवता. 'जेथें माको असे तराळी ... मेसको वळी शोभनिका।' -भारा. अयो. २.७.

**मांखण**—न. अभ्यंग स्नान; अंगास तैलादि मर्दन. -आडिमहा १९. [सं. मृक्ष्]

**माखली**—स्त्री. एक जलचर. चार पांच बोटें लांब असून खाण्यास रुचकर असते. -आनंद १५.२.१६. [सं. मत्स्य]

**मागणें**—अक्रि. १ किंमतीची चौकशी, विचारपूस करणें; अमूक किंमतीस पाहिजे असें म्हणणें. २ लिलावांत वगैरे बोली बोलणें.

**मागधी**—स्त्री. एक प्राकृत भाषा [मगध]

**मागोवा**—पु. अनुसरणें; मागून जाणें; माग; पत्ता. 'व्यासाचा मागोवा घेतु.' -ज्ञा. माघोवा पाहा.

**माग्या**—पु. विणकर; कोष्टी; माग चालविणारा. 'पीतांबराचा माग्या गांवास आमचे वोळखीचा गेला आहे.' -रा १२.३१४.

**माघाड**—स्त्री. मागील बाजू; मागलेपणा; पृष्ठस्थान. 'वडिलपण आघाड संभाजीकडे, धाकुटपण माघाड संताजी बिन महादोजीकडे.' -रा ६. पृ. ३३. [मागें]

**माघारीं**—क्रिवि. मागें; पश्चात्. 'माझ्या माघारीं तुझें कसें होईल?' [मागें]

**माचवा**—पु. १ माचा पहा. अद्र; क्षोभ; माळा; मांडव. -मसाप ४५.२. २ पलंगाचा खूर; पलंगाचा पाय. 'यापेक्षा कोठीस दात थोर असिला तर त्याचे माचवे चार पलंगाचे करऊन पाठवणें.' -पेद १८.१८९. 'छपर पलंगाचे माचवे रंगावयासी दिले आहेत.' -पेद १८.१७०.

**माचील**—पु. (गो.) मेणा. -सह्या. पा. ३०७. [माचा, मंचक]

**माजपट्टा**—पु. मेखला, कांची. -मसाप क ६. [ मध्य-माज+पट्ट ]

**माजरत**—स्त्री. खातरजमा; खातरी. 'कलह परस्परें दूर करवावया व जुंजास आम्ही इच्छित नव्हतों ये गोष्टीची माजरत करावी इतक्या गोष्टी शाहाचे रुबरु करार जाल्या.' -पेद २१.२०२. [ फा. ]

**मांजा**—पु १ एक प्रकारचें गलबत. २ पतंगाचा लुगदी लावून केलेला दोरा.

**मांजा सुतणें**—दोऱ्यास लुगदी लावून मांजा तयार करणें.

**माजरा**—पु. प्रसंग. -मुधो. [ अर. ]

**माज्या**—वि. मध्यस्थ. 'आंडेरकर याणे नारायेण सेणवी माज्या तयार करून खर्चायास व पालखी सरंजाम देऊन केला असे.' -पेद ३५.१७४. [ सं. मध्य-माज ]

**माझेपण**—न. आत्मीय भावना.

**माठणें**—सक्रि (व.) ठोकून बसविणें; रचणें. 'पितळी पलंग। खिळे माठले लवंगी । कोण कारागीर रंगी?।' -वलो ४८. [ सं; मंथन ]

**मांडण**—स्त्री. नाचण्यांची रोपें उपटून पुन्हा त्यांची केलेली लावणी; आवटणी. [ मांडणें ]

**मांडल**—न. एक वेताचें वाटोळें कडें; सुतास पीळ देण्याकरितां उपयोग करितात. [ सं. मंडल ]

**मांडीव**—वि. नवीन लागवडीस आणलेली (जमीन). [ मांडणें, किंवा सं. मंडनम् ]

**मांडीवाळ**—स्त्री. (गु.) तडजोड. 'केस मांडीवाळ करण्याबद्दल दिलेल्या हुकुमाचा अनादर करण्यांत आला.' -विविध १.१०३९.

**माडू वांगें**—न. लांब वांगें.

**माणकाई-मागी**—स्त्री. मुंग्या किंवा चाचड नाहींसे करणारी देवता.

**माणिक प्रभु संप्रदाय**—पु. सर्व लोकांत ऐक्य घडवून आणण्याकरितां माणिक प्रभू स्वामींनीं स्थापन केलेला पंथ. हुमणाबाद येथें याचें पीठ आहे.

**मातंग पोशी**—स्त्री. कोणी मृत झाला असतां त्याच्या आप्ताची समाचारासाठीं ध्यावयाची भेट. 'भालेराव बाबा वारले म्हणून आम्ही मातंग पोशीस येत आहों अशी संपादणी करून तो प्रसंग निवारला.' -ज्ञामं आक्टो ३६. [ मातम पुरशी पहा. ]

**मातर**—स्त्री. (व.) मात्रा. 'ऐक सोयऱ्याचे बोल। कडुनिंबाची मातर। पित्या जाईल तुलारे। रात वैऱ्याची कहर॥' -वलो. [ सं. मात्रा. ]

**मात(तु)ळप**—न. वृक्षविशेष. 'करूनि कस्तुरीचे वाफे। लाविजती इंद्रनीळाचीं रोपें । तैसीं वनांचीं निळीं मातुळपें। परिमळेंसीं।' -नरुस्व ७२४.

**मातियेडे**—पु.अने. मातीकाम करणारे; सैन्याला रस्ता करून देणारे. 'वेगीं भूमि सज्जिती मातियेडे । गजरथ घोडे चालावया।' -भारा. अयो १५३. [ माती ]

**मातींत जाणें**—व्यर्थ होणें; फुकट जाणें; नाश होणें.

**मातृस्थान**—न. (फज्यो.) कुंडलींतील चवथें स्थान. [ सं. ]

**मात्र, मात्रा**—स्त्री. (महानु.) अल्पकाळ. 'मात्र चौथ्या विभागातें म्हणतलें.' -वि ९६.

**मांत्रिक तंत्र**—न. मंत्रविद्येंतील विधी.

**मात्स्यन्याय**—न. मोठ्या माशानें लहान माशास गिळावें हा न्याय. मोठे भांडवलवाले लहानसान उद्योगधंदे बुडवितात इ. गोष्टीस अनुलक्षून. [ सं. ]

**मादवान**—स्त्री. मादी; घोडी. 'गवतहि आहे. सुभिक्ष धान्य आहे. याकरितां वडिली पागेच्या मादवाना वीस पंचवीस पावेतो पाठविलिया उत्तम आहे.' -पेद ९.११. 'खासा बसावयाची मादवान उंदेरीवरील गोळी लागून ठार झाली.' -पेद ३३.५८. [ मादी ]

**मादुरी**—पु. (महानु.) वार्ता सांगणारा; बातमी सांगणारा. 'मानसा आंतु बैसला असे मादुरी येतो जी जी आळउनि भणे' -अज्ञातच ५७. [ मात ] मांदुरी पहा.'

**मांदेल**—पु. (ठा.) एक जातीचा मासा.

**मांद्री**—स्त्री. (गो.) शेंदरी, चटई (बसका विधींतील बसावयाची) ही एकदां घातल्यावर तीन दिवसपर्यंत उचलावयाची नसते. 'नंतर चटईवर (हिलाच बसका अगर मांद्री म्हणतात) मुख्य गांवकरी यांनीं बसावयाचें असतें.'

**माधवी**—स्त्री. चंद्राची सतरावी कळा. 'नेणों ते कैसी चांदिणे यांची माधवी । जडा समुद्रातें ही माजवी । भरितेयाचे निमिसें वोल्हावी। पृथ्वियेसी।' -नरुस्व ५०५. [ सं. ]

**माध्यम**—न. साधन. **शिक्षणाचें माध्यम**-बोधभाषा; शिक्षणाची भाषा. [ सं. ]

**मान**—न. प्रमाण; अवसान; आटोका. 'तिकडून हावभर होऊन जडगीर होईल आणि यावयास लागेल ते समई बरा मानात येईल, तेव्हां येक समयावच्छेदे यालगार करून गनीम नाहींसाच करावा.' -पेद ३३.२९. [ सं. ]

**मानकांड**—न. चुनखडी मिश्रित काळी जमीन. -चित्रकृषि २.७०.

**मानचित्र**—न. प्रमाणबद्ध आकृति; नकाशा. 'आशियांतील भावी रणक्षेत्र म्हणून मानचित्र देण्यांत आलें होतें.' -के १० ६.१९४१. [सं.]

**मानट**—वि. चिकट; लापण (जमीन).

**मानद**—क्रि. रहावें. -मुधो. [अर]

**मानदंड**—पु. माप; प्रमाण; मोजण्याचें मान. 'वाङ्मय हीन ठरवतांना आपल्याला कांहीं तरी मानदंड ठरविला पाहिजे.' -के ८.१.१३९७. [सं. मान+दंड]

**मानबिंदु**—पु. अभिमानाचें स्थान; अभिमान केंद्र. 'प्रत्येकाच्या शरीरांत मानबिंदूची नस आढळेल.' -के २९.३.१९४०. [सं.]

**मानभावीपणा**—पु. ढोंग; कपट. [सं. महानुभाव+पणा]

**मानमार्ग**—पु १ योग्य वर्तन; प्रसंगाप्रमाणें वागणूक; प्रमाणशीर वर्तन; परिस्थितिप्रमाणें वागणूक. 'सिक्षा लिहिली असे तुम्ही तो सर्व मानमार्ग जाणता परंतु लोकीं सुचरितार्थाचा लेखन करावे.' -पुद १ १४१. 'आमचे विचार ऐसे आहे जे मानमार्ग पाहिल्यास तेणेप्रमाणे वर्तणूक केल्यास बोल लागणार नाहीं.' -पुद १.१४२. २ परिस्थिति; बनाव; संधि. 'मानमार्ग कैसा पडतो हें पहावे हे रीतच आहे.' -पेद १५. ३४ [सं. मान+मार्ग]

**मानमोडी**—स्त्री. एक रोग. 'दुष्काळ व मानमोडीच्या कचाट्यांतून हवालदील झालेली जनता एकदांची बाहेर पडली.' -स्मृतिचि ३.१३९. [मान+मोडणें]

**मानवळ**—न. (गो.) मानेचा भाग. 'जातांना तिची पाठमोरी आकृति व भरीव अंबाड्याखालचें गौरवर्ण मानवळ त्याला खरोखरच सुंदर वाटलें होतें.' -अधारांतील वाट. [सं. मान+वळी]

**मानसशोध**—पु. मनांतील आशय शोधून काढणें; मनांतील भाव, हेतु याबद्दल तर्क करणें 'या उपरी मातुश्री दर्याबाई यांचा मानसशोध आपण पाहिला कीं, श्रीमंतानी राजपुत्रासी न्यावयाचा उद्देश धरिलाच तरी काये विचार?' -पेद २६.२६. [सं.]

**मानसिक**—न.अत्यंत अल्पत्व; केवळ काल्पनिक अस्तित्व. 'आपलीं बंदरें पन्नास साठ हजार रुपये आकारतात त्या येवजास मानसिक जालें येणेकरून सरकारचें नुकसान होतें.' -पेद ४०.६३. [सं. मन, मानसिक]

**माना**—पु. वर्चस्व; वरचष्मा; ताबा; अमल. 'प्रजनेकालीं आगीचा मार त्याचा चालता दिसत नाही तेव्हा आपला माना पडेल येैसे वाटते.' -पेद १६.५५. [फा.]

**मानापमान**—पु. सन्मान व अवमान; गारव आणि लघुता. [सं.]

**मानी**—क्रिवि. मानानें; अंतरावर. 'मोच हातघोंडया मानी गेले असावेत.' -पेद २ ६३. [सं. मान]

**मान्दन**—राहणें. [अर.]

**मान्दह**—राहून. [अर.]

**माफीचा दावा**—पु. नादारी दावा.

**माब दौलत**—अस्मादिक. -मुधो. [अर.]

**माबैन**—मध्यंतरीं. -मुधो. [अर.]

**मायमोतब**—न. (चुकीचा शब्द) माही मरातब पहा.

**मायल**—वि. व्यग्र. -मुधो. [अर.]

**मायवत्**—न. क्षेत्रांतील लोकजात: एखाद्या भूमीतील, गांवांतील सर्व मंडळी 'म्हनउनु समस्त मायवत बैसोन विचार केला आणि तुम्हापासी येउनु तुमच्या गळा पडोन तुम्हास कुळकर्ण व घरटा दिधला असे.' -रा १४.१.

**मायह**—वि. शंभर. -मुधो. [अर.]

**मायेची शाल**—ममतेची पाखर; प्रेमळपणा.

**मारगमळा**—पु. वनभोजन. [मार्ग+मळण] खालीं पहा.

**मारचुकवा**—पु. एक मुलांचा स्काऊट खेळ. -व्य.ज्ञा १.३०४.

**मारफा**—स्त्री. लांकूड घांसून साफ करण्याची पोलादी मोठी कानस.

**मारवा**—स्त्री. मार्या; खिस्ताची माता मेरी. 'तीन चार शतकांत मारवा देवीची व येशूची भक्ति त्यांस कां बरें फलद्रूप झाली नाहीं.' -नि १२६३. [मेरी]

**मारहम**—क्रिवि. कृपेनें; दयेनें. 'कसबे मजकुरी देणें मारहम मालोजी व विठोजी भोसले बाहुजती भोगवटे तसरूफाती चालिले आहे.' -रा १५.३७२. [फा. मा+रहम=दया]

**मारूडी**—स्त्री. विहीर खणतांना आंतील माल वर काढणें किंवा आंत सोडणें यासाठीं पाटी ठेवण्याकरितां केलेली लांकडी चौकट. ही विशेषेंकरून ओल्या बाभळीची करतात. -विहीर.

**मारू**—पु. विणकर; कारागीर. 'पांच सात मारू बोलावून त्यांस धोतरजोडे तयार करावयास सांगितले आहेत.' -देवीश्री अहिल्याबाई २८६.

**मार्ग**—पु. (ल.) युक्ति; उपाय. 'या संकटास कांहीं तरी मार्ग काढला पाहिजे.' [सं.]

**मार्ग मळणें (मारग मळणें)**—गांवाबाहेर जाऊन जेवण करणें. -पेंडसेकु ३३७.

**मार्ग सुधारणें**—वाट धरणें; वाटे लागणें; पळून जाणें.

**मार्गी होणें, लागणें**—नक्षत्रक्रमानें ग्रह चालूं लागणं; क्रमानें एका राशींतून दुसऱ्या राशीकडे जाऊं लागणें. याच्या उलट वक्री होणें.

**मालकता**—स्त्री. धनीपणा; स्वामित्व; अधिकार. 'त्याचा काल ... सासवड येथें जाहाला नंतर त्याचे वडील चिरंजीव बाजीरावसाहेब याजकडे मालकता आली.' -मदरु २.७७. 'नंतर त्याचे चिरंजीव नानासाहेब याजकडे मालकता आली.' -मदरु २.७९.

**मालकसर**—स्त्री. किंचित् लाभ; मालावर मिळणारा थोडाफार नफा.

**मालकाळी**—स्त्री. शेतीची जमीन.

**मालकाळीचे कागद**—जमिनीची मालकी; क्षेत्र;आकार वगैरे माहिती देणारे कागदपत्र.

**मालगमाऊ**—वि. नुकसानकारक.

**मालजमीन**—स्त्री. काळी जमीन शेतीच्या लायक जमीन; मालकाळी.

**मालतोटा**—पु. मालावरील नुकसान, हानि.

**मालमुलूख**—पु. चीजवस्त; स्थावर जंगम माल.

**मालका**—पु. (व.) ठेवण; आकार; रचना. 'त्या मुलाच्या तोंडाचा मालका कसा सजेला आहे.'

**मालकी पद्धति**—स्त्री. खेडा जिल्ह्याच्या थासरा तालुक्यांत आढळणारी एक जमीन धारण करण्याची पद्धति. या पद्धतींत मालक सांगतील ते तलाठी सरकारनें नेमावयाचे असतात. धान्याच्या उत्पन्नांतून ७ ते ९ आणेपर्यंत हिस्सा मालकास मिळतो. शिवाय मालकाकडे कांहीं सारामाफीची जमीन असते.

**मालबाजी**—वि. मालबंदी पहा. मौल्यवान; किंमती; ऐवजदार. 'किरकोल जिनस मालबाजी नव्हे परंतु आला' -पेद २८.१४६.

**मालमर्दन**—पु. मल्लमर्दन; मल्लांचें मर्दन करणारा. 'मालमर्दन नटनाटक । अ.वाहक वज्र प्रक्षालक।' -भारा अयो ८.४५.

**मालवज**—पु. मालमत्ता; वस्तुजात; जिन्नस; पदार्थ. 'आपला हिशोब कितेब ऐवज मालवज तरता बुडता पहात असतात.' -पेद २८.८५. 'तुम्ही तेथें असतां एवज मालवजाची कालजी करावी असे नाही.' -पेद ३७.०४. [फा. माल+एवज]

**मालखंड**—न. नाबदसाखर; खडीसाखर. 'तेथिचेया पानांच आगर कोण जाणे। आनाकी जातीची उसरणें। गुळसाखर मालखंडांचे घाणे। दिसती वनाभंवते।' -नरुस्व. [सं. माला+खंड]

**मालिक**—पु. १ मालक पहा. २ टोळीचा नायक. ३ एक मुसलमान जात. -के ३.६.१९४१.

**मालिक मक्बुझा**—पु. मध्यप्रांतांत जमीन धारण करण्याची एक पद्धति.

**मालिनी**—स्त्री. स्त्रियांच्या उपवर्गापैकीं एक वर्ग. मुख्य वर्ग चार. १ पक्षिणी, पद्मिनी? २ शंखिणी, ३ चित्रिणी, ४ हस्तिनी.

**मालियत**—स्त्री. बहुमोल, किंमतवान, विशेष किंमतीचे, देण्यास कठिण इतक्या मोलाचें सामान. 'स्वामीपासी हे बहुत मालियेत नाहीं.' -पेद १४.९. [फा. माल]

**माल्हाडी**—क्रिवि. आनंदानें. 'वसंतु वनदेवतांसी सांगे गोष्टी। तेणें उठीति अनंगाचिया दाटी। म्हणौनि विषया जगजेठी। माल्हाडी नाचताती।' -नरुस्व ७७३.

**मालिवज**—पु. जिन्नस रूपानें रक्कम; माल रूपानें रक्कम 'येथील ऐवज मालिवज जमा जाहाला असेल त्याचा राजभाग याचे दुमाल करणें.' -रा १६.६५. [माल+ऐवज]

**माव**—स्त्री. (प्र. भाषा) आधार; त्राण; तत्त्व; तथ्य; हिंमत 'महिपतराव बाबर व लिंबाजी बाबर सतर असामी जागाचवरी राहिली. परंतु ईश्वरें माव राखिली नाहीं.' -पेद ३७.११. [माया पहा]

**मावद**—न. माळवद; माडी. 'मावद मोठें घरापुढें वमरी तारांची। आंत बैठक सख्याची।' -वलो २. [माळवद]

**मावल्या**—स्त्री. अनेक. (अदि) मातृका. [सं. मातृ]

**मावा**—आम्ही. -मुधो. [अर.]

**मा न**—दही.

**मासतोंडी**—स्त्री. (ठाकरी) एक हरभऱ्या एवढें करवंदासारखें लागणारें फळ.

**मासमस्कांड**—न. मांस वगैरे. 'ह्येला घवाचा तुकडा घाल, मासमस्कांड घालूं नग.' -उपेअंत ४. [मांस द्वि]

**मास्त**—पु. एक मुलींचा खेळ. व्याज्ञा १ ३९०.

**मा र**—पु. चिन्ह. -मुधो. [अर.]

**मासोळी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३६२.

**माहजबा, महजबा**—पु. मुद्दा; जबाबदारी; बाब. 'आतां पाहातच आहां. कोनकोनावर काये काये माहजबे निघतात.' -पेद २०.१९८. [अर मझहबा]

**माहा**—सर्व. (व.) माझा. 'पहिला माझी ओवी। पहिला माहा नेम।' -वलो १.

**माहीबीज**—स्त्री. (ठाकरी.) माघ शुद्ध द्वितीया. या दिवशीं चंद्रदर्शन होईपर्यंत उपवास करून, चंद्रदर्शनानतर भोजन करतात.

**माहुत उतार**—पु. (मल्लखांब) वगली करून बोंडावर जाऊन उतरणें. -व्याज्ञा ३.२१९.

**माहुत फरारा**—पु. (मल्लखांब) माहुत उतार करून बोंडावर बेबी ठेवून केलेला तोल. -व्याज्ञा ३.-१९.

**माहुर**—वि. महामूर पहा. भरभराटलेला; संपन्न; चांगला वसलेला; आबाद. 'गांवीची लावणी संचणी होऊन माहूर गांव होय ते गोष्ट केली पाहिजे.' -रा ३.१७९. 'खारीची बंदिस्त होऊन माहूर होईल.' -रा २.२५९ [महामूर ?]

**माहेरू**—पु. माहेरचा मनुष्य. 'सद्गुरु ऐसा माहेरू। मग किर्तीसी धणी कां करूं।' -ज्ञा.

**माळ**—स्त्री. गळयांत घालावयाचा हार; माला. इचे अनेक प्रकार असतात. उदा. पुतळयांची, जवांची, गव्हांची, कुयऱ्यांची, पोवळयांची, रुद्राक्षांची, नवरत्नांची, स्फटिकांची, तुळशीच्या मण्यांची, मोहनमाळ इ.'

**माळकरी**—पु. पंढरपूरची यात्रा करून माळ घातलेला; गुरूचा उपदेश घेतलेला.

**माळचा गुट्टा**—पु. पेटारी. -चित्रकृषि २.७.

**माळधर**—वि. श्रेष्ठ लोक; मोठे लोक. 'हा संवादु माळधरांचिया लेंकी। बोलती बनकरांचिया वतुकी। सरोवरीं गोष्टी करीति कवतुकीं। वनदेवता।' -नरुस्व ८२५. [सं. मालाधर]

**मिअत**—वि. शंभर. -मुधो. [अर.]

**मिठा वहार**—पु. गोड फळांचा हंगाम. कांहीं झाडांना वर्षांतून दोनदां फळें येतात. एका वेळचीं आंबट अगर बेचव असतात व एका वेळचीं गोड असतात. उदा. अंजिरांस एप्रिलमेमध्यें गोड फळें येतात. त्याचप्रमाणें संत्र्यांचा गोड बहार उन्हाळयांत असतो.

**मिठू**—पु. पोपट. 'लाल लाल मिरची आणतील आणि मिठूच्या लाल लाल चोंचींत देतील.' -जीवनकलह. [ध्व.]

**मिझाज-दानी**—स्त्री. स्वभाव ज्ञातृत्व. -मुधो. [अर.]

**मितभुक्**—वि. बेतानें जेवणारा; मिताहारी; मोजकें व वेळेवर खाणारा. -के १३.१.१९४२. [सं. मित+भुज्]

**मिन**—अव्यय. पासून, पैकीं. -मुधो. [अर]

**मिन्जुम्लह**—बेरजेपैकीं. -मुधो. [अर.]

**मिन्नी**—वि. गोटयांच्या खोळांतील एकवाचक शब्द. -व्याज्ञा १.१५२.

**मिमी**—स्त्री. स्तनाग्र; स्तनाची बोंडी. 'मिम्या झाल्या आतां पाहिजे वर.'

**मियामन**—आशीर्वाद; देणगी; सुदैव; सद्गुण. -मुधो. [अर.]

**मिराणी**—स्त्री. एक वस्त्र विशेष मिरादाणी पहा.

**मिरात**—पु. आरसा. -मुधो. [अर.]

**मिरादाणी**—स्त्री. विशिष्ट प्रकारची साडी, लुगडें- 'खोंडल देव पुरा। टाके अंगावर पाणी। भिजे साडी मिरादाणी।' -वलो १.

**मिराशी**—वि. १ मिरासदार; वतनदार. २ भंडारी. 'मिराशी म्हणजे भंडारी म्हणून त्यास भंडारवाडा असें म्हणतात' -गोराघ ११३.

**मिलागार**—स्त्री. चर्च; खिस्ती मंदिर. 'कमरेंतील चांदीचा गोफ व मिलागरींत जाण्याचा आपला सूट.' -मशा ३६.१२.

**मिल्लत**—स्त्री. धर्म. -मुधो. [अर.]

**मिशन**—स्त्री. १ धर्मप्रसारक संस्था. २ एखादें आयुष्याचें ध्येय. [इं]

**मिसी चपाती**—स्त्री. प्रवासांत खाण्यास योग्य व टिककारी चपाती. -के १२.९.१९३९.

**मिस्दाक**—सत्याचरण. -मुधो. [अर.]

**मिहक**—कसोटी. -मुधो. [अर]

**मीठ**—न. लवण; एक खारट पदार्थ; याच्या खाण मीठ (खाणीतून काढलेलें, काळसर रंगाचें), खारें मीठ (सोरा, दारु कामांतील) समुद्रमीठ अशा जाती आहेत. [सं. मिष्ट]

**मीदहद्**—देतो. -मुधो. [अर.]

**मीफर्मायम**—क्रि. फर्मावितो. -मुधो. [अर.]

**मीर अतीश**—पु. तोफखान्यावरील अधिकारी.

**मीरजाफरीवृत्ति, कारस्थान**—स्त्री. मीरजाफर हा सुराजउद्दौला याचा सेनापति इंग्रजांस फितूर होऊन नबाब झाला यावरून. फितुरी, राजद्रोह. 'मि. जिना यांनीं विलायतेतील पार्लमेंटाच्या एका सभासदास पत्र पाठवून 'मीरजाफरी' कारस्थान सुरू केलें होतें.' -के ७.११.१९४१.

**मीरबक्षी**—पु. सैन्याचा पगार वाटणारा. -ज्ञाको (१९) ५१.

**मुअज्जम**—पु. श्रेष्ठ. -मुधो. [अर.]

**मुअझ्झ-इलहै**—वि. उपर्युक्त. -मुधो. [अर.]

**मुअतकिद्**—पु. निष्ठावान. -मुधो. [अर.]

**मुअतमिद्**—पु. विश्वास. -मुधो. [अर.]

**मुअल्ला**—पु. उच्च. -मुधो. [अर.]

**मुआनिदान**—पु. शत्रू. -मुधो. [अर. मुआनिद अव.]

**मुआफ**—माफ पहा.

**मुआली**—वि. उच्च. -मुधो. [ अर. ]

**मुकद्दमत**—स्त्री. पुढारीपणा. -मुधो. [ अर. ]

**मुकद्दसह**—स्त्री. पवित्र. -मुधो. [ अर. मुकद्दस-स्त्री. ]

**मुकय्यद**—वि. कैद झालेला. -मुधो. [ अर. ]

**मुकर्रम**—वि. उदार. -मुधो. [ अर. ]

**मुकातलह**—स्त्री. लढाई. -मुधो. [ अर. ]

**मुकातिर**—वि. विपुल. -मुधो. [ अर. ]

**मुकाबलह**—मुकाबला पहा.

**मुकाबला**—पु. पडताळा; समोरासमोर भेट; नजरानजर; दृष्टादृष्ट; एकसमयावच्छेदें करून आगमन. ' २५ सवालची मुकाबल्याची तारीख २५ जानेवारी येते. ' -वरामो. [ अर. [ अर. मुकाबलह ]

**मुकाबल्याचा**—वि. जोडीचा; सारखा; सदृश; समोरचा; सरूप. ' जो एक बुरुज पूर्वीं शिवाजी विठ्ठल यांनीं बांधिला होता त्याच्या समूर विठ्ठलराव यांनीं एक नवीन बुरुज त्याच्या मुकबल्याचा बांधिला. ' -विंचूइ २२५.

**मुकामी**—कायम असणें. -मुधो. [ अर. ]

**मुका होणें, पडणें**—मौनावणें; शब्द न सुचणें; तोंडाबाहेर न येणें. ' तेथ वेद मुके झाले. '

**मुक्यांची शाळा**—स्त्री. मुक्या लोकांस बोलके करण्याची शाळा.

**मुकी( तोफ )पाडणें**—तोफ बंद पाडणें.

**मुकी-क्की**—स्त्री. ( वा. शी. ) मुठी वळून एकमेकांवर हल्ला करून खेळण्याचा प्रकार; हा इंग्रजी बॉक्सींग खेळाप्रमाणें आहे.

**मुक्तछंद**—न. वृत्तादि नियम नसलेली काव्यरचना पद्धति. केवळ तालबद्धता व भावनाविष्कार यांवर गेयत्व अवलंबून असलेली काव्यपद्धति [ सं. ]

**मुक्तदा**—पु. पुढारी. -मुधो. [ अर. ]

**मुक्तहस्तशीर्षासन**—न. ( मल्लखांब ) जमिनीवर हात टेकून मल्लखांबाजवळ शीर्षासन करून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.६०. [ सं. ]

**मुक्तिफौज**—स्त्री. एक ख्रिस्ती धर्म संस्था. संस्थापक विल्यम बूथ यांचा पोषाख भगवा व देशी पद्धतीचा असतो. समाजसेवा हें कार्य. इं. सॉलव्हेशन आर्मी.

**मुख**—न. ( ल. ) तोंडी बातमी; तोंडचे शब्द. ' स्वामीकडील बहुतसे मुख आले आहे कीं, ब्राह्मण परभू येक जाले आहेत. आणि तिसरा मराठ यासीहि आपल्यात सामील केले. ' -पेद ६.४६. [ सं. ]

**मुखडा लावणें**—चेहऱ्याच्या सहाय्यानें हावभाव करणें; निरनिराळ्या तऱ्हेचे चेहरे करणें. ' तबला, पेटी व तंबोरा यांच्या सुरांतून श्रोत्यांनीं गायकाच्या सुराची परीक्षा करावयाची आणि त्याची शास्त्रांतली प्रगति ठरवावयाची ! त्यांतच पुन्हा तबलेवाल्याच्या व गायकाच्या झुकांड्या, तें समेवर येणें, तानांबरोबर कलाटणी देणें, मुखडा लावणें, माना डोलावणें इत्यादि इत्यादि आहेच ! ' -रायआवळे १३.

**मुख प्रदेश**—पु. नदीच्या मुखाशीं गाळ सांचून बनलेला त्रिकोणी भूभाग. इं. डेल्टा.

**मुखबीर**—पु. हेर; बातमीदार; वार्ताहर. [ अर. मु+खब्र= बातमी ]

**मुखमस्ती**—स्त्री बडबड; वटवट; नालस्ती; मुजोरी. -पुरु. मार्च १९३२. [ सं. मुख+मस्ती ]

**मुखलेप, मुखलेपन**—पुन. लांच. ' राय हे मुखलेप झाल्यामुळें राष्ट्रसभा व हिंदुस्थान... ' [ सं. ]

**मुखश्रय**—पु. चंदन. ' मुखश्रयाची खुडुनि पालवी। विजणें केलेंस पल्लवीं। वरिवानि ठेविली नवी। कळे कामाची। ' -नरुस्व ५५२.

**मुखांजन चूर्ण**—न. चेहऱ्याला लावण्याची सफेत सुवासिक पूड. -पुरु. नोव्हेंबर १९३९.

**मुखातिब**—पु. पदवीधर. -मुधो. [ अर. ]

**मुखालिफान**—पु. विरोधी. -मुधो. [ अर. मुखलिफ अव. ]

**मुख्तसर**—वि. प्रमुख, मुख्य. ' सदरहू दहा आसामीपैकी येक मुख्तसर शास्त्री केले आहेत. ' -पेद ४२.६.

**मुख्तार**—पु. पसंत केलेला; प्रतिनिधि. -मुधो. [ अर. ]

**मुख्लिस**—पु. मित्र; निष्ठावंत. -मुधो. [ अर. अव. मुख्लिसान ]

**मुगवडी**—स्त्री. मुगांची वडी; मुगदळाची वडी. ' वैराग्यकढें कढविली कढी। तीमाजी माया मुगवडी। विरोनि स्वादा आली गाढी। -भारा बाल २३.११०.

**मुगाची मोगरा**—स्त्री. ( इंदूर ) मुगाची एकदली डाळ.

**मुग्ध बसणें**—स्वस्थ बसणें; गप्प बसणें; न बोलतां बसून राहणें.

**मुग्राब**—स्त्री. तलवारीचा एक प्रकार; मगरबी पाहा. -प्रश ४०. [ फा. मगरेब ]

**मुचलक्या**—स्त्री.अव. हातपाय बांधणें.

**मुजफर**—पु. विजयी. -मुधो. [ अर. ]

**मुजरा**—पु. ( गवई ) ( ल. ) थोर मनुष्याच्या पुढें गाणें वगैरे म्हणून हजेरी लावणें, त्यास अभिवादन करणें.

'शहरांतील सर्व गाणारणी व नाचणारणी येऊन मुजरा करणार आहेत.' -प्रतिआ ३७.

**मुजरंद**—वि. चालू. -मुधो. [अर.]

**मुजाफ**—वि. पूर्वीहून अधिक असलेला. -मुधो. [अर. मुजाफात]

**मुजारी**—पु. शेतकरी. 'सुभे गुजराथची चौथाईची सनद सरबुलंदखान व आलाबिरदीखान याच्या मोहरेनसी करोडे व जागीरदार व फौजदार व ठाणेदार देसाई कानगो व मोकदम व रयेत व मुजारी याच्या नावे.' -पेद १५.८६. [अर. मुझारिअ]

**मुजाहिद**—पु. लढवय्या. -मुधो. [अर.]

**मुजाहिदीन**—पु. जिहादचा प्रचार करणाऱ्या वसाहती. -मुधो. [अर.]

**मुजाहिमत**—स्त्री. अडथळा. -मुधो. [अर.]

**मुजोर**—वि. (तुर्कीनें) माजोरा; तापट; बेफाम. 'मी नवीनच घोडा घेतला होता तो अतिशय मुजोर होता.' -शिआ ४५. [फा. मुह+जोर]

**मुंज्यामणि, मुंज्या ब्रह्मचारी**—मुंज झालेला मुलगा.

**मुटकणें, मटका**—नपु. मुटकुळें; मुठींत दाबून केलेला पीठ, भात वगैरेंचा गोळा. [सं. मुष्टि–भूठ]

**मुटमर्द**—वि. भयंकर; बलिष्ठ. 'पठाण जात सर्वत्र चोर, दगाबाज, मुटमर्द. तिकडे जाण्याचा मार्ग मोठा अवघड.' -सभारंजनी भारतवर्ष ७१. [मूठ+मर्द]

**मुट्ट**—स्त्री. (कर्ना.) मूठ बैलाची पहा.

**मुटया**—पु. एक जातीचें कबूतर.

**मुठाल**—स्त्री. धनुष्याच्या मध्यभागीं तें मुठींत धरण्यासाठीं केलेली जागा. [सं. मुष्टि]

**मुठ्या**—पु. नांगराचें रुमणें; नांगराचा दांडा हातांत धरण्याचें लांकूड. -चित्रकृषि २.७. [सं. मुष्टि]

**मुठ्या**—पु. समुद्रकांठच्या खडकांतील भागांतून राहणारा काळसर तांबडा खेकडा.

**मुंडा**—पु. प्रगंड; गंडस्थल. -मसाप ४५.६. -वि. भुंडा; ओका; रिक्त; मोकळा. [सं. मुंड]

**मुडुग्रे**—न. लग्नाचे वेळीं नवरी मुलीचे हातांत घालावयाची सोन्याची आंगठी, वळें इ.

**मुडूप**—न. १ देवास वाहिलेला जिन्नस. अंगावरचा किंवा इतर एखादा दागिना वगैरे मुडपून देवास नवसाकरितां वगैरे वाहतात तो. २ देवास सालाबाद वहावयाची रक्कम, वस्तु. [मुडपणें]

**मुड्डोशी**—स्त्री. (गो.) लहान व रुचकर माशांची एक जात.

**मुंड्याचें शेत**—१ मुंडयानें लावलेली जमीन; कांहीं ठेव घेऊन खंडानें दिलेली जमीन. २ मुदतबंदी गहाणानें लावलेली जमीन; ठेवी गहाण; विशिष्ट मुदत भोगून मुदत सरल्यावर परत करण्याच्या अटीवर घेतलेली जमीन.

**मुंढरी**—स्त्री. (वप्र.) मुंढेरी पहा. 'कल्याणभोंवतीं तट आहे व त्या तटाला स्फटिकाची मुंढरी आहे.' -सह्याद्रि मार्च १९४२.

**मुढा**—पु. पशूच्या शरीराचा पाठीवरील खवाळ्याचा किंवा पुठ्ठयाचा भाग. -के ६.१२.१९३८.

**मुद्दी**—स्त्री. मल्लखांबावरील पहिली उडी; मल्लखांबावरील साधी उडी.

**मुद्दमार**—पु. परस्परांसमोर उभे राहून परस्परांच्या मुद्ध्यावर मुद्ध्यानें आघात करणें. -व्याज्ञा ४.१८१.

**मुद्ध्याचा हात**—पु मुद्गलांतील एक हात. -व्याज्ञा ४.२५.

**मुत अय्युनह**—वि. तैनाती. -मुधो. [अर.]

**मुतअल्लिकान**—पु. संबंधी. -मुधो. [अर. मुतअल्लीक अने.]

**मुतअल्लुकह**—स्त्री. संबंधीं. -मुधो. [अर. मुतअल्लुक याचें स्त्री.]

**मुतआयनह**—वि. तैनाती. -मुधो. [अर.]

**मुतरफा**—वि. मेलेला. -मुधो. [अर.]

**मुतसर्रिफ-मुतसरुफ**—वि. ताबा असलेला. -मुधो. [अर.] 'पातशाही अमल फैला मोरोजी व बाबाजी राम देशपांडेगिरी सुद पुणाची व कर्याती मावळची कावीज मुतसरूफ असतां बाबत फितूर मुलुक बदस्त सीवाजी राजे भोसले.' -रा १८.२२.

**मुताबिक**—प्रमाणें. -मुधो [अर.]

**मुतीअ**—पु. आश्रय. -मुधो. [अर.]

**मुत्तासिल**—क्रिवि. जवळच. -मुधो. [अर.]

**मुत्लअ**—वि. माहित. -मुधो. [अर.]

**मुदतखरेदी**—स्त्री. कांहीं ठराविक वर्षाच्या भोगवटयानंतर मालकानें ठिकाण परत मागितल्यास तें कांहीं अटीवर परत करण्याचा करार करून केलेली खरेदी.

**मुदब्बीर**—वि. उपायज्ञ. -मुधो. [अर.]

**मुदयेगिरी**—स्त्री. वाद; तंटा; कलह. 'त्यांत मुदयेगिरी घरांतील अनेक प्रकारे. कित्येक फंदफितूर.' -पेद ५.६४. [अर. मुद्दई=वादी]

**मुद्दत**—मुदत पहा.

**मुद्रा**—स्त्री. देवीचे वण. [ सं. ]

**मुद्राधारक**—पु. १ शिक्का धारण करणारा. २ अंगावर मुद्रांचें चिन्ह असलेला. [ सं. ]

**मुद्राराक्षस**—पु. ( थट्टेनें ) मुद्रणालयांत नोकर असलेला पोरगा चेष्टेनें कांहीं अक्षरें वगैरे इकडेतिकडे करीत असे यावरून. मुद्रणदोष. 'मुद्राराक्षस ज्या लीला करतो त्यांकडेहि लक्ष्य दिलें पाहिजे.' -के ११.४.१९२९. [ मुद्रणालयांतील टवाळपोर किंवा नोकर यावरून. मुद्राराक्षस हें मूळ चाणक्यावरील नाटक आहे. त्याचा या शब्दाशीं कांहीं संबंध नाहीं. ]

**मुधटी**—वि. १ उघडी. 'वोले या हरि चंदनांचा सेजवटीं। जळदाये सुपवतिये वरिवंटीं। बाळा बैसविली मुधटी। ढाळु करावया।' -नरुस्व ५६६. २ उंच; उन्नत. 'हातीं हरिचंदनांची आधाटी। माणिकांची उथाळी दोहीं सेवटीं। तुंबियातळीं नाभि मुधटी। वोतिवे चंद्रकळेची।' -नरुस्व १७३.

**मुनक्कश**—वि. कोरलेले. -मुधो. [ अर. ]

**मुनय**—न खड्ग; तरवारीचें नांव. -प्रश १७. [ सं ]

**मुनासीब**—वि. रास्त; बरोबर. 'या दिवसात खतपत्र मुफसल लिहिन मुनासीब नाहीं.' -पेद १५.३३. [ फा. मुनासिब ]

**मुनि**—पु ( सांके. ) सात ही संख्या. सप्तर्षि या शब्दावरून. 'मुनिदिन किंवा त्रयदिन होईल.' -मोरोच ३६.

**मुनीर**—वि. प्रकाशमान. -मुधो. [ अर. ]

**मुन्कबज**—वि. संकुचित. -मुधो. [ अर. ]

**मुन्खताब**—वि. निवडलेलें. -मुधो. [ अर. ]

**मुन्तजिर**—पु. नजर ठेवणारा. -मुधो. [ अर. ]

**मुन्हा**—पु. आघाडी; मुख; मोहरा. 'दिवाण हरि गोविंद व सेखावत व नसके वगैरे तोफखान्यासहित मुन्हेंग ठहराऊन.' -पेद २.१६. [ फा. ]

**मुफिसद**—पु. बंडखोर. -मुधो. [ अर. ]

**मुबरात**—क्रिवि. परस्पर संमतीनें; उभयतानुमतें; अनुसरून. 'बहुत शिष्टाचार मुबरात शिरपाव अबदालीनें दिल्हा.' -रा १.२३६. [ अर. मुबारात=परस्पर संमतीनें ]

**मुबारिक**—वि. आनंददायक; सुखी; शुभ. -मुधो. [अर.]

**मुबारिझ**—पु. योद्धा. -मुधो. [ फा. अव. मुबारिझान ]

**मुब्लिग**—पु. रक्कम. -मुधो. [ अर. ]

**मुम**—न. एक प्रकारचें गलबत.

**मुमुडा**—पु. एक प्रकारचें गलबत.

**मुम्ताझ**—वि. विभूषित. -मुधो. [ अर. ]

**मुरक्कब**—वि. चाकर असलेला. -मुधो. [ अर. ]

**मुरटें**—न. काजूचें बोंड.

**मुरडीब**—वि. मुरडलेला. -पु. ( ल. ) कानवला.

**मुरणें**—अक्रि. दोषाचा वगैरे अंश असणें; कांहीं व्यंग, कमीपणा असणें. सामान्यत: पाणी मुरणें असा प्रयोग.

**मुरलेला**—वि वाकबगार; तरबेज [ मुरणें ]

**मुरलीधर**—पु. श्रीकृष्ण. [ मुरली+धर ]

**मुरवण**—न. आंबोण; कळणा, कोंडा, पेंड सरकी, वगैरेंचें मिश्रण.

**मुरवणीचें जनावर**—न. जीस मुरवण ठेवून धार काढावी लागते अशी गाय, म्हैस वगैरे.

**मुरादी**—वि. इच्छेप्रमाणें; वाटेल तसें; भरपूर; विपुल. 'टके मुरादी दर रुपयास बावीस सण्या.' -भारतवर्ष अखणार दिनचर्या १५. [ अर. मुराद=इच्छा ]

**मुरासिला**—पु. 'शंकरराव भय्यासाहेब यांस खालील मजकुराचा मुरासिला आल्याचें कळतें.' -त्रिकाळ १५.१०.१९३९.

**मुराळा**—पु. वधूचा भाऊ. -ज्ञाको १७.२४८. [ मूळ-मूळारी ]

**मुरीद**—पु. शिष्य. -मुधो. [ अर. ]

**मुर्दह**—वि. शूर. -मुधो. [ अर. ]

**मुर्दाबाद**—उद्गार. नाश होवो; मरून जावो. -पु. नाश; मरण. 'गांधीवादानें महाराष्ट्राचा मुर्दाबाद करण्याचा चंग बांधला आहे.' -के १.८.१९४१.

**मुलतवी**—वि. मुल्तवी पहा. तहकूब; दिरंगाईत पडलेली; स्थगित; पुढें ढकललेली. 'बंदगान आली याचे सरकारचे नजरेचे बोलणें जालें. परंतु मुलतवी आहे.' -रा ७.३६. [ अर. ]

**मुलाजमत**—स्त्री. भेट, गांठ. 'रा. गोविंद बलाल दिलीस आले होतेत. त्यास पातशाहा वजिराची मुलाजमात झाली.' -पेद २.१००. [ अर. मुलाझिमत ]

**मुलाझिमत**—स्त्री. चाकरी. -मुधो. [ अर. ]

**मुलाटो**—पु. गोरा बाप व निग्रो स्त्री यांची संतती. (अमेरिकन इंग्लिश.)

**मुलावी जोडा**—पु. नरम, पायाला न लागणारा पण टिकाऊ जोडा. [ मुलायम ]

**मुल्क**—पु. मुलूक पहा. देश.

**मुल्हीक**—वि. एक रूप. -मुधो. [ अर. ]

**मुवक्कल**—वकील असलेला. -मुधो. [ अर. ]

**मुवाखज**—पु. जाब देणारा. -मुधो. [ अर. ]

**मुशारुन-इलैह**—उपर्युक्त. -मुधो. [ अर. ]

**मुशामिल**—वि. सामील. -मुधो [अर.]

**मुषहूद**—वि. स्पष्ट; उघड; खात्री केलेलें; सिद्ध. 'त्या खात्यांतील फिकरा पारसी व त्याचा तरजुमा हिंदवी करून पाठविला आहे त्याजवरोन मुफसल मुषहुद होईल.' -रा १०.२३४. [अर. मुष हूद=स्पष्ट]

**मुष्टावर्त**—पु. भाल्याचा पवित्रा. -प्रश १६. [सं.]

**मुष्कबद**—न. नर्कीकस पहा.

**मुसदर**—वि. नवीन तऱ्हेचा; विशेष सुंदर. 'या माझ्याकडे तुमचे दागिने मी एक मुसदर दागिना आलीकडील फॅशनचा तुम्हाला करून देतें.' -प्रतिआत्म ४९१. [अर. मुसज्जर]

**मुसनफ**—स्त्री. सुतळी, दोरा. 'गोसावी यांनी वळीव मुसनफ जिना कारणें पाठऊन द्यावी म्हणोन रुबरु आज्ञा केली होती त्याजवरून मुसनफ वलीव पाठविली आहे.' -पेद ११.१३. [फा.]

**मुसमार्ग**—पु. थांगपत्ता; ठावठिकाण; चिन्हः खुण. 'ते अगर त्या कामाचा त्या रानीं कांहीं मुसमार्ग नसिला तर तसेच खबर घेऊन येणे म्हनोन पाठविले आहेत.' -पेद ३३.२४३ [मागमूस पहा]

**मुसम्मा**—वि. नांव धारण करणारा. -मुधो [अर अव. मुसम्मान]

**मुसल्लम**—वि. सुरक्षित. -मुधो. [अर.]

**मुसविदा**—पु. मसुदा पहा. कच्चा खर्डा; आराखडा. 'आम्ही राजे यांस पत्र लिहिलें आहे तो मुसविदा तुम्ही आइकावा.' -पेद २८ २२. [फा.]

**मुसाइद**—वि प्रयत्नवादी. -मुधो. [अर.]

**मुसाइबत**—वि स्नेहपूर्ण; हितैषी. 'नवाब नासरजंगाजवळ कोणी मुसाइबत उमदा मनुष्य नाही.' -पेद २५.६१. [मुसाहेब पहा]

**मुसाई** वि. प्रयत्नी. -मुधो. [अर.]

**मुसाफत**—स्त्री. अंतर. 'मुसाफत तीन कोस सतर जरीब मुकाम मौजे जाखपली प्रहर दिवसा डेरेदाखल जालि.' -पेद २१.१६९.

**मुसाहेबत**—स्त्री. स्नेह; दोस्ती. 'उमदतुलमुलक शांत जालियावर नबाब सफदरजंग याची मुसाहेबत बहुत जाली.' -पेद २.१. [अर]

**मुसीर**—वि. दौऱ्यावर असलेलें. -मुधो. [अर.]

**मुस्तअद**—वि. तयार. -मुधो. [अर.]

**मुस्तजहर**—वि. जाहीर. -मुधो [अर.]

**मुस्तताब**—वि. चांगला, शुद्ध.

**मुस्तफी-मुस्तोफी**—स्त्री. नेमणूक, राजीनामा वगैरेसंबंधी काम; किंवा तें काम करणारा माणूस 'देवराज मुस्तोफी होता. तो शांत जाला त्याचे मुस्तोफगिरीचें काम राजश्री खंडेराव नामे सिपाहाचे वकील त्याजला होऊन वस्त्रे जाली.' -पेद ३८.१४८.

**मुस्तब्जब**—वि योग्य. -मुधो. [अर.]

**मुस्तहक**—वि. हक्क असलेला. -मुधो. [अर.]

**मुस्ता**—वि. (प्रां.) आडदांड. 'मुलगी नुसती मुस्ता आहे.'

**मुस्ताक**—वि थक्क; थंड; आश्चर्यमूढ. 'चौरोजा आड मुदबक व्हावा. हें वर्तमान आईकोन मुस्ताक जाहलों. सवा करोड रुपये बारा हजार फौजेस दोन वरसांत वसूल असतां हा गजब!' -रा १०.१६५.

**मुस्तासिल**—वि. नष्ट; उन्मूलित. -मुधो. [अर.]

**मुस्तिब्शार**—वि. शुभवृत्त सांगणारा.

**मुहम्मल**—वि. टाकलेलें; सोडलेलें. -मुधो. [अर.]

**मुहर**—स्त्री. शिक्का; मोहोर पहा. -मुधो. [अर.]

**मुहिय्या**—वि. तयार. -मुधो. [अर.]

**मुहीग**—वि. घेरणारा. -मुधो. [अर.]

**मुहुर्तनिश्चय**—पु. विवाहाची निश्चित वेळ ठरविणें. [सं.]

**मुळवा**—पु. मुळकंडया; मुळासकट बुंधा. 'गवताचे तुकडे न लावतां मुळवे मिळाल्यास ते लावणें उत्तम.' -के २५.९.१९३६. [सं. मूळ]

**मुळावण**—न. मूळ; अंकूर. 'तुझी आई गांव सोडून गेली हे कळल्यानंतर संसाराच्या मुळावणाचे तीन तेरा करून मीहि मुशाफरीला सुरवात केली.' -अंधारांतील वाट १३२. [सं. मूल]

**मुळावणें**—अक्रि. मूळ धरणें. -चित्रकृषि २.५. [मूळ]

**मुळींद**—न. समुद्राच्या पाण्याची खोली मोजण्याचें साधन. बुडीद. -किर्लो आगस्ट १९३७.

**मूठ**—स्त्री. तलवारीच्या मुठीचे पुढें दिल्याप्रमाणें अनेक प्रकार असतात :-१ दिलीशाई, २ औरंगजेबी, ३ सिंधी, ४ हकीमखानी, ५ बंगला, ६ गुजराथ, ७ पुरबिया, ८ भुजी, ९ सिरोही; १० करनशाही ११ कर्नाटकी, १२ शेरदहा, १३ मुल्हेरी, १४ इराणी असली, १५ इराणी नकली, १६ इराणी पोपट घाटी, १७ सुरा घाटी, १८ कुबडी घाटी, १९ इंग्रजी २० प्रकार, २० अब्बासी, २१ डोंगरपुरी, २२ घोडयाच्या तोंडाची, २३ सिंहाच्या तोंडाची, २४ मेंढ्याच्या तोंडाची, २५ बांसबाडी, २६ नांदोदी, २७ अकीकची, २८ ईसबची,

२९ हस्तीदंती, ३० तखाराणा; ३१ वाघाच्या तोंडाची, ३२ कवडी घाटी, ३३ गारदो, ३४ सोजित्रा, ३५ रामपुरी, ३६ उदेपुरी, ३७ महाराष्ट्रीय, ३८ जाफराबादी, ३९ अरबी, ४० फैजाबादी-फैजपुरी.

**मूठमर्दी**—स्त्री. दांडगाई; मस्ती; जबरदस्ती. 'त्यास तो मूठमर्दी करून सुरलीत टका देत नाहीं म्हणोन देशमुख मजकुरास जाऊन सांगितले.' -पेद ३१.१८६.

**मूम्तइलैह**—उपर्युक्त. -मुधो. [अर.]

**मूरत**—वि. मुदत ? 'शेअर बाजारांत मूरत वायद्याची पट्टावर जवळ आल्यामुळें बदल्याचे व्यवहार मोठ्या प्रमाणांत झाले.'

**मूर्ख**—वि. या शब्दापासून महामूर्ख, शतमूर्ख, कुटुंब-मूर्ख, पढतमूर्ख असे निरनिराळे पर्यायवाचक शब्द बनतात.

**मूर्ति**—स्त्री. या शब्दाखालीं पुढील सामासिक शब्द अधिक देतां येतील. **मूर्तिपूजा**-सगुणरूपधारी परमेश्वराची पूजा **मूर्तींची प्राणप्रतिष्ठा**-मूर्तीची स्थापना, अर्चा. **मूर्तिपूजक**-मूर्तीची पूजा करणारे, सगुणोपासक. **मूर्तिभंग**-मूर्ती फोडणें.

**मूल**--नस्त्री. १ अर्भक; लहान बाळ. २ (ल.) लहान सुनेसहि म्हणतात. 'मूल येणार नाहीं असें म्हणून मी सकाळीं ताईस सुचविलें होतें ' -दुर्दैवी रंगू ८४.

**मूल्यमापनपद्धति**—स्त्री. माल तयार करावयास लाग-णारी मूळ किंमत काढण्याची पद्धति.

**मूसापर्णी**—स्त्री. एक वेल; रंडा; मूषिकपर्णी. -मसाप ४५.३.

**मृगया**—स्त्री. पारध; शिकार. 'सबल सचिब तो भूपति मृगया करितां वनीं बहु श्रमला.' -मोवन धेनुहरण. [सं.]

**मृगयावन**—न. पारधीचें रान; शिकारीकरितां राखून ठेवलेलें अरण्य. 'आम्ही ग्लेनार्तनी नांवाचा डोंगर पाहिला त्यावर लार्द बिल्लबी ह्यांचें मृगयावन आहे.' -राणीचें पुस्तक २५. [सं. मृगया+वन]

**मेखला**—स्त्री. तरवारीच्या पात्यावर सांखळीप्रमाणें आडवी असलेली नक्षी.

**मेघाडंबरेत**—स्त्री. सप्तमी. मेघडंबरीत. 'वजीरजीस मेघाडंबरेत घालून नीट दिलीस घेऊन आले.' -पेद २.७०

**मेजर**—पु. एक इंग्रजी लष्करी अधिकारी. [इं]

**मेझरपट्टी**—स्त्री. एक पांच फुटी इंचांच्या खुणा केलेली शिंप्याची माप घेण्याची पट्टी. [इं.]

**मेटी**—स्त्री. मेढ; खांब.

**मेटा, मेटया**—पु. अध्वर्यु; पुढारी. [?]

**मेटें**—न. लांकूड किंवा दगड कामांत राहिलेली खांच, फट, चढ. एका दोरींत नसलेला भाग.

**मेंडकी**—स्त्री गळ्यांतील गांठ.

**मेंडकी सुजणें**—गळ्यांतील गांठी सुजणें, दुखणें.

**मेंडूल**—ग. एक सापाच्या जातीचा प्राणी.

**मेढीमुहूर्त** -पु. वरपक्षांतील स्त्रियांकडून वधू व वधू-माता यांचा मुहूर्तमेढीजवळ जो सत्कार करतात तो. -लविसो १३८.

**मेणबत्तीचें झाड**—न. जंगली अक्रोड. -ज्ञाको (ज) २३३.

**मेणवली, मेणोली**—स्त्री. मेण वगैरे लावलेली बांबूची टोपली.

**मेणी**—स्त्री. दगडांत जे हिरव्या रंगाचे पडदे व डाग असतात ते. -शिल्पकला विज्ञान १.३.१२.

**मेंदू-मेंदू तापणें**—थकणें; श्रमणें. मेंदूला थकवा येणें, मेंदू श्रांत होणें-दमणें.

**मेधा**—स्त्री. मर्यादा. 'पगाराची कमाल मेधा दरमहा १२०० रुपयांवर आणून ठेवण्यांत आली.' -विविध ८.१.१९२९.

**मेरू**—रु एक फळ. हें खरबुजाप्रमाणें असतें.

**मेरुमणि**—पु. माळेंतील मोठा, मध्यवर्ति मणि. २ (ल.) मुख्य आधारभूत गोष्ट; आधारस्तंभ. [सं.]

**मेवळी**—स्त्री. मिश्र पदार्थ; संगूट; मेळ, एकत्रित पदार्थ. -मसाप ४५.८.

**मेवा, सुका मवा**—पु. बदाम; पिस्ते; खारका; किस-मिस वगैरे वाळविलेलीं फळें.

**मेवा खाणें-चाखणें**—लांचलुचपत घेणें

**मेवाखाना**—पु. मेव्याचें तबक; मेवा भरलेलें पात्र; बदाम, पिस्ते, किसमिस वगैरेनीं भरलेली परडी, तबक वगैरे. 'दौलांनीं पोषाक व खरबुजें सोनेरी व मेवाखाने गुजराणिले.' -रा ७.११७. [मेवा+खाना]

**मेवेखोरी**—स्त्री. लहान मुलाकडून होणारी आगळीक; हट्ट; दांडगाई. 'जसा आपला मुलगा तसाच हा आपणाला आहे. तो मेवखोरी करीत आहे. आपण त्याला मूल समजून वागवावें.' -देवीश्री अहल्याबाई ३११. [मेवा=खाऊ, खोरी=खाणें. खाऊ मिळण्याकरितां केलेला हट्ट]

**मेहदी**—स्त्री. मिरवणूक. 'मीर जुलफकार आली ज्याहा दरज्याहा याचे कन्येची बिसमिलाची षादीसाठी छ १७ रोज रविवारी रात्रीं मेहदी निघाली.' -रा ५.५६.

**मेहनत**—स्त्री. श्रमाचा व्यायाम; दंड, बैठका वगैरे व्यायाम. [ अर मिह्‌क ]

**मेहनतवारी**—स्त्री. मिनतवारी; विनम्रपणा; आग्रह. 'आपण म्हणावें. 'चलचल येत नाही जा' शेवटीं मोठ्या मेहनतवारीनें त्यानें घेऊन जावें.' -वेताल पिशाच्च पत्रें. मसाप ७.३०६.

**मेहमानगिरी**—स्त्री. पाहुण्यांची सरबराई. 'अशी मेह-मानगिरी आम्हीं कोठेंहि पाहिली नाहीं.' -शिंआ १०२.

**मेहरा**—पु. तेली. 'आगा ए मेहराः तुझीया मेहरीः यातें काइसेया आणिलें.' -लीच १.१८.

**मेहवासी**—स्त्री. गुजराथेंत जमीन धारण करण्याची एक पद्धति. मेवासी, मेवाशी.

**मेहुणा**—पु. ( माध्यंदिन ) मामेभाऊ.

**मेहुणी**—स्त्री. ( माध्यंदिन ) मामाची मुलगी.

**मैदान बसणें**—शौचास बसणें.

**मैमनत**—सुदैव, उत्कर्ष. -सुधो. [अर.]

**मैराळ**—पु. खंडोबा.

**माकलणें धाय**—मोठमोठ्यानें रडणें.

**मोकळदार**—पु. वसूलीकरितां पाठविलेला शिपाई; तगादेदार; जप्तीदार. 'सूर्याजी दुंदुसकार याचे घरीं मोकल-दार बैसविले कीं सत्तावन देणें ... याचे घरचे मोकलदार उठवणें.' -मइसापया ३२.

**मोकळी होणें**—स्त्री. स्त्री सुखरूपपणें प्रगूत होणें; बाळबाळंतीण खुशाल असणें; हातीं पायीं सुटणें.

**मोकळें( शहर )**—वि. प्रतिकाररहित; बिनलढाऊ. युद्धामध्यें एखाद्या शहराचा नाश होऊं नये अशी इच्छा अस-ल्यास तें शहर मोकळें शहर म्हणून जाहीर करण्यांत येतें; त्या शहरावर शत्रू विमानांतून अथवा जमिनीवरून तोफांचा मारा करून त्याचा विध्वंस करीत नाहीं. अर्थात् असें शहर प्रतिकाराशिवाय शत्रूच्या योग्य वेळीं ताब्यांत द्यावें लागतें. 'मॅनिला राजधानी मोकळी करावी कीं काय?' -के २६.१२. १९४१.

**मोकाट सुटणें**—मोकळें सुटणें; स्वैर बनणें.

**मोखरा**—पु. उपायन; नजर; भेट 'त्याकडे जे नजर मोखरा करणें ते रुबरु करऊन याचे काम याचे हाते करविले जाईल.' -पेद २७.८३. [सं. मुख]

**मोगरा**—पु. तरवारीच्या मुठीच्या अग्रावर वाटोळा भाग असतो तो. -प्रश ५५.

**मोगरी**—स्त्री. भोंवऱ्याच्या डोक्यावरील बोंड. -व्याज्ञा १.१५७.

**मोगरी बाभळ**—पांढरी बाभूळ.

**मोझा**—पु. पुरावा; साक्षी; चौकशी; तपास; चर्चा. 'याचे मोझे पुणियांत आहेत. तो मोझा आपणाकडे पुणियांत देतों म्हणून सेवेसी पाठविले आहेत.' -पेद ४३.३. [ अर. मुवाझअ ]

**मोटडी**—स्त्री. गठडी; मोटळी; गाठोडें. 'पैका मोटडीत भरून ठेविला आहे कीं काय, पैदा करून खर्च करावा, ऐसा राजे रेणुराव यांस हुकूम होतो.' -रा ५.९८. [ मोट+डी ]

**मोटर शर्यत**—स्त्री. एक मुलांचा खेळ. व्याज्ञा १.३२७.

**मोटें घाटें अन्न**—न. जाडेंभरडें अन्न. शेतकरी लोकांचें कण्या, अंबील वगैरे अन्न.

**मोडणी**—स्त्री. अडचण; पेंच; अडथळा. 'चहुंकडून खर्चाची मोडणी. वरातांची वगैरे पाहतां फारच आहे. त्याहून आणखी वाढते. -रा १०.१५४. [ मोडणें ]

**मोडबनिया**—पु. गजराथी बनियांतील एक जात. हे भांड्यांची मोड, जुन्यापुराण्या वस्तू वगैरेंचा व्यापार करनात. [ मोडणें-मोड+वाणी-बनिया ]

**मोडमकांदा**—पु. एक वनौषधि.

**मोडी अक्षरें**—नअव. तिरपीं अक्षरें; इंग्रजी इटालिक्स अक्षरें. 'त्या शूर पुरुषाची खुद्द रसेलसाहेबांनीं केलेली मोठी तारीफ त्यांत जी मोडी अक्षरांनीं लिहिली आहे.' -नि ३७१.

**मोडीगर**—पु. जादूगार.

**मोढा**—पु. शत्रूच्या खांद्यावर केलेला वार -मवि ९.११.

**मोत्याचा पाऊस**—पु. जहर त्या वेळीं विपुल पाऊस पडून भरपूर पीक देणारा पाऊस.

**मोदकपात्र**—न. मोदक उकडण्याकरितां योजावयाचें झांकण्यांचें भांडें.

**मोनाल**—स्त्री. तरवारीचें अग्र; नक्की; नोक. -प्रश ८७.

**मोमिया**—न. चंद्रवट पोलादास मोंगल लोकांचें दुसरें नांव. -प्रश २४. [ फा. ]

**मोर**—पु. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९१.

**मोर उडी**—स्त्री. ( मल्लखांब ) मोहन बेडीच्या अढीनंतर पाय उंच करून मल्लखांब हातांनी ढकलून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.१०२.

**मोरया होणें**—खेळखंडोबा होणें; फजिती होणें. 'मग शिक्षकांच्या परिषदेंत त्यांच्या सूचनेचा मोरया झाला असल्यास नवल काय?' -के २४.२.१९३९. ( गणपतीचे विसर्जन कर-तांना मोरया' असें मोठ्यानें ओरडतात यावरून ).

**मोरवल्ली**—स्त्री मोरवेल पहा. गोकर्णी; सुरदानवल्ली; पीलुपर्णी. -मसाप ४५.३.

**मोरशेंडे**—पु. काखी; खराश्वा; दीप्य. एक क्षुद्रुप. -मसा१ ४५.४.

**मोरावळा**—पु. साखरेच्या पाकांत मुरविलेले आंवळे.

**मोराक्को कातडें**—एक प्रकारच्या विशिष्ट पद्धतीनें कमविलेलें कातडें; मोरोक्को देशावरून.

**मोलकै**—पु.अव. मोलकरी; मजूर. ' मग तें हीं मोलकै करूनि पाठवीलें; तो मोलकै महदाइसां वार्टेसि भेटलाः ' -लीच ३. पृ. ९८.

**मोंवतिया**—स्त्रीअ मेणबत्त्या. ' राजसबाईच्या लग्नासाठीं मोंवतिया पाठविल्या. ' -आघइ १५.

**मोवारी**—स्त्री. स्निग्धता, मऊपणा. ' मोवारीचें वंगण घालणारा मध्यस्थ नाहींसा झाला. ' -दुर्दैवी मोह.

**मोस**—पु. ( बे. ) घात.

**मोसबा**—पु. ( बे. ) नमूना. **मोसब्याचा जिन्नस-पदार्थ**-१ नमुन्याचा, वानगीचा पदार्थ. २ उत्तम बहुमोल जिन्नस.

**मोसंबी**—वि. मोझांबिक बेटांतील किंवा मोझांबिक बेटास जाणारें येणारें. ' फिरंगयाचे मोसंबी तराडे मालवणच्या किनाऱ्यास आलें, तेव्हां मालवणकरांहीं गलबतें पाठऊन तरांडे नेले.' -पेद ३६.४०२. -स्त्री न. एक नारिंगासारखें फळ. मोसांबिक बेटांतून इकडे आलें यावरून. [ मोझांबिक बेट ]

**मोसर**—पु. ( गु. ) मृत्युभोजन. [ मौत ]

**मोह**—न. मोहोळः मधमाशाचें पोळें. **मोहाची माशी**-स्त्री मधमाशी. **मोहाचा मध, मेण**-मोहोळाचा मध, मेण वगैरे.

**मोहडा**—पु. ( महानु. ) मुख; तोंड ( हत्तीचें मुख= सोंड ). ' सौंदर्यवान दिग्गजाचिया मोहडा तरी उपमा दीजे भुजा दंडा । ' -नरुस्व ११२२. [ सं. मुख ]

**मोहतादी**—वि मोताद; कंगाल; दरिद्री. ' सरनाईक व सरनाबद मोहतादी लोक एकत्र मत्त होऊन हवालदार वगैरे सिरक्याकडे तन देत होते त्यास बेड्या घालून किल्यावरी ठेविले असत. ' -पेद ३३ १०२. [ मुहताज ]

**मोहन पकड**—स्त्री. ( कुस्ती , प्रतिपक्षाच्या खवाट्यावर बैठक मारून आपले पाय त्याच्या हाताखालून ताणणें.

**मोहनबेडीची अढी**—स्त्री. ( मल्लखांब. ) मल्लखांब हातांच्या कैंचींत धरून वर उडी मारताना हात व मल्लखांब यांच्यामध्यें पाय घालून शरीर काढून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.९१.

**मोहभंग**—पु. नाखुषी; मनांतील समजुतीचा उलगडा. आनंदाचा विरस; हिरमोड. ' मध्यस्ताची जात म्हटल्यास याचे उपयोगी तसे करतील परंतु याचा मोहभंग कशास करावा ? या अर्थीं जंग यासही आस्था लावून ठेविली. ' -रा ७.; -खलप २.३४. [ सं. मोह+भंग ]

**मोहर**—स्त्री. ( महानु. ) मनोरथ; इच्छाः मनकामना; वांछा. ' तयाची मोहर दंडायमान. ' -आचारभाष्य.

**मोहरमखाना**—पु. अशुरखाना; ताबूत ठेवण्याची जागा. [ फा. ]

**मोहरी**—स्त्री. नाश ' मीच राम येउनी करीन शत्रु मोहरी. ' -आ. यज्ञरक्षण.

**मोहरी**—स्त्री. मुखावरील अलंकार; बिंदीसारखा दागिना. ' नथ नाकांतली बाई । नाकाला झाली भारी । नका बहिनी लावू हे गंड । सरजे मोहरी ॥ ' -वलो १०१. [ सं. मुख ]

**मोहली**—पु. सामना. ' आगीचा पूर त्याचा मोहली कोन्ह घेईसा आहे ? ' -पेद २४.१२. [ सं. मुख ]

**मोहसला**—स्त्री. मसलत; खलबत. ' मातुश्रीचा कारकून यास नेणेचे मोहसलेस नेहमीच आहे. ' -पेद ६.१९०. [ फा. ]

**मोहीम**—वि. महत्त्वानें; उत्कृष्ट. ' जरी महाराजाचे चित्तास नागेशाचे स्थल मनास येईल तरी हे मोहीम आहे. ' -पेद १८ ३६. [ फा. ]

**मोहोट**—स्त्री. मोट पहा. ' मोहोटहि लागावी ते न लागली. ' -पेद २.१४.

**मोळ**—पु. कानांतील मळ.

**मोळताई**—स्त्री. नम्रता. ' तो गाडीवाला अगदीं मोळताईनें बोलूं लागला. ' -प्रतिभा जुलै १९३६. [ मवाळी ]

**मोळी बांधणें**—( कुस्ती ) एक डाव. प्रतिपक्षाचे हात त्यानें आपल्या मानेवर ठेवल्यास तेथेंच दाबून बाहेरची टांग मारणें. हीस मोळीची टांग असें म्हणतात.

**मौकूफ**— वि लेझीममध्ये लेझीम हातांत पुढें धरून उभें राहण्याचा हुकूम व क्रिया. -व्याज्ञा ४.४३८. [ अर. ]

**मौजअ**—पु. गांव. -मुधो [ अर. ]

**मौरशी**—वि. आनुवंशिक. मव्रूसी पहा. [ फा. ]

**मौला**—मोवला पहा. मोगल; काजूगर. -के २१.३ १९३९.

**मौलिक**—वि. १ मुळाशीं असलेला. २ अगदीं नवीन; मूळः प्रथमच नवीन शोधून काढलेला. [ सं मूल ]

**मौलुद**—स्त्री पैगंबराच्या वाढदिवशीं केलेली प्रार्थना. ' फात्या पढणें, मौलुद करणें वगैरे रिवाज घालून दिले. ' -के १२.४.१९४०.

**मौसुफ**—वि. मशारनिल्हे; मजकूर. 'साहेब मौसूफ, जनरल मौसूफ.' -विंचू इ.

**मौळा**—पु. मुसकें. 'तोंडीं मौळा वत्स हुंबरे धेनूस। कासेस निघतां ती मारी यास।' -योसं ८.१६.

**म्यानबंद**—पु कटिबंध.

**म्यानबंधा**—कटिबंधीं अलंकार घातलेली. -सारुह ४१.

**म्हातारचाळा**—पु. वृद्धपणामुळें होणारी भ्रांति व तीमुळें घडणारी विचित्र गोष्ट. [ म्हातारा+चाळा ]

**म्हाद्वी**—पु. विदूषक; संस्कृत नाटकांतील विदूषकाला माधव्य किंवा माधविक असें म्हणतात; त्याचें ग्राम्य रूप. [ माधव्य ]

**म्हाळका**—पु. मागणी घालणारा. 'सीतेचे म्हाळके बसूं घाला डाळीये। पुसती कुळीये जनकाची.' -भंडारी गाणीं. –मसाप ५.१५४.

**म्हाळकुम**—स्त्री. महालक्ष्मी; कडक लक्ष्मी; मळवट भरलेली वगैरे स्त्री

**म्हैसवेल**—स्त्री. बेल्याचा वेल; ऋक्ष गंधा; छागलांछा. –मसाप ४५४.

---

# य

**यकंगबाजी**—स्त्री. तलवारीचें द्वंद्व युद्ध. 'तलवारीचें युद्ध महाराष्ट्रांत फार प्रिय असे असें वर्णन फिरस्त्यानें केलें आहे. यास यकंगबाजी म्हणतात.' -व्याज्ञा १.३८. [ एकांग+बाजी ]

**यकता दिली**—स्त्री. एकदील असणें. -मुधो. [ अर. सं. एकता+अर. दिल ]

**यकदान**—न. कातडयानें मढविलेली लाकडाची पेटी. या उंटावर लादतात. –सैआ ६१.

**यकरंगी**—स्त्री. एकतानता. -मुधो. [ अर. ]

**यकरूप**—क्रिवि. केव्हांहि; कधींहि; एकंदर; बिलकूल. 'ते आलियावर महार दरियाबाहेर यकरूप न निघते.' -पेद २६.१६८. एकरूप पहा.

**यक्क**—वि. एक. यक्की यक्की एक.

**यडताक**—न. जमीनीवर रोपांची लागवड करण्याकरितां चौरस पाडण्याकरितां ( वेळूची ) खुंटया मारून केलेली रचना.

**यत्कुण**—न. खड्ग. तरवारीचा प्रकार. -प्रश १७.

**यत्नसाध्य**—वि. खटपट केली असतां सिद्ध होणारी गोष्ट. [ सं. ]

**यंत्र बांधणें**—( काव्य. ) कांहीं नियत अक्षरें साधून प्रबंध रचणें.

**यदनिमित्यें**—क्रिवि. या कारणास्तव; ज्यामुळें; ज्या करतां. 'यदनिमित्यें दोन्ही स्थळींहून वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण रवाना करून दिले ते येणेंप्रमाणें.' -आठइति ५२. [ सं. यत्+निमित्त ]

**यद्वातद्वा**—क्रिवि. कांहीं तरी अद्वातद्वा पहा. [ सं. यत्+वा+तत्+वा ]

**यर्भक**—वि. मठ्ठ, आळशी. [ सं. अर्भक=अजाण मूल ]

**यमनूर बेडी**—कर्नाटकांतील यमनूर गांवच्या पीराची बेडी. उपदंश झालले लोक ही बेडी हातांत व पायांत घालतात.

**यवनी**—स्त्री. प्रसूती: जन्म. 'यवनीला नाहीं ठिकाण अन् बुधवारचें लग्न.' [ सं. योनी ]

**यव्हानळ**—वि ( महानु. ) जोंधळा. 'कितीक यव्हांळा आहे.' 'यव्हांनळीशिवाय भागत नाहीं. [ सं. यावनाल ]

**यव्हानळी करणें**—अक्रि. ( महानु. ) जोंधळा विकणें. 'सर्व यव्हानळी करून आलो.'

**यशभरें**—क्रिवि. यश मिळाल्याच्या आनंदानें. [ सं. यश+भृ=भरणें ]

**यशवंतराव**—पु. यशाचा दगड; कोनाडा; झरोका. पूर्वी गडांच्या वगैरे पायांत बांधकाम पूर्ण व यशस्वी व्हावें म्हणून बळी देत त्या जागीं झरोका, खिडकी, दगड वगैरे खूण ठेवीत त्यास म्हणत. -उपे अंत. [ सं. यशवंत+राजन्-राव ]

**यशवंती विवाह**—पु. एक पत्नी जिवंत असतां दुसरी करण्याचा प्रघात. [ यशवंत कवींनीं असा विवाह केल्यावरून रूढ. -त्रिकाळ ८.११.३६. ]

**यशस्तुलना**—वि. विजयाची बरोबरी; कीर्तीशीं साम्य. [ सं ]

**यशोधन**—न. पतीबद्दल रकम; साकदाम; धंदा विकतांना घ्यावयाची रकम. 'लोकशिक्षण मंडळी लि करतांना आपण यशोधन काय घेतलेंत?' -महाराष्ट्र मार्च ४२. [ सं. ]

**यशोरस**—पु. विजयरूपी यश. [ सं. ]

**यशोहार**—पु. विजयरूपी हार. 'भूपां यशोहारसा' -नल. [ सं. ]

**यहतीयाज**—वि. अवश्य; जरूर. 'जयादा लिहिणें यहतियाज नाहीं.' -पेद २८.२०८. [ फा. ]

**यहतीयात**—स्त्री. जरूरी; आवश्यकता. 'आषज्या उल्मुलुक दारोगे बबर्जीखाना यास खाना यहतीयातीनें रावजी-कडील घेऊन येणे याचा हुकुम जाला.' -रा ७.१७०. [ फा. यहतीयात=आवश्यकता ]

**यळक**—पु. मेंढ्यांची एक जात; एडका. ही टक्कर घेण्यांत पटाईत असते.

**यळताग**—पु. लहान मुलाच्या शिश्नास होणारा एक रोग व त्यामुळें आलेली सूज.

**यज्ञनंदन**—धर्मराज ?

**यज्ञमंडप**—पु. यज्ञ करण्याकरितां घातलेला मंडप. [सं.]

**याक**—पु तिबेटमधील गाईसारखा एक पशू.

**यांग**—स्त्री. (कुण.) वेंग; बगल.

**यांगभर**—(कुण.) खाकेंत मावेल एवढा; वेंगभर. 'गुरांना यांगभर चारा टाक.'

**यागिस्तान**—न. अफगाणिस्तान व हिंदुस्थान यामधील निस्तंत्र देश. -सिंश.

**याझ-दहूम**—वि. अकरावा. -मुधो. [अर.]

**याझ्दाव**—पु. ईश्वर. -मुधो. [अर.].

**यातायात**—स्त्री. आयात व निर्यात मालावर नियंत्रण. [सं. यात+आयात]

**यातृ**—स्त्री. जाऊ, दिराची पत्नी. [सं.]

**याददास्त**—स्त्री. मालमत्ता; जिंदगी; वस्तुजात. 'तमाम याददास्त धरली, सुमार सत्तावीस हजारांचा झाला.' -पेद ६.५००. [फा.]

**यादवन्याय**—पु. यादवी; आपआपसांतील कलह, युद्ध; परस्पर द्वेष. यादवी पहा. 'यानंतर कालचक्र प्रयोगें येथपर्यंत नवबत पोहोंचली कीं वैरी स्वहस्तें यादवन्यायें निमाले.' -पेद ३६.३८५. [यादव पहा]

**याप्य**—वि. औषध चालू असेपर्यंत शमणारा व पुन्हा जोर करणारा (रोग). [सं.]

**याफ्त**—वि मिळविलें. मुधो. [अर.]

**याफ्तन**—मिळविणें. [अर.]

**याफ्तह**—मिळविले आहेत. अर.]

**युगंधर**—वि. युग प्रवर्तक. 'एखादा महापुरुष युगंधर होतो असें दिसतें.' -पर्शुच ८५.

**युगपुरुष**—पु. एका युगांत अतुलनीय पुरुष. -किलों. जाने १९३९. [सं.]

**युगांतर**—न एक युग संपून दुसरें लागण्याचा काळ; काळ बदलणें; नवीन कालास आरंभ [सं.]

**युद्ध**—न. दोन पक्षांमधील द्वंद्व; झुंझ; यामध्यें अनेक लढाया होतात व हें दीर्घकाल चालतें. [सं.]

**युद्धबंदी**—पु. लढाईंत कैद केलेला मनुष्य. [सं. युद्ध+बंदी]

**येकजफ्त**—वि. एक हातीं; एकाच्या ताब्यांत; एकाच्या रक्षणाखालीं. 'स्वामीचे प्रतापे पांच वर्षें येकजफ्त असलियास वस्ती होऊन प्रगणा आबाद राहील.' -पेद २९.१३२. [फा.]

**येकटी**—वि. एकठायीं; एकत्र. 'फत्तेखान व रणजितसिंग याची फौज येकटी होऊन काश्मीर खालीं गेली.' -पेद ४१. ८१.

**येकतमता**—पु. ऐकमत्य; स्नेह; मेळ. 'त्यांचा व सिरके यांच्या लोकांचा येकतमता होऊन किल्ला शिरके यांच्या स्वाधीन करावा.' -पेद ३४.१९०. [सं. एक+मत]

**येकदेठीस लागणें** – रांगेस लागणें; विल्हेस लागणें; यथाक्रम होणें; उलगडणें. 'जाबसाल येकदेठीस लागल्यावर तुमच्या मर्जीप्रमाणें वर्तणूक करूं.' -पेद ३८.१९०. [एक+देठ]

**येकपदमार्ग**—पु. पाऊलवाट. 'त्या घाटाची कुबलता प्रख्यात तसा घाट उतरून येकमार्गानें बहुत दूर जाऊन लोह-पर्वताचा माथा चढून खालीं पाहिल्या समग्र निबिडवन.' -तंजाशिला ३०. [सं.]

**येकवर्ण**—वि. एकनिष्ठ; निष्कपट; दुजेपणा नसणारा. 'दुसरें पत्रीं मजकूर कीं राजश्री रघुनाथदास उमदे आम्हासी एकवर्ण स्नेह राखतात हे तुमच्या सांगितल्यावरून निश्चयास आलेंच होतें.' -पेद ६.१८२. [सं. एकवर्ण]

**येकवोढी**—वि. एक तर्‍हेचा; एकाच पद्धतीचा; कमी-जास्त फरक वगैरे न करतां केलेली (गोष्ट). 'आम्हावरीं दृष्टि होणें ऐसी बहुत प्रकारें आजीजी केली परन्तु राजश्री बाबाचा कारभार येकवोढी मूलतर अज्ञान न अयेकत.' -पेद ४०.३९. [एक+ओढ]

**येका**—पु. ऐक्य; एकी; संघटना. 'लोकांचा तुमचा एका नाहीं चहूंकडे फूट दिसती.' -पेद २०.१९८. [एक]

**येख्तनी**—वि. एकजथी; एकमताचें. 'मनसवा करणें तो माहीत व येख्तनी असतील ते सांगतील तें सर्वांनी करावें.' -पेद ३ .१६९. [अर-यख्ता]

**येंग**—स्त्री. (नाग) १ वेंग; यांग पहा. २ टांग; ढेंग; पाऊल. 'चार येंगांत जाऊन येतों.'

**येजीज**—वि. अजीज पहा. दीन; अगतिक; हैराण. 'फिरंगी लोकांस कोंडवाड जाली येजीज जहाला.' -ऐपो २.५३. चौलदप्तर ६६

**येणें**—अक्रि (व. अप.) विणें; जनणें. 'बाई पंढरपुरांत। कपीला गाय येली।' -वलो ८. [विणें अप.]

**येतन्मुळें**—वि. यायोगें; यामुळें. 'येतन्मुळें शामलाचा उममर्द विशेष जाला.' -पेद ३.१८३ [सं. एतद्+मूल]

**येदन्यायें**—क्रिवि याप्रमाणें; अशा प्रकारचीं. 'येद-न्याये येथील मजबुदी आहे.' पेद ३ १८३. [सं. एतद्+न्यायेन]

**येन**—न. जपानी नाणें.

**येरव्हीं**—क्रिवि. सहज; विशेष कारण नसतां. 'येरव्हींच आलों होतों.' [एरव्हीं पहा.]

**येरव्हींचें जेवण**—नित्याचें जेवण; साधें जेवण.

**येरव्हींचे कपडे**—नित्याचे, साधे कपडे.

**येरूळ मंगरूळ-एरौळ मंगरौळ**—न. (महानु.) कांहींतरी; कांहींचे बाही; भलतेंसलतें; अचावचा. 'सातरा घातला एरौळ मांगरौळ भणो लागले.' -उवाच २०२.

**येला**—पु. (व.) हेलना; विटंबना; त्रास. 'माहा जीव गेला। नका करूं माहे येले। नेतील ते तळहातीं। माहेरचें फुल झेले।' -वलो ६७. [सं. हेलना-हेला]

**येवंक्रमेण**—क्रिवि. याप्रमाणें; अशा रीतीन. 'येवंक्रमेण दोहोकडूनहि संकटच प्राप्त जाहले.' -पेद ३.६३. [सं एवम् क्रमेण]

**येवज**—क्रिवि. येवंच; एवंच; याप्रमाणें; एकूण; सारांश 'येवज दोहोकडूनहि दगा आहे.' -पेद ३८.८३. [सं. एवंच]

**येहतियात**—स्त्री. सावधपणा; काळजी; सावधानता; दूरदृष्टि. 'नबाबांनीं सांगोन पाठविलें कीं, कचेरी व लोक मेळवोन बसों नये. येहतीयात असावी.' -रा ७.१११. [अर. इहतियात=सावधपणा]

**येळ**—स्त्री. (कुण) वेळ.

**येळापूर प्रकर्ण**—न. (महानु.) अर्थ पदार्थ प्राप्ती.

**योगदान**—न. साहाय्य; मदत. 'पुष्कलशी भक्तमंडळी तुम्हांस या कामी योगदान देतील.' -गौरांगऊ [सं. युज्-योग+दा-दान]

**योनि**—स्त्री. (फज्यो.) मनुष्याच्या जन्म नक्षत्रावरून कांहीं जाती कल्पिल्या आहेत त्यांपैकी एक. [सं.]

**योशीता**—स्त्री. योषिता अपभ्रंश. स्त्री; बाई. 'सारांश, हे सौष्ठाई आपसांत करून योशीतेस सांगावें.' -रा १०.११०. [सं. योषिता]

**यौम**—पु दिवस. -मुधो. [अर.]

# र

**रकाणा**—पु. आंत रस भरण्याच्या वेळचा पिकांतील दाणा. कणीस भरण्याच्या वेळचा दाणा. [?]

**रकीहम**—पु. पत्र. -मुधो. [अर.]

**रक्तपा**—स्त्री. जळू; रक्त शोषून घेणारा कीटक. [सं. रक्त+पा=पिणें]

**रक्तक्षय**—पु. शरीरांतील रक्त क्रमिकमी होत जाण्याचा व्याधि. [सं.]

**रक्ती**—स्त्री. बाळंतिणीच्या बाराव्या दिवशीं बकऱ्याच्या रक्तांत ऊन पाणी व मसाला मिसळून केलेला पदार्थ. -ज्ञाको (क) ५४०. [रक्त]

**रखनुते**-न. तंटा; भांडण; बिघाड. 'सुरेश यानीं पत्र लिहिलें आहे रखनुते होईल.' -पेद ३८.३५. [फा.]

**रखाऊ**—वि. रखेली. राख; वेश्या. [राखणें]

**रगडा**—पु. (मल्लखांब.) मल्लखांबावरून खालीं उडी टाकतांना हात सोडल्यावर जो मानेस वर हिसका देतात तो. 'मल्लखांबास छाती टेकून ती हिसका मारून वर उचलावी-या क्रियेस रगडा मारणें म्हणतात.' -व्याज्ञ ३.५१. [रगडणें]

**रंगबेरंग**—वि. निरनिराळ्या रंगाचा; तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचा; मिश्र रंगाचा. 'त्या माचव्यास साधाच रंग देऊन तयार करून येका पलंगाचे सामान पत्र पावताच पाठवून देणें. रंगबेरंग न करणें. साधाच रंग देऊन तयार करून पाठविणें.' -पेद १८.१७०. [रंग+बे+रंग]

**रंगरूट**—पु. सैन्यांत भरती केलेला नवा शिपाई. [इं. रिक्रूट]

**रंगसफेती**—स्त्री. सारवासारव; मुलामा; वरून झिलई. 'सरहद्दीवरील खऱ्या भिंतींवर रंगसफेती करण्याचा प्रयत्न केला.' -के १३.२.४०. [सं. रंग+फा. सफेत]

**रगळी**—स्त्री. पिरपीर; कुरकूर; रडगाणें. [ध्व.]

**रगळी रामायण**—रडकथा; रडगाणें. [ध्व.]

**रघु**—पु. सूर्य वंशांतील एक राजा. [सं.]

**रघुनाथ**—पु. राम: रघूच्या वंशांतील श्रेष्ठ पुरुष. [सं.]

**रघुपति**—पु राम. 'रघुपति कधीं येशी मागुती भेट देशी.' [सं. रघु+पति]

**रंजक पटविणें**—सरबत्तीला सुरवात करणें.

**रंजगंज, रंजीगंजी**—स्त्री. ओढाताण; हलाखी; अडचणी. [रंजद्वि]

**रंजीगंजीनें संसार चालविणें**—मोठ्या कष्टानें, जेमतेम, कसातरी, ओढगस्तीनें संसार करणें. [रंजणें+गंजणे]

**रजत महोत्सव**—पु. कोणत्याहि संस्थेस पंचवीस वर्षे पुरीं झालीं असतां करावयाचा महोत्सव, ही चाल यहुदी लोकांच्या ज्युबिली समारंभावरून प्रचारांत आली.

**रजनी**—स्त्री. हळद. [सं. रंजनी]

**रजनी चूर्ण**—हळदीची पूड.

**रंजयंती**—स्त्री. रंजविणारी, आनंद देणारी. 'परिसुनि दमयंती रंजली रंजयंती.' -नल. [सं. रञ्ज्]

**रजस्थान**—न. गर्भाशय. [ सं. ]

**रंजिसवाणें**—वि. कंटाळवाणें. [ रंजणें ]

**रजोमूर्ति**—पु. ब्रह्मदेव. [ सं. ]

**रज्म**—पु. युद्ध. –मुधो [ अर. ]

**रज्मगाह**—पु. रणांगण.

**रटाळ**—वि. गचाळ, हलक्या प्रतीचा. [ ? ]

**रट्ट**—पु. तीव्रता, कडकपणा. 'उन्हाचा तर इतका रट्ट झाला होता कीं त्याच्या मेंदूचें वितळून पाणी झालें असतें.' –फांतब १२.

**रद्ट**—न. पुष्टीपत्र. [ ? ]

**रद्ट करणें**—घाण करणें. ( हगून ). [ ? ]

**रद्ट होणें**—भीतीनें शौचास होणें.

**रट्ठ**—पु. कुणबी. [ ? ]

**रडतेला**—वि. रडका. [ रडणें ]

**रडभेक**—वि. रडका; बेंगरूळ. [ रडणें+भेकणें ]

**रंडिरा**—स्त्री. साखर. 'कंडू शमनार्थ रंडिरा खावी.'

**रड्डी**—पु. कर्नाटकांतील मराठा जात.

**रणगाडा**—पु. चिलखती गाडा; पोलादी जाड पत्र्याचा तोफा वगैरेनीं सज्ज असा लढाऊ अजस्र यांत्रिक गाडा.

**रणघर**—न. किल्ल्याच्या किंवा तटाच्या भिंतींना बाहेरील शत्रूशीं आंतून लढतां यावें म्हणून बांधकाम करतांनाच कांहीं ठिकाणीं सरळ तिरपीं वगैरे छिद्रें बांधलेलीं असतात, तसें छिद्र; जंगी. 'किल्ल्यांचींहि रणघरें नीट करून ठेवणें.' –रा १.२९८. [ रण+घर ]

**रणतरी**—स्त्री. युद्ध नौका. [ रण+तरणें ]

**रणधुरंधर**—पु. युद्धांत अग्रभागीं उभा असणारा, शूर योद्धा. [ सं. रण+धुरंधर ]

**रणयान**—न. लढाऊ विमान. 'जर्मनीच्या रणयानांनीं दोस्तांची ६८ विमानें खालीं पाडलीं.' –के ४.९.१९४०. [ सं. रण+यान ]

**रणसारंग**—पु. एक मुलांचा खेळ. –व्याज्ञा १.३५५. [ सं. ]

**रतावा**—पु. रात्रीचा हल्ला. 'लालीचे लष्करावरी रतावा पडून, बहुत- सोलदाज वगैरे कित्येक सरदारासही मारून.' –तंजाशिला ९४.

**रतिपति**—पु. मदन; रतीचा नवरा. [ सं. ]

**रतिमात्र**—क्रिवि. अगदीं अल्पप्रमाण; किंचित् सुद्धां. [ सं. रति+मात्रा ]

**रतीब चारणें**—लांच देणें.

**रथचर्या**—स्त्री. रथ फिरविण्याची कला. –व्याज्ञा १.३६.

**रफ़अत**—स्त्री. उच्चता –मुधो. [ अर. ]

**रबिसानी**—स्त्री. रबिउलआखर हा महिना; दुसरा रबी; अखेरचा रबी महिना. 'तुम्ही छ २७ माहे रबिसानीचे पत्र पाठविलें तें छ १३ जावली पावलें.' –रा २२.९२. [ फा. ]

**रब्ब ऊल अर्बाब**—पु. धन्याचा धनी. –मुधो. [ अर. ]

**रंभापुतळी**—स्त्री. सुंदर स्त्री. [ सं. रंभ+पुतळी ]

**रमदी**—स्त्री. चर्च; पोर्तुगीज लोकांतील देऊळ. 'पापडीच्या रमेदीजवळ लष्करचा मोकाम आहे.' –पेद १६.४४.

**रमेश**—पु. लक्ष्मीपति, विष्णु. [ सं. रमा+ईश ]

**रम्झ-शनास**—पु गूढार्थज्ञ. –मुधो. [ अर. ]

**रयतावा**—पु. मंडळी; मुलेंमाणसें; गडी गुरेंढोरें; नोकरचाकर वगैरे मंडळी; कुटुंबावा; व्याप तेगार; धबडगा. 'आमचे घरीं रयतावा मोठा होता दावणींत आठ बैल शिवाय गाई म्हशी वासरांचें खिल्लार.' –शिंआत्म. पृ. ३३.

**ररा करणें**—अक्रि. कुरकुर करणें. [ ध्व. ]

**रवई**—पु. माहीतगार; परिपाठांतील; नित्यांतील. 'जे गोष्ट आम्हीं लिहितो ते मिथ्याच भासते व तेथील रवई कोण सांगतात तेंच सत्य भासते ये गोष्टीस येतन नाहीं.' –पेद ३३.४६. [ रव. ]

**रवन्द**—क्रि. जावें. –मुधो. [ अर. रफ्तन=जाणें ]

**रवला**—पु. बिघाड; कथला; भांडण; तंटा. 'श्रीमंताच्या व आमच्या रवल्यांत त्यास पत्रें पाठविलीं होतीं.' –पेद २०.२८७. 'या रवल्या अगोदर मी तेथें पाठविला होता.' –पेद २०.२८७.

**रवा करणें**—घोटणें; घटविणें; घट्ट करणें; पाठ करणें; अभ्यास करणें. 'त्याचा फायदा पेच रवा ( पाठ ) करण्याच्या कामास फार झाला.' –प्रतिआत्म ५२८.

**रवा नेमणें**—रवा काढण्याचें दिव्य निश्चित करणें. 'कसबे काल्हें–येथे रवा नेमिला. तो आपले वडील देवो लक्ष्मण यांणी काढून खरे जाहले.' –सनदा ५८. रवा देणें, रवा होणें; रवा मोडणें असेहि वाक्प्रचार आहेत.

**रवी**—स्त्री. मेळावा; एकत्र जमून पाहणी. 'फिनिक्सपार्क नांवाच्या रमण्यांत एक मोठी शिपायांची रवी झाली.'–राणीचें पुस्तक १९४. [ रव=रांग, जमणें ]

**रशी**—स्त्री. रसाचा गूळ होण्याच्या अवस्थेपूर्वींचा कढविलेला रस, कढलेला रस. 'उरलेली रशी बादलीच्या बुडाशीं सांठेल.' –ज्ञाको ( ऊ ) १८.

**रवासुदगी**—स्त्री. 'लोकांकडून रसद व नजर येणें रकमेपैकीं सरकारास दुसरे लोकांस पैसा देणें असतो. त्या लोकांस

वरातां देत असतात त्या या सदरांत लिहिण्याची चाल आहे.' -मराठ्यांचें दप्तर भारतवर्ष ९. [ फा ]

**रसद तोडणें, बंद करणें**—सैन्यास अन्न वगैरे सामुग्री मिळणार नाहीं असा बंदोबस्त करणें; कोंडी करणें.

**रसदे**—पु. सैन्यास रसद पोहोंचविणारे. -गौरा घ १७. [ रसद ]

**रसन**—पु. दोरी. -मुधो. [ फा. तुलना; सं. रशना= दोरी ]

**रसरंग**—पु. रागरंग; परिस्थिति; धोरण. 'तोंवर नेथिलहि रसरंग सर्व कळतो तशासारिखें केले जाईल.'-हिद ५९. [ सं. रस+रंग ]

**रसाणें**—पु.अव. तलवारीच्या मुठीवर सोनें चांदी वगैरे चढविण्याचें काम करणारे लोक; रासायनिक. -प्रश ९९. [ सं. रसायन ]

**रसानन्द**—क्रि पोहोंचवावें. -मुधो. [ अर. ]

**रसानाथ**—पु. राजा; पृथ्वीपति. 'शोभे तामरसाक्षसा नळ रसानाथ स्तवूं फारसा.' -नल. [ सं. रसा=पृथ्वी+नाथ= पति ]

**रसायण, रसायन**—न. १ धातुपोषण; पोकळ गोष्ट; गोडी गुलाबीची गोष्ट; बहाणा; सबब. 'भगवंतरायाचा तलास करून हस्तगती जाला तरी घेऊन येतो ऐसे रसायनाच्या गोष्टी करून चित्रकूट पर्वतामध्यें आहे तेथें येऊन बसले.' -पेद १४.९. २ वरवर स्नेह; सलोखा. 'सर्वांसी रसायेण चंदरोज या प्रान्तांत राहणे तर राहावे.' -पेद १५.७९ 'त्याजवरोन त्रिवर्ग सरदारांसी परस्परें रसायेण होऊन मुभेदार पाटील बावांचे येथें मेजवानीस गेले होते, परंतु हिंमतबहादर याजबद्दल मनांत शुधता नाहीं. बाह्य मात्र रक्षितात.' -रा १०.१३६. ३ समजूत; सलोखा; मिलाफ. 'होळकराचे मते रसायण करून द्यावे असें आहे.' -पेद ९.८२. 'नवाबाची व सरकारची यगानगत आजपर्यंत रसायनानें चालत आली.' -रा ५.७९. ४ कारस्थान; भानगड; मसलत. 'वरकड इकडील वर्तमान सोलापुराकडील रसायण लवकर होईलसे दिसत नाहीं.' -पेद ३७.११०. 'इंग्रजाकडेस व फिरंगी याजकडेस लेहून व सांगून पाठऊन रसायण संपादिले.' -पेद ३३.१५.

**रसायन धर्म**—पु. पदार्थांच्या ठिकाणीं परस्परांवर परिणाम करणारा रासायनिक गुण. [ सं. ]

**रसायनी**—पु.( शास्त्र. ) पदार्थ मात्राची जाति निर्णीत करणारे.

**रसेश**—पु.(फज्यो.) रसांचा अधिपति. [ सं. रस+ईश ]

**रसेशफल**—न. प्रत्येक वर्षीं जो रसांचा स्वामी असतो त्याच्याप्रमाणें मिळणारें फलज्योतिषानुसार फल. [ सं. रस+ईश+फल ]

**रसौषधी**—स्त्री. धातूंचीं भस्में व रसायनें. [ सं. रस+औषध ]

**रस्म**—स्त्री. पद्धती; चाल; वहिवाट; कायदा. -मुधो. [ अर. ]

**रस्सीखेंच**—स्त्री. दोर ओढीचा खेळ. [ रस्सी=दोरी+खेंचणें ]

**रहकला**—पु. रेकला पहा. बैलगाडी; बैलांनी ओढावयाचा गाडा. 'बाणांचे कैंच्यांचे उंट सात व रहकले बारा व दमानची सवाशे आहेत.' -रा १.७. [ हिं. रहकला ]

**रहमान**—वि. दयाळ. -मुधो. [ अर. ]

**रहवळ**—पु. घोडा. 'रहवळ तुर्कीविषयीं लिहीलें त्यासीं एक दोन रोजीं मागाहून पाठवितात.'-रा १०.११०. [ रहंवर पहा ]

**रहवाल**—स्त्री. घोड्याची धांवण्याची चाल. [ फा. राह ]

**रहाटचक्र**—न. परस्पराची कंबर धरून चक्राप्रमाणें उड्या मारण्याची कसरत. -व्याज्ञा २.१२१. [ रहाट+चक्र ]

**रहा पाहणें**—खोळंबणें; वाट पाहणें. [ फा. राह=रस्ता ]

**रहित करणें**—बंद करणें; थांबविणें; बेत सोडून देणें, मोडणें. [ सं. ]

**रहीस**—पु. ( व. ) रईस पहा. 'सामुबाईचा कुसवा। कसा निघाला चांगला। माझ्या कपाळाचं कुंकू। राजा रहीस शोभला।' -वलो १०५.

**राई**—स्त्री. तलवारीच्या धारेचा प्रकार. -प्रश ५४

**राऊंडर्स**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.२६९. [ सं. ]

**राकव**—न. हरणाच्या केसांचें वस्त्र. -मसाप ४५.६.

**राखाडी**—स्त्री राख; रक्षा. [ सं. रक्षा ] **अंगाला राख लावणें, फासणें इत्यादि**-बैरागी होणें.

**राखी**—स्त्री. शीख लोकांनीं बसविलेला एक संरक्षण कर. मराठ्यांच्या चौथाईप्रमाणें. 'शीख लोक संयुक्त प्रान्तावर स्वाऱ्या करून राखी म्हणून मागत.' -के २६.३.१९३७. [ राखणें ]

**राखोळी**—स्त्री. संरक्षणाकरितां द्यावयाची वार्षिक खंडणी. 'जमीनदार जुन्या गोंड घराण्यांतील असून ७७२ रुपये कोरिया संस्थानास राखोळी देत असतो.' -शाको (ख) ८९. [ राखणें ]

**रांगोळीचा गालिचा**—पु. निरनिराळया रंगित रांगोळया तयार करून त्यांचा जमिनीवर काढलेला गालिचा, चित्र, देखावा वगैरे. हा पाण्यावरहि काढतात. [ सं. रंगवल्लिका+फा. गालिचा ]

**राघूसारखा बोलणें**—१ गोड बोलणें. २ शिकविल्याप्रमाणें बोलणें; पोपटपंची करणें; पोपट ज्याप्रमाणें शिकविलेले शब्द तेवढे बोलतो त्याप्रमाणें आज्ञेप्रमाणें भाषण करणें. ३ बडबडणें.

**राघोभरारी**—स्त्री. राघोबादादा ज्याप्रमाणें अतिशय त्वरित स्वारी करीत असे त्याप्रमाणें केलेली स्वारी. 'जर्मनीची ही राघोभरारी पाहून सारे जग दिग्मूढ झालें.' -के १९.४.१९४०.

**राजकन्या**—स्त्री. राजाची मुलगी. [ सं. राजन्+कन्या ]

**राजगृह**—न. राजवाडा. [ सं. राजन्+गृह ]

**राजकारणशास्त्र**—न. शासनशास्त्र; राज्य चालविण्याची विद्या; मुत्सद्दीगिरी. [ सं. ]

**राजकी**—स्त्री. राजाचें वैभव. [ राजा ]

**राजकी भोगणें**—राजाप्रमाणें सुखांत राहणें. [ राजा ]

**राजपुरोहित**—पु. राजाचा उपाध्याय. [राजा+पुरोहित]

**राजोपाध्याय**—पु. राजपुरोहित. [ राजा+उपाध्याय ]

**राजबिराजी**—स्त्री. राज्यक्रांति; बंडाळी; अराजक. 'कांहीं दिवस राजबिराजीमुळें गांव पडिला वसाहत नाहीं.' -सनदा ५१. [ राज्य+वैराज्य ] -पेद २५.९०.

**राजमेचु**—पु ( महानु. ) हिरवा पाषाण; एक उत्तम नक्षीचा दगड. 'रत्नखचित सुकुमारा । नानाविधा पत्रवेलीस विकारा । राजमेचुचिया ।' -नरुस्व १.३२.

**राजमेहमान**—पु. राजाचा पाहुणा; राजातिथी; पाहुणा आलेला राजा. [ राजा+मेहमान ]

**राजवलभ धूप** —पु. ( महानु. ) केशर, कस्तुरी, अगर, तगर, कृष्णागिर, नागरमोथा, चंदन, कापूरकचरी, गव्हला, कचरा घालून केलेला धूप; दशांग धूप.

**राजरोशन**—क्रिवि. उघडपणें; दिवसा ढवळया; इतमामानें; दिमाखानें 'राजरोशन जाऊन भेटू आणि सरकारचे कामाची सरबरा होऊन येईल.' -पेद २०.३४. [ फा. राज+रोशनी, रोशन ] यावरून मराठी राजरोस शब्द आला.

**राजहुडा**—पु. राजवाडा. [ राजा+हुडा=बुरुज ]

**राजाई**—स्त्री. राजेपण. 'राजाई उत्पन्न होऊनहि तिचे स्वरूप लवचिक तात्पुरतें असा याटाचें.' -परशुच १०१. [ राजा+ई प्रत्यय ]

**राजापुरी गंगा**—स्त्री. अकस्मात घडणारी गोष्ट. 'राजापुरास मध्येंच केव्हां तरी पाण्याचा झरा उत्पन्न होत असतो व एकाएकीं बंद होत असतो यावरून. 'राष्ट्रीयत्व हेंहि राजापुरी गंगेप्रमाणें एकदम उगम पावत नाहीं.' -के २२.३.१९४०.

**राजुक**—पु. प्रतिनिधि. 'जणु अशोकाचें राजुकच' -हिप्र २१४.

**राजोखाट**—पु. दोन ओढयांचा संगम. 'तेथून विंचेवरील राजोखाट तेथून बिंदाणे पांढर जुळीचा खिळा.' -रा १८.५. [ ? ]

**राज्यपद**—न. राजाचा अधिकार; अधिपत्य. [ सं ]

**रांडबाळसें**—न. विधवा स्त्री प्रकृतीनें धडधाकट असली म्हणजे म्हणतात. रांडमांस पहा.

**रांडमरण**—न. विधवेचें मरण; अभर्तृक स्थितींतील मरण; वीरास अनुचित असें मरण; शय्या मृत्यू. 'येथें विना कारण रांड मरणानें मरून जावें त्यापेक्षां येथून पळून जाऊन पुन्हा उद्योग करून सैन्य जमवूं व शत्रूंस लढाई देऊं.' -माप्र ५०. 'यासमयीं आपण पुढें जाऊन बंदूकीचे गोळीनें मरणें. आणि रांडमरणें बरोबर आहे' -माप्र ११०.

**रांडपुनव**—स्त्री. पौष शुद्ध पौर्णिमा या दिवशीं जोगतिणी हातांतील कांकणें फोडून टाकतात.

**रातपाळी**—स्त्री रात्री काम करण्याची पाळी.

**रातराणी**—स्त्री. एक सुगंधी फुलझाड. याच्या फुलांस रात्रीं वास येतो.

**रातबेरात**—क्रिवि १ रातोरात. २ रात्रदिवस न पाहतां.

**रातिवा**—पु. हल्ला; धाड; रात्रीचा हल्ला. 'एकएका अवयवाचा मेळावा । जिणे मुग्धाचा थोवा । तिये करितातिं रातिवा । शस्त्रें मन्मथाची ।' -नरुस्व ५९१. [ रात ]

**रात्रीचा दिवस करणें**—रात्रीसुद्धां दिवसाप्रमाणें काम करणें.

**रात्रीमान**—न. रात्रीचा अवकाश; रात्रीचा काल; रात्रीचें कालमान, अवधि.

**राणा**—पु ( महानु. ) पुजारी; भोप्या; बडवा; गुरु. 'तंव तो राणा लिंगाची तर्पणा करोनि, राणा रायेयातें रहावा.' -उच २३५ [ सं राजन् ]

**राणीमुंगी**—स्त्री. केवळ अंडीं घालणारी मुंगी. इतर मुंग्यांना कामकरी मुंग्या असें म्हणतात.

**राधाकृष्णी धोतरजोडा**—पु. गंगाजमनीप्रमाणें विशिष्ट प्रकारचा धोतरजोडा. 'याप्रमाणें राधाकृष्णी धोतरजोडे करून पाठवणे.' -रा ३.२२४.

**राधा नाचविणें, राधचा खेळ**—पु. शिमग्यामध्यें खेळी राधेचा खेळ काढतात व गांवोगांव हिंडतात त्यास म्हणतात. तमाशा; तमाशा करणें.

**रान माजणें**—पिकांत गवत वाढणें.

**रापणी**—स्त्री. मासे पकडण्याच्या जाळ्याची दुरुस्ती. 'त्याच्याकडे खंडानें असलेली बाग मालकानें काढून घेतल्यामुळें तो रापणीवर गेला होता.' -मशा सप्टें १९३६.

**रापविणें**—सक्रि. एखादी क्रिया कांहीं वेळ चालू ठेवणें; मुरविणें; रंग येऊं देणें; रंगास चढूं देणें. 'यावर लोकांच्या चित्तांत की जुज रापवून घोडे घालावे.' -पेद ३३.३४७. [ रापणें पहा ]

**रांबी**—स्त्री. एक खेळ. एका खांबासभोंवती नारळाच्या चोडांची रास करतात व त्या राशींतून चोडें पळविण्याचें काम एक पक्ष व राखण्याचें काम हार असलेला पक्ष करतो.' -मसाप ७.२५४.

**रामचंगी**—स्त्री. मोठी बंदूक. -ज्ञाको ( आ ) २४२.

**रामजानी**—स्त्री. एक संकर जातीय स्त्री; वेश्या. 'गुलाब मुसलमान धर्माची रामजानी होती.' -म्हावम्हा. [ हिं. रामजनी ]

**रामटोमणा**—पु. दणदणीत टोमणा; मोठा तडाखा; रामटोला. 'खास नायडूशाही साहासाहाचे रामटोमणे दोन गरगरीत मारले.' -के २१.११.१९३९.

**रामदंडी**—पु. नाशिक येथील युद्धशास्त्रच्या पाठशाळेंतील विद्यार्थी. 'त्या मंदिरासमोर आमचे रामदंडी रोज सकाळ संध्याकाळ जमून प्रार्थना करतील.' -के ३.८.१९३७. [ राम+दंड ]

**रामपुरी**—वि. रामपुरचें पोलाद. -प्रश २४.

**रामबाण**—पु. पाणकणीस.

**रामयुद्ध**—न. एक वनस्पती; सहा; काकमुद्रा; मुद्रपर्णी. -मसाप ४५.४.

**रामरूमी**—स्त्री. ( व. ) रामरामी; नमस्कार; वंदन. 'घेती भेटी वाटेवरी। रामरूमीची आगत। जावया बापुजीला। बिगबाळी हातीं देत।' -बलो ५८. [ राम+राम ]

**रामविनोद**—पु. विदूषक; खुषमस्कऱ्या.

**रामा**—पु. सामान्यपणें घरचाकर; घरगुती नोकर. मुंबईस सामान्यतः घर चाकरी करणारांस हें नांव सामान्य झालें आहे, 'तुमच्या रामास पाठवून द्या!'

**रामा लोक**—पु. घरचाकरवर्ग.

**रावरंग**—पु. परिस्थिति; रागरंग.

**राशियत**—स्त्री. अमदानी; कारकीर्द; अंमल. [ रियासत पहा. ]

**राशी**—स्त्री. ( व. ) वरप्रस्थान; वर आपल्या जानवश्याहून वधुगृहीं जाण्यास निघणें. 'मोठ्याचा नवरदेव। राशी निघाला शिळाणीं। रुपाया ओवाळणी। हातीं घालिती बहिणी।' -बलो ३१.

**राष्ट्र चिन्ह**—न. ( मुद्रण ) ट्र अक्षर करण्यासाठीं ट अक्षराखालीं जें रकारदर्शक चिन्ह जोडतात त; एक मुद्रणालयांतील खिळा.

**राष्ट्रपध्दति**—स्त्री. प्रत्येक संस्कृतिविशिष्ट लोकांकरितां पृथक राज्य पाहिजे अशी पद्धत. -ज्ञाको ४.३४९.

**राष्ट्रीय कर्ज**—राष्ट्राच्या कार्याकरितां काढलेलें कर्ज.

**राष्ट्रीय युद्ध, लढाई**—राष्ट्राच्या इभ्रतीकरतां स्वातंत्र्याकरितां करावें लागणारें युद्ध.

**राष्ट्रोळी**—स्त्री. १ वड, पिंपळ वगैरे झाडावर असणाऱ्या देवादिकांप्रीत्यर्थ दिवे लावणें. -नवजी आक्टो १९३८. २ एक क्षुद्र देवता. 'मग एक देवचार व एक राष्ट्रोळी अशीं दोन सोंगें आणतात. नंतर वेताळ येतो व या भुतांस व देवचार राष्ट्रोळ्यांस कांहीं सांगून समज घालतो.' -मांद्रेलेख रा. ना. केळकर.

**रास**—स्त्री. ( मिठागरी ) एक हजार सहाशें मण मिठास रास म्हणतात. -मातीर्थ ४.३३. [ सं. राशि ]

**रास**—पु. ( अबि. ) अबिसीनियांत सरदार, उमराव श्रेष्ठ लोक यांच्या नांवामागें लावावयाचें उपपद. उदा. रास तफरी. [ राज ]

**रासकर्दन**—न. एकत्र करणें; गोळाबेरीज करणें; जमेनांवे करणें. 'यास्तव दागिने याची घालमेल रासकर्दनाची होईल येविसी आज्ञा जाली पाहिजे. -पेद ४.२०. [ फा. रास+कर्दन ] कर्दनबस्तन पहा.

**रासधारी**—पु. रासप्रसंगाचें नाटक करून दाखविणारे लोक. -व्याज्ञा १.४०५. [ रास+धृ ]

**रासनांव**—न. राशिनाम. मूल ज्या राशीवर जन्मलें असेल त्या राशीस अनुसरून विशिष्ट आद्याक्षरयुक्त नांव. [ राशि+नांव ]

**रासणें**—सक्रि. कापणें; मारणें. 'पाताणे प्रभू जातींत देवक स्थापनेच्या वेळीं पशू वधाऐवजीं कोहळें कापतात त्यास कोहळें रासणें म्हणतात.' -ज्ञाको १७.२४८.

**रास्ती**—स्त्री. सत्यता; योग्यता. -मुधो. [ अर. रास्त ]

**राहा**—स्त्री. १ पद्धति; रीत; तऱ्हा; डाव. २ पट्टयाची फेंक; घाई किंवा हात, हूल, काट, वार, पलटी वगैरे कांहीं ठराविक क्रिया मिळून राहा होते. [ अर. ]

**राहावा**—पु राहणें; राबता; वहिवाट; रहिवास. 'जरी हे गोष्ट केली तरी तेथें राहावा पडलियाने सर्व मनोदये होऊन येईल ' -पेद २७.१६८.

**राहेराहे**—क्रिवि. वारंवार; राहून राहून; राहराहों पहा. 'राहेराहे उडे सत्राणें.' -भाराबाल २.१०. [ राहणें ]

**राळ उडविणें**—दंगल माजविणें; कल्लोळ माजविणें. 'काँग्रेसच्या सत्याग्रहाच्या चळवळीनें कितीहि राळ उडविली गेली असली.' -के १०.१२.१९४०. (पूर्वीं पौराणिक नाटकांत राक्षस प्रवेशाच्या वेळीं राळ उडवून मोठा जाळ करीत यावरून.)

**रिआयत**—स्त्री. कृपा. -मुधो. [ अर. ]

**रिकेब ताजवा**—पु. (मल्लखांब) वेताचा मल्लखांब पायाच्या लवणींत धरून केलेली ताजव्याची उडी. -व्याज्ञा ३.३३५.

**रिकेबपकड**—स्त्री (मल्लखांब.) वेताच्या मल्लखांबाची पकड रिकिबीप्रमाणें बसवून केलेली अढी. -व्याज्ञा ३.३३३.

**रिक्शा**—स्त्री. माणसानें ओढून न्यावयाची स्वारीची गाडी. [ जपानी-जिन रिक्शा ]

**रिखाटा**—वि. एकलकोंडा; एकटा; सडा. 'आपल्या घरांत नाहीं मूलबाळ रिखाटयासारखे दोन जीव.' -भावं. [ सं. रेषा, रेखा ]

**रिंगणखेंच**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५८.

**रिंगण धरणें**—वर्तुळाकार नाचणें; वाटोळें फिरणें. [ रंगण ]

**रिंगणावर धरणें**—खरडपट्टी काढणें.

**रिंगणांतील अस्वल**—न. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३४३.

**रिंगा**—पु. घोकणी; कुरकूर. 'सरदेशमुखी पहिली नव्हे हा रिंगा चाललाच होता. -पेद ४२.२.

**रिठा**—पु. 'पिंपळाचें झाड त्या गांवच्या मालगुजाऱ्याच्या वाडयाच्या रिठावर वाढलेलें होतें.' -रातराणी ६३.

**रितुप**—पु. वृक्ष विशेष. 'तेथ राय-जंबिरिचिया वोळी। हीं वनचिया सोनेकेळी। दिपांतरीचिया रितुपी सरळी। दुधावलिया।' -नरुस्व ७९९. [ सं. ऋतुपु ]

**रिपुदारणा**—न. खड्ग, तलवारीचें नांव. -प्रश १७. [ सं. रिपु+दारणम् ]

**रियासत**—स्त्री. देशी संस्थान. 'पंजाबमधील रियासतीकडे दृष्टिक्षेप करा म्हणजे तेथील प्रजेची किती कष्टमय स्थिति आहे हें कळेल.' -के १.३.१९३०. [ फा. ]

**रिवायत**—स्त्री कथा; कीर्तन; प्रवचन. 'सर्व मुसलमानांना हरिपूर या गांवी रिवायतीसाठीं निमंत्रण आलें होतें.' -के १३.४.१९३७. [ अर. रिवायत-कथा गोष्ट ]

**रिष्टें**—न. खड्ग. तलवारीचा प्रकार. -प्रश १५. [ सं. ]

**रिहाई**—स्त्री. सुटका. -मुधो. [ अर. ]

**रीघ लागणें**—रांग लागणें; गर्दी होणें.

**रीघ नसणें**—वाट नसणें; अतिशय दाटी होणें.

**रील**—पु. एक प्रकारचा हायलंड देशांतील नाच. 'दुसरेहि कित्येक जण रील नांवाचा नाच करीत होते.' -राणीचें पुस्तक. (इं.)

**रीव**—स्त्री. कपट. -मुधो. [ अर. ]

**रीश**—स्त्री. जर्मन साम्राज्याचें नांव.

**रीशस्टॅग**—स्त्री. जर्मनीची लोकसभा.

**रुई मंडळ, रुई मांजऱ्या**—न.पु. रुईच्या झाडाशीं केलेला विवाह; अर्क विवाह. [ रुई+मंडळ; मंगल ? ]

**रुक्म**—न. लोह; पोलाद; कांतलोह. -प्रश २२. २ सोनें. [ सं. ]

**रुखंत**—न. (व.) रुखवत पहा. 'रुखंत आणलं। नुसत्या साखर फेण्या। नवरी राजकन्या।' -वलो ४५.

**रुचीक**—पु. रुईचा चीक.

**रुजणें**—अक्रि. (ल.) जीव धरणें; दम धरून राहणें; तगणें; टिकणें; मूळ धरणें. 'मोंगलाची आवाई झाली तरी यांतून एकहि जागा रुजणार नाहीं.' -रा २. -पेश ६६.

**रुणी**—स्त्री. अळी; कीड. 'तें पीठ जुनें होऊन त्यांत रुण्या पडलेल्या दिसतात.'

**रुंड**—न. १ लांकूड वगैरेचा तुकडा; ओंडा; ठोकळा. २ वास्तविक शीर; चुकीनें धड. 'शिर रुंडा भेट केली.' -ऐपो २.२८. [ सं. ]

**तणी**—स्त्री. गुंता; घोंटाळा; अडचण; एखादी वस्तु किंवा गाडी गाळांत रुतून बसते त्याप्रमाणें स्थिति. 'त्याजमुळें मनसुबा रुतणीस पडला.' -रा १२.१४१. [ रुतणें ]

**रुतनी पडणें**—गाळांत वगैरे अडकून गुंतून बसणें. 'आमची गाडी वाटेंत रुतनी पडली.'

**रुदंती**—स्त्री. रोदन; रुदन; रडण्याची क्रिया. 'अधिकारियाचे नांवे सर्व रुदंती करतात कीं.' -पेद ३४.२०२. [ सं. रुद्=रडणें ]

**रुदंती**—स्त्री. रुद्रवंती; एक वनस्पति. या वनस्पतीपासून पाणी टपकतें म्हणून हीस हें नांव पडलें आहे. [ सं. रुद् ]

**रुद्र**—पु. एक सूक्तसंग्रह; रुद्राचे मंत्र; यजुर्वेदांतील शतद्रीय स्तोत्र. समासांत-रुद्रगण, रुद्रपठण इ. [ सं. ]

**रुद्राभिषेक**—पु. रुद्रस्तुतीपर सूक्तसंग्रह म्हणून करावयाचा अभिषेक. याचे पर्याय एकादशणी, लघुरुद्र, महारुद्र, अतिरुद्र इ. आहेत.

**रुद्रावतार**—पु. १ रुद्र देवतेचा अवतार, खंडोबा, जोतिबा, हनुमान वगैरे. २ (ल.) अत्यंत रागीट मनुष्य.

**रुद्रविस्की**—(अप. रुद्रविंशी) शेवटचे वीस संवत्सर. [सं. रुद्र+विंशति]

**रुधिर**—समासांत रुधिरपान-प्राशन-प्रिय-पिपासु-लालसा-स्नान इ.

**रुमाल**—पु. रुमालभर अंतर; एक फूट. 'त्यांना वाटलें होतें कीं सर्व विहीर एक रुमाल खोल गेली कीं दहा आणे झाले.' -स्मृतिचि १३९.

**रुरो**—स्त्री. दगडांची रास; उभे दगड मांडून केलेली मांडणी; बांध; ऐरण. 'त्याचे खालते लवण त्याचे खालती ती (तीन) दगडाची रुरो.' -रा १८.१.

**रू**—पु. चेहरा. -मुधो. [अर. रूअ]

**रूद**—वि. नवी. -मुधो. [अर.]

**रूमीसुरा**—पु. पुढें रुंद होत जाणारा सुरा. -प्रश ४०.

**रूसाई**—स्त्री. पश्चात्ताप. -मुधो. [अर.]

**रेकार्ड**—न. १ उच्चांक; श्रेष्ठतम मर्यादा; उच्चतम पद. २ घडवंची; मांडणी; जिन्नस ठेवण्याकरितां फळयांची मांडावण, चौकट. इं. रेकॉर्ड.

**रेखा**—पु. रसाविष्करणाची रीत किंवा शैली. -राज्ञा ६.६. [सं.]

**रेखाचित्र**—न. १ केवळ रेघांनीं काढलेली आकृति. २ मानचित्र. [सं.]

**रेखाटी**—स्त्री. आंखण्याकरितां लांकडाची सळई करतात ती. [रेखा]

**रेखीव**—वि. प्रमाणबद्ध; चित्रासारखें; जेथल्या तेथें असणारें. [रेखणें]

**रेगर**—वि. काळी. (जमीन) -ज्ञाको (उ) १२०.

**रेंगसणें**—अक्रि. बोचणें. 'पायांत दगड रेंगसला आहे.'

**रेघ उमटणें**—रेषा उमटणें पहा.

**रेघांचा प्रश्न, रेघा मारून प्रश्न पाहणें**—(फलज्यो) एक भविष्य पाहण्याची पद्धत; हनुमान प्रश्न.

**रेचणें**—अक्रि. कापसांतील सरकी काढणें; लोडणें. -नवाका २६.१.१९३४.

**रेजगारी**—स्त्री. बंदुकीच्या गोळया, छरे वगैरेचा मारा; गोळागोळी. 'रेजगारी बेशुमार.' -ऐपो २.४५. [रेजा=तुकडा]

**रेट**—वि. पुष्कळ; अतिशय.

**रेडे गोसावी**—पु गोसाव्याचा वेष घेऊन फिरणारे व रेड्यांचा व्यापार करणारे लोक.

**रेडे मुसळे**—पु.अने. एक जाडया भाताची जात -चित्रकृषि २.७.

**रेड्यावर पाऊस**—पु. रेडयाच्या अंगावर कितीहि पाऊस पडला तरी त्याची त्याला खिजगणतीच नसते त्याप्रमाणें जिची पर्वा नाहीं अशी गोष्ट. 'मीहि शांत रितीनें तें सर्व ऐकत राहिलों जणू रेडयावर पाऊस.' -हिप्र १६३.

**रेप**—स्त्री. झड; जोराची वृष्टि.

**रेपा उठणें**—मघा नक्षत्रांतील पावसाची झड लागणें.

**रेपाचा पाऊस**—मोठा पाऊस.

**रेवती रमण**—पु. बलराम. [सं.]

**रेवाळें**—न. एक बिनवासाची भाताची जात. -चित्रकृषि २.७.

**रैवत**—वि. रेवती नक्षत्रासंबंधी. [सं. रेवती]

**रैवतपक्ष**—पु. (ज्यो.) रेवती नक्षत्रांतील योगतारा आरंभस्थान कल्पून गणित करणारा पक्ष. [सं.]

**रैवत पंचांग**—वरील पक्षाचें पंचांग. [सं.]

**रो**—पु. रोह; मोड आलेलें भात. -चित्रकृषि २.७. [सं. रुह्]

**रोखमारा**—पु. अचूक मारा; प्रत्यक्ष मारा; सरळ हल्ला. 'छोटेखानी लढाई व झटापट करण्याकरितां एखादा किल्ला किंवा रोखमाऱ्याचें ठिकाण हस्तगत करून घ्यावयाचें असतें.' -विद्याभिवृद्धि ११६.

**रोगरें**—न. (सोनारी) वेळा पिळण्याचा चिमटा.

**रोजबरोज**—क्रिवि. दररोज; प्रत्यहीं; दरदिवशीं. 'याचा खर्च व खिसा रोजबरोज जारी.' -रा ५.१६०. [फा. रोझ्‌बरोझ]

**रोजमुरा**—पु. कामगारास किंवा अधिकाऱ्यास वर्षांतून कांहीं वेळां हप्त्याहप्त्यानें पैसा द्यावयाचा त्यास रोजमुरा म्हणतात. दीड महिन्यांनीं किंवा दोन महिन्यांनीं एक वेळ असा रोजमुरा तैनातपैकीं देत असत.' -भारतवर्ष मराठयांचें दप्तर १५.

**रोझ**—पु. दिवस. रोज पहा.

**रोझ अफ्जून**—रोज वाढणारी.

**रोझगार**—पु. काल; कारकीर्द. -मुधो. [अर.]

**रोदसी**—पु. द्विवचन. आकाश व पृथ्वी; द्यावापृथिवी. [सं.]

**रोप**—स्त्री. भाताची लावणी. -चित्रकृषि २.७.

**रोपीतक**—पु. खंजिऱ्याचा पवित्रा. -प्रश १८. [सं.]

**रोमांबर**—न. केसांचें वस्त्र; लोंकरीचें वस्त्र; शाल वगैरे. 'अति सूक्ष्में रोमांबरें । पाटाऊ पीतांबरें।' -भारा. बाल २५.८१. [ रोम+अंबर ]

**रोयेदाद**—वि. रूयदाद पहा. प्रस्तुत; उपस्थित; प्राप्त; आलेलें. 'लिहिले आहेत कीं रोयेदाद जरूरी असेल ते हजरतेस पुसोन लिहीत जाणें.' -रा १.१०५. [ फा. रूअ ]

**रोशन**—पु. प्रकाश. -मुधो.

**रोषा**—पु. रोशेगवत याचें तेल. 'एलिचपूरचा रोषा.'

**रोहपोह**—पु. उगवणी; वसूली; जमवाजमव. 'यैसे यास माहालो माहली बाकी साकी राहिली आहे त्याचा रोहपोह करावा लागतो.' -पेद १७.३९ [ सं. रुह्-रोह द्वि. ]

**रोहिणी**—पु. एक प्रकारचें लोह, पोलाद. -प्रश २२. [ सं. ]

**रोहिणी मंडप**—पु. रोहिणी नक्षत्रांतील मेघ मंडल; सूर्य रोहिणी नक्षत्रीं आला म्हणजे आकाश ढगांनी व्याप्त होतें परंतु प्रत्यक्ष पाऊस पडत नाही. [ सं रोहिणी+मंडप ]

**रोहिणीबाल**—न. खडग. तलवारीचें नांव. -प्रश १७.

**रोहिणी शकट भेद**—पु. रोहिणीच्या दोन तारांतून शनि हा ग्रह जाणें. हा योग अत्यंत अनिष्ट व अनर्थकारक मानतात. [ सं. ]

**रोहिदास**—पु. हरिश्चंद्राचा पुत्र. [ सं. ]

**रोहिलखंड**—न. रोहिले लोकांचा देश.

**रौका-रौळा**—पु. खका; खरजेवरील खपली, खवळ, पापडी.

**रौनक पिजीर**—पु विचाराचा प्रकाश. -मुधो. [ अर. ]

---

# ल

**लई**—स्त्री. लय पहा. खळ; चिकी; चिकटविण्याकरितां मैदा, बारीक पीठ वगैरेची केलेली खळ.

**लक**—वि. लक्ष ( संख्या ). -मुधो. [ अर. लक. सं. लक्ष ]

**लकडी**—स्त्री. १ वेताची, बांबूची वगैरे काठी. २ बांबूची काठी हातांत घेऊन दोन प्रतिस्पर्ध्यांनीं खेळावयाचा मारामारीचा खेळ; छटका. [ लाकूड ]

**लकरा**—स्त्री लबाडी, लकारी पहा. 'संस्थानांत खरें बोलणें थोडें लकरी फार आहे.' -पेद २८.२२९. [ ल= लबाडी याचें आद्य अक्षर ]

**लकलकणें**—अक्रि. पोटांत भुकेने कालवाकालव होणें.

**लका**—न. कबूतराची जात.

**लगट, लगूट**—क्रिवि. ( कुण. ) लवकर.

**लगड**—स्त्री. ( व. ) हिशेब, पाड. 'इतका भात कोणत्या लगडींत लागेल ? तो पुरणार नाहीं. आणखी भात टाका.'

**लंगड**—पु. पतंगाच्या मांज्यास एका टोंकास एक दगड बांधून तयार केलेलें खेळण्याचें साधन. 'प्रत्येक मुलगा आपआपला लंगड घेऊन लंगड लढावते म्हणून दुसऱ्याशीं लंगड लढवितो.' -व्याज्ञा १.१३९.

**लगत**—शअ. जोडून; सोबत, 'अर्जालगत पावत्या हजर केल्या आहेत.' [ सं. लग्=लागणें ]

**लगत्व**—न. ( छ. ) लघुगुरुभाव; अक्षरांच्या लघुत्व गुरुत्वाचें भेदक तत्व. -सह्या. जून ३७. [ सं. ल=लघु; ग=गुरु ]

**लगदालगदी**—स्त्री. हिसकाहिसक. 'शाकंभट ( लगदालगदी करीत ) त्या माझ्या खडावा.' -सन्यख ९८.

**लंगधडक, लंगधडंग**—पु. सडासोट; फकीर.

**लगाम तुटणें**—(ल.) १ आटोक्यांतून जाणें; आवाक्याबाहेर जाणें. २ दुर्दशा होणें [ लागणें ]

**लगाव-ऊ**—वि. ( कुण. ) लागास येणारा; योग्य; कामीं येणारा.

**लगाव**—पु. लागाची जागा; मान्याची जागा. 'शाहामाहमुदाचा तकिया व मसजीद शहरास लागती आहे हे हस्तगत जालियास शहरास मोर्चा भारी आहे यैसें जाणून बनाजी येथें येऊन लगाव पाहून त्याचे रक्षणास सातशे प्यादा नेमिला.' -पेद २६.१०१. [ सं. लग्-म. लागणें ]

**लगीत**—वि. ( व. ) पुष्कळ; फार; खूप. 'यंदा मोहरमांत नागपुरांत लगीत वाघ निघाले होते.'

**लगेच**—क्रिवि. लागलीच; तत्काळ.

**लगेढाल वाजविणें**—मोठमोठ्यानें गवगवा करणें; प्रशंसा करणें; प्रोत्साहन देणें; पुरस्कार करणें. 'मुंबईचा टाईम्स त्यांचे लगेढोल वाजवीत आहे.' -के २४.२.१९३९. [ ध्व. ]

**लंगोट**—पु. ( ल. ) वृषणावर खालून वर केलेवा वार. -मवि ९.११. [ लंगोट=मल्लानें कसावयाचें कांच्यासारखें वस्त्र ]

**लगोरिया फेर**—पु. घोड्याची एक चाल. -विछ ९९.

**लंगोवर**—स्त्री. घोड्याची धांवण्याची चाल. -ज्योत्स्ना ऑ. १९३७.

**लग्गा मारणें**—डल्ला मारणें; हात मारणें; लुबाडणें; लुटणें. [ लागणें-लग्गा ]

**लग्न**—न. ( फज्यो. ) कुंडलींतील प्रथम स्थान. यास मित्र, जननी, तनु, शक्ति, काय इ. नांवें आहेत. [ सं. ]

**लंघणें**—अक्रि. आटणें; घटणें. 'चौघरांसि भिक्षेसि गेली एः तंव उसीर झालाः जी जीः तेणें पाक लंघलाः म्हणौनिः कठिण जालें कीं:' -लीच ३ पृ. ५५.

**लघुनित**—स्त्री. लघुशंका. 'गोसावी तेयातें लघुनिती घेऊनि जाती. दोन्ही श्रीचरण धरूनि मूतिती.' –लीच ३. पृ. २५.

**लघुनिबंध**—पु. एखाद्या मुद्याचें थोडक्यांत चटकदार वर्णन. [ सं. लघु+लहान+निबंध ]

**लघुपरिहार**—पु. लघुशंका; लघवी. 'तंव गोसावी लघुपरिहारासि बिजें केलें.' –लीच ३. पृ. १०० [ सं. ]

**लघुरुद्र**—पु. शिवावरील अभिषेक प्रकार; अकरा एकादशनी; अकरा जणांनीं बसून एक एकादशणी म्हटली असतां होतो. [ सं. ]

**लघुवाद्या**—स्त्री. समुद्र फळाचा वेल; निपल; हिज्जल; इज्जल. –मसाप ४५.३. [ सं. ]

**लचका**—पु. लोभ; ओढा; ध्यास. 'अन याजला तर रुपयाचा लचका लागला आहे.' –पेद २०.६२. [ लचक ]

**लटकण**—न. एक दागिना. 'त समई शर्फूदौला यास दरबारास बोलावून नेऊन लटकण व भुजबंदी दिले.' –पेद ३९.१५०. [ लटकणें ]

**लटका**—पु. थरकांप; लटालट कांपण्याची क्रिया. 'संतापातिशयानें माझ्या अंगाचा लटका झाला.'–आभाळाची सावली १०९.

**लटका**—वि. दिखाऊ; केवळ दर्शनी; निरुपयोगी; व्यर्थ. 'लटकें काम न वाढविणें.' –पेद १८.१७०.

**लटकावा**—पु. ट्राममध्यें वगैरे धरून उभें राहण्याकरितां छपरापासून खालीं सोडलेला दोर, सांखळी, कडी वगैरे. [लटकणें]

**लटिवाद**—पु. खोटेपणा; लबाडी. 'राजश्रीस दर्शन न दिल्यास मजकडे लटिवाद येईल.' –ब्रम्हेंद्र निधन बखर. भारतवर्ष २. [ लटिका+वाद ]

**लटें**—न. लोंकरीचें वस्त्र; हलकें घोंगडें. –चित्रकृषि २.७.

**लट्टु**—पु. भोंवरा. –व्याज्ञा १.१५७.

**लठ-लाठी**—स्त्री. भरीव बांबूची लांब काठी.

**लडाकडा**—क्रिवि. वारंवार; एकसारखा. 'मामाच्या रे घरीं। नको जाऊं लडाकडा। येऊं दे गाडीघोडा।' –सह्या फेब्रु १९३६.

**लडेलटके**—पु. अने. अडथळे; गुंते; अडचणी; घोटाळे. 'चहूंकडून नाना प्रकारचे लडेलटके प्राप्त होनात.' –रा १२. १३१.

**लढत**—स्त्री. लढाई; कुस्ती; झोंबी. [ लढणें ]

**लढंतगढंत**—स्त्री. कुस्ती; डावपेंच; झोंबी. 'हीं माणसें तालमीच्या नादांतील होतीं. तीं तात्यासाहेबांबरोबर जोर, बैठका काढीत. त्यांच्याशीं लढंतगढंत खेळत.' –प्रतिआत्म २५१.

**लदबदणें, लदबदून जाणें**—अक्रि. भरून जाणें; लादलेलें असणें. 'वृक्ष फल पुष्पांनीं लदबदून गेले.' –तुसरा ५३६ [ लदणें द्वि. ]

**लपण**—न. आडोसा; लपण्यास अवकाश; लपण्यासारखी जागा. 'तिकडील राहणार लोकांस पहाडाची लपण फार, जमीदार लोक बादशहास दबत नाहींत.' –सभा रंजनी. भारत वर्ष ११. [ लपणें ]

**लंपास करणें**—अक्रि. पळविणें; लांबविणें; नाहींसा करणें. 'शैक्षणिक लेख वाचण्याच्या सबबीवर मास्तर सह्याद्रीचा अंक लंपास करतात.' –के १७.१.१९३९.

**लपेटवा**—वि. लटपटीचें; कावेबाजपणाचें; धूर्ततेचें; वक्रतेचें. 'याचें उत्तर किरकॅपट्रिक यानें लपेटवा दिल्हें कीं, याचा जबाब कंपनीचे आज्ञेशिवाय देतां येत नाहीं.' –रा ५.१७४. 'त्याचें उत्तर त्यास लपेटवा दिले.' –रा ५.२१०. [ लपेट ]

**लबूक**—वि. लवचिक काड्या असलेला (पतंग). –व्याज्ञा १.१६२.

**लय**—स्त्री. चिकी; खळ; कागद वगैरे चिकटविण्याकरितां मैदा किंवा बारीक पीठ शिजवून केलेली खळ; गोंद. 'टाकणखाराची लय करून कापडास लावतात. या योगानें कापड रंग चांगला पितें व दिलेला रंग पक्का बसतो.' –शिल्पकला विज्ञान ११.१०.

**ललितकथा**—स्त्री. अनेक प्रसंगांची चतुराईची मांडणी; गुंफण. –प्रतिसा. [ सं. ]

**ललितवाङ्मय**—न. मनास आनंद देणारें; रिझविणारें मनोरंजक वाङ्मय. [ सं. ]

**लव**—स्त्री. पागोळी; वळचण. 'लवेचें पाणी दक्षिणेस काढून दिलें.' –भाइसंमं.

**लवंडा**—पु. गुदमैथून करून घेणारा; नपुंसक.

**लवणे**—न. दार. 'सार्थी लवणे उघडौनि पाहिले.' –लीच ३. पृ ३८.

**लवबाक**—स्त्री. लवणें व वाकण्याची क्रिया. 'नाचतांना तिचे शरीराची हालचाल व लवबाक अशी सफाईदार होई कीं, पाहणारास वाटे हिचें शरीर बत्ताशासारखें हलकें फूल आहे.' –पाणकळा ७८.

**लवमात्र**—क्रिवि. १ किंचितहि; अल्पसुद्धां. २ किंचितकाल; अल्पकाल; क्षणभर.

**लवादनामा**—पु. लवादानें दिलेला निवाडा.

**लष्कर उतरविणें**—(उप. विनोद) लहान मुलानें शौच करणें.

**लसण्या**—पु. वैडूर्यमणि.

**लसालसलेला**—वि. हापापलेला; वखवखलेला; अधीर; उतावळा 'काय घोटभर चहा घेईल तेवढाच, कधीं लसासलेला नाहीं तो.' -खेस्व ५१.

**लस्सी**—स्त्री. (हिं.) दहीं साखर व पाणी यांचें मिश्रण.

**लहज**—स्त्री. ऐट; नखरा; दृश्य; शोभा. 'इकडे कडे व तोडेवाले तिकडेहि तशीच लहज.' -ऐपो २.४७. [अर. लहज-अर्ध दृष्टी; अर्धवट डोळे झांकून पाहणें]

**लहर-री**—स्त्री. लाट; तरंग. कंप; आंदोलन (नाद, ध्वनी वगैरेचा) [सं.]

**लहान आंबोती**—स्त्री. अंबुशी; एक वनस्पति. हिचीं पानें आंबट असतात; अंबष्टा; चुक्रिका; चांगेरी.' -मसाप ४५.४.

**लहू**—(वि. व.) आवडता; प्रिय; लाडका. 'लाडकी सून माही। भ्रताराची मोठी लहू। कशी माहेरा पाठवूं.' -वलो [सं. लघु]

**लव्हे-मुगटे**—न. भाताची एक जात. -चित्रकृषि २.७.

**लव्हे साळ**—स्त्री. बारीक साळ. -चित्रकृषि २.७.

**लक्ष्य**—न. उद्दिष्ट; नेम मारण्याचें ठिकाण; हल्ला करावयाचें स्थान; शत्रूचें मर्मस्थान. 'आस्ट्रेलियाच्या सरकारनें जपानी लक्ष्यावर चढाई करण्याच्या आज्ञा सोडल्या आहेत.' -के १३.३.१९४२. [सं.]

**लाअपजा**—वि. सडा; सामानसुमानरहित. 'हाजरत येथें लाअपजा होणार म्हणोन बोलोन करोडगिरीकडील मुतसदी व पंचोत्र्यवाले यांस बोलावून सांगितलें.' -रा ७.१०६.

**लाइण-णी**—क्रिवि. व्यर्थ; उगाच; विनाकारण. 'सूर्याजी पिसाळ लाइणी गळा पडला आहे हें खरें केलें आणेहि स्वामीस विदित केलें कीं सूर्याजी पिसाळ लाइणी गळां पडतो.' -पेद ३१.८५. 'जगदलियांची वृत्ति कदीम सालाबाद पहिलेपासून चालत असतां लाइणी शिवाजी नाइकडा निमे पटेलकीसी कथळा करितो.' -रा १५.१२.

**लाइन मन**—पु. रेल्वेचा रस्ता, तारायंत्राची तार वगैरे दुरुस्त आहेत किंवा नाहीं याची पाहणी करणारा. याचें काम दररोज सर्व रस्ता चालून जाऊन पाहण्याचें असतें. इं.

**लाकसूर**—वि. बेगुन्हा. -मुधो. [अर. ला+कसूर]

**लांकूड तोड्या**—पु. लांकडें फोडून आणून विकून निर्वाह करणारा. [लाकूड+तोडणें]

**लाखदाणा**—पु. अखेरचा कापूस. [सं. लक्ष्य+धान्य]

**लाखाशाही**—स्त्री. एक तलवार. -प्रश ४५. [लखराज सरदारानीं केलेली तलवार]

**लाखै(खो)वा**—पु. दिवा. 'नगरी उजळे कुळैवे। ठाईठाइ अखंड लाखैवे। जैसीं निधानें चरेति सदैवें। यादव प्रतापाची।' -नरुस्व ४८२. 'महूराचीं तोरणें बहूतसें। फुलांचा चांदोबा फळांचें घोंस। भीतरि कळियांचे लाखोवे कैसे। सोनें चापयांचे।' -नरुस्व ७७६. [सं. लक्ष्य]

**लाख्या बारगीर**—पु. दरसाल एक लाख रुपये वेतन मागणारा घोडयावरील सैनिक.

**लागणें**—अक्रि. चिकटणें; हल्ला करणें; नेट धरून बसणें; वेढून बसणें. 'बोरसदेचें ठाणें पठाणानें सरकारचें घेतलें तेथें लागोन घेऊन त्याचे हवाला करावे.' -पेद ३६.२८९. (**नादी**) **लागणें**-फंदांत पडणें; पाशांत अडकणें; आहारी जाणें.

**लागत**—स्त्री कर. 'रेल्वेनें अगर जलमार्गानें विनालागत तो माल जाऊं यावा.' [लागणें]

**लागमाग**—पु.अनेे गुप्त जागा; हल्ला करण्यासारखी जागा वगैरे; भेदस्थानें. 'कार्याचे लोक बोलावून आपले लागमाग ठीक केले.' -साब १६. [लाग+माग]

**लागवण**—स्त्री. वशिला; ओळख. 'त्याचे कारण माझी हुशारी नव्हे तर लागवण हेंच होय.' -सत्याप्र ११७.

**लाझीम**—वि. जरूरीचें कर्तव्य; आवश्यक. -मुधो. [अर.]

**लाटणें**—न. (कुस्ती.) प्रतिपक्षाच्या पोटाखालून हात घालून पलीकडचा दंड धरणें व दुसऱ्या हातानें त्याचा पलीकडचा पट पकडणें व तो दंड व पट आपल्याकडे ओढणें.

**लाट्याबाई लाट्या**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.२८९.

**लाठीछूट**—स्त्री. अनेकांनी एक समयावच्छेदें करून लाठी चालविणें व हल्ला परतविणें.

**लांडी**—स्त्री. रेल्वे मजूरांची चाळ (एकमजली).

**लांडारगा**—पु. (अशिष्ट) मुसलमानास तुच्छतेनें म्हणतात.

**लादणी**—स्त्री. १ रस्ता किंवा कालव्यावरील मोऱ्या; पूल आच्छादणारे लांब दगड; खिडक्यांवरील छावणीचे आच्छादनाचे लांब दगड. २ फरशी. [लादणें]

**लादालाद**—वि. लादून तयार; बांधून ओझीं घालून तयार. 'तमाम कारखाने लादालाद जाले आहेत.' -पेद ६.२८.

**लादून राहणें**—बांधाबांध करून तयार राहणें; सज्ज राहणें. 'आज्ञेप्रमाणें कूच करून लादून राहणें.' -पेद १.६३. [लादणें]

**लापण्यमिष्ठता**—स्त्री. मधुर भाषण; भाषामाधुरी; गोड बोली. 'राजाची तारीफ मर्देशहाणे, नेकदार या प्रकारें बहुत लापण्यमिष्ठतेनें गौरव केला.' -शिदि ५०. [ सं. ]

**लाबरी**—वि. (बे.) फुकट.

**लांबलचक**—स्त्री. दिरंगाई; लांबण; दीर्घसूत्रीपणा. 'तुम्ही लांबलचक लागू न देता किला खाली करून देवावा हें चांगलें.' -पेद ३९.७. [ लांब+लचक ]

**लांबोटा**—पु. (ठाकरी.) (उपहासानें) कुणबी. कारण कुणब्याचा नेसूचा रुमाल लोंबत असतो.

**लामअ**—वि. तेजस्वी. -मुधो. [ अर. ]

**ला मजहब**—वि. अधार्मिक; धर्म नसलेला; धर्मविहोन. 'राजा स्वतःला लामजहब असें म्हणवून घेतो.' -के १.१३. १९३९. [ फा. ]

**लायझाल**—वि. अविनाशी; शाश्वत. -मुधो. [ अर. ]

**लायह**—वि स्पष्ट; उघड. -मुधो. [ अर. ]

**लार**—स्त्री. (सिंधी) दलदल; पाणथळ जमीन.

**लारैबी**—स्त्री. सुदैवता. -मुधो. [ अर. ]

**लालबुंद**—वि. लालभडक; अतिशय लाल.

**लालमुखी**—न. एक कबूतराची जात.

**लाला**—पु. पंजाबी हिंदूस म्हणतात. पठाणासहि म्हणतात.

**लालूवाड**—स्त्री. एक तलवार. -प्रश ४१.

**लावगण**—स्त्री. लागवड; पेरणी. 'माहाली उगवणीचा व लावगणीचा हागाम हे दोनी कामें झाली पाहिजे होती.' -पेद ३१.८. [ लावणें ]

**लावणीचा**—वि. आपोआप न उगवतां मुद्दाम लावून तयार केलला. [ लावणें ]

**लावूलड्डू** वि. निरुपयोगी (जिन्नस मनुष्य).

**लाहक**—वि. खोटें. -मुधो. [ अर. ]

**लाक्षणिक कपात**—स्त्री. नांवाची; नामधारी कपात; नापसंती व्यक्त करण्याकरितां किंवा टीका करावयास संधि मिळावी म्हणून सुचविलेली नाममात्र कपात. 'या खात्याच्या मागणींत एक लाक्षणिक कपात सुचविली.' -के २५.३.१९३९.

**लिखाळें**—न. केसांतील लिखा काढण्याची फणी. [ सं. लिक्षा ]

**लिखोट**—स्त्री. लिखावट; हस्तलेख; पत्र; हातरोखा. 'हुजूराची लिखोट मानतात.' -पेद २९.२७४. 'लिखोट पत्र निराळें राजे हिंदुपत याचेंच नांवचें पाठविलें पाहिजे.' -पेद २९.२७.

**लिंगाडी धिंगाडी**—पु. (ठाकरी.) लिंगायत.

**लिटी**—स्त्री. ओळ (लेखन).

**लिवाए**—पु. झेंडा; निशाण. -मुधो. [ अर. ]

**लिसेंव**—स्त्री. (गो.) गोव्यांतील पोर्तुगीज कॉलेज. -सह्या ३१०. [ पोर्तु. ]

**लिस्सा**—पु. नरम मांजा. -व्याज्ञा १.१६२.

**लिहाज**—कारण. -मुधो. [ अर. ]

**लिहिणार**—पु. कारकून, लेखक. 'याचे हाती फतोरीचा लिहिणार दादाजी अनंत हेहि आम्हास भेटले.' -पेद १६.१२१.

**लिहिली पुसली**—न.अने. लेख वगैरे. 'त्यांनीं सरकारच्या मुलकास ढका न लावावा त्याप्रमाणें शफतपूर्वक लिहिणें पुसणें–लिहिली पुसली झाली.' -पेद २.६६.

**लीळापंचक**—न. (महानु.) १ सहेतुक लीळा. २ अवलोकनरूप लीळा. ३ तात्कालीक लीळा. ४ येति-भविष्य लीळा. ५ आश्चर्यरूप लीळा.

**लुकमा**—पु. १ मूं भरी; लांच; तुकडा. २ भर; दुजोरा. 'वाजीदअली खानाहीं लुकमा दिधला कीं जे आपण म्हणतात तें सत्य आहे.' -रा १.१०७. [ अर ]

**लुकाट**—न. एक फळ. हें लहान लिंबाएवढें असून खाण्यास आंबूस गोड असतें.

**लुकान**—पु. (कुस्ती.) परस्परांनीं मानेवर हात दिले असतां आपला उजवा हात प्रतिपक्षाच्या दंडावरून छातीजवळ नेऊन त्यास मागें लोटावे व आपला उजवा पाय त्याचे मागें नेऊन झटक्यानें मागें जावें.' -व्याज्ञा ४.१७१.

**लुगारी**—स्त्री. लूट; लुटालूट. 'बाबूरायाबरोबर दहावीस राहतात. नाहींतर दरोबस्तां लुगारीला धावले आहेत.' -पेद २.४०.

**लुलात**—वि. (महानु.) लीलायित; इच्छुक; आषक; भोगेच्छु. 'तो विषया कारणें लुलातु असे.'-आचारभाष्य १४.

**लुलीनम**—पु. खंजीराचा एक पवित्रा. -प्रश १८.

**लुवणें**—अक्रि. (गो.) कापणें. सह्या. पा. ३११. [ सं. लु=कापणें ]

**लुस्कान**—वि. अशक्त; निरुपयोगी; कुचकामाचा. 'तुरुंगाचा दारें इतकी लुस्कान आहेत कीं जातां जातां मोडतां येतील.' -आगरकर तुदि.

**लुळलुळणें**—अक्रि. लोंबणें, हालणें. [ ध्व. ]

**लूसि**—स्त्री. चिमटी; बचक. 'यकाधा अभिचार आणावा। वसंत रितु आकशावा। यावरी मळाची लूसि घेववा। चंडवाता करवीं।' -नरुस्व ६००.

**लेखनकामाठी**—स्त्री. १ हलक्या प्रतीचें लेखन. 'एखादा लेखक केवळ द्रव्यासाठीं लेखनकामाठी करीत असला.'

-प्रतिभा ४.१५. २ लेखनकला. 'आपली लेखन कामाठी भाव्यांना चांगल्या प्रकारें सजवितां आली असती.' -चित्र ७.१.१९४०.

**लेखनामा**—पु. लेखसारांश; लेखाचा मथळा; लेखांतील महत्त्वाचा भाग. [ लेख+नामा ]

**लेखया**—पु. लिहिणारा. [ लेखन ]

**लेख्यशाला**—स्त्री. दप्तरखाना. -पेंकुपृ. [ सं. ]

**लेवा**—स्त्री, हलकी अकू व पसेवा यापासून तयार केलेली एक प्रकारची चिक्की.' -ज्ञाको अ २६०.

**लोकनिर्णय याचना**—स्त्री. सार्वत्रिक मतदान; सर्व जनतेचें मत घेऊन केलेला निर्णय. [ सं. ]

**लोचदार**—वि. मधुर; गोड; आवडणारा. 'विनायकबुवा ठाकूरदास हे अत्यंत रसिक वृत्तीचे व लोचदार गळ्याचे हरिदास व मार्मिक संगित तज्ज्ञ होते.' -मनो नोव्हें १९१८.

**लोटण**—न. एक जातीचें कबूतर.

**लोटणें, लोटून काढणें**—सक्रि. केर झाडून काढणें; केर साफ काढून टाकणें.

**लोणपाटी**—स्त्री. आव्यापाट्यांतील शेवटची पाटी. -व्याज्ञा १.२२०.

**लोणहराम, लोणहरामी**—वि. पु. स्त्री. निमकहराम; निमकहरामी. 'लोणहरामी करावयाचें नाहीं.'; 'इनामी आहों लोणहराम नाहींत.' -शिदि ४७.२१०. [ सं. लवण=मीठ+फा. हराम ]

**लोणारी कोळसा**—पु. लांकडें जाळून केलेला कोळसा, याचे उलट दगडी, खाणींतील कोळसा. लोणारी हे कोळसा चुना वगैरे भाजण्याचें काम करतात.

**लोणिया**—स्त्री. लहान आंबोती; चुक्रिका; अंबष्टा; चांगेरी. -मसाप ४५.४.

**लोधा**—पु. हैद्राबाद संस्थानांतील रजपूत.

**लोध्या**—वि. मठ्ठ मनुष्य.

**लोलिंगता**—स्त्री. खुशामत; हांजीहांजो; पुढेंपुढें करणें; आर्जव. 'नासिरजंग सेवेसी मिलाफी आहेत ऐसें लेखोन, याचें वचन बहुत भार यास्तव बाह्यात्कारें यासी बहुतसी लोलिंगता करितात. परंतु अंतर्यामी यासहि दुजाणत नाहींत.' -रा १.५.

**लोलो ठोकणें, बडविणें**—बोंब मारण.

**लोळ उठणें ( भुकेचा )**—अतिशय भूक लागणें.

**लोळण फुगडी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९३.

**लोळेबोळे**—पु. लचके.

**लोळेबोळे तोडणें**—लचके तोडणें. 'तिनें त्या चळवळीवर तोंडसुख घेतलें तिचे लोळेबोळे तोडले.' -प्रति फेब्रु १९३६.

**लौकिक**—वि. उघड; जाहीर; ज्ञात; परिस्फुटित. 'नानवली, दिघी भुजे ये जागा जमाव ठेवून किनारा बंद करावा म्हणजे केला मनसबा लौकिक न होता सिघी होईल.' -पेद ३३.२०. [ लोक=लौकिक ]

**लौंडी, लौंढी**—स्त्री. बटकी; दासी [ लवंडी पहा ]

**लौंडीचा**—पु. दासीपुत्र; एक अपशब्द.

---

## व

**वइस**—वि. (कु.) वाईस; वाईच पहा. थोडा; अल्प.

**वकल**—न. भाडोत्री कूळ. 'आम्ही आपल्या परसूदाराकडे एक वकल ठेवलें आहे.' २ हंगामावर धान्य घेण्याच्या बोलीनें ज्यानें काम करावयाचें असें कूळ. 'माझ्याकडे १० वकले आहेत.'

**वंकद्वार**—पु. देवडी; पाहऱ्याचा दरवाजा; चौकीचें दार. 'निगतां वंकद्वारा बाहिरी। येति भेटली मंगळार्ति करीं। तिथें सकुण फळें लेणें दिधलें सुंदरी। मग वारु नमस्कारिला।' -नदस्व ६९२. [ फा. बंक पहा ]

**वकफा**—पु. मुक्काम; थांबवणूक; दिरंगाई; उशीर. 'वीस दिवस कमठाण्यावर वकफा येसें बोलले.' -रा ७.८६. [ अर. वक्फा ]

**वकफायत**—स्त्री. वाकफियत पहा. माहिती; ज्ञान; जाणीव. 'इजाफा आपण करार करून दिल्हा याची वकफायत राये चिमणलाल याजला आहे.' -रा २२.१४५. [ फा. वाकिफ ]

**वकळा, वकाळा**—पु. बैलावरील गोणी; धान्याचें बैलाच्या पाठीवरील ओझें. 'याज करतां वाणी याचे वकाळे येतात ते फिरोन जातात.' -पेद ३३.२९३. (वाकळ ?)

**वंका**—पु. वाफा.

**वकार**—पु. हे तीन आहेत. वकील, वैद्य व वक्कल (वेश्या).

**वकूअ**—पु. प्रसंग; घडलेली गोष्ट; माहिती. -मुधो. [ अर. ]

**वक्कल**—अर्पण पत्रक.

**वक्त गुदरणें**—प्रसंग कठीण येणें.

**वक्ताला उपयोगी पडणें**—कठीण प्रसंगीं मदत करणें; कामाला येणें.

**वखर**—न. वकर पहा. अब्रू; मान; प्रतिष्ठा. 'त्याणीं सांगितलें कीं, ह्या पेठ्या महाराज साऱ्या उलगडून पाहिल्या शिवाय वखर करून घालवण्याच्या नाहींत.' -शामब भारतवर्ष ७२.

**वगत**—(अवगत?) ताबा. 'एकशें सत्तावन गांव शत्रूचे वगत जात आहेत.'

**वंग (लोह)**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २३. [सं.]

**वगळी**—पु. अने. ओघळ; ओहोळ. 'जसे वगळी वाहती जात असे दरारा.' -ऐपो २.१९४.

**वगारा**—पु. वापर; वाग; रहदारी. 'ती जागा बायका मुलांच्या वगाऱ्याची होती.' -आआल [वागणें]

**वचपी**—पु. (गो.) जाणारा. [गो. वच=जाणें; सं व्रज्=जाणें]

**वचनसुपारी**—स्त्री. वाग्दान. वधूवर निश्चय करण्याचा एक विधी. -लाविसो ९. [वचन+सुपारी]

**वंचित**—धावि. १ वियुक्त; निराळा; अलग. 'अशा लेखकांना विद्वान या विशेषणापासून प्राय: वंचित ठेवण्यांत येतें.' -प्रतिभा ३.१०. २ अलाहिदा.

**वज्जीदन**—क्रि. वाहणें; -मुधो. [अर ]

**वज्रूह**—क्रि. व्यक्त होणें. -मुधो. [अर.]

**वट**—न. लोह. पोलादाचा प्रकार. -प्रश २४.

**वटकापैका**—पु. पैसा अडका; द्रव्य वगैरे: पैसा रुका. 'स्वामीसेवा निष्ठेनें करून कष्ट मेहनत वटका पैका वेंचून दोन्ही वतनें खादिलीं. वडिलपण शिक्का कुळीं आमचा.' -रा ११. पृ. ६५

**वटकें** न. (कुर) वठलेलें; शुष्क. 'वटकीं लांकडें वजनाला कमी भरतात.'

**वटछपन्नी**—स्त्री. वजनावरील कर.

**वटांगण**—न उटिंगण पहा. आधार. 'सोन्याचें ताट झालें तरी त्याला वटांगण हें पाहिजेच' -फातब १०.

**वठ्ठ्या हाणणें-ठोकणें**—भरपूर जेवण करणें; जेवणावर हात मारणें.

**वड**—स्त्री. वेग; लहर (साप चावल्यावर येते ती). 'इतक्यांत त्याला उचकी आली. अरेरे! तिसरी वड आली पोरें म्हणाली व थोड्याच अवकाशांत त्याचें प्राणोत्क्रमण झालें.' -अंधारांतील वाट १०९.

**वड्डी**—पु. (व.) धोबी; परीट. 'जाते सिताबाई वना। देव भार वड्डिणीला। धुजो हलक्या हातावरी। रामाचा रेशमी शेला।' -वलो १०. [वट्टी-ट्टी पहा]

**वणी**—स्त्री. गाई कुरणांत चारण्याबद्दल द्यावयाची रकम; चरणावळ. 'या लोकीं अर्ज केला ऐशास गाईची वणी तों एकंदर माफ केली आहे. म्हैसीची वणी घ्यावयाचा तह आहे.' -रा २०.२७३. [सं. वन]

**वत**—पु. शेता भोंवतालचा कुंप -चित्रकृषि २.७.

**वत्सदंत**—न. बाणाचा प्रकार. -प्रश १९. [सं.]

**वथुना**—स्त्री. (गुज.) वास्तुक; एक वनस्पती. -मसाप ४५.५.

**वधघट**—स्त्री. चढउतार; वाढघट; कमी अधिक होणें. [सं. वृध्-वर्ध+घटणें]

**वधारा**—पु. वाढावा; अधिक्य; वरतावा. 'तीन टक्के व्याजाचे रोखे वधाऱ्यानें विकले गेले.' -के ४.२.१९४१. [सं. वृध्]

**वनमनसली**—स्त्री. एक फुलझाड. -पेम.

**वनसोड**—पु. एक जातीचा आंबा.

**वनस्पती तूप**—न. गळिताचें धान्य किंवा इतर वानस्पतिक तेलापासून घट्ट व पांढरा बनविलेला तुपासारखा पदार्थ.' -चिज ४१४.१९४१.

**वफद**—पु. ईजिप्तमधील राष्ट्रपक्ष. [वफ्तपाशा या पुढाऱ्याच्या नांवावरून]

**वफाशियार**—वि. निष्ठेचा पोषाख घातलेला. -मुधो. [अर.]

**वफूर**—पु. समृद्धि; रेलचेल. -वि. पुष्कळ. -मुधो. [अर.]

**वयला**—वि. (कुण.) वरचा.

**वयली आळी**—वरची आळी.

**वरकस**—स्त्री. भाताचें पीक न होणरी डोंगराळ जमीन. -चित्रकृषि २.७. [वर+कसणें]

**वरखत**—न बी पेरण्यापूर्वी जमिनींत खत न घालतां पीक उगवल्यावर देतात तें खत; उपरीखत. -ज्ञाको ख ३८.

**वरगण**—न. (महानु.) भ्रमण; हिंडणें. वटि. [सं. व्रजन]

**वरगत**—स्त्री. वर्गणीपहा. पट्टी; चंदा; हिस्सेरसी. 'मुलीस ज्ञातिवाले पैका वरगत करून देऊन सोडवितात.' -पेद ४२.३.

**वरंगळणें**—अक्रि. घरंगळणें; पाटावरून घरंगळत खालीं सोडून मूग वगैरे धान्यांतील खडे वगैरे निवडून काढणें.

**वरगु**—वि. वर्गांतील; जातीचा. 'हल्ली जफ्तीवाले तुटपुंजीक सबब वरगु फुटकळ बारा घरचे जमा झाले.' -पेद ३६.२९७. [वर्ग पहा]

**वरचवढा**—पु. वरचढपणा; वर्चस्व; हुकमत गाजविण्याचा अधिकार. 'सास्वांचें वरचवढ्याचें वर्तन त्यास मान्य नाहीं' –साम ४४.

**वरजन**—वि. (महानु.) वरचढ; श्रेष्ठ; विशेष ज्ञानी. 'वरजनपर पानी चिद्धउ स्वामि माझा' –गस्तो २१४.

**वरडें**—न. वरटा; गंधोली. –मसाप ४५.६.

**वरणें**—सक्रि. (व.) प्र. वैरणें पहा. शिजत टाकणें. 'बोले भावजय माही। कण्या वरल्या गंजींत।' –वलो ३०. [ओयरणें पहा.]

**वरदळ**—स्त्री. बैठकीची जागा; वापराची जागा. 'नांदत होता तें घर व वाडा व वरदळ व पडशाळ व परसूं.' –ऐअप १५२१.१६.

**वरप**—पु. आगरी लोकांतील एक जात; मराठा आगरी. –के १३.१२.१९३८.

**वरप्रसाद**—पु परमेश्वराजवळ कीर्तनाच्या अखेरीस आशीर्वाद अथवा प्रसाद मागतात तो. 'मंगलाचरणापासून वरप्रसादापर्यंत सारें कीर्तन लावण्यांत आलें.' –मोच ४.

**वरव**—पु. १ प्रवाह; उतार. 'उंचीकडून सखल जागेकडे पाण्याचा वरव असतो.' २ पाझर. 'या ठिकाणीं पाण्याचा वरव दिसतो.'

**वरवता**—पु. (ठाकरी.) खाटारा पहा. प्रेताची तिरडी.

**वरसंशोधन**—न. वधूकरतां योग्य वर पाहणें.

**वरुद**—क्रि. पोंहोचणें; येणें. –मुधो. [अर.]

**वर्क्षेन्द**—क्रि. स्वीकार करावा. –मुधो. [अर]

**वर्ण**—पु. (फलज्यो.) राशींचे गुणधर्मांवरून ब्राह्मण, क्षत्रियादि चार वर्ग केले आहेत त्यापैकीं प्रत्येक उदा. मेष, वृषभ, मिथुन, कर्क या अनुक्रमें क्षत्रिय, वैश्य, शूद्र व ब्राह्मण वर्णाच्या होत. [सं.]

**वर्तह**—पु. भोंवरा; चक्रव्यूह. –मुधो. [अर.]

**वर्तुळांतील चेंडू**—पु. एक मुलांचा खेळ. –व्याज्ञा १.३६७

**वर्दी**—स्त्री. तैनात; शुश्रुषा; चाकरी. 'महाराणीसाहेबांच्या वर्दींत जे नोकर देण्यांत आले आहेत.' –विविध १५.१.१९३९.

**वर्धट**—स्त्री. वाढ. [सं. वृध-वर्ध]

**वर्धापनदिन**—पु वाढदिवस. 'या संस्थेचा प्रथम वर्धापनदिन मोठ्या थाटानें साजरा झाला.' –के ३१.३. १९३९. [सं.]

**वर्धावा**—पु. (ळ) आनंदाची बातमी; खुष खबर. 'कौसल्येसी पुत्र जाला। स्वधर्मे वर्धावा आणिला.' –भारा. बाल ६.८५. [वरधावा पहा]

**वर्मे**—स्त्री. वरम पहा.

**वऱ्हाडपांडे**—पु. वऱ्हाडांतील एक देशपांड्याप्रमाणें वतनदार वर्ग. हा प्राचीन असून यास वतन इनामें नाहींत. कामें करतात तीं रोखीच्या मोबदल्यांत करतात.' –के ३.१०. १९४२.

**वऱ्हाडीगोष्टी**—स्त्री. भातुपोषणी गप्पा; गौरवाच्या गोष्टी; मोठमोठ्या बाता. 'तूर्त त्यांस श्रीमंतांच्या स्नेहाचें अगत्य ते गोष्ट आपले हातीं नाहीं याकरितां वऱ्हाडी गोष्टी सांगून समाधान करून मार्गस्थ केलें.' –रा ६ पृ. २९५.

**वला**—पु. वेळ. –मुधो. [अर.]

**वलावदार**—पु. साहाय्यक; पाठ पुरावा करणारा; संरक्षक. एक गलबत दुसऱ्या गलबतास समुद्रांत संरक्षण, मदत देऊन नेतें त्यास म्हणतात. 'जे मोऱ्हील मागीलचा वलावदार व मागील मोऱ्हीचा वलावदार.' –पेद २४.१८३.

**वलाटा**—पु. जहाजांच्या मार्गाचा तक्ता; जलमार्गाचा तक्ता, नकाशा. –आंघइ ४०५.

**वल्लभपंथ**—पु. पुष्टिमार्ग; गुजराथमध्यें वल्लभाचार्यांनीं स्थापन केलेला कृष्णभक्तीचा अथवा वैष्णव पंथ. [सं]

**वल्ली घोळती**—स्त्री एक वनस्पती; हिलसा; हिलमोचिका; मुळा. –मसाप ४५.५.

**वल्हाटें**—न. गुरूं. 'कव्हणीं एक सेतकरी असे: तो आपुले वल्हाटे राखत असे: वोढाळ गुरु असे.' –लीच ३ पृ. ६५.

**वल्हे**—पु वल्हो पहा. वळू; संततीकरितां राखलेला. 'पंतप्रधान यांचा वल्हे घोडा बोररतन उगाच वारला असे.' –रा ६. पृ ४४.

**ववसा**—पु. महार लोकांत विवाहानंतर संक्रांत, नागपंचमीसारख्या सणाच्या दिवशीं वरपक्षाकडील मंडळी वधूकडे साडीचोळी शिधा वगैरे मिरवीत नेतात तो विधि. [सं. उपासना-वोवसा]

**वश्य**—वि. (फज्यो.) प्रत्येक राशीस जो प्राणी वश असतो तो. [सं.]

**वसती**—स्त्री. (महानु) एक रात्र राहणें; दिवस रात्र मुक्काम. [सं वस्]

**वसरी**—स्त्री (व.) ओसरी पहा. 'माळद मोठें घर। पुढं वसरी तारांची। आंत बैठक सख्याची।' –वलो २.

**वसाड**—न (कों.) धांवती मोठी लाट. [इसाड]

**वसाहतींचें स्वराज्य**—न. साम्राज्यांतर्गत स्वायत्तता. इं. डोमिनिअन स्टेटस यास प्रतिशब्द.

**वसिगत**—स्त्री. वसाहत; वस्ती; आबादी. 'राजश्री तुळाजी आंग्रे याणी ते गड बांधोन वसिगत केला.' -पेद २४.२०.

**वसु**—पु. पुनर्नवा; शोथघ्नी; एक वनस्पती. -मसाप ४५.५.

**वस्तुगत**—वि. वास्तवीक; विशिष्ट गोष्टींच्या महत्त्वाप्रमाणें; वस्तुनिष्ठ. 'लाठीमारांची वस्तुगत अनिष्टता व भयानकता त्यास कळते.' -के २१.७.१९३९. [सं.]

**वसैए, वसैए**—स्त्री. वस्ती; आश्रय; उपाश्रय; जैनमंदिर. सीवाळे रचमेचेंच स्थान म्हणौनि गोसावी वसैए बीजें करूं आदरिलें: मग वसए अवस्थान दिसतात.' -लीच पृ. ४१. 'हार्ती वेंझ देवोत तऱ्ही वसैए आंतु रिगो नेए.' -लीच ३.

**वहाफ**—स्त्री. बैल वाहण्यासाठीं, नांगरटीसाठीं घावयाचें बैल वगैरेचें भाडें. -प्रकाश २१.८.३८२ [वाहणें]

**वहितदार**—पु. वाहणारा; शेत करणारा; कूळ. [वाहणें]

**वह्या**—स्त्री. (खा.) भगत अंगांत येऊन घुमूं लागला म्हणजे मंडळी देवस्तुतीपर जीं गाणीं म्हणतात तीं.' -संशोधन एलेच पृ २६७. [ओवी, ओव्या]

**वळ**—पु. वसु; देवास वाहिलेला खोड. -चित्रकृषि ८.७.

**वळण**—न. पटावट. 'मासिक वळणांसाठीं बरीच रक्कम उचलण्यांत आली.' -२२.११.३८.३६. [वळणें]

**वळणें**—अक्रि. (महानु.) सोडणें; टाळणें. 'हा अर्थ वळले या पक्षाचा जाणावा' -आचारभाष्य १३.

**वळती**—स्त्री. धरपकड; धराधर. 'सरकारनें गुन्हेगारांची वळती करण्यास सुरवात केली.' -के १४.२.१९४१. [वळणें]

**वळार**—पु. अने. कासार (बांगड्या भरणारा).

**वळें**—न. (गो.) नारळ.

**वळेसर**—पु. (गो.) गजरा; फुलांची वेणी. 'अबोल्याचे वळेसर ताळेयरगो। फिरगी बोळयला माळयेर गो।' [वळणें]

**वाईट वाकटें**—वि. खराब; घाणेरडें; वाईटसाईट. 'बन्सीला तूं कांहीं वाईटवाकटें खायला घालूं नको.' -उपेअंत ३. [वाईट+ओखटें]

**वाकडी**—स्त्री. (ठा.) एक जातीचा मासा.

**वाकसाळ**—स्त्री. एक भाताची जात. -चित्रकृषि २.७.

**वाकुरी**—स्त्री वाफा.

**वाकुली**—स्त्री. विकृति; भाव; चेष्टा. 'विकारांच्या ज्या अनुकूल किंवा प्रतिकूल वाकुल्या प्रपंचांत दिसत असतात त्या पाहावयास आपल्याला वेळच नसते.' -साहित्यधारा मो ८. २८.

**वाखारी**—स्त्री नाण्यांची थैली; पिशवी. 'पुढां आमुचि वाखारी झेलावी असे.' -लीच ३ पृ ५६.

**वाखोरा**—पु. उत्तरीय वस्त्र. 'साऊल वेढुनि पोफळ गांठी। वाखोरेया देऊनि वायगांठी। येकी ताणुनि कूचतटीं। खांदेसी अंशुक आणिती।' -नरुस्व ८४२.

**वाग**—स्त्री. लगाम; दोरी. 'वाग धरून मारामारा राऊताला.' -ऐपो २.२६. [वाग पहा]

**वांग**—पु. पाड; कथा; महत्त्व. 'कविराय चमकला हीर, लोक जाहीर इतर शाहीर काजनें वांग.' मोच ४८.

**वागचवडा**—पु. एक रोग. वाघचवडा पहा.

**वांगड**—स्त्री. (गो.) सोबत

**वाग्मिता**—स्त्री. वक्तृत्व. 'महाराष्ट्राची वाग्मिता, पुण्याई, पराक्रम यांचा अंत झाला.' [सं. वाक्]

**वाघउडी**—स्त्री वज्रमुष्टीचा व्यायाम. एका जागेवर बसून तेथून ४-५ हात पुढें उडी मारून बसणें व पुन्हा तोंड फिरवून पहिल्या जागी उडी मारून बसणें. -व्याज्ञा ४.११४.

**वाघदंड**—पु. दंडाचा एक प्रकार. यांत दंड काढल्यावर दोन्ही हात उचलून खांद्याजवळ आणून वाघासारखी मुद्रा करावयाची असते.' -व्याज्ञा ४.४६.

**वाघुळासन**—न. (मल्लखांब) वेताच्या मल्लखांबावर हनुमान पकड बांधून केलेली एक अढी. -व्याज्ञा ३.३८२.

**वाघुळी**—स्त्री. कडीमध्ये दोन्ही पायांचे नवडे अडकवून लोंबकळत राहण्याचा डाव. -व्याज्ञा ३.४१०. [वाघूळ]

**वाङ्मय फौजदार**—पु. वाङ्मय चौर्य शोधून काढणारा. -प्रतिमा ३ १८.

**वाचकरावाचकर**—स्त्री. उलटापालट; उस्तराउस्तर; विसकटणें. 'कागदपत्रांचे ढीग पडले होते त्यांची कोणीतरी वाचकरावाचकर केलेली दिसत होती.' -पाणकळा १५३.

**वाच्यांश**—पु. बोलणें; बोलण्यांतील सारांश; भाषणांतील आशय. [सं. वाच्य+अंश]

**वाचारंभण**—न. उच्चार; वाचेनें प्रकटीकरण; परिस्फुटता. 'परन्तु तिला वाचारंभण अजून मिळाळेलें नव्हतें.' -टिच १.१०५.

**वाज**—पु. एक पांढरा कंद. हा खातात पण मादक व विषारी असतो.

**वाजअ**—जाहीर. -मखो. [अर.]

**वाजणें**—अक्रि. बोलाचाली होणें; कलह तंटा होणें. 'आचारी सोंवळयाची हेळसांड करतो असें निदर्शनास आल्यावर भय्यासाहेबांचें व त्यांचें एक दिवस चांगलेंच वाजलें.' -समं जिन्सीवाले चरित्र १४.

**वाजी**—वि. खराब; बिघडलेलें. 'कापड वाजी न होतां सुरक्षित गोविंदगडास येईल तें केलें पाहिजे.' -रा ३.३०३. [अर. बाजी]

**वाजीपुसी**—स्त्री. वाजपूस पहा. चौकशी. 'त्यास व आम्हास बोलावून त्याची वाजीपुसी करावयाची सेवेसी उचित असे.' -पेद ३६.१७२.

**वांझोटें**—न. निष्फल; निरर्थक 'यालाच वांझोटें जिणें म्हणतात.' -आई. [वांझ]

**वाट उठणें**—(महानु.) चोरानें नागवणें.

**वाट पडणें**—लूट होणें; वाटेंत नागविलें जाणें. 'शहरचे गिर्दनवाई दोन चार कोशीं वाटा पडतात माणूस वाग्रं देत नाहींत.' -पेद ३८.२३५.

**वाटमार**—स्त्री. एक मुलांचा खेळ. व्याज्ञा १.३५३.

**वाटावाट**—स्त्री. चर्चा; विचार व मनन. 'याचा विस्तार वाटावाट केल्यानें फार समजण्यांत येईल' -रा ५. ५०. [वाटणें द्वि]

**वार्टीमेलती**—स्त्री. एक वेल; बला; वाद्यालक. -मसाप ४५.४.

**वाडखोळ**—क्रिवि. पुष्कळ वेळ; दीर्घकाल; वाडवेळ. 'तेथून सयद काबील खानाचे घरीं जाऊन वाडखोळ खलबत केलें.' -रा १.११५. [सं वृद्ध+वेला. म. वाड+वेळ]

**वाडबेल**—पु. (व.) लहान बैल. 'सण पोळ्याचे दिवशीं। मातीचे वाडबैल। बांध कागदी बाशिग। गुंफ बनातीचे चौर।' -वलो २४.

**वाडहोळ**—क्रिवि. वाडवेळ पहा. पुष्कळ वेळ 'मोरोपंत व नबाब यांनीं खलबत बहुत वाडहोळ केलें' -पेद २६.९७ [वाढोळ पहा]

**वाडी भरणें**—पाठारे प्रभू लोकांत गरोदर स्त्रीस प्रथम समयीं पांचव्या महिन्यापासून श्रृंगार चढवितात तो. विशेषतः तिच्या गालावर व कपाळावर रंगीत कटोऱ्यांची चित्रें किंवा नकशी काढतात तीस वाडी भरणें म्हणतात. -ज्ञाको १७. २४९.

**वाडेरो**—पु. सिंध मधील जमिनदार.

**वाडेहुडे**—पु. अने. घरें व बुरुज; घरेंदारें; मालमत्ता. 'पुढें पेशवाई बुडाल्यावर त्या लोकांनीं आपले वाडेहुडे विकून टाकून ते आपल्या वतनावर व इनामावर जाऊन राहिले.' -जुन्या ऐ. गो भारतवर्ष ३८ [वाड+हुडा]

**वाढवय**—न प्रौढवय; वाढलेलं वय. 'वाढवयांत पहिलं बाळंतपण जिवावरचं असतं कार.' -अंधारांतील वाट. [वाढ वय]

**वाढून जाणें**—पुढें चाल करून जाणें; आक्रमण करणें; पुढें होणें, येणें. 'सरहद्दीबाहेर वाढून जाऊन पठाणांचा निःपात करतां येत नाहीं' -के १३.२.१९४०.

**वाढूळ**—वाढोळ पहा.

**वाण धरणें**—पाग टाकून मासे धरणें. -आदिमहाका.

**वाणा**—पु. पावटा; वाटाणा. -चित्रकृषि २.७.

**वाणी**—स्त्री. कौतुक; नावीन्य; अपूर्वता; अत्यंत प्रियता. 'माझे दोघे भाऊ। मला ते वाणीचे। देवाच्या दारीचे। कडुनिंब' -स्त्रीजी २४.

**वाणीत्रय**—न. (महानु.) १ अतितवाणी. २ परावाणी. ३ अमोघवाणी.

**वातनौका**—स्त्री समुद्रावर जाणारें विमान.

**वातायनासन**—न १ (मल्लखांब) मल्लखांबाच्या बोंडावर बसून डावा पाय टेकून त्यावर उजवा पाय दुमडून ठेवावा व हात जोडून उभे रहावें' -व्याज्ञा ३.२४५. -न. २ एका पायाची टांच लांघेत लावून त्याच पायाचें ढोपर दुसऱ्या पायाच्या टाचेवर टेकून हात जोडून उभे राहणें.' -व्याज्ञा ४.४९६.

**वादाडा**—पु. हल्ला; धाड; दरोडा; घाला. 'येक वादाडा मारीन कुनाला तर वर्साची बेगमी करीन तुझी.' -उपअंत ४९.

**वाफर**—न वाफोर; आगबोट. -के २.१२.४१.

**वाफा**—पु भातखाचर. - चित्रकृषि २ ७.

**वामनाचीं पदें**—वामनानें स्वतः बटुमूर्तीचें रूप धारण करून तीन पावलें भूमिदान मागितलें व तें मिळाल्यावर त्याचीं पावलें जशीं अतिशय दीर्घ होऊन सर्व विश्व व्यापून राहिलीं त्यावरून हळुहळू वाढत जाणारी गोष्ट; दीर्घसूत्री कारभार, फार लांबणारी गोष्ट. 'महालाकडील कजिये म्हणजे वामनाचीं पदें.' -पुद १.२१३.

**वामनाक्ष**—न. खड्ग तलवारीस नांव. -प्रश १५. [सं.]

**वामविरयी**—स्त्री. (गु) वागळ; वागूळ; जाऊका; अजिनपत्रा. -मसाप ४५.५

**वायगाठ**—स्त्री. अंतर्गाठ; आंतील पदराला घातलेली गांठ. 'साउले वेढुनि पोफळ गांठी। वाखोरेया देऊनि वायगांठी। येकी ताणुनि कुचतटीं। खांदेसी अंकुश आणिती.' -नरुस्व ८४२. [सं. वात+ग्रंथी]

**वायद्याचा व्यवहार**—पु. कोणताहि माल किंवा शेअर वगैरे ठराविक मुदतीनंतर विकत घेण्यादेण्याचा करार. मात्र या करारांत प्रत्यक्ष माल देण्याघेण्या ऐवजां केवळ किंमतींतील फरक देण्याघेण्याबद्दलच पुष्कळदां समजूत असते.

**वायपंट**—न. ( ठा. ) भूत; पिशाच्च, वारे.

**वायसी**—स्त्री. खंजिऱ्याचा पवित्रा. -प्रश १८. [ सं. ]

**वायुवाद्य**—न. हार्मोनियमप्रमाणें वाऱ्याच्या योगानें सूर निघणारें वाद्य. ' माझ्याजवळ एक सोडून पांच पेट्या आहेत. त्यांतलीं तीन वायुवाद्यें आणि दोन तंतुवाद्यें आहेत. ' -श्रमसाफल्य १.३.

**वायेकल**—स्त्री. निष्कारण बोलाचाल; अकारण क्रोधाचीं भाषणें. ' धाकटे देवडीस राजश्री पंतसचीव याजवर गफलतीनें वायेकल जाली. ' -पेद १३.१८. ( वायकळ पहा )

**वार**—पु. ( व. ) गारांचा वर्षाव ' गारपगाऱ्याला आम्ही कांहीं दिलें नाहीं तेव्हा त्यानें आमच्या गांवाकडे वार वळविला. '

**वार**—पु. ( व. ) पावसाची वृष्टि; वृष्टीचा मोसम ' यंदा पोळ्याचा वार पडला पण महालक्ष्म्याचा पडला नाहीं. ' [ सं. वार=समुदाय ]

**वारकरी**—पु सैन्याबरोबरचे बिन लढाऊ लोक; बाजारबुणगें; याविरुद्ध धारकरी.

**वारनळणें, वारसटणें**—अक्रि. वारा लागणें.

**वारांगना, वारयोषिता**—स्त्री. वेश्या; पण्यांगना; अनेकांस उपभोग देणारी स्त्री; या शब्दाचा वार म्हणजे दिवस याशीं संबंध नाहीं. [ सं. वार=समूह+अंगना=स्त्री ]

**वारापाणी होणें**—दाणादाण होणें. ' मराठ्यांची मांड कोसळतांच वारापाणी होऊन शत्रूचे लोक परत आपल्या गलबताकडे धांवले. ' -वसमो.

**वाराभिषक**—पु. देवावर, बहुधा शिवदेवतेवर, प्रत्येक सोमवारी करावयाचा अभिषेक. -आडिमहा ७३.

**वारीचा**—वि.क्रिवि. ( महानु. ) बदली; वाटचा; ऐवजीचा. ' माझ्या वारीचे सर्वज्ञास विनवावें. ' -विचारसिंधु ९९.

**वारेजणें**—अक्रि. ( व. ) वारा खाऊन तडकणें. ' वारेजलले लांकूड दारांच्या फळ्यासाठीं उपयोगी पडत नाहीं.'

**वाऱ्यावर सोडणें**—आधार काढून घेणें; निराधार स्थितींत टाकणें; जाईल तिकडे जाऊं देणें; ज्याप्रमाणें गलबताचें सुकाणु वगैरे काढून घेतल्यास तें वाऱ्याच्या प्रवाहाबरोबर भटकत जाईल त्याप्रमाणें निराधार सोडून देणें. ' पौंड हुंडी वाऱ्यावर सोडून द्यावयाचें ठरलें. ' -के ५ ९.३९.

**वाला**—वि. ( व. ) वेगळा. वायला पहा. ' पाण्याला जाऊं गड्या। रस्त्यानें वाल्या वाल्या । पहा बुडाला दिवस। कृष्णाच्या गाई आल्या. ' -वलो ३. [ सं. विलग ]

**वालाई**—स्त्री श्रेष्ठता; मोठेपणा. ' उत्तर झालें कीं, किस्तीस हे तकरीब नाहीं हें वालाई लेकिन हा मझेला द्यायेल आहे. ' -रा ५.१८१. [ वाला=श्रेष्ठ ]

**वाले**—न. औतास जूं बांधावयाची दोरी. -चित्रकृषि २.७.

**वाल्मीकि समाज**—पु. युक्त प्रान्तांतील झाडूवाले वगैरे अस्पृश्य समाज.

**वाव**—स्त्री. ( ठा. ) एक जातीचा मासा.

**वावर**—न. शेत; क्षेत्र; सपाट मोठी जमीन. ' एक एक वावराच्या अंतरानें चालणारे आम्ही तिघेजण अर्ध्या बांकावर आंखडून बसलों होतों. ' -हिप्र १०६.

**वावरें**—न. रहू करून शेतांत पेरलेलें भात. -चित्रकृषि २.७.

**वावुली-वावुलें**—क्रिवि. ( महा. ) आल्यापावलीं परत; मागील पावली. ' मागुते वावुलीं निगाले. ' -उच २६०.

**वासना**—स्त्री. पाठभेद; तऱ्हा; प्रकार. ' तिळ तेलीण तीळ पाखडीत होती. एकी वासना: तेल विकीत होती: तीया देखिलें. ' -लीच १.१८

**वासला वाढ**—स्त्री. तलवारीच्या धारेचा एक प्रकार. -प्रश ५४.

**वासिक**—वि. दृढ. -मुधो. [ अर. ]

**वासिल**—वि. मिळणारा. -मुधो. [ अर. ]

**वास्तववाद**—पु. सत्यसृष्टीचें यथातथ्य चित्र रंगविणें. -सह्या मे ३५. [ सं. वस्तु ]

**वास्तववादी**—वि. यथार्थ चित्र रेखटणारी; यथातथ्य कल्पना देणारी. ' रंगभूमीची सजावट सुद्धां अधिक वास्तववादी अशी झाली. ' [ सं. वस्तु+वाद ]

**वास्तव्य**—न. वास्तविक गोष्ट; वस्तुस्थिति; सत्य; तथ्य. ' ऐसें मनांत खचित येऊन वास्तव्य असेल तें कळवील. ' -रा ५.४७. [ सं. वस्तु ]

**वाहितगारी**—स्त्री. वहिवाटीचा हक्क. ' वंश परंपरा कोणासहि वाहितगारी द्यावयाची नाहीं. ' -के २९.९१९३९.

**वाहिली**—स्त्री. वाहण्याचें साधन, २ गंत्री; कंबलवाहक. -मसाप ४५.६.

**वाहीद**—वि. एकमेव; विशेष वाकबगार. ' पंतप्रधान व नबाब दोन्ही दौलती वाहीद मदारुल महाम माझे येक अन्तःकर्ण असल्यास करोडो रुपयांची किफायत करून दाखवील. ' -रा ७.१९५. [ अर. वहीद=एकटा, एकाकी, अद्वितीय ]

**वाहुटी**—स्त्री. वाऱ्याच्या प्रवाहाबरोबर वाहाती; वाहत जाण्याची क्रिया. ' मुलें वाऱ्याच्या वाहुटीला लागल्यासारखीं झालीं. ' -पुरु ३५०.१९१०.

**विक्रम**—पु. पूर्वीच्या खेळाडूंपेक्षां अधिक केलेला पराक्रम; उच्चांक; सर्वांत अधिक गुण [ सं. ]

**वाळ**—वि. भाकड. (गाय, म्हैस इ )

**वाळ पडणें**—भाकड राहणें.

**विडळींचे, विड्ठलींचे**—वि. (महानु) स्नेहाचे; नात्याचे. 'राउळी विड्ठळींचे मानुने.' -आचारभाष्य १४.

**विक्रयकर**—पु. घाऊक व किरकोळ विक्री व वायदा यांवर बसविलेला कर. [ सं. ]

**विकृतिचेष्टा**—स्त्री. (महानु.) थट्टा; उपहास; मस्करी. 'कांहीं विकृतिचेष्टाः नाजी विकृतिचेष्टा होवावया काई कारण.' -उच १३ [ सं. ]

**विखणें**—न. विखण; एक हत्यार. 'अळगिल्या चर्म काचे विखणें। नित्य लेपाळी त्या मोंसाने। परिस लागताच होय सोनें। लोखंड मोलें मागो नये।' -योसं १८.१५८.

**विग्रह**—पु. १ अवतार. 'यांना गौरांग प्रभूचा दुसरा विग्रह मानतात.' गौरांगऊ. २ (महानु.) देह 'शुभ विग्रह धरणें.'

**विंचणें**—अक्रि. चकणें; खेळण्याचा अनुक्रम ठरविण्यासाठीं गोट्यांच्या खेळांत बदीकडे लाखोटया फेकणे.' -व्याज्ञा १.१५२.

**विचबंद**—वि. मध्यें दोरा बांधलेली (विडी) [ हिं. बीच=मध्य+बंद ]

**विजय**—न खड्ग तलवारीचें नांव. -प्रश १५.

**विजात-विज्यात**—वि. असंबद्ध; परस्पर मेळ नसणारे; परस्परविरुद्ध. 'एक नबाबाचे ताळे विज्यात आहेत.' [ सं. वि+जाति ]

**विजुरेल**—पु. एक फिरंगी लष्करी अधिकारी. इं. व्हॉइसरॉय.

**विझला**—वि. विजेप्रमाणें चमकणारी. 'भूषण सकळ विझळांचा सांठा । धरूनि द्रोणागिरी म्हणवी मोठा।' -योसं २.५८.

**विझारत**—स्त्री. वझीरी. -सुधो. [ अर. ]

**विटाल**—पु. दोष; बट्टा; दूषण. 'आपल्या महत्वास व वचनास खेरपनास विटाळ होत आहे.'-पेद २३.२२. [ विटाळ पहा ]

**विथानकैला**—वि. भूतपीडित; भूत संचार झालेला; भूतानें पछाडलेला. 'तैं हामौनि रुक्मिया बोलिला। म्हणे विदघोशु रुशी शापिला। तैंलागोनि हा विथानकैला। जल्पे भलतें उतें।' -नरुस्व ३६७.

**विदग्ध वाङ्मय**—न. अभिजात वाङ्मयः ललित व उच्च दर्जाचें वाङ्मय [ सं. ]

**विदेह (लोह)**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २३.

**विद्वत्ता पाघळणें**—(उप.) मूर्खपणाचें विधान करणें; मूर्खपणा करणें; घडणें.

**विधिपक्ष**—पु. एखादें मत स्थापून त्याचें मंडन करणारी बाजू; पूर्वपक्ष. [ सं. ]

**विनयाधान**—न. कायद्याची अंमलबजावणी; समाजांतील स्वास्थ्य रक्षण; नियमांचें पालन. [ सं. ]

**विनाभाव**—पु द्वैत; दुजाभाव; मतभेद; बिघाड. 'मुख्य गोष्ट स्थल हस्तगत होयेतोपर्यंत आम्ही आपणाकडून येकंदर विनाभाव दाखवीत नाही.' -पेद २४.१६२. [ सं. ]

**विनोद**—पु. (साहित्य) गंभीर खेळकर अशा दोन मनोवृत्तींचें मिश्रण. [ सं. ]

**विभाजन**—न. विभागणी; भेद; वांटणी. [ सं. ]

**विभाजन**—न. भेदकतत्त्वः विभागण्याचें गमक. 'धर्म किंवा वर्ण इत्यादि गमकें किंवा विभाजने या युगांत ग्राह्य होण्याजोगीं नाहींत.' -के ११.४.१९३९. [ सं. ]

**विभाव**—पु. निमित्तकारण. [ सं. ]

**विभास्वरूपी खरेदी**—स्त्री. वायद्याची खरेदी. इं. हेज.

**विभास्वरूपी वेंचाण**—स्त्री. प्रत्यक्ष खरेदी केलेल्या मालाची प्रत्यक्ष विक्री करताना तोटा होऊं नये उलट फायदा व्हावा याकरितां खरेदीच्या वेळीच वायद्याची विक्री करून ठेवणें.

**विमान**—न. लिंगायत लोकांत किंवा एखादा श्रेष्ठ पुरुष मृत्यु पावला असतां त्याचें प्रेत नेण्याकरितां केलेली रचना. [ सं. ]

**विरजी**—पु. (महानु.) साथीदार; सहाय्यक; मदतगार. 'मी पाणिया विरजी वेलाऊ.' -उच १६.

**विरजीक**—स्त्री. सहाय्य; मदत. 'तीर्थरूप यंदा येथें नाहीं त्यामुळें चार दिवस विरजीक करावी म्हणून आज्ञा न घेतां आलों.' -पेद ९.७२. [ इरजिक पहा ]

**विरागी**—पु विरक्त; वैरागी; बैरागी. भैरवपंथी बैरागी. हे भगवीं वस्त्रें घालतात व हातांत एक चिमटा बाळगतात. [ सं. वि+राग ]

**विरथीपणें**—क्रिवि. साधनविरहित; तुल्यबल नसतां, शस्त्रास्त्रविरहित. 'महाराजांचे सेवक लोकही विरथीपणे झुंजले.' -वसमो. [ सं. वि+रथ ]

**विरद्या**—स्त्री.अने. करंगळीजवळच्या बोटांत घालावयाचीं भूषणें; विरवल्या.

**विलाईत, विलायत**—स्त्री. १ जन्मभूमि; मूळ देश. २ अफगाणिस्तान; मुसलमानांचा हिंदुस्थानांत येण्यापूर्वीचा मूळ देश. 'आजच लखनौवाले यांची डांक विलाईतपर्यंत बसली आहे. त्यांतून एक बारीची (अखबाराची) लाल थैली आली.' -रा १०.८२४. 'विलायतवाला फौजबंदी करून या प्रांतावर चढाई करून येतो हें वर्तमान आज एक महिनापर्यंत आहे.' -रा १०.८२४.

**विलोमपद्धति**—स्त्री. १ सरळ अनुक्रमानें पुढें न जातां मध्येंच एका पुढील टप्प्यापासून मागें येणें. २ उलट क्रमाची पद्धति; अनुलोम याच्या उलट [सं. वि+लोम-रोम=केंस]

**विल्हळ**—वि. विरळ; झिरझिरीत. 'अवएवीं सारे विल्हळु। तो फुटा पांगुरविला पातळु। जैसा कळिके वरी परिमळु। कनक कमळाचिये।' -नरुस्व ४०७ [सं. विरल]

**विल्हाउळ**—न. (महानु.) घर; स्थान; आश्रयस्थान. 'करतळा धनरेखा विल्हाळ। कीं तें चहुदानाचें विल्हाउळ।' -नरुस्व ११२६. [वेल्हाळ]

**विल्हाळ**—वि. (महानु) स्पष्ट; सुंदर; विस्तृत. 'करतळीं धनरेखा विल्हाळ.' -नरुस्व ११२६. [वेल्हाळ]

**विशेष**—वि (महानु) सर्व श्रेष्ठ. माहूर व गंगातीर या दोन तीर्थस्थानांतील दगडाला महानुभावीय लोक विशेष म्हणतात

**विश्वजन**—पु सर्व जगांतील लोक; पृथ्वीवरील लोक. 'विश्वजनाचा प्रतिपाल होऊन उर्जित जाहाला. आमचा मात्र उधरकाळ अला नाहा.' -पेद ४०.११३ [सं. विश्व+जन]

**विश्वेस्लाम**—पु. इस्लामी धर्माचें जागतिकीकरण; सर्व विश्व इस्लाममय करण्याची प्रवृत्ति. 'यांनीं महाराष्ट्रीय चळवळींच्या ध्येयांत विश्वेस्लाम प्रसाराचें तत्व घुसडून दिलें' -ज्ञाको. त. १३५. [सं. विश्व+अर इस्लाम]

**विषसन**—न. खड्ग. तलवारीचा प्रकार. -प्रश १५. [सं.]

**विषुवदिन-दिवस**—पु. ज्या दिवशीं दिनमान व रात्रिमान समसमान असतें तो दिवस. [सं.]

**विसबंद**—स्त्री. मेंदी 'माळ्याला ताकीद। विसबंदीच्या रोपांची। तान्ह्या बाळाला दृष्ट झाली। प्रेमधल्या लोकांची।' -स्त्रीगी ३८ इसबद पहा.

**विसातत**—स्त्री. मध्यस्थी -मुधो. [अर]

**विसारणें**—अक्रि. (महानु) दूर करणें. 'हंसु विसारीजे सारबकें.' -जांस्व ७७८.

**विश्वतोमुखा**—क्रिवि. सर्वांचें तोंडी; विख्यात; उघड उघड. 'अमक्या कार्याबद्दल आले होते ऐसी बोली विस्वतोमुखी.' -पेद ३.१११. [सं. विश्वतः+मुखी]

**विहरा**—पु. नदीचें पाणी आटल्यावर नदीच्या पात्रांत झरा खणतात तो. 'तेथेंच विहरे करून पाण्याची तजवीज करून उदईक मुकाम तेथेंच करावा.' -पेद २७.१२ [विहीर]

**विहसित**—न. हसितापेक्षां कांहींसें अधिक स्पष्ट हास्य; मोठ्यानें हंसणें. [सं. वि.+हस्-हसित]

**विही**—स्त्री. एक झाड. -पेम.

**विळखा अढी**—स्त्री. (मलखांब) मलखांबास हाताचा विळखा घालून मारावयाची उडी.' -व्याज्ञा ३.२१२. [विळखा+अढी]

**विळखा अढी फरारा**—पु. (मलखांब) विळखा अढी घेऊन केलेला तोल. -व्याज्ञा ३.२१२.

**विळाखिळा**—पु. मोडतोड; विळयाचा खिळा; मोठी वस्तु मोडून लहान करण. 'त्या आरशाचा विळाखिळा व्हायला कितीसा वेळ लागेल.' -श्रुतिगु १२८. [विळा+खिळा]

**वींती**—स्त्री. प्रसूत होणारी स्त्री. 'रण मृत्यु नच रुचे जरि बहुहित तरि जेविं बोळ वींतीतें.' -मोद्रोण २१.६३. [विणें]

**वीरकल-वीरगळ**—पु. वीरकल्लु पहा. वीर पुरुषाच्या स्मरणार्थ स्थापन केलेला दगड. [सं. वीर कान. कल्लु]

**वीरवाटव**—पु. बिरुद; बाणा; पराक्रम. -मुविराट ५.६३. [सं वीर+वाटव]

**वीरस्वर्ग**—पु. वीरास उचित असा युद्धांत मृत्यु प्राप्त होऊन मिळणारा लोक; स्वर्गवास. 'तो संग्रामांत वीरस्वर्ग पावला.' -पेंध २३. [सं वीर+स्वर्ग]

**वीरासन**—न. (मलखांब) मलखांबाच्या बोंडावर केलेलें वीरासन. -व्याज्ञा ३.२३३.

**वीर्यशुल्का**—स्त्री जिच्या स्वयंवरांत एखादें पराक्रमाचें कृत्य करणें हा पण असतो अशी स्त्री; पराक्रमानें प्राप्त होणारी स्त्री 'जनकानें आपली कन्या सीताबाई वीर्यशुल्का असल्याचें कळवून धनुष्य सज्ज करण्याचा पण लावला होता.' -व्याज्ञा १२९. [सं.]

**वृश्चिकासन**—न. १ (मलखांब) मलखांब बगलेंत धरून वर पायांचा आकार नांगीसारखा करणें. -व्याज्ञा ३.२४१. २ जमिनीवर कोपरापर्यंत हात टेकून पाय वर करून ढोपरें वाकवून नांगीप्रमाणें वर धरावे.' -व्याज्ञा ४.५०४.

**वृषस्कंध**—वि. बैलासारखे रुंद व पुष्ट खांदे असलेला. वृषभस्कंद कपाटवक्ष असें वर्णन नेहमीं येतें.' -व्याज्ञा १.४५. [सं.]

**वृषोछर्ग, वसोछाग**—पु. वृषोत्सर्ग पहा. 'कार्तिक, पौर्णिमेस वृषोछर्ग करणार.' -पेद ४.१६. 'कार्तिकमासी वसोछाग करण्याचें बाईचें मानस आहे' -पेद ४.१८. [ सं वृष+उत्सर्ग ]

**वृक्षासन**—न. ( मल्लखांब ) बोंडावर हात टेकून पाय वर ताठ करून थोडें तिरपें राहणें. -व्याज्ञा १.२३८. [ सं ]

**वृक्षासन अढी**-स्त्री. ( मल्लखांब ) मल्लखांबाजवळ हात टेकून डोकें न टेकतां वर पाय करून पायांची अढी करणें. -व्याज्ञा ३ ६२.

**वेकली**—स्त्री. वेहकळी पहा. एक वनस्पती. स्वादुकंटक, स्नुवा; ग्रंथिल. -मसाप ४५.२.

**वें( वे )कावणें**—सक्रि. वेडाविणें; चिडविणें; खिजविणें. [वांकुल्या पहा ]

**वगीवाल**—न. खड्ग; तलवारीचा प्रकार. -धश १७.

**वेचाण**—स्त्री.विक्री. 'संपाची वावटळ पसरल्यामुळें त्याची वेचाण वाढली.' -प्रावि जून १९३६. [ सं. व्यय=वेंच ]

**वेचुक, वेचूक**—वि. विचूक पहा. ( बडबड ) बेशुद्धींतील.

**वेझुटी**—वि. स्त्री. ओझरती. 'निंबालकर यासी तिराची जखम मानेस वेझुटी लागली आहे.' -पेद ३८ ६०. [ ? ]

**वेडाराघू**—पु. एक चिमणी एवढा पक्षी. शरीराचा रंग हिरवा, डोक्यावरचा बाजूचा रंग सोनेरी, हनुवटी व गाल तकतकीत निळया रंगाचे असतात. -बाबो १ मे १९ २.

**वेढा**—पु. तेढ; तिढण; आडवळसा; वक्रता 'पुतळाजी जिवाजीसारखे समागमे असतां वेढे काय म्हणून लागले. -रा ६ ८८. [ सं. वेष्ट् ]

**वेताळाची स्वारी**—स्त्री.स्मशानांत दलदलींत दिसणारा देखावा; स्मशानांत कधीं कधीं दलदलीच्या जागेंतून वायु बाहेर येऊन पेट घेतल्यामुळें आगीचा लोळ निघतो त्यास म्हणतात. खालीं पहा.

**वेताळाच्या चुडया**—स्मशान, रणभूमि वगैरे ठिकाणीं अस्थींतून निघणाऱ्या फॉस्फरसमुळें दिसणारा उजेड. -नि ८७.

**वेदी ( लोह )**—पोलादाचा प्रकार. -प्रश २३. [ सं.]

**वेधविणें**—सक्रि. आकर्षण करणें; ओढणें; खेंचणें; ( वेधणें याचे प्रयोजक रूप. ) 'तो प्रमदामदें वेधवोन । नगरा आणावा छळून ।' -मारा बाल १.१००.

**वेध्य**—पु. वेधा; गुंता; विरोध. 'प्रतिनिधीकडील वेध्य चुकलियावरी अंजनवेलीस मोर्चे देतो.' -पेद ३.४३८. [वेध ]

**वेर**—स्त्री. १ करवतीच्या धारेची वेणी. २ करवतीनें पाडलेली चीर.

**वेरा**—पु. कर. खंडणी; फाळा. 'छाणी, पादरे दोन्ही मातबर गांव येथे दो लक्षाचा वेरा घातला आहे. तो मारकूट करून वसूल करतात. -पेद २६.९४. 'आठ मास झाले वेराहि जाला रयतेंत जीव नाहीं.' -पेद ३६.२८९.

**वेल करणें**—( लाठी ) लाठी आपल्या अंगाभोंवती फिरविणें व परित्र करून मधून मधून शत्रूवर वार करणें

**वेलांतर**—न. ( फज्यो. ) मध्यम व स्पष्ट सौर दिनमानांत जें अंतर पडतें तें; उदयांतर; मध्यम माध्यान्ह काल व सूर्याचा याम्योत्तर वृत्तलंघनकाल यांतील अंतर. [ सं ]

**वेली वली, विली, विल्ह**—स्त्री. ( महानु. ) घराणें; वंश; कुल; गोत्र; आडनांव. [ सं. ]

**वशीवरचा आरसा**—सार्वजनिक वस्तु; कोणीहि उपयोग करावा अशी वस्तु. ( वेशीवरच्या आरशांत कोणीहि तोंड पहावे ). हा स्पष्टचि वेशीवरचा। आरसा अल्या गेल्याचा' -मनो.

**वसंद**—स्त्री. विसंधि; फूट; विजोड; बिघाड. 'सेनाधुरंधर व महंमद इसफ यांणीं वेसंद पाहिली आणि रुबकार जाहले' -पेद ५.६४.

**वेसर**—पु. खेचर. 'तो तूं खराचा सांगाती। वेसर उत्पत्ति भारवाही। भारवाही वेसर खरा। वाहातोसी त्रिंशिराच्या भारा।' -भारा अर ११. ११-१२.

**वेळवाक**—पु. वेळू वगैरे झाडें. 'लोकांस कौलपत्रें देऊन वेळवाक करावलें ते उंटे घालून सारली.' -पेद ९.४४. [वेळू+ वाक ]

**वैचा घेणें**—( विणकाम ) ताणा दुप्पट करणें.

**वैजात्य**—वि. ( महानु. ) ( ल. ) विजातीय स्त्री. 'वैजा त्यांचा उपद्रव'

**वैतागवाडा**—पु. (व ) कोपगृह. राणीस रुसून बसण्याकरितां बांधलेला वाडा. 'मनीं वैतागली सीता। गेली वैताग वाड्याले। लागो आग पाप्या तुझ्या। उभ्या रंगीत माडीले।' -वलो १४. [ वैताग+वाडा ]

**वैणिक**—न. वीणागीत; भावगीत. इं लीरिक [सं.वीणा]

**वैदग्ध्य**—न. १ सुसंस्कृतता; वाङ्मयांतील उच्चता. २ कुशलता; कौशल्य; चातुर्य. [ सं. विदग्ध ]

**वैदुगिरी**—स्त्री. ज्याप्रमाणें वैदू वैद्याची लटकी भूमिका घेऊन औषध योजना करून फसवितो त्याप्रमाणें कृति; भोंदुगिरी; लबाडी; फसवेगिरी. 'राजकीय मिथ्याचारानें व वैदुगिरीनें राष्ट्रांतील बुद्धिवान लोकांस मूर्ख कां बनवावे.' -के २१.५.१९४०.

**वैध**—वि. कायद्यासंबंधी; कायदेशीर. 'जनतेच्या वैध तक्रारी दडपून टाकणें हा निजामी कारस्थानाचा हेतु आहे.' -के २६.५.१९३९. [ सं. विधि ]

**वैधता**—स्त्री. शास्त्रीयता; कायदेशीरपणा; विधिग्राह्यता. 'त्याची वैधता हिंदुमहासभेच्या अध्यक्षाकडून येणाऱ्या निर्णयासाठीच स्थगित झाली आहे.' -के १.८.१९३९. [ सं. विधि ]

**वैधमार्ग**—पु. कायदेशीर मार्ग. 'सुभाषचंद्र बोस यांची निवडणूक वैधमार्गानें झाली असतां तिला नामोहरम करण्यांत आलें.' -के ३० ६.१९३९. [ सं. विधि ]

**वैधृतिपात**—पु. ( फलज्यो. ) रविचंद्र क्रांतिवृत्ताच्या विरुद्ध बाजूस असून समक्रांति योग झाल्यास म्हणतात. [ सं. ]

**वैशाख**—पु. दोन पावलांमध्यें तीन वितींचें अंतर ठेऊन स्तब्ध उभे राहणें. -व्याज्ञा १.५१.

**वैशाखनंदन**—पु. गाढव; खेचर. 'अहो ब्रह्मदेवानें अश्व उत्पन्न करावेत तर विश्वामित्रानें लांब कानाचे वैशाखनंदन उत्पन्न करावेत.' -दशवतार २३ मसाप.

**वैहाळी**—स्त्री. क्रीडा; विहार. 'तेथ राजकुमारां हातिची लळवडि। पांतवास सांची वैहाळीं कोरीं। येकमेकांस राऊ करीति गरुडीं। पारिवां खेळत।' -नरुस्व. [ सं. विहार ]

**वोकिर**—पु. डोळयांतील पू; उकीर; नेत्रमल. -मसाप ४५.६.

**वोढा घेणें-बांधणें**—क्रि. ( महानु. ) पोट बांधणें; कमी अन्न जावें म्हणून महानुभाव भिक्षुक पोटावर पट्टा बांधतात. त्यावरून अल्प आहार घेणें. [ ओढा ]

**वोढा सोडणें**--क्रि. ( महानु. ) जास्त आहार घेणें.

**वोढे खोडे**—पु. अव. ओढेनाले वगैरे. 'त्यामध्यें वोढेखोडे फारच आहेत.' -पेद १.७४. [ ओढा द्वि ]

**वोलखी**—वि. जाणते; तज्ज्ञ. 'आम्ही दीन व्हावे यातील अर्थ वोलखीच जाणतील.' -पेद ५.२१. [ ओळखी ]

**वोलणी**—स्त्री. ओलाणी; पडदणी; ओलेतें; स्नान करण्याकरितां भिजविण्याचें वस्त्र. 'मा गोसावियातें वोलणी दीधली.' --लीच ३ पृ ३८.

**वोहर**—पु. मत्स्यविशेष; जलचर प्राणी. 'तेथ वोहर, सुसर, मगर मासे। नानाविधें चळचरे जळमाणुसें। तिये उडौनि गगनीं घेवो-पाति आविसे। नक्षेत्रांची।' -नरुस्व ७१९.

**वोहरती**—वि. ( महानु. ) उतरती; निमूळती होत गेलेली. 'सुंदर वोहरता पोटऱ्या.' [ सं. वि+हर ]

**वोहरी**—स्त्री. निद्रा. 'तवं भाव कळवा सुंदरी। कोपौनि म्हणे ठाका बाहीरी। देवियें येवों धावो वोहरी। सिनली असे।' -नरुस्व ४०६.

**व्यंकणा-व्यंकटपण**—वि.ना. व्यंग; उणेपणा असलेला. 'श्रीरामें व्यंकणा मी केलों.' -भारा अयो १४.७५. 'तें कृपेस आलें व्यंकटपण' -भारा आयो १४.७६. [ सं. ]

**व्यक्तिस्वातंत्र्य**—न. प्रत्येक व्यक्तीस मनास येईल त्याप्रमाणें वागण्याची मोकळीक. [ सं. ]

**व्यतिपात**—पु. ( फज्यो. ) रविचंद्र एकाच दिशेस असून समक्रांतियोग झाल्यास व्यतिपात म्हणतात. [ सं. ]

**व्यवहारपत्र**—न. करार. 'अहो अधिकरणिक व्यवहारपत्र वाचावयास सांगा.' -मोहवि. [ सं. ]

**व्याख्यान अटाटी**—स्त्री. व्याख्यानाची झोड. 'या अजब विधानावर व्याख्यान अटाटी करण्याची जरूरी आहे काय?' -प्रतिभा ४.१५.

**व्याघ्रनख**—पु. खंजिराचा पवित्रा. -प्रश १८. [ सं. ]

**व्यायत**—स्त्री. करार; निश्चय; तडजोड. 'व्यायेत केली आणि थोडे रुपये करार केले.' -पेद २०.९२. 'सालगुदस्त पैका अदवनीवर व्यायेतीण केला नाहीं तर वाजवी नव दहा लाख रुपये द्यावे.' -पेद २०.९२. [ सं. वि+आयत ]

**व्यालछत्र**—न. सर्पासारखें नागमोडी छत्र; अबदागीर. 'नक्षत्रमाळा व्यालछत्रे व तोरणे वहतीचे वगैरा रथ हत्तीवरील अंबाऱ्या ऐनाच्या वगैरे.' -मदरु २.२१२. [ सं. व्याल=सर्प+छत्र=छत्री ]

**व्रज**—पु. गोकुळाचा प्रांत. -स्त्री. त्या प्रान्तांतील भाषा.

**व्हडले घर**—न. ( गो. ) १ मोठें घर; वडील घर. २ ( ल. ) यमाचें घर. -वसमो.

## श

**शक**—पु. एका जातीचे परकीय लोक; सिथियन. 'अंगापासुनि केले प्रकट तिनें म्लेच्छ यवन शबर शक.' -मो. धेनुहरण. [ सं. शक ]

**शकावली**—स्त्री. शकवार टिपण; कालक्रमानुसार नोंदणी; प्रसिद्ध गोष्टींची सालवार जंत्री; सनावली. -नि ५२२. [ सं. शक+आवली ]

**शंकरा पुढचा**—१ नंदी; बैल. शंकराच्या देवळांत पिंडीच्या समोर शंकराचें वाहन म्हणून नंदी बैलाची प्रतिमा बसवितात यावरून. २ ( ल. ) मठ्ठ; निर्बुद्ध; बैलोबा.

**शकवारी, शाकेरी**—स्त्री. ढाका येथील शूर लढाऊ जात.

**शकुनदिवा**—पु. वरघोड्याबरोबर विवाहास जातांना वरमाता आपल्या हातांत जो दिवा नेते तो. -लविसो ११९.

**शकुनाचें तपेलें**—न. रुखवताच्या वेळीं तांदुळ वगैरे शिध्याचें सामान ज्या तपेल्यांत नेतात तें.

**शंकेखोर**—वि. शंका काढणारा, घेणारा, संशयी. [सं. शंका+फा. खोर]

**शंखमणि**—पु. पुरुषाचा कंठमणि; गळ्याजवळील मणका. [सं.]

**शडंगलीला**—स्त्री. (महानु.) १ स्थान. २ काळ. ३ शृंगार. ४ वस्त्र. ५ परिवार. ६ क्रिया.

**शतत**—स्त्री. धास्ती. सतत पहा. 'आम्हास लाभ म्हणावा तरी त्यांची शतत वाटली.' –पेद ३.३७. [फा.]

**शनासाई**—ऐकणें. –मुधो. [अर.]

**शनिश्चरता**—स्त्री. मंदपणा; हळूपणा; दिरंगाई; विलंब. शनीची गति मंद असते यावरून. 'ते अद्याप औरंगबादेच्या आसपासच आहेत. शनिश्चरता मांडली आहे.' –पेद ६.१७३. [सं. शनै+चर]

**शनीद**—ऐकलें. [अर.]

**शफखून**—पु. शब्खून पहा. रात्रीचा हल्ला. 'रात्रीस शफखून केला.' –पेद २५.१३७.

**शब**—स्त्री. रात्र. –मुधो. [फा.]

**शबनम**—न. दंव. [फा.]

**शब्दछल**—पु. (शब्दाचा) सरळ अर्थ सोडून वांकड्या मार्गांत शिरणें; शब्दाचा सरळ अर्थ न करतां भलताच आहे असें दाखविणें; शब्दावर कोटी करणें. –हाविभी २६४. [सं. शब्द+च्छल]

**शब्दाशब्दी**—स्त्री. शिवीगाळ; बोलाचाली; भांडण. 'शब्दाशब्दी तर बाकी कांहींच राहिली नाही.' –पेद ६.९८. [सं.]

**शंभर भरणें**—पूर्ण माप भरणें; मनुष्याची आयुर्मर्यादा शंभर आहे यावरून, तसेंच मनुष्याचे शंभर अपराध भरले म्हणजे त्यास शिक्षा होते अशी समजूत आहे तीवरून. विशेषत: शिशुपालाचे शंभर अपराध झाल्यावर नंतर त्यास श्रीकृष्णानें मारलें या महाभारतांतील कथेवरून. उदा. शंभर अपराध भरणें.

**शमशीर**—स्त्री. तलवार. समशेर पहा. –मुधो. [अर.]

**शमशीर आदाजी**—स्त्री. तलवार पेलण्याची, मारण्याची कसरत किंवा विद्या. 'तिरंदाजी, नैजेबाजी व शमशीर आदाजी म्हणजे तलवार मारण्याचा अभ्यास व पैलवानीचा अभ्यास बहुत यत्नेकरून करीत होता.' –विबाइ. भारतवर्ष ७.

**शम्अ**—स्त्री. ज्योत; समई. –मुधो. [अर.]

**शम्स**—पु. सूर्य. –मुधो. [अर.]

**शयनासन**—न. (योग.) १ एक प्रकारचें निजण्याच्या स्थितींतील आसन. २ (मल्लखांब) मल्लखांबास खांदा लावून जमीनीवर निजून मारावयाची उडी. –व्याज्ञा ३.६१.

**शरफखास**—स्त्री. सरफइखास, सरफखास पहा. 'खास राजाकरितां राखून ठेवलेली जमीन. 'अफजूखान खोजा पातशाही शरफखासचा दरोगा आपला वकील आहे व तमाम अमीर उमराव आपणास जाणतात.' –पेद ४०.५५.

**शरह**—पु. शेरा; विवरण. –मुधो. [अर.]

**शरा**—पु. उर्दू कविता.

**शराबखोरी**—स्त्री. दारुबाजी. 'मक्तेदाराबर नियंत्रण घालून शराबखोरीस फारसा प्रतिबंध होत नाहीं.' –के १.३. १९४०. [फा.]

**शरीफ**—वि. मोठा. –मुधो. [अर.] –स्त्री. शरीफह.

**शर्त**—स्त्री. पैज; सरत; चढाओढ; होड. शर्त पहा.

**शर्फ**—वि. मोठा. –मुधो. [अर.]

**शलभासन**—न. जमिनीवर पालथें निजून दोन्ही हात बाजूस ठेवावे. व बेंबीवर सर्व भार घेऊन पाय, डोकें व छाती वर उचलावी.' –व्याज्ञा ४.५०३.

**शश**—वि. सहा. –मुधो. [अर.]

**शशांकित**—वि. साशंकित याचें अपभ्रष्ट रूप. शंकित; संशयाक्रांत; शंकाकुल. 'आपले फौजिचें बळ नाहींसें जाणून हे शशांकित होऊन बाहीर निघणें राहिले.' –रा १२.७. [सं. सह+शंका]

**शस्त्रपान**—न. १ शस्त्रांस पाणी देणें. २ शस्त्राचें पाणी दाखविणें; शस्त्रानें मारणें. [सं.]

**शस्त्रसंधि**—पु. १ सशस्त्र सहकार्य; सैन्य व शस्त्रास्त्रें यांसह परस्पर सहाय्य करण्याचा तह. २ युद्ध तहकुबी; शस्त्रास्त्रें आवरण्याचा तह. 'शस्त्रसंधीवर स्वाक्षऱ्या झाल्यानंतरहि फ्रेंच सैन्यानें सयाम्यांवर आक्रमण केलें.' –के ७.२.४१. [सं.]

**शहर**—पु. चंद्रमास. –मुधो. [अर.]

**शहर संपादक**—पु दैनिक पत्रांतील स्थानिक माहिती सर्वांत ताजी जमवून देणारा संपादक. शहराबाहेर पाठविण्याचा वर्तमान पत्राचा अंक लवकर छापला जातो व त्यांत उशीरां किंवा रात्री आलेली बातमी नसते. परंतु ज्या गांवीं वर्तमानपत्र निघतें त्या गांवीं बहुधा लंडन, मुंबईसारख्या ठिकाणीं अद्यावत् बातमी देण्याकरितां रात्रीहि काम करणारा स्वतंत्र संपादक असतो त्यास म्हणतात.

**शहामृगी वृत्ति**—स्त्री. शहामृग पळतां पळतां शत्रु दिसेनासा व्हावा म्हणून आपलें मुंडकें वाळूंत खुपसतो व शत्रु

गेला असें समजतो. यावरून डोळेझांक; टाळण्याची मनीषा. 'गांधींनाहि आपली शहामृगी वृत्ति बाजूस सारून त्या अत्याचारावर कडक टीका करणें अवश्य वाटलें.' -के २२.१०. १९४०.

**शहामृगी शहाणपण**—न. स्वतःस शहाणें समजून आपल्याच घमेंडींत असणें; स्वतःस विद्वान समजून आपलेंच मत अथवा युक्ति उत्तम मानणें. 'व्यवहाराचा पोकळ आव आणून बाह्यतः तिरस्कार दर्शवीत शहामृगी शहाणपणाच्या कैफांत उद्गारतो. 'दीडशाणा आहेस आलें.' -किर्लो जाने. १९४२.

**शाई घालणें**—तबला, मृदंग, यांच्या तोंडावरील चामड्यावर लोखंडाच्या किटाची पूड खळींत घालून बसविणें. पाणशाई अथवा पातळ थर चढया सुराकरितां व भरशाई अथवा जाड थर खालच्या सुराकरितां.

**शाक**—न. शाका पहा. कत्तल; कापाकापी; मारून निकाल. 'इंग्रजाचें शाक करावेंसें वारंवार बोध करून ठेवला आहे.' -रा १२.४. [अर. सक्का=चाकू, सुरी]

**शाकटा**—वि. १ छाकटा; धूर्त; लवाड. २ दारुबाज. [सं. शाक्त]

**शांकरी**—स्त्री. भांग; घोटा; थंडाई. शंकराचा प्रसाद म्हणून. 'देवपूजा आटोपून भैय्या बारामास लोटीभर असली दुधिया शांकरीचें प्राशन करीत.' -म्हावम्हा. [सं. शंकर]

**शाकायलवणाय करणें**—जें मिळेल थोडेंफार तें स्वाहा करणें: तोंडीं लावणें म्हणून गट्ट करणें. 'मुबल रायांनीं शाकायेलवणाये प्रारंभ केला आहे.' -पेद २१५. [शाकाय वा स्यात लवणाय वा स्यात् या संस्कृत वाक्प्रचारावरून]

**शाखा**—स्त्री. (बंगाली) शंखाची बांगडी. -स्त्री. जुलै ३६.

**शाखा**—स्त्री. दुर्वा, शमी वगैरेचे पल्लव घेऊन ते एका आंब्याच्या पानांत गुंडाळतात व त्यावर कच्च्या सुताचें वेष्टन करतात त्यांस शाखा म्हणतात. अशा सहा शाखा असतात. [सं.]

**शाण्णव कुळी**—स्त्री. मराठ्यांतील मूळ उच्च अशीं ९६ घराणीं.

**शांति मंदिर**—न. पारशांची स्मशानभूमि. [इं. टॉवर ऑफ सायलेन्स] [सं.]

**शादिल**—? विशेषनाम गांवाचें. ? 'शादील मारावयास पुढाईत तुम्ही.' -हिंद ९०.

**शाद्वल स्थळ**—न. ओलवण; वाळवंटांतील पाण्याची जागा. [सं.]

**शांबरिक खरोलिका**—स्त्री. जादूच्या दिव्याचीं चित्रें; दिव्याच्या साहाय्यानें पडद्यावर मोठीं चित्रें पाडण्याची विद्या. इं. मॅजिक लँटर्न. [सं.]

**शामलपटी**—स्त्री. मोगलाई अमलाचा कर. 'शामलपटीस राजापूर प्रांतात रवाना होणार आहेत.' -पेद ३३. ४२०. [शामल=मोगल+पटी=कर]

**शामी**—पु. (व.) स्वामी. 'माहा जीव गेला। शामी डोळ्यांत कां पाणी । दुसरी हो करा राणी । नवती तुमची ज्वानी।' -वलो ६७. [सं. स्वामी]

**शायवार**—न. जहाजाचा एक प्रकार.

**शार**—वि. घनदाट; गहन; दृढ. काळा शब्दाबरोबर प्रयोग, हिरवागार प्रमाणें. 'वावरांत काळया शार। मोठी हरणी निजून। पारध्या दादा धांव । टाक जाळे रे शेजून।' -वलो ५२.

**शारंगपाणी**—न. विवाहस्थळ तीर्थाचें ठिकाणीं असल्यास वरानें एका नवपरिणीत जोडप्यासह तीर्थावर जाऊन खालीं न ठेवतां आणलेलें पाणी. -लविसो ५१. [सं. शृंग-शार्ङ+पाणी]

**शारदा लोक**—पु. सरस्वती लोक; सरस्वतीचें स्वर्गीतील स्थान; स्वर्ग; वैकुंठ. 'नाना पावगी यांनीं ८ डिसेंबर रोजीं शारदालोकीं प्रयाण केलें.' -प्रतिभा. [सं. शारदा=सरस्वती+लोक]

**शारी**—स्त्री. कुंपण; वई; शेरी ? 'माळ्यानं केला मळा। बंघुनं केली शारी.' -मसाप १५.३३८.

**शासनबद्ध राजसत्ता**—लोकनियंत्रित राजशाही. [सं.]

**शासनाक्रांत**—वि. स्वाधीन; सत्तेखालील; ताब्यांतील; अधीन. 'दोन्ही जागे महाराजांच्या शासनाक्रांत करावे तरीच जाऊन बसावें.' -पेद ३.१२७. [सं. शासन+आक्रांत]

**शास्ती**—स्त्री. शासन; शिक्षा. 'शास्ताखानाची शास्ती केली आणि मागाहून जसवंतसिंग येऊन त्यानें सिंहगडास वेढा दिला.' -ऐपो २.१३. 'त्यांस शास्ती करून बाहेर घालवावें.' -पेद ३३.२०. शास्त पहा. [अर. सियासत्. सं. शास्]

**शाहुपटी**—स्त्री. सावकारांवरील कर. 'नवाबाकडेस शाहुपटीचे रुपये मागावयास व बाबूजी नाईक याचेहि मनसब्यास आले होते.' -पेद २५.२४. 'शाहुपटीबदल सोळा हजार रुपये देणे म्हणून लिहिले पाहिजे.' -पेद २८.७१. [शाहु-साहु+पटी]

**शिंककार**—पु. शिंकेचें शुभाशुभ सांगणारा; शिंकेवरून शकुन पहाणारा. -सह्यापा ३११.

**शिकलगीर**—पु. हत्यारें साफ करणारा. -प्रश ६. [फा.]

**शिकस्ता**—स्त्री. अरबी किंवा उर्दू भाषेची जलद लिहितां येणारी लिपी; उर्दूची मोडी लिपी.

**शिकारखाना**—पु. १ शिकारीकरितां राखीव रान. -के १६.२.४०. २ पशु संग्रह

**शिकारखानी खग**—पु. ज्या खणाच्या काठांत सिंह, वाघ, हत्ती वगैरेंचीं चित्रें असतात असा जरी बुट्टीचा खण.

**शिकारा**—पु. काश्मीरांतील नांव. -के २२.१०.१९४०.

**शिकेकरी**—शिक्केकरी पहा.

**शिक्काई नाणें**—न. राजाचा शिक्का असलेलें नाणें.

* **शिक्क्याचा कौल**—पु. सही शिक्का असलेलें अभयपत्र.

**शिखरक**—न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. -प्रश १७. [सं.]

**शिंगाडा**—पु. १ गाडीच्या पुढें असणारा दांडा. 'दोघा तरुणांस गाडीच्या शिंगाडयांनीं बेदाम मारलें.' -के १० ३. १९३९. -ज्ञाको १७. २ घोडयास होणारा एक रोग. यांत गळयाखालीं किंवा कानशिलांत गांठ येते. शिंगाडी पहा.

**शिगिकाई**—स्त्री. शिकेकई पहा.

**शिंगी**—स्त्री. केळीचा कोंब. मोना. -शालाप फेब्रु १९३९. [शिंग]

**शिगुफ्तन**—क्रि. विकसणें. -मुधो. [अर.]

**शिंगोरी**—स्त्री. कोंबडयाचा तुरा, शेंडी. 'वृषण काढलेल्या कोंबडयाची शिंगोरी कमी कमी होत जाते.' -ज्ञाको (क) ७५८.

**शिदोरी**—स्त्री. शिंगोरीबद्दल चुकीनें. 'कला व शिदोरी लाल भडक असलेली कोंबडी इतर कोंबडयांमधून निवड करून ठेवावी.' -के २६.१.१९४०.

**शिंदीसरा**—पु. शिंदीचा रस; शिंदी; शिंदीचें मद्य. 'अंगीं अविद्या विषयाचा वारा। त्यावरी पीती पेंडा शिंदीसरा। -योसं १८·२५०.

**शिनहाळ**—वि. (अप. झिंदल) विधवा; गतधवा; पतिरहित. 'शिनहाळ माझी पागा दिसती सार.' -ऐपो २. १८४.

**शिपणें**—सक्रि. (व.) १ शिंपडणें. २ टिपणें; शिवणें; स्पर्श करणें. 'मागून निघून सुद्धां मुक्काम गांठण्यापूर्वी मी मी तुम्हास शिपलों का नाही.'

**शिंपली मोतीं**—खोटीं मोतीं. **शिंपली चुना**-शिंपा भाजून केलेला चुना.

**शिपिल**—न. एक गलबताचा प्रकार.

**शिमग्याची सहाण**—स्त्री. साण पहा. क्रि० भरणें. या ठिकाणीं शिमग्यांत धुळवडीच्या दिवशीं जमून देवास कौल लावतात व गांवांतील तंटेबखेडे मोडतात.

**शिरगणती**—स्त्री. खानेसुमारी; मनुष्यांची मोजदाद.

**शिरडे**—स्त्री. शिरडी पहा. भाताची एक जात.

**शिरशिरी**—स्त्री. १ थंडीचा कांटा; हिंव; थंडीचे शहारे. २ त्वेष; क्रोधोद्भव. ३ वीट; खंती. [ध्व.]

**शिरसाव ज्वारी**—स्त्री. उत्कृष्ट ज्वारी.

**शिरा**—पु. रीत; चाल; पद्धति. 'या प्रसंगीं या किल्ल्याची फत्ते नवे शिरानें खुद्द जातीचेच जुरतीनें झाली.' -भारतवर्ष, पत्रे यादी १७. 'तेथील बंदोबस्त नव्या शिरानें जाहला.' -भारतवर्ष पत्रें यादी ३९.

**शिराई**—स्त्री. (ठाकरी) एक जातीचें गवत व त्याची केरसुणी.

**शिराधडाच्या चिठ्या**—स्त्री. अस्तिनास्ति पक्ष ठरविण्याकरितां टाकलेल्या चिठ्या. चितपट किंवा होय नाहीं अशाकरितां नाणें टाकणें, किंवा ओली सुकी करणें याप्रमाणें एका चिठीवर शिर व एका चिठीवर धड हे शब्द लिहून चिठया टाकून त्यांतून शीराची चिठी उचलील त्यानें जिंकली अशी समजूत. 'मग शिराधडाच्या चिठया दोनी करून देवापाशी टाकिल्या...दोघांनीं चिठया उचलोन आणिल्या तों शिराची चिठ्ठी मावजीनें आणली धडाची चिठ्ठी केरोजीनें आणली.' -सनदा ५८.

**शिरोपस्ताई**—स्त्री. डोकें वर काढणें; मगरुरी; उठावणी. 'ते जाताच दुरील मुलूक तेथे कितेक जमीदारानी सिरोपस्ताई केली. याकरितां मुलूख पोटेसी घेऊन रहावे.' -पेद २७. ५०.

**शिरोळी**—एक प्रकारचें माप. बारोळीच्या निंमे.

**शिलंगणी बेरीज, जमाखर्च**—पोकळ बेरीज, जमाखर्च. दसऱ्याच्या मुहूर्ताच्या दिवशीं कांहीं मुहूर्तानें व्यवहार केला हें दाखविण्याकरितां कांहीं पोकळ जमाखर्च करतात त्यावरून.

**शिलवृत्ति, उंछवृत्ति**—स्त्री. शिलोंछवृत्ति. शेतांतील पीक काढून नेल्यावर जे कणसांचे तुकडे अथवा दाणे गळून पडलेले असतात ते वेंचून त्यावर उदरनिर्वाह करण्याचें व्रत; यास शिलवृत्ति म्हणतात व धान्याच्या मळणीच्या वेळीं खळयावर जाऊन राहिलेलें किंवा दिलेलें धान्य घेणें यास उंछवृत्ति म्हणतात. हा एक व्रत, नियम, तपाचा प्रकार आहे. 'शिलवृत्ति आणि उंछवृत्ति। जावोनि त्यांच्या गृहाप्रती। जितुकें द्रव्य

ते मागती । तितुकें चतुर्गुणी तूं त्या देई ॥' -भारा अयो ८.३८.

**शिवरें**—न. कंप; शिवशिव; शहारें. 'तिला घट्ट धरल्या-मुळें तिच्या शरीरांतून शिवरें गेलें.' -पाणकळा. [ सं. शीत ]

**शिवार**—न. पीक; शेती. 'कांहीं शिवार रानांत आहे कांहीं शिवार गांवांत आहे.'

**शिवाळ**—स्त्री. मोटेचे बैल जुंपावयाचें जूं. -चित्रकृषि २.७.

**शिशुगीत**—न. लहान मुलांकरितां रचलेलें गाणें.

**शिस्त धरणें**—पाठीस लागणें; पिच्छा पुरवणें; कचाटींत धरणें; एकसारखी टीका करीत राहणें. 'डॉ. परांजपे यांनीं सरकारवर शिस्त धरली.' -के १८.२.१९४१.

**शिळाण**—स्त्री. थंड वेळ; शीतळ वेळ. 'मोठयाचा नवरदेव । राशी निघाला शिळाणीं । रुपया ओवाळणी । हाती घालती बहिणी ।' -वलो ३१. [ शीत+वेला ]

**शिळंद**—न. ( ठाकरी ) एक रानफूल; गौरीचें फूल. हें बहुरंगी असतें.

**शिळवाट**—स्त्री. शिळेपणा.

**शिक्षा**—स्त्री. पद्धति; रीत; शिक्षण. 'दुसरे स्त्रीकडून वाढविलें, तिला शिक्षा वाढावयाची दाखविली.' -पत्रें यादी ५३. [ सं. ]

**शिक्षागार**—पु. शिक्षक. 'शिक्षागार वृद्ध चांगले सत्कार्णी लावावे. राजपुत्र म्हणून तिळमात्र मुरवत करूं नये.' शिदि २२५. [ शिक्षाकार=शिक्षा लावणारें ]

**शीघ्रलिपी**—स्त्री. जलद लिहिण्याची लिपी; लघुलिपी. [ सं. शीघ्र+लिपी ]

**शीताचवरी**—स्त्री. शतावरी; नारायणी; एक वनस्पति. -मसाप ४५.३.

**शीर**—पु. ( लाठी ) प्रतिपक्ष्याच्या कानशिलावर केलेला वार. ०**वार**-पु. १ टाळूवरील वार. -मवि ९.११. २ फरीग-दक्याचा डोक्यावरील वार. -व्याज्ञा ४.३८४.

**शीर्षासन-अर्धी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाजवळ हातांवर शीर टेकून शीर्षासन करून पायांच्या अर्धीत मल्लखांब धरून मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.६२.

**शीर्षासन**—न. ( मल्लखांब ) बोंडावर डोकें टेकून वर पाय ताठ करणें. -व्याज्ञा ३.२३७.

**शीळ**—वि. श्लील; शुद्ध; सात्त्विक; पवित्र. 'त्यांची शीळ बुद्धि कैसी । सकाम मानसीं स्पर्शेना ।' -भारा. अर. ४.५. [ सं. श्लील ]

**शुकपाठ**—पु. प्राथमिक पाठ; ओनामा; प्रारंभ. 'पहिल्या पिढींत सुधारणेचा शुकपाठ झाला तो पुरा झाला.' -भाबं १.

**शुकळीत, सुकळीत**—पु. शुक्रित; शुक्र; रेत. 'शुकळीत श्रोणीत सप्तधातु । मायबापही लटकी असे मातु ।'-योसं ७.६. 'सुकळीत श्रोणिता संगें गळे ।' -योसं १०.६९.

**शुक्र**—पु. उपकार; आभार. -मुधो. [ अर. ]

**शुक्रनीति**—स्त्री. शुक्रनीति या नांवाचा एक राजनीतीवर ग्रंथ आहे. यावरून धूर्तता; चाणाक्षपणा; सावधगिरी; राजकारणांत अवश्य असणारी चतुरता; डावपेच. 'बहुत सावध लेकूरपण टाकून या दिवसांत शुक्रनीतीनें असावें.' -पुद १. २५३.

**शुगुल**—पु. 'आतां छपरें घालण्याचा शुगुल आहे.' -पेद ८.६३. [ फा. ]

**शुजीअ**—वि. शूर. -मुधो. [ अर. ]

**शुदन**—क्रि. होणें; असणें. -मुधो. [ अर. ]

**शुद्धशास्त्रें**—न. अव. केवळ विचार गम्य शास्त्रें, याचे उलट पदार्थगम्य शास्त्रें.

**शुद्धिसांड**—वि. शुद्धीवर नसलेला; भानावर नसलेला. 'इतकें असून सुद्धां तूं मला आपली शुद्धिसांड म्हणतेस.' -सह्यां. मे १९३८. [ सं. शुद्धि+सांडणें ]

**शुनक**—पु. खंजीराचा पवित्रा. -प्रश १८. [ सं. ]

**शुभ्र**—वि. १ पांढरपेशा; गृहस्थ. २ रुपया. 'शुभ्राशिवाय चालत नाहीं.' [ सं. शुभ्र=पांढरा ]

**शुमारद**—गणावें; मोजावें. -मुधो. [ अर. ]

**शुमुर्दन**—क्रि. मोजणें. -मुधो. [ अर. ]

**शुम्म**—सना. तुम्ही. -मुधो. [ अर. ]

**शुहूर**—वि. सौर. -मुधो. [ अर. ]

**शूर्पारक ( लोह )**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २३. [ सं. ]

**शेंगट**—न. गवताची एक चांगली जात. -चित्रकृषि २.७.

**शेगा**—पु. जमीनीचा महसूल. -सयाजी २.४६६.

**शेगा मारवेल**—पु. गवताची एक चांगली जात. ही वासरांचे उपयोगी असते.

**शेजबाज, शेजवात**—स्त्री. ऐरणी दानानंतर बहुल्याजवळ एका पलंगाबरील शेजेवर वरवधूंस बसवून त्यांचे भोवती सुताचे सोळा फेरे गुंडाळतात व नंतर त्याची एक वात करतात तो विधी. -लविसो १४६.

**शेजून**—क्रिवि. (व.) जवळून; निकट अंतरावरून. 'वावरांत काळया शार। मोठी हरणी निजून। पारध्या दादा! धांव। टाक जाळें रे शेजून।' -वलो. [ शेज ]

**शेणभरो, शेणभरवीण**—पु. स्त्री. शेणभरणारा-री.

**शेतिवस**—पु. एक वृक्ष; स्यंदन; तेभि; वंजुल. -मसाप ४५.२.

**शेद्‌व**—पु. १ घामाचा अंश; घामाचा ओलावा; विशेषतः ताप उतरत असतां अंगास जो घामाचा ओलावा येतो तो. २ कोऱ्या मडक्यांत पाणी ठेवलें असतां बाहेरच्या अंगास झिरपून येणारा ओलावा. [सं. स्वेद]

**शेद्‌वणें**—अक्रि. आर्द्रता येणें; ओलावा, घाम येणें. [सं. स्वेद]

**शेंदुड**—न. निवडुंग; सामंत; दुग्धा; सिंहुड. -मसाप ४५.४.

**शेंदुरवणी**—स्त्री. एका जातीचें झाड.

**शेपटणें**—सक्रि. छडीनें मारणें; छडीनें पिटाळून लावणें. [शेप]

**शेंपरूट**—न. एक प्रकारचें गवत.

**शेंबडी**—स्त्री. (ठाकरी) शिकेकाई.

**शेर**—पु. वाघ. -मुधो. [अर.] **शेरअफगन**-वाघमाऱ्या.

**शेरबेशह**—व्याघ्रस्वभावी. [अर.]

**शेरामध्यें पडणें-शेऱ्यामध्यें पडणें**—मागें पडणें; बाजूस पडणें. 'आपलीं पत्रें येथें हमेशा सर्वांस येतात त्यास एकाहि पत्रांत आमचें स्मरण न जालें तस्मात् आम्ही शेरामध्यें पडिलों असें दिसोन येतें.' -रा १४.५. 'तात्या आमचें विस्मरण न व्हावें आम्हांस शेऱ्याच्या लोकांत न घालावें.' -रा १४.५.

**शेरीफ**—पु. महंमदाचे फातिमेपासून झालेले वंशज. -विविध २५.१२.१९३८.

**शेलट**—न. भोकरीचें फळ. -मसाप ४५.२.

**शेलणें**—सक्रि. शेलण्याने पाणी झाडांस घालणें, उडविणें.

**शेलवट**—पु. भोकरीचें झाड; शेलु; श्लेष्मातक; शीत. -मसाप ४५.२.

**शेवटावणें**—सक्रि. शेवट करणें; शेवटास नेणें; काम पूर्ण करणें.

**शेवतीपूजन**—न. १ सीमांतपूजन. २ वरपक्षाकडून वधू, वधूमाता व करवली यांचा सत्कार करतात त्या विधीस म्हणतात. -लविसो १३४. [सं. सीमांतपूजन]

**शेवरा**—पु. (व.) एक जातीचें गवत. 'हिरव्या गायवनीं। गाई खातील शेवरा। तानुलीच्या दुधासाठीं। बांधा खुंटल्या भिवरा।' -वलो ८०.

**शेंवरी**—स्त्री. नदी कांठची जमीन भरून येण्याकरितां व उन्हाळ्यांत ओली वैरण मि[illegible]वी म्हणून करावयाचें पीक. -चित्रकृषि २.५.

**शेषारती**—स्त्री. सप्तपदी झाल्यावर सुवासिनी स्त्रिया वधुवरांस औक्षण करतात तो विधि. [सं.]

**शेहरा**—स्त्री. मुंडावळ. 'शेहरा म्हणजे मुंडावळी यास तास मोत्याची झालर लावून तयार केली.' -रा ७. -खलप १.२६. [फा.]

**शेळक्या बोकड**—पु. धनगर व बोकड. 'वाघशेळी नांवाचा खेळ.' 'जैसा सेलका बोकड खेळती मुलें। एकें लांडगा होऊन खेळविलें। फेरे फिरतां चहूंकडे ताणिले। एकाच पोरें।' -योसं १०.१०. [शेळी-शेळक्या=धनगर+बोकड]

**शैवाल भालान**—न. लोह; पोलादाचा प्रकार. -प्रश २२. [सं.]

**शोकी**—स्त्री. दांडगाई; मस्ती. 'शामलानें शोकी फारसी केली.' -पेद २.३८. शोखी पहा. [शौख]

**शोभनिका**—स्त्री. गोवरी; शेणी. 'जेथें माको असे तराळी। ...मेसको वळी शोभनिका।' -भारा अयो ३.७.

**शोभावरी**—क्रिवि. (महानु.) विमानावर; विमानारूढ. 'गोसावी तेथ शोभावरी विवळुनि उभा वावरेंही मुशानी।' -गस्तो २०१९.

**श्यांबार**—न. शायबार पहा. गलबताचा एक प्रकार.

**श्रमजीवि**—पु. कामकरी; मजूर. [सं.]

**श्रावणझड**—स्त्री. श्रावण महिन्यांत पावसाची एकसारखी लागलेली धार, सतत धार, अविरत वृष्टि. 'जुन्या शब्दांची नुसती श्रावणझड सुरू केली.' -प्रतिभा ३.११. [श्रावण+झड]

**श्रीकार**—पु. १ (ल.) सुरुवात; प्रारंभ. २ आद्य नांव; प्रथमारंभींचें नांव. 'लोकमान्यांनीं स्वतःच्या नावाचा श्रीकार घातला.' -के १.८.१९३९.

**श्रीगर्भ**—न. खड्ग; तरवारीचा प्रकार. -प्रश १५. [सं.]

**श्रीचक्र**—न. एक यंत्र; समोरासमोर समभुज त्रिकोण काढून आंत आकडे मांडून तांत्रिक पूजेकरितां केलेली प्रतिमा; मातेचें प्रतीक. [सं.]

**श्रुति**—स्त्री. (संगीत) एक स्वराचें मान. ध्वनिमान. [सं.]

**श्रुतिगुण नाटिका**—स्त्री. कवळ ऐकल्यानें बोध होईल असें छोटें नाटक. श्राव्य नाटक. [सं.]

**श्वेतकृष्ण**—न. काळेंपांढरें; काळेंबेरें; किल्मिष. 'सुप्रवृत्तीनें वर्तणूक केली तर उत्तम कदाचित् श्वेतकृष्ण विचार चित्तात आणून या तर्फेचे मुलकात वरातदार पाठऊन रयतेचा आट करू लागले तरी येकवेल साफ सांगोन वरातदार हाती धरून बाहेर घालणें.' -पेद ३.५५. [ सं. ]

**श्वेतेडा**—स्त्री. एक वनस्पति; तिगडी; त्रिपुटा; त्रिवृत्ता; त्रिमंडी. -मसाप ४५.४. [ सं. ]

## ष

**षडंगोदक**—न. तापांत अंगावर घ्यावयाचें नागरमोथा, पित्तपापडा, वाळा, काळा वाळा, रक्तचंदन व सुंठ घालून उकळलेलें ऊन पाणी. [ सं. ]

**षिगुफा**—पु. शिगूफ पहा. बखेडा; मझेला; लचांड; फूट. 'तों दरमियान अलीजाह यांचा षिगुफा खडा झाला, याजमुळें शिबंदी खर्च जाजतीच पडला.' -रा ५.१३५. [ फा. शिगाफ् ]

**षिताब**—क्रिवि. जलद; लवकर; तावडतोब. 'मा॥रनिले नुमाज्यलद व षिताब आंमोर्हिबाकडे पोहंचतील.' -रा १०. २३५. [ फा. षिताब=घाई; जलदी त्वरा ]

**षैद**—पु. (प्र. शहीद) शहीद पहा. हुतात्मा. 'असा अंनर्थ मांडिला त्या मुलकाचे ब्राह्मण षैद होऊन फिरावयास लागले.' -साब ४.

## स

**सआदत लझूम**—वि. सुखाची निश्चिती असलेला. -मुधो. [ अर. ]

**सई**—प्रयत्न. -मुधो. [ अर. ]

**सुई**—क्रिवि. लागलीच.

**सईर**—वि स्वैर, अपभ्रंश. [ सं. स्वैर ]

**सकच्छ**—वि. कासोटा घातलेलें (नेसणें); दक्षिणी स्त्रियांची सामान्यतः लुगडें नेसण्याची पद्धति; याचे उलट विकच्छ; गोल नेसणें. [ सं. स+कच्छ ]

**सकण**—वि. कणी असलेलें; भाताची कणी मिसळ असलेले तांदूळ; धान्याचे कण असलेला कोंडायुक्त अंश.

**सकत**—स्त्री. शक्ति. अपभ्रंश.

**सकरड्या गायी**—स्त्री. अने. (महानु.) पठारावरील गवत चरणाऱ्या निर्बल गायी.

**संकल्पपत्र**—न. योजनापत्रक; एखाद्या कार्यासंबंधी आराखडा. [ सं. ]

**संकर्ष**—पु. १ संबंध; लगट; संघटन. २ लढा; संघर्ष. [ सं. ]

**सक्तीची खुषी**—स्त्री. नाइलाजानें दाखविलेली संमति; बलानें घेतलेली संमति.

**संक्रांत**—स्त्री. (ल.) पीडा; त्रास. **०मागें लागणें**- लचांड पाठीस लागणें.

**संक्रांतीचें गाडगें डोक्यावर फुटणें**—बदनामी होणें.

**संकुटन**—न. १ सकोटण पहा. २ चेंदामेंदा; चुरा.

**संकेताचार्य**—पु. (महानु.) संकेतज्ञाता; ज्याला सर्व ज्ञान आहे असा; जरठ.

**सकेला**—पु. तरवारीचा प्रकार -प्रश २ .

**संख**—स्त्री. घाण; गाळ; सांखा.

**संगतरा**—पु. संत्रा; नारिंग. [ फा. ]

**सगर्भ**—वि. भावपूर्ण; मनांत कांहीं हेतु ठेवून (केलेलें भाषण, कृत्य). २ (ल.) खोंचदार कपटयुक्त (भाषण, कृत्य इ.) [ सं. ]

**सगी**—स्त्री. सगाई; सख्य; सोबत; मित्रत्व; संगीत (कुणबाऊ बोलींत). [ सगा ]

**संगीति**—स्त्री. सूरमिलाफ; स्वरमेळ. 'आपण जेव्हां एकादा ग्रंथ वाचतों तेव्हां आपलें वाचनाचें कार्यच फक्त चालतें असें नाहीं. आपल्या अनुभूति व लेखकाच्या ग्रंथबद्ध अनुभूति या दोहोंचा संगम होत असतो व एक प्रकारची संगीति निर्माण होत असते.' -रायआंवळे ५७.

**संगीन**—वि. पूर्ण; सर्वांगीण. 'राजकीय परिस्थितीचा संगीन अभ्यास मी प्रिटोरियामध्यें केला.' -सत्याप्र. [ संग= दगड ]

**सगीर**—वि. अज्ञान. 'नंबर दोन ते चार सगीर त्यांचे वाली न्यायाधिशानें नाजर यांस नेमलें आहे.' -के २८.३. १९३९.

**सगुदा**—वि. संपन्न; सज्जड; समृद्ध; तयार. 'हा समय उत्तम आहे. आपण सर्व गोष्टीनें सगुदा आहों, यास्तव साधले प्रसंगास आळस न करावा.' -रा १.९.

**संग्रहशास्त्र**—न. भांडवल वाद. [ सं. ]

**संघराज्य**—न. निरनिराळ्या गटांचें मिळून होणारें राज्य. [ सं. ]

**संघवी**—पु. जैन संघास यात्रा घडवून आणणारा मनुष्य. [ सं. संघ ]

**संघ**—(सामाशब्द) संघचालक; संघनायक; संघाध्यक्ष इ.

**संघाराम**—पु. बौद्ध लोकांचा विहार; मठ. 'सारनाथ येथें आठ संघाराम उकरून निघाले आहेत.' -के १.११. १९३८.

**संचणी**—स्त्री. संचय; मिलाफ; जमाव. 'देशाभिमान, भाषाभिमान व स्वाभिमान या गुणांच्या संचणीनें त्यांच्या व्यक्तिमत्वावर तेज चढविलें होतें.' -के २२.३.१९४०.

**संचलन**—न. कवाईत; एकसमयावच्छेदें करून केलेली हालचाल. [ सं. ]

**संचालक**—पु. सर्वाधिकारी. [ सं. ]

**संचित्र**—वि. चित्रयुक्त; चित्रें असलेलें. [ स+चित्र ]

**संचित ओढवणें**—पूर्वकर्माचें अनिष्ट फल प्राप्त होणें. 'आनंदानें नांदत असतां संचित ओढवलें.' -झुंझारराव.

**संच्यार**—पु. बिघाड; विघटना; विजोड; मतभेद. 'कित्येक संच्यार गृहछिद्रे.' -पेद ५.६४. [ सं. सम्+चर ]

**सजणें**—अक्रि. जुंपणें; जमणें; गांठ पडणें. 'त्यास फिरंगी यासी आम्हासी सजून येकप्रहर युध्ये बहुत कठीण जाहलें.' -पेद १६.६७.

**सजावल**—पु. तगादेकरी; ढालाईत. 'तो पैका आणावयास नबाबानें तुंगभद्रा तीर दाखल होताच सजावल पाठविले होते.' -पेद २५.५८. [ फा. ]

**सजावली**—स्त्री. तगादा. 'त्याची सजावली त्यासच सांगूं.' -पेद २.४.

**सजावार, सज्यावार ( होणें )**—क्रिवि. शिक्षा पावलेले ( होणें ); शिक्षा पावणें. 'मुरारजी घोरपडे व मुजफरखान यानी हरामखोरी केली. तेणेप्रमाणे सज्यावार जाले.' -पेद २१.८६. [ सजा=शिक्षा ]

**संजोगणी**—स्त्री. सारवासारव; स्थिरता; शांतता. [ सं. संयोजना ]

**सज्जणें**—सक्रि. सज्ज करणें; सिद्ध करणें. तयार करणें ( धनुष्य इ. ). 'हरचाप देखतां दृष्टि । सर्वांगीं कांटा उठी । तें सज्जावया जग जेठी ।' -भारा बाल १९.१६.

**सटाबटा**—क्रिवि. घालमेलीनें; गडबडीनें; घालमेल, गडबड, लटपट धरसोड वगैरे करून. 'तेव्हां सटाबटा दावा करून यश रक्षावेच लागते.' -पेद ३.१०२. 'आपण म्हणतील की, सटाबटा करून आपला उलगडा करून आदावल आम्हावरी घालून गेले.' -पेद ३.१०२. [ सट्टा+बट्टा ]

**सटीचें नवरात्र**—न. चंपाषष्टीचें नवरात्र; मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेपासून चंपाषष्टीपर्यंतचें व्रत. यांत वास्तविक सहाच दिवस असतात. [ सं. षष्टी-सटी ]

**सटोडिया**—वि. सट्टेबाज; सट्टा करणारा; जुगारी. [ सट्टा ]

**सडक**—वि. सरळ व लांब ( केश ). 'तुझ्या दाट, रांठ व सडक केसांनीं आच्छादिलेल्या.' याचे उलट कुरळे.

**सडकबीजन**—न. रस्त्यांतील लोकांची कत्तल. 'क्षेत्र निराश्रयच होतें. गोरे लोकांनीं एकदम आंत शिरून सडक बीजनास आरंभ केला. जे पुरुष सडकेवर सांपडतील त्यांस बंदुकीनें ठार मारावें.' -माप्र ६०.६३. 'इंग्रज सरकारनें शहर घेतल्यावर शहरांत एक प्रहरपर्यंत सडकबीजन करून बहुत लोक मारले.' -माप्र.

**सडका**—वि. सडलेला ( तांदूळ ).

**सडगर**—पु. १ नट्टापट्टा; शृंगार; भूषा. २ विनवणी; खुशामत; लघळपणा.

**सडिवा**—पु. सडेपणाचा दोष; अविवाहितपणाचा दोष. 'कव्हणींचि आबुली न ठके पासीं । विसडाउनि गौळनी देती विवसी । तेव्हळे सडिवा फेडिला तुळसियेसी । अठवरपणाचा ।' -नरुस्व ३७२. [ सडा ]

**सडेतोड**—वि भीडमुरवत न ठेवतां; रोख ठोक; निखालस, जळजळीत; कर्णकटु.

**सण खोलणें**—अक्रि. दोरखंडें उकलून त्याचा ताग मोकळा करणें. हें काम तुरुंगांत शिक्षा म्हणून करून घेण्यांत येतें.

**सणसर**—वि. मजबूत; घणसर.

**सतत**—स्त्री. तसदी; तगादा; टुमणें. 'सातारियावरील हवालदार आमचा मामा आमचे विचारास लागला म्हणोन सारे गडकरी व हकीम याणी सतत लाविली आहे.' -पेद ६.८५. 'हेरेचे दगडासी सतत लाविली आहे.' -पेद २४.७७. 'बागुरासहि सतत लागली आहे.' -पेद ४०.१०८. शतत पहा.

**सतर**—क्रिवि. सतार पहा. सरल; एका रेषेंत. 'मुसाफत तीन कोस सतर जरीब मुक्काम मौजे जाखपली प्रहर दिवसा डेरेदाखल जाहले.' -पेद २०.४७. [ स+तार ]

**सता**—स्त्री. ( महानु. ) अस्तित्व; स्थिति; जवळीक. -विसू९. [ सं. सत् ]

**सताज्ञान**—न. अपरोक्ष ज्ञान; अव्यभिचारी ज्ञान. -उसू.

**सतीची**—वि. (व.) सत्तेची; सख्खी. 'सखु मी जोडली। बाई अधल्या पैशाची । सखु बहिण सतीची ।' -वलो १९. [ सत्ता+चि ]

**सतीझ**—लढाई. -मुधो. [ अर. ]

**संतोलन तत्त्व**—न. ( कुस्ती ) कुस्तीमध्यें स्वतःचा तोल संभाळणें व प्रतिपक्षाच्या तोल घालविणें. [ सं. ]

**सत्यंदारी**—स्त्री. कायम कराराची नोकरी वगैरे; एक मजूर पद्धति. यांत वर्षांनुवर्षांचा करार असून पोटगी, घडीपगडी रोख मुशाहिरा वगैरे वेतन वार्षिक असे. [ सतत+दार ]

**सत्याग्रह**—पु. १ आपल्याला जें सत्य न्याय्य वाटतें ासाठीं आग्रह धरणें. २ एखाद्या हक्काबद्दल वगैरे दुराग्रह रून शांततेचा व निःशस्त्र प्रतिकार. ३ त्रागा; हट्ट. [ सं. ]

**सदं(तं)तर**—वि. स्वतंत्र; वेगळे. ' येथें राहूना म्हणतात, बब कीं, आबाजी नाईक हे सदंतर येथें आहेत. ' -पेद ६. .१. [ सं. स्वतंत्र अप. ]

**सदरेवरील सरदार**—पु. स्थानिक अधिकारी.

**सदा**—पु. आवाज. -मुधो. [ अर. ]

**सदाशिवपेठी वाङ्मय**—न. १ पुण्यांत सदाशिव पेठेंत हुधा ब्राह्मण व पांढरपेषे यांची वस्ती आहे; अशा लोकांच्या ीवनावर रचलेलें वाङ्मय, किंवा अशा लोकांनीं लिहिलेलें ाङ्मय. २ ( ल. ) संकुचित विचाराचें, दृष्टीचें वाङ्मय. हा ब्दप्रयोग प्रथम डॉ केतकर यांनीं काढला. सदाशिवपेठी ंस्कृति असाहि प्रयोग रूढ आहे.

**सनदशीर**—वि. राज्यघटनेच्या नियमानुसार; कायदे-ीर; रूढ पद्धतीप्रमाणें. ( इं. Constitutional ).

**सनदी खर्च**—पु. ' अजमासांत न मिळे (नेमले) खर्चा-ीं जो खर्च होतो तो. बिगर हुकमानें मामलेदार यांणीं खर्च केला असेल तो गैर सनदी. ' -भारतवर्ष, मराठ्यांचें दप्तर १३.

**सनदी संस्थान**—न. येथील व्हाइसरायानें सनद देऊन उत्पन्न केलेलें किंवा राखलेलें संस्थान.

**सनह**—पु. सन पहा. वर्ष. -मुधो. [ अर. ]

**सनावली**—स्त्री. शकावली पहा

**सनीहार**—पु. यज्ञार्थ दक्षिणा. [ सं. ]

**सनीहारी**—पु. यज्ञार्थ दक्षिणा गोळा करणारा. [ सं. ]

**सपात**—स्त्री. डोंगराच्या माथ्यापासून ओढयाच्या कांठा-पर्यंतची जमीन; डोंगराचा उतार. [ सं. स+पात ]

**संपादणी**—स्त्री. पुरस्कार. [ सं. सं+पद् ]

**सपिवळ**—वि. किंचित् पिंवळें; पिवळसर. ' आधीचि रूप गोरें सावळे ऐसें । वरि तारुण्यें आंग उटतसे । तैसें सपिं-वळ छाया येतसे । क्षिरोदकासी ॥ ' -नरुस्व ९३. [ सं. स+ पीत-पिवळा ]

**सप्तरुचि**—स्त्री. ( महानु. ) रुचीचे सात प्रकार- १ कटु. २ अम्ल. ३ लवण. ४ तीक्ष्ण. ५ कठोर. ६ मधुर. व ७ मिश्र.

**सप्तवर्ण**—पु. इंद्रधनुष्यांत दिसणारे सात रंग-तांबडा, नारंगी, पिवळा, हिरवा, अस्मानी, निळा व जांभळा.

**सप्ताहसमाप्ति**—स्त्री. शनिवार तिसऱ्या प्रहरापासून सोमवार दोन प्रहरापर्यंतचा सुटीचा काळ. ' सभासदांनीं सप्ताहसमाप्तीची सुटी घेतली. ' -के ११.४.१९३९. ( इं. वीक-एंडचा पर्याय ).

**संप्राप्ति**—स्त्री. शारीरिक विकारांचें ज्ञान. विकृतेंद्रियविज्ञान.

**सफ**—पु. रांग. -मुधो. [ अर. ] **सफ-शिकन**-रांग मोडणारा.

**सफामन्झील**—वि. शुद्ध मान्यतेचा. -मुधो. [ अर. ]

**सफ्हपानसफा**—शुद्ध. -मुधो. [ अर. ]

**संबंधिया**—पु. ( महानु. ) पति.

**संबंधीन**—स्त्री. संबंधियाचें स्त्रीलिंगी रूप; संबंधिनी.

**संबुद्धि**—स्त्री. १ संबोधन. २ लक्ष्य वेधणें; जागविणें; जागे करणें; सावध करणें. [ सं. सं+बुध् ]

**सबूत**—पु. पुरावा. -मुधो. [ अर. ]

**सब्अ**—वि. सात. -मुधो. [ अर. ]

**सब्ईन**—वि. सत्तर. [ फा. ]

**संभवणें**—अक्रि. समजणें. ' तो सकलार्थ भावगर्भ तुम्हास संभवलाच असेल. ' -पेद ६१. [ सं. सम्+भव ]

**समअ**—क्रि. ऐकणें. -मुधो. [ अर. ]

**समक्रांतियोग**—पु. (ज्यो.) जेव्हां रविचंद्र यांची किंवा दोन ग्रहांची क्रांति सारखी असेल तेव्हां हा योग होतो. [ सं. ]

**समजावीस**—स्त्री. रोजमुरा व नालबंदी वजा जाऊन बाकी देणें राहिलेल्या रकमेचा हिशेब करून समजूत करीत असत त्यास समजावीस असें म्हणतात. -भारतवर्ष, मराठ्यांचें दप्तर १५.

**समजुती**—वि. ज्या फौजेची रोजमरा, नालबंदी वगैरे बाबतींत पूर्ण फेड झालेली आहे व जी चाकरी करावयास राजी असून जोजवळ जरूर तो सरंजाम आहे अशी ( फौज ). ' यादी फौजेकरितां राजश्री बाबूराव सदासिव फौज आठ हजार सरंजामी समजुती तयार राखावी, ज्या समयीं म्हटलें त्या वेळेस तयारी राखावी. ' -पेद ३७.६. [ समजणें ]

**समझोता**—पु (हिं.) समजूत; तडजोड. ' मग आपसांत कांहीं समझोता झाला कीं काय न कळे. ' -के २५.४.१९३९. [ समजूत ]

**समत**—स्त्री. एक प्रादेशिक विभाग; एक प्रांत, भाग. संमत पहा. ' अमीनभावी हें गांव पेशव्यांचे वेळीं आठ गांवच्या समतेचें मुख्य ठिकाण होतें. ' -ज्ञाको ( अ ) ३४४. [ अर. ]

**समपद**—पु. पाय, गुडघे वगैरे अवयव जोडून सरळ ताठ उभें राहाणें. -व्याज्ञा १.५१. [ सं. ]

**समभावना**—स्त्री. सहानुभूति; समसंज्ञापन. [ सं. सम+ भावना ]

**समभुज**—वि. सारख्या बाजू असलेली आकृति. [ सं. ]

**समय**—पु. १ संकेत. २ करार. ३ मीलनस्थान; संकेत-स्थान. 'जणूं काय सैन्य एकत्र करण्याचा समय तिकडे ठरला आहे.' -हिप्र १७.

**समसमासंयोग**—पु. योग्य मीलन; समसमान व्यक्तींचा मिलाफ. 'मधल्या तहानें त्यानें समसमासंयोग घडवून आणला.' -आंघइ.

**समाजवादी**—पु. समाज वर्गविरहित असावा व कोण-त्याहि उत्पादन साधनांवर खासगी मालमत्ता नसावी, असें मानणारा.' -के १३.१.१९३९. (इं. सोश्यालिस्ट-कम्युनिस्ट याला पर्याय). [सं.]

**समाजसत्ता**—स्त्री. सर्व गोष्टी सार्वजनिक मालकीच्या व्हाव्या असें मत. (इं.) सोश्यालिझम. [सं.]

**समाधा**—स्त्री. कुरुंदाच्या दगडाची भुकी. -प्रश ८६.

**समान**—वि. आठ. -मुधो. [अर.]

**समार**—स्त्री. जमीन सपाट करण्याचें औत; गुठेफळी. 'जमीन दोन वेळ नांगरून वर समार फिरवितात.' -ज्ञाको (ग) ६८.

**समीन**—वि. पुष्ट. -मुधो. [अर.]

**समुत्व**—वि. उंच. -मुधो. [अर.]

**समुद्रास्तृप्यंतु करणें**—समुद्रांत पाण्यांत बुडविणें. 'तीन जहाजें समुद्रास्तृप्यंतु करण्यांत आलीं.' -के ३.११. १९३९.

**समेट**—पु. समजूत; समजावणी. [सं. सम+इ]

**संमोहन**—न. आमिष; भुलविण्याचें साधन. 'हें संमोहन त्यांच्या उपयोगी पडे.' -नीच आत्म १३२. [सं. सं+मुह्-मोहन] **०विद्या**-इं. हिप्नाटिझम-मेस्मेरिझम याला प्रतिशब्द. वशीकरण विद्या.

**संयुक्तराज्यपद्धति**—स्त्री. अनेक घटकांनीं एकत्र जमून अंगीकारलेली सामान्य राज्यव्यवस्था, घटना वगैरे. -के १२.१०.१९३७.

**सय्यिद**—पु. मान्य पुरुष. -मुधो. [अर.]

**सर**—पु. (व.) जोंधळयाच्या ताटाच्या टोंकास बारीक वेतासारखा वाढणारा भाग. याच्या शेवटास कणीस धरतें. 'धाडयाचे वाळलेले सर गोळा करून ठेवा.'

**सर**—वि. उत्तम; सर्वोत्कृष्ट. 'स्वामिनी तरवारेविसी त्यास आज्ञा केली होती. त्यावरून त्याणी तरवार बहुत सर मिलवून ठेविली आहे.' -पेद २४.९७. [फा.]

**सर**—शअ. पर्यंत; पावेतों. (थंयसर=तेथपर्यंत)

**सर**—पु. डोकें; मुख्य. -मुधो. [अर.]

**सरअफ्राजी**—डोकें वर काढणें. -मुधो. [अर.]

**सरआमद**—मुख्य होणें.

**सरक ओढणी**—सरकवितां येणारी ओढणी; सरकवितां येण्यासारखा बुरखा. -मामा १९१.

**सरकदंड**—पु. वज्रमुष्टीचा व्यायाम. प्रथम साधा दंड काढून हातांच्या जागीं पाय आणून बैठक मारावी व पुन्हां तेथें हात आणून दंड काढावा. -व्याज्ञा ४.१०८.

**सरकांडें**—न. बोरू.

**सरग**—पु. (व.) स्वर्ग. 'अहुळी नार मेली। गेला सरगांत धुवा। घात लेकरांचा झाला। काय केलें तुवा देवा॥' -वलो ८४. [स्वर्ग]

**सरगर्म**—उष्ण डोक्याचा. [फा. सर=शिर; गर्म=उष्ण]

**सरगुंडा**—पु. (व.) ज्वारीच्या धांडयाच्या सराला गुंडून वळलेला वळवटाचा एक प्रकार. 'यंदा तुमच्या घरीं सरगुंडे आणि आमरस कधीं करतां बोला!'

**सरघस**—स्त्री. (गु.) मिरवणूक. 'वल्लभभाईच्या सरघशीच्या वेळीं आम्हास पोलिसांची मदत नको.' -विविध २९.१.१९३९.

**सरणें**—अक्रि. (महानु.) मरणें; मृत्यु पावणें. 'जी जी परसनायक सरलेः खोड वळलेः' -उच २६०. 'सृष्टवीवस्थेनें सरला.' [सं. सृ=सरणें]

**सरतेरीज**—न. हिशोबाच्या तेरजांचें तेरीज; संक्षिप्त सारांश; बाबवार एकंदर रकमा. 'नकलांच्या यादी व सरतेरीज ऐसें पाठविलें आहे.' -पेद ३९.७८. [फा.]

**सरपोश**—पु. सरपोस पहा. वरून घालावयाचें वस्त्र; पांघरावयाचें वस्त्र. [अर.]

**सरफराज**—वि. कृपापात्र; आभारी; भाग्यवान. 'प्रत्योत्तरें सरफराज न झालो.' -पेद २९.१४३. [फा.]

**सरबमोहर**—वि. मोहर वगैरे असलेलीं; सही सिक्का वगैरे यथास्थित असलेलीं. 'त्यांत कितेक दफ्तरें सरबमोहर व कितेक बेमोहरेचीं याप्रमाणें लिहिलीं.' -रा ७. खलप २.९.

**सरबाखास**—पु. जातखर्चाकरितां तोडून दिलेला मुलूख; जाततैनाती मुलूख; सरफखास पहा. 'परंतु हे महाल सरबाखास पातशहाचे.' -पेद २७.१३०. [फा. सर्फ-इ-खास]

**सरमर्दी**—स्त्री. विशेष बहादुरी; विशेष पराक्रम; धीटपणा; धारिष्ट; मर्दपणा. 'तेव्हां विशेष सरमर्दीची बुडी मारून तोफ व वस्त काढून दिली.' -आंघइ ४२२.

**सरली**—क्रिवि. सरळ; सन्निध. 'पुणेसी सरली सूप गावे तेही ताम्रमुखाच्या हातास लागले.' -तंजाशिला ४३.

**सरसगिरी**—स्त्री. डागडुजी; गिलावा; दर्जेबंदी; दर्जा वगैरे भरणें; चुन्याचा गिलावा वगैरे करणें. 'टाकियाची सरसगिरी करावयासी गवंडे पाहिजेत.' -पेद १६.४८.

**सरसनीरस**—वि. चांगले वाईट; बरेवाईट; उत्कृष्ट व कमी प्रतीचे. [ सं. सरस+नीरस ]

**सरसें होणें**—उपयोगी पडणें; कामास येणें; चालणें. ' स्वामीनी कृपाळु होऊन कृपेस पात्र केलें म्हणोनच सेवकाचें अज्ञपणहि सेवेसी सरसें होतें. ' -पेद २८.२८. [ सरसा पहा. ]

**सरा**—पु. घोडयास होणारा एक रोग. -ज्ञाको १७.

**सराए**—स्त्री. चंगळ; तृप्ति. 'ऐसें गोसावी तृप्तपर्यंत आंबे खावविले: सराए केली:' -लीच ३ पृ ७२.

**सराकर्ता**—एक जमीन धारण करण्याची पद्धति. यांत मालक व सरकार यांचे वांटे ६ ते १० आणेपर्यंत असतात.

**सरायत**—स्त्री. परिणाम. -मुधो. [ अर. ]

**सरी**—स्त्री. १ जनावरें जाण्याकरितां ठेवलेली वाट. २ कांदा, लसूण इ. लावण्याकरितां केलेला वरंबा. -चित्रकृषि २.७.

**सरीर**—गादी; सिंहासन. -मुधो. [ अर. ]

**सरें**—क्रिवि. त्वरें; झणीं. 'आपण हाटा गेला: पूजा-साधन: तांबूल: सरें घेउनि आला: सरें वोळगविलीं...सरें आरोगण केली:' -लीच १.१२.

**सरोकार**—पु. दाट संबंध; सगेपण. 'मायबापाशीं व तत्संबंधी सोयरे वगैरे मंडळीशीं सरोकार ठेवूं नये.' -नाभो कागपत्र १२.

**सरोदा**—पु. सलोखा; स्नेह. 'त्याच्या भेटी घेऊन सरोदा करून बंदोबस्ती केली.' -पेद १३.११. 'नवाबाच्या चित्तांत आहे की राजश्री तात्याची भेटी घ्यावी. सरोदा करावा यैसे आहे.' -पेद १३.११.

**सरोदी, सरोदिया**—पु. सरोद वाद्य वाजविणारा. [ सरोद ]

**सर्पिका**—स्त्री. खंजीराचा पवित्रा. -प्रश १८. [ सं. ]

**सर्मदी**—वि. शाश्वत. -मुधो. [ अर. ]

**सर्वाध्यक्षपणा**—पु. सर्व गोष्टीचा अखेरचा अधिकार; मुख्याधिकार. 'सर्वाध्यक्षपणा आपला व्हावा यांत दोहीकडे-जड असावे यैसे कित्येक मनसबे.' -मदरु २.४३. [ सं. सर्व+अध्यक्ष+पणा ]

**सर्वानसर**—वि. सर्वांपेक्षां अधिक; अत्यंत कमालीचा. 'हे सर्वानसर महागमनी आहे.' -पेद २४.१९३. [ सं. सर्व. फा. सर ]

**सर्वावरिष्ठ**—वि. सर्वश्रेष्ठ; सर्वाहून उत्तम. 'वडिलाचे पुण्यप्रतापे शत्रूचा निपात झाला हे कीर्त सर्वावरिष्ठ स्वामीची जाली.' -पेद ३.१८७. [ सं. सर्व+वरिष्ठ ]

**सर्वोत्कर्ष**—वि. सर्वोत्कृष्ट; उत्तम. 'सांप्रत हे यश आगाध श्रीनें आपले पदरी सर्वोत्कर्ष घातले.' -पेद ३.१८१. [ सं. सर्व+उत्कृष्ट ]

**सलंब**—वि. सलग; लांबच लांब. 'आडवळे धैर्याचे सलंब.' -भारा. बाल २३.२३. 'सलंबपणें मुक्तघोसी।' -भारा बाल २३.२७.

**सलामत**—स्त्री. सुरक्षितता. -मुधो. [ अर. ]

**सलाह**—उचित. -मुधो. [ अर. ]

**सलाहमसला**—पु. विचार; अभिप्राय; मत; बुद्धिवाद. 'रायेचुरास येऊन आपले मातोश्रीस भेटून सलाहमसला पुसोन मग दरकूच कलबुर्गे येणार.' -पेद २६.२४७. [ फा. ]

**सलीपाट**—पु. आगगाडीच्या रुळाखालचा लांकडी ओंडा; इं. स्लीपर.

**सल्तत**—स्त्री. राज्य. -मुधो. [ अर. ]

**सल्लेखना विधि**—पु. प्रायोपवेशन; जैन धर्मीयानें करावयाचें आमरणांत उपोषणाचें व्रत. 'चामुंडराय पुराण शके ९०० त रचून झाल्यानंतर आणि शके ९०६ त राचमल्लयानें सल्लेखना विधीनें जैनधर्मानुसार प्राणार्पण करण्यापूर्वी चामुंडराय रायमल्लाची प्रधानगिरी करीत असतांना हा पुतळा त्यानें केव्हां तरी उभारला.' -मसाप ६३.२७१. [ सं. ]

**सव**—स्त्री. शपथ; आण. 'हिंदूयासी गाईची सव आहे.' -पेद ३१.३. [ फा. सव ]

**सवत लागणें**—मृत सवतीपासून पीडा होणें; मृतसवतीपासुन भूतबाधा वगैरे होणें.' -स्त्री आक्टो १९४१.

**संवदळणें**—अक्रि. स्वच्छ करणें; केरकचरा काढून टाकणें. 'पाणी संवदळत होता.' -सवाशंभर १००.

**संवर्ग**—पु. संग्राहक. 'वायु हा सर्वांचा संवर्ग आहे.' -भात ३३.

**सवसगिया**—पु. सहवासी; सोबती; बरोबर असलेला. 'शाहामाहमुदजीचें त्याचें भाषण काय जालें आणि तबरुक काय दिधला याचा शोध पुरता सवसगियापासून घेऊन सेवेसी लिहितो.' -रा १.१०५. [ सं. सम+संग; सव+सगा ]

**सवळेकरी**—पु. सोंवळेकरी; स्वयंपाकी. -उसना नवरा.

**सवादपत्र**—न. १ वादांतील मुद्यांची यादी. २ कबूलीपत्र; सलोखा पत्र. 'त्याप्रमाणें आम्ही आपले सवादपत्र पानसरियासी लेहोन दिलें व त्यानी आपले सवादपत्र आम्हास लेहोन दिले.' -जुने कागद.

**सवान**—स्त्री. स्वर; आवाज; वाचापद्धति; बोलण्याची लकब. 'बाळाभाऊंची सवान स्त्री पार्टीला साजेशी कोमल व हलक्या सुरांतली असून अभिनय करण्याची कुशलता व

साहजिक प्रचारांतलें व रंगभूमीला साजेसें भाषण करण्याची धमक उत्तम होती.'-गणपतराव जोशी पृ. १७७.[ सं. स्वन ]

**सवाबदीदह**—पु. उचित द्रष्टा; उचित दर्शन. -मुधो. [ अर. ]

**सवारणें**—अक्रि. (व.) सज्ज करणें; तयार करणें. 'माझ्या मरणाचे वेळीं। पुढें माय माही पाहूं। सेव सवारली माही। बहिण प्रीतीची जाऊ॥' -वलो ७७.

**सवारी**—स्त्री. मोहरमांत पीराचा संचार झालेली व्यक्ति. 'तेथें मोहरमचे दिवसांत सवाऱ्या मात्र बसतात.' -के १५. ४.१९४१.

**सवाशंभर**—वि. एक शंभर व पाव म्हणजे एकशेंपंचवीस; शंभर पूर्णांक एक चतुर्थांश. [ सं. सपाद+शतम्+भर ]

**सविकल्प समाधि**—स्त्री. जाणीव न हरपतां लागणारी समाधि; ज्ञानयुक्त अत्यानंदाची अवस्था. [ सं. स+विकल्प+समाधि ]

**सविकार**—वि. १ कुशल; चतुर. 'विडे देवविले सकर्पुर। भोई पाठविले सविकार। वाजिएखंड सावासिए पठियार। ते राहिले दारवठा॥'-नरुस्व. २ विकार उत्पन्न करणारा; सुंदर. 'हातकडगां-पुढां हातसर। गळां मोतियांचें लेणें सविकार। कानिचे झुळुंबिके करिति बिरार। कृत्तिकांसी॥' -नरुस्व ९५. [ सं. ]

**सविरोध सहकार्य**—न १ प्रतियोगी सहकारिता.

**सवै**—स्त्री. संवय पहा. 'नवाबास एक सवै हामेषाची आहे कीं.'-रा ५.१४.

**सव्वोत्रा**—पु. दरमहा दर शेंकडा सवा रुपया याप्रमाणें व्याजाचा दर. [ सव्वा. सं. सपादोत्तर ]

**ससा जा वशा**—ससा ज्याप्रमाणें सर्वांस वश असतो व त्यास कोणीहि अपाय करूं शकतो त्याप्रमाणें मनुष्य शेवटीं आपल्या स्वाभाविक प्रवृत्तीप्रमाणें व नैसर्गिक शक्तीप्रमाणें कार्य करूं शकतो.

**संसर्पण**—न. पाणी तापत असतांना त्याच्या अणूंमध्यें उत्पन्न होणारी चक्राकार गति. पाणी तापलें असतां तें गरम पाणी वर जातें व थंड पाणी त्याच्या जागीं खालीं येतें, या त्याच्या गुणधर्मामुळें खालीं विस्तव ठेवला म्हणजे भांड्यांतलें सर्व पाणी तापतें. या गुण धर्मास संसर्पण म्हणतात. (इं. कन्व्हेक्शन यास प्रतिशब्द). [ सं. ]

**ससा व पारधी**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १. ३६६.

**ससेमिरा**—पु. १ तगादा; शुक्लकाष्ट. २ काळजी; हुरहुर पहा.

**संस्था**—स्त्री. सोय; बेगमी; तरतूद; तजवीज; व्यवस्था. 'कोंकणामध्यें येखादी सेवा सेवकास योजावी म्हणजे कुटुंबाची संस्था होईल.' -पेद २५.७७. [ सं. ]

**सहग्राम**(लोह)—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २३.

**सहजीवित्व**—न. एकत्र जीवन; सामुदायिक व सहकार्यतेनें कार्य करणें वगैरे. 'कर्नाटकी बेळवीसह आम्ही महाराष्ट्र मंडळी म्हणजे सहजीवित्वाचा, मित्रत्वाचा व एकजुटीचा नमुनाच.' -गतगोष्टी ५९७.

**सहाबत**—स्त्री. मैत्री. -मुधो [अर.]

**सहारा, साहारा**—पु. अवकाश; सवलत; फुरसत; वाव; धीमेपणा. 'साहाऱ्या साहाऱ्यानें काम होईल, उतावीळपणा उपयोगाचा नाहीं.'

**सहे**—वि.क्रिवि. मान्य; संमत. 'मागाहून याद पाठवितो जे सहे करून लोकांचे उर्जित होये तें करणार स्वामि धणी आहेत.' -पेद २४.१८ [ सही पहा ]

**सळय**—स्त्री. विटीदांडूच्या खेळांतील एक संज्ञा.

**संज्ञा, संवज्ञा**—स्त्री. संकेत. 'इतिक्रियांत संज्ञापूर्वक तुमची चिठी आम्हास आली.' -पेद ३०.२४२. 'संवज्ञा लिहिली आहे. समजून काम करणें.' -पेद ३०.२८२८ [सं.]

**साअकह**—वीज; वज्र. -मुधो. [ अर. ]

**साइद**—मदतगार. -मुधो. [ अर. ]

**साकटा**—वि. (कु.) छाकटा; व्यसनी. [ सं. शाक्त ].

**सांकिक**—पु. साक्षी; पहारेकरी. 'कीं सहस्रकरें निगता। आंधार शिथिला मातांइता। तीयें सालें ठेविलीं मजपांतां। सतें सांकिकाची।' -नरुस्व ४८३. [ सं. स+अंक् ]

**सांखळी**—स्त्री. १ एक मुलांचा खेळ. याचे अनेक प्रकार आहेत.' -व्याज्ञा १.३२९. २ एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९३.

**साख्तन्द**—क्रि. केलें. -मुधो. [ अर. ]

**साख्तीम**—क्रि. केलें. -मुधो. [ अर. ]

**सांग**—स्त्री. लहान भाला (हा पूर्ण लोखंडाचा असतो). -प्रश. २ पोलादाचा एक प्रकार. -प्रश २२.

**सागळ**—स्त्री. पखाल; पिशवी; पाण्याची पिशवी; भांडें. 'पाठीं सागळ भरूनि ठेविली तियें हीं नीजेलीत:' -लीच १.१२. [ छाग ]

**सांघिक**—वि. अनेक व्यक्तींनीं एकत्र येऊन शिस्तवार व पद्धतशीर रीतीनें केलेलें (कार्य, खेळ इ.) **०लाठी**-स्त्री. अनेक ठराविक व्यक्तींचा सांकेतिक शिस्तीचा लाठीचा खेळ; लाठीची कवाईत.

**साजगरी जमीन**—स्त्री. गवताळ जमीन; माळ जमीन. 'सुलतानजी झांवरा ... याचा व आपला कजिया साजगऱ्या जमीनीचा आहे.' -जुने कागद.

**साजापेजा**—वि. ताजातवाना; धट्टाकट्टा. 'साजापेजा असतां एकाएकींच वारला.' -रा.द. पृ. १२४. 'शुक्रवारीं यमाजी माळी ढोल्या वरचेवर साजापेजा मालियांत काम करितां वारला असे.' -रा ६. पृ. ८९. [ सं. सद्यः=साजा-द्विरुक्ति ]

**साझन्द**—क्रि. करावें. -मुधो. [ फा. ]

**साट**—पु. जमावः संघ; संचणी. 'हजार दीड हजार माणसाची रवानगी लोहगडाहून होऊन श्री येथील रानामध्यें साट घेतला आहे.' -पेद २४.१९०. [ सांटणें पहा ]

**साटप**—वि. साटोप पहा. लवकर उरकणारा; जलद काम करणारा. 'सोवळयांतले पापड करावयास साटप बायका सोंवळयानेंच आल्या.' -खेस्व ४२.

**साटोडी**—स्त्री. ( व. ) साटोरी; पुरण भरलेली पुरी. 'मागे बाळकृष्ण जेऊं । तेथ भरली साटोडी । केली उत्तम पाटोडी।' -वलो ३६. [ साटोरी पहा ]

**साठपूल**—( हिं. ) ८-१० आणे. सातपूल पहा.

**साठमारी**—स्त्री. साटमारी पहा.

**साठी**—स्त्री. साठ पहा. भात व नाचणीची साठ दिवसांत पिकणारी एक जात. -चित्रकृषि २.५.

**साठी**—स्त्री. साटी पहा. बैलगाडीची बसावयाची चौकट.

**सांडणी**—स्त्री. पाणी अडविण्याकरितां बांधलेल्या बंधाऱ्यांत पाणी सोडण्याकरितां जी वाट अथवा द्वार ठेवलेलें असतें तें. 'बंडगार्डनच्या सांडणींत खोजापित्रापुत्र बुडून मरण पावले.' -के २८.५.१९४०.

**सांडबर**—वि .(प्र. साडंबर). शृंगारलेला. 'उमेशंकराचा कुमरू । कीं सांधों गणांचा ईश्वरू । तो सेंदुरें सांडबरू । गोरा-मेरू जैसा॥' -नरुस्व १. [ स+आडंबर ]

**सांडवा**—पु. ( महानु ) सेतु; बांध; लहान किंवा ठेंगणा पूल. 'सांडवा बांधिजैली.' -उच १६.

**सांडासांड**—स्त्री. हरवाहरव; एकसारखी वरचेवर कांहीं तरी वस्तु हरवण्याची क्रिया. 'माझ्या पाठीमागें एकसारखी सांडासांड लागली आहे.' [ सांडणें द्वि. ]

**साडिया**—पु. सांडणीस्वार. 'फिरोन साडियाबरोबर उत्तर पाठवावे.'-पेद २.९०.

**साडेचौऱ्यात्तर**—वि. हा आंकडा गुजराती व रजपूत लोक अशुभ मानतात. याचा चितोडच्या जोहाराशीं संबंध आहे असें मानतात. अकबरानें चितोडगड घेतला त्यावेळीं जयाचें माप वेगळया तऱ्हेनें केलें. रजपूत वीरांच्या पराक्रम-दर्शक फितीच्या तुकडयांचें वजन केलें तें ७४॥ मण भरलें. या प्रसंगाचें स्मरण म्हणून तो आंकडा अत्यंत अशुभ मानतात असें स्पष्टीकरण आनंद १९२६ एप्रिल अंकांत पृष्ट १४२ वर दिलें आहे तें पटत नाहीं. कारण त्यावेळीं फितीची पद्धति नव्हती. ती इंग्रजी आहे. कदाचित् ७४॥ लपेटीनें लिहिल्यास श्रीकार होतो त्याप्रमाणें श्रीकार असावा. ७४॥ हा आंकडा अरबी किंवा फारसी पत्रांच्या माथ्यावर आपल्या पत्रांतील श्रीकाराप्रमाणें हुकार म्हणून घालतात. हुकार पहा. हुं म्हणजे परमेश्वर-हा शब्द अरबी भाषेंत हे ( दुचष्मी ) व वाव या अक्षरानीं लिहितात व त्यांचा आकार ७४ या आंकडयासारखा दिसतो व पुढें दोन रेघा दिल्या म्हणजे ७४॥ हा आंकडा होतो.

**साणा**—वि. शाहणा अपभ्रंश.

**साणी**—स्त्री. सार्णे पहा. १ गवाक्ष; खिडकी. २ धुराडें; धारें.

**साणें**—न. मूस; भातखाचरांतील पाणी बाहेर जाण्यासाठीं ठेवलेलें द्वार.

**सातजाळी**—स्त्री. भोंवऱ्याच्या खेळांत फिरता भोंवरा जाळीनें (दोरीनें) सातवेळ झेलण्याची क्रिया. -व्याज्ञा १.१५९.

**सातपूल**—पु. काबुली रुपया. साठपूल पहा.

**सातरखाणी**—स्त्री. गलबताचा एक प्रकार. 'फिरंग्याची रेवदंडयांतील सातरखाणी दिसूं लागली होती.' -सह्या जुलै ३७.९.

**सातोरें**—न. ( ठाकरी. ) सातवा दिवस; मुलाचा अन्नप्राशन विधि. 'मूल अन्न खातें झालें म्हणजे त्याचें सातोरें घालतात.' [ सात ]

**सात्रें**—न. सप्तक. [ सं. सप्त; म. सात ]

**सात्वन**—पु.न.स्त्री. सप्तपर्णी; सातवण;सातवीण. -मसाप ४५ २ सात पहा.

**सांथ**—स्त्री. रोगाचा प्रादुर्भाव; फार मोठया प्रमाणावर एखाद्या रोगाचा प्रसार; रोगाचा फैलाव. बहुधा सांसर्गिक रोगाच्या बाबतींत पण इतर रोगांच्या बाबतींतहि वापरतात. उदा० हिंवतापाची सांथ; देवीची सांथ; गोंवराची सांथ. २ भयंकर पीडा; त्रास. ३ ( ल. ) त्रासदायक मनुष्य; उपद्रवी मनुष्य.

**सांद बांधणें**—संधि घडवून आणणें; एकचित्त करणें; ऐकमत्य करणें. 'भोसले, मोगल, हैदर, जाधव च्यार येके जागा जाहले तेव्हां इतक्यांशीं सांद बांधणें दुरापस्त आहे.' -रा १३.८५.

**सादनी**—स्त्री. तोंडी लावणें.

**सादिर**—पु. सुटणारा (हुकूम). -मुधो. [ अर. ]

**साधकता**—स्त्री. साधण्याची हातोटी; मिळवून घेण्याची कला; जमवून घेण्याची वृत्ति; गुण. 'हरिपंततात्या हे त्या वेळच्या मंडळींत मोठे मिळून मिसळून वागणारे असून सर्वांशीं 'साधकता' ठेवणारे असे होते.' -देवी श्री अहल्याबाई १०९. 'परंतु तात्यांची साधकता विशेष.' -कित्ता ११२.

**साधन**—न. तोंडीं लावणें.

**साधनत्रय**—न. (महानु.) १ क्षेम. २ आल्हाद. ३ कृपा.

**सांधप**—न. सांधावयाचीं पादत्राणें; दुरुस्त करावयाचे जोडे वगैरे. 'हीं जुनीं सांधपं इतकीं चांगलीं शिवलीं तर रोजरोज आपल्या घराला कोण येईल?' -साखरपाणी-मन्वं डिसें १९४३. [ सांधणें ]

**साधातोबा**—पु. एक स्काउट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३१२.

**सानिदह**—पु. प्रसंग. -मुधो. [ अर. ]

**सानी**—स्त्री. कलावंतिणीच्या नांवापुढें लावण्यांत येणारें उपपद. उदा० गंगासानी, हिरासानी.

**सान्न**—न. सांदणा पहा. -सह्यापा ३१३.

**सापड**—पु. पुष्कळ माणसांनीं वाद्याच्या नादावर करावयाची भांगलण; ईजिक.

**सापसंद**—स्त्री. एक औषधि वनस्पति, विशेषतः सापाच्या विषावर उपयोगी.

**सापेक्षतावाद**—पु. प्रत्येक बाबतींत तुलनात्मक विचार करण्याची पद्धति; कोणत्याहि गोष्टीबद्दल अनुमान काढावयाचें किंवा निश्चय करावयाचा किंवा एखादें परिमाण मोजावयाचें असल्यास तत्संबद्ध अनेक गोष्टींचा विचार करून अनुमान काढावें लागतें, असा सिद्धान्त; लांबी, रुंदी याप्रमाणें काल हेंहि मापनांत घेण्याचें मान आहे असा सिद्धान्त. (इं.) डॉक्ट्रिन ऑफ रिलेटिव्हिटी.

**सांप्रदाय**—पु. (प्र.) संप्रदाय पहा. पद्धति. उदा० वाक्संप्रदाय=शब्दांचे लाक्षणिक अर्थ मानण्याची प्रद्धति.

**सांबण**—न. एक प्रकारचें गलबत.

**सांबरी**—स्त्री. शेवरी; सांवर-री पहा शाल्मली; एक वृक्ष. -मसाप ४५.२.

**साबाण**—न. कोळयाच्या जाळयासारखें दिसणारें कापड.

**सांबारपीठ**—न. वेसवार; उपस्कर; भाजींत घालावयाचा पीठ, मसाला, इ. -मसाप ४५.७.

**साबि(बी)क**—वि. पूर्वीचा; मागील. 'कल्लाखान भवानगिरीचा आमील यास बदस्तूर साबीक बाहालीचा सिरपाव दिल्हा.' -पेद १.३. [ अर. ]

**साबित**—पु. भक्कम; पुरावायुक्त. -मुधो. [ अर. ]

**सामटा**—पु. सामता. छिद्र पाडण्याचें हत्यार. 'पाषाणांत जन्मलें पोलाद घन। पाथरवटा संगतीं पाषाण। तैसेंच त्या सामटयाचें लक्षण। तिरव्या तिरव्या भुरळितसे।' -योसं १२.१८.

**सामदी**—क्रिवि. (महानु.) युद्धाच्या तयारीनें; सामुग्रीसह. 'मागुतें पुरीया सामदी येइजें। राउळांतें ठाइं घालिजे।' -जांस्व २५२.

**सामरिक**—वि. युद्धसंबंधीं. [ सं. समर ]

**साम्राज्यशाही**—स्त्री. एका राष्ट्राची सत्ता दुसऱ्या अनेक राष्ट्रांवर स्थापित होऊन त्यांचा एका मोठया राज्यांत, साम्राज्यांत अन्तर्भाव होऊन मूळ राष्ट्राचा अंमल इतर राष्ट्रांवर चालणें. अनेक देशांवर एका देशाची सत्ता चालणें. (इं) इंपीरिॲलिझम.

**साय, साये**—वि. साहाय्य; अनुकूल; मदतीस तयार; योग्य. 'तरी आपण कूच करून लोक सुधा साये राहोन मोकाम करावा.' 'आम्हास वारा साय आहे.' -पेद २४. ११८.

**सायर**—वि. इतर. -मुधो. [ अर. ]

**सायला**—पु. साग.

**सायार**—पु. मांडव; माच. 'कीं तो चकोरा करावया पाहुणेरु। तेथ आणुंपांत चंद्र सेखरू। म्हणोनि गगनीं बांधत सायारू। तिहीं लोकींचा॥' -नरुस्व ७९५.

**सार**—क्रिवि. (व.) बिदा; पोंचती; पावती. (क्रि० करणें). 'बहिण सार केली। मागं परतले लोक। भाऊ जागचा हालेना। भावाला बहिण एक॥' -वलो ५०. [ सरणें ]

**सारठणें**—अक्रि. सपाट होणें; पसरट होणें. 'एक वाढोनि जारठली। एकसु पृष्ठें सारठली।' -भारा. बाल. २३.८५.

**सारणी**—स्त्री. मोटेचें पाणी बागेंत खेळविण्याकरितां बांधलेला पाट. 'मोटेच्या थारोळयाचे दगड चोरीस गेले होते. सारणी मोडून पडल्या होत्या.' -पाणकळा. [ सं. सृ=सरणें ]

**सारणी**—स्त्री. (महानु.) चाळणी. 'ब्रह्मविद्या सारणी.' -वि ३३.

**सार्वमहंमदीय संघटना**—विश्वेस्लाम पहा. (पॅन इस्लामिझमला पर्याय.)

**सार्वस्विक संप्रदाय**—पु. सर्वांनीं परिश्रम करून मधमाशांप्रमाणें सार्वजनिक कोठार भरावें व त्यांतून जें पाहिजे तें आपल्या विनियोगार्थ घ्यावें.

**साल**—पु. प्रत्युत्तर. 'येथून आम्ही पत्र पाठवितो त्याचे उत्तर स्वामीचे येते. जाबाचा साल होतो आणि त्याचे फिरोन काय ल्याहावे.' -पेद १६.१९. [ अर. सवाल=प्रश्न. चुकीनें उत्तर अर्थ ]

**सालगांठ**—स्त्री. वर्षगांठ; वाढदिवस. 'आता लेकाची सालगांठ. त्याची इयादी करितात.' -पेद ३८.११३.

**सालढाल**—स्त्री. चालढकल; बोलाचाली करून दिरं-गाई; ढिलाई. 'कांहीं किरकोळ बोलतच नाही. सालढाली-खालीं घालितों।' -रा १२.१०४.

**सालवग**—न. साल नांवाच्या झाडांचें रान. 'वैरण मिळत नाही. सालवण लागलें आहे.' -रा १०.६०. [ साल+वन=अरण्य ]

**साली**—(सातारी.) लग्नांत वधूच्या पायाच्या बोटांत घालण्यासाठीं केलेला चांदीचा दागिना; विरोली.

**सालेमन**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २४. [ फा. ]

**सालोमालो**—पु. तुकारामाचा द्वेष करणारा एक (दोन?) सालोमालोचे अभंग आहेत. यांची समाधि वरवंड ( पुणें जि.) जवळ आहे. (ल.) स्वतःचा उत्कर्ष होत नाहीं म्हणून दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होऊन त्याचा द्वेष करणारा मनुष्य.

**सावगणी**—वि. मूर्त; शरीरधारी.'कोकिळांचिये श्रुतीचे निरंगें। अमृत पंचम वसंत रागें। मन्मथनाथु गातां अनुरागें। दिसा होति सावगणी ॥' -नरुस्व ७६३. [ स+अव+गण ]

**सावजी**—पु. सावज टेहळणारा; शिकारीस जावें किंवा न जावें हें सांगणारा. [ सावज ]

**सावटी**—वि. एकत्र; एकंदर; बेरीज; गोळा. 'मसाल्यास सावटी करणें.' -पेद ८.५३.

**सावर करणें**—सावरणें; आटोपणें. 'त्यास मोड झाला तो सावर करून तैसेच गानिमावर घातले.' -पेद ३.१६.

**सावर बसणें**—सावरणें; स्थिर होणें. 'त्यामुळें कोणासच कोणे गोष्टीचा सावर बसून दौलतीचे वझें घेऊन यश आलेच नाहीं.' -पेद ५.३३.

**सांवत्सर**—पु. ( फलज्यो. ) ज्योतिषी. [ सं. ]

**सावाय**—स्त्री. १ साळु; सायाळ. 'चक्रवाक चकोर फळेकार। दापानि जवादिये लेकार। भारी बहु सावायांचे असिवार। ते चलती मोचेघसणी ॥' -नरुस्व ७४८. २ साहित्य. 'ते आपुलिया कणवा महाकवि। नवरसांचे मेघ वोळवी। सावायाचे दिवटे खोलवी। कविता पुढा ॥' -नरुस्व १२.

**सांसर्गिक**—वि. स्पर्शानें, सहवासामुळें उत्पन्न होणारा (रोग, द्वेष वगैरे) -आडि. महा. [ संसर्ग ]

**साहाण**—पु मोठा नगारा. 'साहाणी हाती'=नगाऱ्याचा हत्ती. 'मोडले दळभार। गेले गेले हाती साहाणी.' -उषा १६०६.

**साहानी**—पु. सेनापति. 'तो जसा श्रृंगाराचा साहानी। की रतीचा वीर करनी। कीं कामाची कीर्ति लिहिता श्रीकरणी। वहिये सुमनांचिया ॥' -नरुस्व ७.३४.

**साहिब**—पु. सोबती; मालक. -मुधो. [ अर. ]

**साहिल**—पु किनारा. -मुधो. [ अर. ]

**साहिब्या**—स्त्री. पट्ट असलेलें रेशमी कापड. -सारुह ३.४०. [ फा. ]

**साहेता**—स्त्री. साहाय्यता; पुरवणी; मदत. 'त्यांची मांडवीची साहेता आम्ही कशी केली.' -वमो.

**साहेब तर्तूद**—स्त्री. दूरदृष्टि; पुढील तजवीज. -वि. दूरदृष्टीचा; पुढील तजवीज करणारा.

**साळ**—स्त्री. शाळा; छाप; सांचा; पद्धति; वळण; परंपरा. 'फार करून पोरेंच आहेत नवीच साळ आहे एक मल्हारजी होळकर मात्र जुना आहे.' -रा १४.६९. [ सं. शाला ]

**साळांक, साळांग**—न. गायन. 'ऐसा साळांक मार्ग दाखविला। तिन्हींमार्गीं गीतगुड म्हणिनला। मग छंद गाउनि ताळ ठेविला। ध्रुवपदावरी॥' -नरुस्व १८६. 'मग मृत्य लोकिचिया आंगा। कैसें रूप केलें साळांगा। राग-रागांग-उपांग-देशांग। भाषांगेसीं॥' -नरुस्व १८४. [ शाला+अंग ]

**साळेमाळे पापडिये**—पु. एक मुलींचा खेळ.

**साक्षीगांठ**—स्त्री. वाङ्‌निश्चयाच्या वेळीं उभयतां व्याही साक्षी विडे घेऊन गांठ बांधतात ती. -विसो १३६.

**सिकार**—पु. १ सुरतोपभोग; विषयसुख; कामसेवन. 'माधवी मंडपाचे विणे। तेथ पक्षिय सिकारपणें। देवाचीं रूपकें वानें। गाती बनकरीं सवें॥'-नरुस्व ७९४. २ श्रुतिधर; सूर धरणारा. 'उभयां ठाकौनि रायापुढें। सिकार खुणाविलें सर्वांगडे। हात उचलौनि आसी पढे। जे दुभे मनोरथु॥' -नरुस्व १७४. [ सं. सीत्कार ]

**सिकिंदा**—वि. सिकस्त; फजीत; त्रस्त. 'बहुतच सिकिंदा करून गांवांत कोंडला असे.' -पेद २.४९. [ फा. ]

**सिकोपा**—पु. झेंगट; टुमणें; लचांड; पेंच. 'परंतु श्रीमंताच्या चित्तांत उगेच संवशये होतात. भलताच सिकोपा मागें लावितात यास काय करावें?' -पेद ६०.१९८.

**सिखामणी**—वि. शिरोमणी; समर्थ; श्रेष्ठ; सर्वाधिकारी. श्रीमंताची प्रतिज्ञा सिधीस जाऊन आचंद्रार्क त्रैलोक्यांत, कीर्ति विस्तार होये ते करणार समर्थ शिखामणी आहेत.' -पेद ४०.७८. [ सं. शिखा+मणि ]

**सिंगट**—न. शिंग; शिंगाचें धनुष्य. 'प्रत्यक्ष सिंगटाची कडी कमान। नीटतीर जाऊन करी कारण।' -योसं ८९०. सं. शृंग ]

**सिंगल गंजी**—स्त्री. (कैदी.) तुरुंगांतील एकांत कोठडी. के २१.३.१९३९. [ इं. सिंगल+गंजी ]

**सिता**—स्त्री. श्री. 'नरकीर्ति तरवळें जरि हरितिल हरिची ळें सिता श्वानें।' -मोद्रोण १०.३०. [ सं. ]

**सिताब**—क्रिवि. ताबडतोब; त्वरेनें; जलदीनें; लवकर 'बैल व बेगार देऊन सिताब पाठवून देणें.' -पुद १.३०. अर. षिताब ]

**सितीन**—वि. साठ. -मुधो. [ अर. ]

**सिद्धांतन**—न. सिद्धांत काढण्याची क्रिया. 'ज्यांत सिद्धांतनहि प्रयत्नें करून केलें आहे असे ग्रंथ निघूं लागले.' के २२.७.१९३८. ( हा नवा शब्द श्री. न. चिं. केळकर यांनीं काढला. इं. थिओरायझेशन ).

**सिद्धानीन**—स्त्री. सरळ लगाम. 'सरळ नाक्याना सिद्धानीनें गेल्यास पशुकोटींतून देवकोटींत प्रवेश होऊं शकतो.' -विविध ४.७.१९३७. [ सं. सिद्ध+अर. अनीन=लगाम ]

**सिना**—स्त्री. छाती. 'त्यांत फिरंग्याच्या आश्रेये आपले प्राणे म्हणावयास गेले याकरितां येकवेला सिन्याचा कोट करणें तो सर्वांनी मिळून ठाण्यासच झटावे मारावे मरावे.' -पेद १६. १९. [ अर. सीना=छाती ]

**सिनेदराजी**—स्त्री. धैर्य; हिंमत. सिनेजोरी पहा.

**सिनेपान**—न. छातीइतका कोट. 'सफेली टाकून सिनेपान दोन गजी केली.' -वसमो.

**सिपह**—पु. शिपाई. -मुधो. [ अर. ]

**सिपाह सालार**—पु. सेनाध्यक्ष. [ अर ]

**सिप्हर**—स्त्री. ढाल. -मुधो. [ अर. ]

**सिबा**—स्त्री. किलास; सिध्म. -मसाप ४१.६.

**सिम्त**—स्त्री. तर्फ. -मुधो. [ अर. समत पहा ]

**सिय**—न. शीत; हींव; थंडी. 'हिमांचे देखौनि दामोधर। सियें सूर्यो कांपे निरंतर । हो काज विजूसि वाजतुसे दांतौर। मेसे गाजनेयाचेनि॥' -नरुस्व ४३८. [ सं. शीत ]

**सियादत**—स्त्री. मोठेपणा. -मुधो. [ अर. ]

**सिरउपच्छाई, सिरोपस्थाई**—वि. प्रमुख; शिरोपस्थायी; म्होरक्या. 'या प्रांताचे वर्तमान तरी वोडसे प्रांतचे हरामखोर सर्व येकत्र होऊन कुंवर भूपालसिंग राजे याचा कनिष्ठ नातु यास सिरउपच्छाई पुढें करून खरगापुरवाले व देशानवाले व पलेराव कठोर व धमना वगैरे पवार धंदेरे तीन चार सहस्र पांव लोक व पांच सातसे स्वार जमा होऊन दुंडी केली.' -पेद २२.७. 'सिरोपस्थाई आपणच व्हावे.' -पेद ३.४३. [ सं. सिर+उपस्थायी ]

**सिरगिरी**—स्त्री. छत्र. 'सिरगिरी धरी बारिणी मयूरिका।' -नरुस्व १०२. [ सं. श्रीगिरि ]

**सिरड**—न. शिरें; अनेक फांद्या फुटलेली काठी; कांटेरी फांटे फुटलेली काठी. [ शिरें पहा. ]

**सिरनाहाणी**—स्त्री. मानसन्मान; प्रशंसा; शर्फराजी. 'तेव्हां सूर्याजीची स्तुती हजरतीं पावेतों करून सिरनाहाणी करविली. हा अस्करा लष्करांत बहुत जाहला.' -सनदा १९५. [ फा. सिर+सं.+स्ना=नाहणें ]

**सिरोपस्थ**—वि. प्रमुख; मुख्य; पुढारी. 'ते समयीं गणोजी कदम सिरोपस्थ होता.' -रा १३.२०. सिर उपस्थाई पहा.

**सिरोही(लोह)**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २६.

**सिरोही-पवाशाई**—स्त्री. एक तरवारीचा प्रकार. -प्रश ४१.

**सिरोही-मानाशाई**—स्त्री. एक तरवारीचा प्रकार.

**सिलसिली**—स्त्री. टेहळणीची नाव; पाहऱ्याचें गलबत. 'आरमाराच्या वेढास सिलसिल्यांची नुदर असली तरी वसई साष्टी प्रांतें महोगिऱ्या आहेत.' -पेद २४.२०४. [ सिलसिला ]

**सिलहदार**—पु. शिलेदार पहा, -मुधो. [ अर. ]

**सिलीकबंद**—वि. हिशोब बंद करून शिलक काढून तयार केलेले. 'जमा खंडणी त्याचा वसूल तेरीखवार किर्दी सिलीकबंद आणावे.' -पेद २.६८. [ शिलक पहा ]

**सिवना**—न. स्वप्न. 'घायेवटें होति सिवना। तया उपडुडुचि जाला विजना।' -नरुस्व ६६६.

**सिष्टकृत्य**—न. खालीं सिस्टकृत्य पहा.

**सिस्टकृत्य**—न. समाप्ति; अखेर; शेवट. 'त्याचे सिस्टकृत्य करून पुढें फौज रवाना करून आम्ही देशास सत्वरीच येत असतो.' -पेद २.५७. 'इतकियांत त्याचें सिस्टकृत्य जालें असेल.' -पेद २.६३. कोणत्याहि धार्मिक कृत्याच्या वेळीं होम करावयाचा असला म्हणजे प्रधानयाग अथवा मुख्य आहुती देऊन झाल्यानंतर स्विष्टकृत् अग्नि वगैरे देवतांस आहुती देऊन होम पूर्ण करावयाचा असतो; त्या होमास स्विष्टकृत् होम असें म्हणतात. त्यावरून लक्षणेनें समाप्ति, शेवट हा अर्थ प्राप्त झाला. [ सं. सु+इष्ट+कृत् ]

**सिंहशय्या**—स्त्री. उजव्या कुशीवर कोपर जमिनीवर टेकून त्यावर डोकें ठेवून व पाय ताठ करून केलेलें शयन. -योगशास्त्र. [ सं. ]

**सिंहाचा भाग**—पु. मोठा हिस्सा. सिंह हा वनराज असल्यामुळें कांहीं साथीदारांसह त्यानें शिकार केल्यास त्यास त्या शिकारीपैकीं मोठा हिस्सा मिळण्याचा हक्क असतो यावरून. 'महाराजांनीहि पण त्यांतील सिंहाचा भाग उचलला होता.' –सयाजी ३.८२१. इंग्रजी 'लायन्स शेअर' या वाक्प्रचाराचा पर्याय.

**सिंहाडा**—पु. सिंहमुखी दगडी कठडा. 'तिये ठाइं नाना विधां कुसरी सैंभी। साटोपा सिंहाडेचिया उभी। पुतळिया षड्विधानाटारंभीं। दाखवी द्विजराजु।' –नरुस्व ८६९. [ सं. सिंह ]

**सीगा**—पु. दर्जा; वर्ग; कोटी. 'दक्षिणेंतील प्रख्यात कंक, मालुसरे, मोरे या घराण्यांतील मंडळीस सरदार, मानकरी सीग्यांत नवीन मुकर्रर केले आहेत.' –के २८.१०.१९४१. [ अर. सीगा=धंदा, व्यापार, वर्ग ]

**सीझदुम**—वि. तेरा. –मुधो. [ अर. ]

**सीत**—वि. सहा. –मुधो. [ अर. ]

**सीद**—स्त्री सिंद. धनगरांतील एक कुळी.

**सीधाजनेऊ**—स्त्री. डाव्या खांद्यावरून उजव्या कमरेपर्यंत केलेला वार. –मवि ९.११.

**सीवर्णचिचाना**—क्रिवि. (महानु.) पहांटे. 'मग एरेदीं त्यातें नपुसत सीवर्णचिचाना नीगाले.' –वृद्धाचार १९.

**सीळका**—स्त्री. (महानु.) काडया; शलाका. 'तंव सूर्योदये दंतपंक्तीः वक्र सी(ळ)का (करूनि) फेडिती जीह्वामळ' –पूजावसर १५. [ सं शलाका ]

**सुई दोरा**—पु. (मल्लखांब.) मल्लखांबावरील वेलाचा एक प्रकार. हातांतून क्रमानें पाय काढून घेणें. –व्याज्ञा ३.२०२.

**सुकांबा**—पु. आंब्याच्या वाळलेल्या फोडी, उसरी. [ सं. शुष्क+आम्र ]

**सुकी काकडी**—स्त्री. फऱ्यामऱ्याच्या खेळांत प्रतिपक्ष्याचें एकहि फरें होऊं न देतां सर्व मरीं घेऊन खाऊन टाकणें.

**सुख**—न. निद्रा; विश्रांति. 'सुख करून उठली असली तर सत्वरी उत्तर पाठविणें.' –पेद २६.४६. [ सं. ]

**सुचें**—न. सूचना; जाणीव; माहिती; ज्ञान; ओळख. 'त्या नेमास येसाजी आंगरे व रेवदंडेकरी आपले लोक गेले तो सुचें जाले. याजमुळें कार्य न होता माघारे आल्यावर मानाजी आंगरे राजकोटावरून मारगिरी करूं लागले आहेत.' –पेद २४.१३३. 'राजकोटाचें राजकारण केल्या अनुसंधानाप्रमाणें साधावें परंतु सुचें जालें याजमुळें साधलें नाहीं.' –पेद २४. १३४.

**सुटविणें**—सक्रि. सोडणें; धाडणें. 'तुम्ही राजश्री रुद्रो मेलगीर या समागमें पत्र सुटविलें.' –रा ३.७. [ सुटणें ]

**सुतरमुरुग**—पु. शहामृग. 'सुतरमुरुग म्हणणार येक अपूर्व पांखरूं थोर दीड पुरुषप्रमाण उंच त्याचे पाय उंटासारिखे ऐसें पांखरूं पाठविलें.' –तंजाशिला ९९. [ अर. शुतरमुरुग ]

**सुतळी**—वि. (व.) सुतासारखें बारीक; नाजूक. 'मागे बाळकृष्ण जेऊं। तूप पुरणाची पोळी। दूध सेवया सुतळी।' –वलो ३५. [ सूत सं. सूत्र ]

**सुताटी**—स्त्री. खांद्यापासून मान वर निघते तो भाग. 'राणोजी जाबूलकर मानेच्या सुताटी जवल गोली जखम भारी' –पेद २१.७७. [ सूत ]

**सुंदरवन**—न. गंगानदीचा मुखप्रदेश. –के १४.३. १९३९. [ सुंदर नांवाच्या झाडावरून ]

**सुदर्शनफिरकी**—स्त्री. (मल्लखांब) नसीकसाचे हात बांधून दोन्ही हातांत मल्लखांब दाबून पाय उचलून घडाळयाच्या काटयाप्रमाणें फिरविणें. –व्याज्ञा ३.१८०.

**सुदामपण**—न. (ल.) गरीबी. श्रीकृष्णाचा मित्र सुदामा गरीब होता यावरून. [ सुदामा ]

**सुदूर**—वि. सुटलेला. –मुधो. [ अर. ]

**सुंदोपसुंदी**—स्त्री. आपसांतील कलह; वर्ग कलह. सुंद व उपसुंद यांचा तिलोत्तमेवरून कलह झाला होता या कथेवरून. [ सं. ]

**सुनग**—पु. (खान.) नग. नग पहा.

**सुनीत**—न. एक इंग्रजींतून आलेला काव्य प्रकार. इं. सॉनेट यास प्रतिशब्द.

**सुपडूं**—न. चंपारा; पाणी काढावयाचें एक साधन.

**सुपत्ते**—स्त्री. सुबत्ता; विपुलता 'पूर्वीं सुपत्ते होते तेव्हां केले नाही.' –पेद ४.४६४. [ सं. सु+पूर्ति ]

**सुपर्णचिती**—स्त्री. एक यज्ञवेदी; गरुडाच्या आकाराची रचना. [ सं. सुपर्ण+चिती ]

**सुपलीपकड**—स्त्री. (मल्लखांब) आपले दोन्ही तळहात जोडन सुपलीसारखे करून त्यांनीं बाजूंनी मल्लखांब धरून मारावयाची उडी.' –व्याज्ञा २६६. [ सूप+पकड ]

**सुपाक**—वि. चांगलें; उत्कृष्ट. 'कांचेन आघिपाशीं, सुत शोकिच गुणसुपाक यांचे न।' –मोद्रोण १.२४. [ सं. ]

**सुपारा**—पु. धान्य वारवण्यासाठीं सुपानें घातलेला वारा. –चित्रकृषि २.७. [ सूप+वारा ]

**सुपारी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. –व्याज्ञा १.३९१.

**सुप्रत करणें** —सुपूर्त करणें पहा. हवालीं करणें; स्वाधीन करणें. 'त्या मुलखावरील पूर्ण सत्ता बडोदे सरकारास सुप्रत करण्यांत आली.'

**सुप्रवर्ती**—क्रिवि. सुप्रवृत्तीनें; सरळपणें. 'खंदक भारी केला आहे. तो कांहीं सुप्रवर्ती गढी देत नाही.' -पेद २.२६. [ सं. सु+प्रवृत्ति ]

**सुबाळ**—न. एक गलबताचा प्रकार.

**सुब्हान**—पु. परमेश्वर. -मुधो. [ अर. ]

**सुबिता**—स्त्री. सुबत्ता; सवंगाई; सुविधा; सोय. 'सुबिता जाल्यावर आपण विसरणार नाहीं.' -पेद ४३.६६. [ सं. सु+वृत्ति ]

**सुभता**—पु. सोय; सुविधा; मोकळेपणा; सुरक्षितता. 'मार्गाचा सुभता नाहीं. याकरितां विलग आहे.'-पेद ५.६५. [ सं. सु+विधा ]

**सुभेलष्कर**—न. सेनापति दाभाडे; सर लष्कर गायकवाड वगैरे मोठे सरदार पथकेलष्कर यापेक्षां जास्त हुद्याचे सैन्यावर झालेला खर्च लिहिण्याचें सदर. -भारतवर्ष मराठ्यांचें दप्तर १५.

**सुभ्र**—पु. रुपया. 'राजगड तर्फेस आपले धर्मादाउ आपले नांवें करून घेतला त्यास वीसपंचवीस सुभ्रे खर्च जाले.' -रा १५.२६२. [ शुभ्र ]

**सुमनाम**—रात्रीचें दंव. शब्नम पहा.

**सुमंतपंचक**—न. स्यमंतपंचक. 'परशुराम याणी एकवीस वेळां निक्षत्रिय पृथ्वी करून सुमंतपंचक क्षेत्रीं रुधिराच्या नदीमध्यें तिलोदकें मातृआज्ञेस्तव ब्रह्मयज्ञ केला.' -आठइति ५३. [ सं. ]

**सुयाळें**—न. सुया ठेवण्याचें पात्र; जुगदान. [ सुई+आलय ]

**सुरअत**—स्त्री. चपलता. -मुधो. [ अर. ]

**सुरखी**—स्त्री. विटांचा चुरा; विटांची पूड. सुरकी पहा.

**सुरतरु**—पु. ( महानु. ) देवदार; सरळ वृक्ष; पंचसुरतरु. -दाव १००. [ सं. ]

**सुरमें**—न. ( ठा. ) एक जातीचा मासा.

**सुरसुरी**—स्त्री. तळफ; तीव्र इच्छा; लहर.

**सुरहावल्ली**—स्त्री. मोरवेल; गोकर्णी. -मसाप ४५.३.

**सुरळी**—स्त्री रेशमी लुगडें.

**सुराणी**—स्त्री. (चुकीनें) शिराणी पहा. दुर्मिळता. 'एका आईचीं मुलें पण भेटीची सुराणी होते.' -पकोघे.

**सुर्ती रुपया**—पु. सुरत येथें पाडलेला इंग्रजी रुपया.

**सुर्मान**—न. ( कण. ) स्मरण (अपभ्रंश). 'त्यानें मनांत खंडोबाचें सुर्मान केलें अन् सर्व शक्ति एकवटून दोन्ही हातांनी जो हिसडा मारला तो काढण्या तटातट तुटल्या.' -उपेक्षित [ सं. स्मरण ]

**सुलगणें**—अक्रि. शिलगणें; पेटणें; भडकणें; जळणें. 'टोपीवाल्यांमध्यें परस्परें कजीया किती दिवसांपासून सुरू. लेकिन रोज बरोज अधिकच सुलगत चालली आहे.' -रा ५.२१३. शिलगणें पहा.

**सुलतानढवा**—पु. हल्ला. 'फिरून एकदां सुलतानढवा करून कोट घेण्याचा विचार इंग्रजांनीं केला.' -वसमो. 'फौज आलियानंतर सुलतानढवा करून स्वामीच्या पुण्येंकरून कार्यसिद्धि सत्वरीच करूं.' -पेद ३३.१८९. 'राजश्री गंगाधरपंत यांनीं विजेदुर्गीचा सुलतानढवा करणार त्याच्या संशयात्मक लिहिलें आहे कीं, दोनचारशें माणूस निवडक पाठवावे.' -पेद २४.२४३. 'या उपर याही सुलतानढवा करावा म्हणून विचार केला आहे.' -पेद १६.५४.

**सुलाखत खाने**— ? 'सिदी साद याज सांगाते सुलाखत खाने आरमार व जमाव देऊन मदतीस येणार म्हणौन परस्परें एकिले.' -पेद ३.२२. [ फा. ]

**सुलालह**—स्त्री. प्रजा. -मुधो. [ अर. ]

**सुलेख**—वि. सुंदर; रेखीव; सुरेख 'सौंदर्यें चंद्रासारिखें मुख । कमळा पामौनि डोळे सुलेख। आजान बाहु सुरेख। विशाळ वक्षस्थळ।' -नरुस्व ३२१. [ सं. सुरेखा ]

**सुल्तान**—पु. राजा -मुधो. [ अर. ]

**सुवट**—वि. सुंदर; वर्तुळाकार. 'सुवटा मांडिया भरिवां। कैसिया पोटरिया आटिवा। काइ सांघें चरणांचा मेळावा। जें जन्मस्थान तीर्थांचे।' -नरुस्व ३२३. [ सं. सु+वृत्त ]

**सुवर्णवज्र**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २२. [ सं. ]

**सुश्रब्ध**—वि. सुखदायक; प्रेममय. 'माहेरच्या सुश्रब्ध वातावरणांत गेल्यावर पुन्हा सासरीं येण्याचा धीर मला झालाच नसता.' -कुरु ३६.

**सुस्मार**—स्त्री. घोरपड. [ अर. ]

**सुळकांड्या**—स्त्री. येरझारा; हेलपाटे. -उमनानवरा.

**सुळकी**—स्त्री. सूर; पोहतांना खालीं डोकें करून सरळ मारावयाची उडी. -व्याज्ञा ४.३३५.

**सुळकी अढी**—स्त्री ( मल्लखांब. ) मल्लखांबापासून दूर बसून एकदम उंच उडी मारून मल्लखांबावर करावयाची अढी. -व्याज्ञा ३.८३.

**सुक्षोभ**—वि. सहज तापणारी; तत्काळ त्वेष येणारी. 'लहान वयांत सहज परिणाम होणारी अंतःकरण प्रवृत्ति सुक्षोभ असून.' -नि ३७. [ सं. ]

**सू**—बाजू. -मुधो. [ अर. ]

**सूइणें**—सक्रि. टाकणें; घालणें; ठेवणें. ' मधुकर्पुरें चेकारी अंजिजे। तेहीं आसुइं कुमोदु-कंदु उगाळिजे । ते अंजन पायातळीं सूइजे। चंद्रिका मंत्रें।' -नरुस्व ५४७. [ सं. सूद् ]

**सूची प्रवेश**—पु. रिघाव; आंत येणें; आगमन; थोडासा आवकाश मिळणें. ' त्यांचा सूचीप्रवेश जाहालियानें जेथें पाय लागेल त्या प्रांतास उपद्रव हें जाणून मान्य करवत नाहीं.' -पेद २४.२७. [ सं. सूची=सूय+प्रवेश=रिघाव ]

**सूचीमुख**—पु. बाणाचा एक प्रकार. -प्रश १९. [सं.] सुईसारखें अणकुचीदार अग्र असलेला.

**सूडकरी**—वि. सूड घेणारा.

**सूत्रपात**—पु. प्रारंभः सुरुवात. ' रंगभूमीवरील नवीन सुखमय प्रवेशाचा सूत्रपात कसा झाला तें आपण अवलोकन करूं.' -सयाजी १.११०. [ सं. सूत्र+पात ]

**सून चोरटी सासू पळपुटी**—स्त्री. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३९९.

**सूफ**—स्त्री. लोंकर; भीस.

**सूबह**—पु. देश; सुभा. -मुधो. [ अर. ]

**सूर**—पु. सूड; दिशा; ताळतंत्र; पद्धति. ' सूर कोठें आहे त्याच्या कामाला.' -खेस्व ४९.

**सूरकाठी**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.२६१.

**सूरकांडें**—न. आट्यापाट्यांमधील दोन पाट्यांच्या मधील सूरपाटीचा भाग. -व्याज्ञा १.२२०.

**सूरतपणें**—क्रिवि. ज्ञानबुद्धीनें. ' शेखमहंमद द्रवे सूरतपणें । ऐकाजी सद्‌गुरु तोतरीं वचनें । तुमचे कृपें तुम्हास अनुवादणें । मज लडिवाळपणें।' -योसं ५.४१.

**सूरपाटी**—स्त्री. आट्यापाट्यामध्यें सर्व पाट्यांस मध्यें छेदणारी उभी पाटी. -व्याज्ञा १.२२०.

**सूर मारणें**—अंगाचा आकार माशासारखा करून पाण्यांत उडी मारणें.'

**सूरमासा**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३६१.

**सूसमार**—स्त्री. घोरपड. -मुधो. [ अर. ]

**सूक्ष्मशेप**—पु. तालीमखाना; कोलिस्त; कोकिलाक्ष; इक्षुगंधा; इक्षुर. -मसाप ४५.४.

**सेजवळा**—पु. शय्या करणारी दासी. ' दांडिये चढौनि भीमकी । वनियेचा राउळ आणिली झडकी । तेथ सेज झाडिली बटकीं । सेजवळेचा।' -नरुस्व ३८८. [सं. शय्या-शेज+वल् ]

**सेतु**—पु. रामेश्वर येथील समुद्रावरील वाळू. ही काशीस नेऊन गंगेंत टाकतात. प्रथम काशीची गंगा रामेश्वराला भेटवितात. ' कांहीं लोकांनीं येथें सेतु घेतला.' -पुरु जुलै १९४०.

**सेद**—स्त्री. सेहत; प्रकृतिस्वास्थ्य. ' या मुकामावर आले, सेद जाली.' -पेद २५.९. [ अर. सेहत् ]

**सेंद्रिय**—वि.ज्याला इंद्रियें आहेत असा; निरिंद्रय याच्या उलट. (इं ऑर्ग्यानिक). ०खत-प्राणी अथवा वनस्पती यांच्या अवशेषांपासून बनलेलें खत.

**सेंध, सेंधे, सेंधी**—नस्त्री. रास; ढीग; समूह. ' खालता उभाबांद सेंधी ४ खिला १, खलवडे एक खिला खलवडिया खालता सेंधे दगडाचे एक फणी खालता उभाबांद दगडाचा.' -रा १८.१.

**सेनापति**—पु. विवाह मंडपांत विघ्ननिवारणार्थ स्थापन केलेली एक देवता. मंडपाच्या ईशान्य दिशेस मुहूर्तमेढ रोवून तीस एक पांगाऱ्याची काठी बांधतात ती. [ सं. ]

**सेनापती**—स्त्री. सेनापतिपद; सैन्याधिकार. ' रामाजी दगडोनें त्याचा दोरा आणिला आहे जे श्रीमंत राजेश्री बाजीराऊजी दस्तगिरी करून महाराजास भेटऊन सेनापती देवितील तर उठोन येईल.' -पेद १०.७३. [ सं. सेना+पति+फा. ई ]

**सेप्त**—स्त्री. शपथ. ' रेवापार जाउ देईन तर सेप्त गुरुची.' -पेद ५.८५. [ शपथ ]

**सेफ**—स्त्री. तलवार; सैफ पहा. [ फा. सैफ ]

**सेमला**—पु. ( व. ) शेमला पहा. पटक्याचा पदर. ' सखा चालतां थाटांत । खालीं सेमला लोंबत । नार मोहना मागून। कशी तुल्याला झोंबते.' -वलो ३९. [अर. शामला ]

**सेरीफ**—पु. अक्षराच्या माथ्यावरची व खालची रेघ. ' इंग्रजींत जसे सेरीफ असतात.' -के ९.४.१९३७. [ इं. ]

**सेलणें**—सक्रि. जिंकणें. ' दामोधराचा खणोखणी विचित्रें। वारेनें वाजितलीं जंत्रें। तियें सेलीत सप्त स्वरार्शी शस्त्रें। कानाचेनि निरोपें.' -नरुस्व ५२२. [ सं. शैल ]

**सेलबैल**—स्त्री. बैल जोडीवरील कर. ' खर्चपटी व सेलबैल व सरदेशमुखपटी व सराफ पटी.' -पेद ३१.२३. [ सेल पहा ]

**सेलसांड**—स्त्री (व.) हेळसांड. 'घराची अस्तुरी । नाहीं सुपारीचं खांड । रोज दासीच्या पलंगीं । दोडयांची सेलसांड॥' -वलो ८९.

**सेला**—पु. बाण. ' पुढीली अणीया भाले । जवळी पांच पांच सेले।' -उषा ७३-८२४. [ सं. शिली=बाण ]

**सेलेचा बैल**—पु. जोडीचा बैल; बैलांच्या दावणीतील शेवटचा बैल; अखेरचा बैल. 'सेलेचे बैल तैसे तारागण फेर। ईश्वरी प्रदक्षिणा।' -योसं २.३२. [सेल=शेवट; तुल. गुजराती छेला=शेवटचा]

**सेव**—न. (व.) शव. 'माझ्या मरणाचे वेळीं। कुठं माय माही पाहूं। सेव सवारल माही। बहिण प्रीतीची जाऊ।' -वलो ७७. [शव]

**सेव**—पु. शेवट; अखेर; सारांश. 'सांगतां उखई होईल बहु परी। म्हणऊन सेव मांडिला।' -योसं १२.८३. 'सेव दाविलें तोडून विस्तार।' -योसं १४.२. [शेव=शेवट]

**सेवभार**—पु. (व.) प्र. सेवाभार; सेवा करण्याचें कार्य. 'सांगे सीता जातां वनीं। सेवभार तेलिणीला। तेल पुरव तिळाचं। रामाच्या समईला॥' -वलो १९. [सेवाभार अप.]

**सेळंद्री**—स्त्री. सैरंध्री; दासी. 'कास्मिरीच्या नादमूर्ती। जो संगांत रावो चक्रवर्ती। तेणें गुपितें सेळंद्री धाडिला होती। रुक्मिणीतें पाहावया।' -नरुस्व २१९.

**सैंग**—क्रिवि. सहज; नैसर्गिक; स्वयंभ. 'अफौटे भिदें पढवी सैंग। कव्हणांचिया खाडेया न मेळवी डांग। आणिकतया भोटें आंग। जे चाळवी रुशी भार्यातें॥' -नरुस्व ३७१.

**सैतुक**—न. तुतीचें फळ; हें लाल असून सुरवंटासारखें असतें.

**सैन**—न. एक जातीचें विलायती कापड. 'सैनाचा पांढरा शुभ्र व इस्त्री केलेला कडकडीत अंगरखा जाऊन त्याचे जागीं खादीचा अंगरखा आला.' -टीच १.९५.

**सैरट भैरट**—वि. अर्धवट; मिसाट; खुळसर; नीट ऐकून न येणारा; स्वच्छंदी.

**सैलपाटी**—स्त्री. खळयावरील धान्याची पहिली पाटी.

**सोगई**—वि. नात्याचा; सगे असलेला; सगेपणचा. 'अभिलाषितील सोगया नारी। ते गोंडी परियेसा पां।' -योसं ११.९७.

**सोगौर**—पु. हंसासारखा एक पक्षी. 'राजहंसु देखौनि दचके। चकोरा चक्रवाका चवके। शब्दासवें विधानके। सोगौराचेया॥' -नरुस्व ६३१. [सं. स+गौर]

**सोडविणें**—अक्रि. (महानु.) वाजविणें. 'अनुहातें सोडविली जंत्रें। तीये वारेंनी वाजताति विचित्रें॥' -नरुस्व १०.३४.

**सोडशिडी**—स्त्री. दोरीची शिडी; सोलाची शिडी; किल्ल्याच्या तटावरून खालीं सोडावयाची शिडी. 'मोरच्यास व दमाम्यास व सुरुंगास व तोफास सामान बंगले व वाडे व तटे व झाप व सोडशिडया दारुगोळा सामान शंकराजिपंतास व गंगाजी नाईकास पुरवावयास लागले.' -साब ४९.

**सोडा**—पु. पोरकिडा; अरण्यमक्षिका. -मसाप ४५.६.

**सोनावणें**—अक्रि. सुंदर, बहुमोल होणें. 'स्वयें सोनेंपणें सोनावलासी। तथें कां सुगंधें सांडवलासी।' -योसं ९.१८.

**सोनें लागणें**—महत्त्व येणें; मोल चढणें. 'हिंदी लोकांत नुसते पदवीधरहि त्या सुमारास हाताच्या बोटावर मोजण्याइतके असतील कीं नाहीं याची शंका; अशा स्थितींत माधवरावांना सोनें लागावें यांत नवल कसलें.' -के १६.१.१९४२.

**सोनेवख**—पु. सुवर्ण पक्षी; पिंवळा पक्षी. 'तेथ गरुडें वीणि साधिली। तैसीं सोनेवखीयांचीं पिलीं। मधुकेसरावरी बैसली। चारा वांटितें॥' -नरुस्व ७९२. [सं. सुवर्ण+वख]

**सोभेदान**—न. सावधान; शुभमंगल सावधान. 'दिले एकेकाला तांदुळ मुठमुठभर। सोभेदान कुणाला येईना अक्षर।' -ऐपो २.१९९ [शुभमंगल सावधान अपभ्रंश]

**सोमतें, सोमतेंच**—क्रिवि. लागलेच.

**सोमसाले**—स्त्री. एक बारीक भाताची जात. -चित्रकृषि २७.

**सोरट**—न. माळ; रांग; चक्र; गोंधळलेला समूह. 'असें विचाराचें सोरट मनांत चालू असतां गाडी पुढें जाते.' -उपेअंत ७०.

**सोवनी**—पु. सोन्याचा व्यापार करणारा; सोनेंचांदी विकणारे; सोनी. 'सोवनी सोनार सिंपी गोवळी। कोळी निहाळी निघाले।' -भारा.अयोध्या८.११८. 'वाणिये सिद्ध केले पसारे। सोवनी सोनार जोशी वेव्हारे।' -भारा. अयोध्या १२.५४.

**सोष्ट**—वि. स्वस्थ. 'खुशाल झाले सोष्ट सारें घरदार।' -ऐपो २.१९६. [सं. स्वस्थ]

**सोसनपत्ता**—पु. एक तलवार. -प्रश ४२.

**सोळाके**—वि. डौलदार व वजनदार; सुढाळ. 'काइपूर्ण चंद्रमंडळ। पाहुनि सोळाके मुक्ताफळ। अमृताचें हातजौळ। कुणी चरणोदकाची॥' -नरुस्व ३३.

**सौंगण**—स्त्री. स्मृतिचित्रें.

**सौदंड**—पु. शमीवृक्ष; शिता. -मसाप ४५.३. सक्तुफळा.

**सौंदर्यप्रसाधन**—न. वेषभूषा; नटणें; टिळाटाळा.

**सौभाग्यसंन्यास घेणें**—सोवळी होणें. 'वडिलांच्या श्राद्धाचे वेळीं आईनें सौभाग्यसंन्यास घेतला.' -विविध १६.८ १९३६.

**सौरष्ट**—न. सौरस्य पहा. 'ते बहुत करून सौरष्टच होईल असें आहे.' -रा ३.५.

**सौरस**—पु. प्रवेश. 'वनीं सौरसु नाहीं सूर्येकरा। तरि सुरतरू केवि दिसे आंधारा। पुण उजियेड होय गोरा। आंगकांतिचा॥' -नहस्व ८०४.

**सौराष्ट्र**—न. अफाट विस्तारः साम्राज्य. 'रात्रीच्या कर्दीम सौराष्ट्रांत कांहीं हात लांब पोंचला आहे.' -स्पूत २६.

**सौष्टाई**—स्त्री. सुष्ठुता; गोडी; समेटः सलोखा. 'सारांश हे सौष्टाई आपसांत करून योशितेस सांगावें.' -रा १०.११०. [सं सुष्ठु=योग्य; चांगलें]

**स्खलदगी**—स्त्री. तोतरेपणा; अडखळण्याची खोड. 'माधवराव यांचे वाणीस लहानपणापासून पुष्कळ स्खलदगी होती.' -विंचू इ. २३२. [सं. स्खल्]

**स्तंभरोपण**—न विवाहमंडपांत विधिपूर्वक मुहूर्तमेढ रोवतात तो विधि. -लविसो १३. [सं.]

**स्त्रीनाइकी**—स्त्री. स्त्रीसत्ता; बायकी कारभार. 'बालनाइकी, स्त्रीनाइकी, बहुनाइकी जाहली.' -हिंद १८० बालनायकी पहा.

**स्थगित**—वि. कुंठित; दिरंगाईवर पडलेलें; लांबलेलें. पुढें टाकलेलें; लांबणीवर टाकलेलें. 'तो आतांपावेतों स्थगित करण्यांत आला आहे.' -के २५.४.१९३९.

**स्थान**—न. (महानु.) तीन, सात, किंवा पंधरा दिवस वसति.

**स्थानक**—न. ठिकाण; स्थान; ठाणें. 'नभोवाणी स्थानक उभारण्याची अनुज्ञा सरकारपाशीं मागितली.' -के ३०.५. १९३९.

**स्थिति होणें**—समाधि लागणें; लय पावणें. 'मार्तंडा स्थिति झाली ... हा स्थिति तवं देखतु असे:.' -लीच ३. पृ. ६७.

**स्थिरग्रह**—पु. शनि. याची गति फार मंद आहे यामुळें तो स्थिर दिसतो म्हणून. [सं.]

**स्थिरवासर, स्थिरवार**—पु. मंदवार; शनिवार. 'कार्तिक शुद्ध द्वादशीं स्थिरवासरे क्षेत्रिय कुलावंतंस श्रीराजाराम छत्रपति स्वामी याणी वृत्तिपत्र दिल्हे येसे जे.' -पेद ३१.६०. 'ज्येष्ठ बहुल त्रयोदसी स्थिरवासरे वेदमूर्ती गोपालभट बिन रामभट गिजरे वास्तव्य कसबे कऱ्हाड यांनीं वसंतगडाचे मुकामी येऊन विदीत केले की.' -रा २१.८२. [सं.]

**स्थूलघ्राणलंबोष्ठ**—पु. आफ्रिकेंतील काळे निग्रो. -मसाइ २. [सं.]

**स्नान सांगणें**—न. (कों.) भोजनाची वेळ झाली म्हणून निमंत्रितांस स्नानाची सूचना करणें.

**स्पेस**—स्त्री. (मुद्रण.) सूट; दोन शब्दांत अंतर ठेवण्यासाठीं योजावयाचा खिळा.

**स्फुरस**—स्त्री. आवड. 'अंडज खाणीमध्यें राजहंस। त्यास मोतियांचा असे स्फुरस।' -योसं २.७५.

**स्मार्ताग्नि**—पु. विवाहानंतर ज्यामध्यें गृहप्रवेशनीय होम करावयाचा तो अग्नि पुढें कायम ठेऊन त्यावर नित्य होम करण्याचें व्रत; स्मृतिधर्मास अनुसरून पाळावयाचें अग्निव्रत. याच्याविरुद्ध श्रौताग्नि. [सं.]

**स्मृतिशेष होणें**—केवळ आठवण मागें राहणें. 'महात्मे कालवश होऊन स्मृतिशेष होतात.' -स्वीच १.

**स्याळी**—स्त्री. थंडी; शीतकाल. 'स्याळीएचे आंगी टोपरें लेउनि:' -लीच ३. पृ. ६५ [सं. शीतकाल]

**स्वर्णक**—न. पोलादाचा एक प्रकार. -प्रश २२. [सं.]

**स्वप्नरंजन**—न. कल्पनाराज्यांतील आनंद. [सं.]

**स्वभाषालेदु**—वि. स्वभाषेस पारखे; स्वभाषाविन्मुख. 'किर्लोस्कर संगीत मंडळी सध्यां महाराष्ट्रांतून नामशेष होऊन उत्तर हिंदुस्थानांत वर्षानुवर्ष स्वभाषालेदु होऊन ज्या मराठी भाषेनें त्या मंडळीला वैभवाच्या शिखरावर चढविलें तिनेंच त्या आपल्या उन्मत्त पोरीला आपल्या घरांतून काढून लावून सदयतेनें आपल्या बहिणीच्या दारीं म्हणजे हिंदी भाषेच्या द्वारीं लाजिरवाण्या अवस्थेंत राबायला लाविलें आहे!' -गणपतराव जोशी पृ. २१८. [सं. स्वभाषा+हिं. लेदु]

**स्वयंताप**—पु. (महानु.) भीत; स्वदैवकृत ताप. -गस्तो २३४.

**स्वरूप** —न; खरी योग्यता; महत्त्व; थोरपणा. 'हे भट आमचे पुरातन आश्रित यांचें स्वरूप तुम्हीं चित्तांत आणले नाहीं.' -आठइति ९६. [सं.] -क्रिवि. स्वतः; प्रत्यक्ष. 'त्यास स्वामीचे आगमन श्रीकृष्णातीरीं स्वरूपच कालें करून होणार, पुढें दर्शनाचा विचार परस्परें घडावा.' -पेद २४.९२.

**स्वस्ता**—पु. जरदाळूच्या बीतील मगज.

**स्वस्तिवाद**—पु. स्वस्तिवाचन; पुण्याहवाचन. 'मग पाहोनिया सुदिन। स्वस्तिवाद पुण्याहवाचन।' -भारा. बाल ७.२०. [सं. स्वस्ति+वाद]

**स्वाहिंब**—वि. स्वयंभू. 'परिवस्तु ते स्वाहिंब चतुष्ट। अभिन्नत्व असे॥' -योसं ११.१३. 'पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश। त्यांमाजी स्वाहिंब वस्तूचा प्रकाश।' -योसं ११.२३. [सं. स्वयंभू]

**स्वादुपिंड**—पु. जठरांतील एक पाचक रस स्रावक ग्रंथि. -व्याज्ञा ५.१६७. ०**रस**-स्वादुपिंडांतून श्रवणारा पाचक रस. -व्याज्ञा ५.१२९.

**स्वाधीनता**—स्त्री. स्वावलंबन; स्वातंत्र्य. 'गोखले यांची भिस्त शिष्टाई व वकिली यावर तर लजपतराय यांची भिस्त स्वाधीनतेचे उद्योग करण्यावर अधिक.' -सासं २.३५.

**स्वामी**—पु. लिंगायतांतील जंगम. [ सं. ]

**स्वामी-शासन**—न. धन्याची, मालकाची आज्ञा. 'त्यास संस्थानच्या हद्दींतहि राहूं नये असें स्वामिशासन झालें.' -विछ ९७. [ सं. ]

**स्वास्त**—न. मालमत्ता; मिळकत. 'पुणें आदीकरून स्वल्प स्वास्ता स्वतंत्र मागून घेऊन स्वल्प मात्र स्वास्तेचा उद्योग केला.' -दप्तर १.९७. [ सं. स्वत्वः स्व+अस्तित्व ]

**स्वास्तक**—न. स्वतःचें घर; स्थानिक मिळकत. 'आपणास कांहीं स्वास्तक नाहीं, नजर इनायत करून स्वास्तक करून दिधलिया...श्रेय तुम्हास येईल.' -सनदा २०. [ सं स्व+अस्ति ]

**स्वास्तिक**—वि. (व.) स्वस्तिक काढलेली. 'पहिल्यानं आलं न्हाण। चोळी हिरवी स्वास्तिक। मोठं नंदेला कौतुक।' -वलो १४३.

**स्वीकारता**—स्त्री. मान्यता; संमती; कबूली 'साहाय्यार्थ ५०० रुपये देण्याची स्वीकारता दिली होती.' -के १३.३. १९४२. [ सं. स्वी+कृ ]

**स्वेत**—पु. सेतु; पूल. [ सं. सेतु ] ०**बांधणें**-(ल.) सूत्र लावणें; संबंध जोडणें; धागादोरा लावणें. 'यजमानाचे ठाई श्री रघुनाथजीनें स्वेत बांधला आहे.' -पेद ३.१०४. 'राजश्री स्वामीनी तो वरच्यावर पत्रांचा स्वेत लावला आहे.' -पेद ३.१४७.

---

# ह

**हक**—पु सत्य. -मुधो. [ अर. ]

**हकशनासी**—स्त्री. सत्यज्ञातृत्व. -मुधो. [ अर. ]

**हकाहक**—पु. सत्यासत्य.

**हकराई**—वि. हक्कदार; हक्क असलेले 'तुम्हास जाहागीर व मनसब व महाल व वतन हकराई लोकासहित दिल्ही.' -पेद १५ ८६.

**हकाटका**—पुस्त्री कबजा; ताबा; आटोका; तावड. हक्काटक्का पहा. **हकेटकेंत येणें**-तावडींत सांपडणें; आटोक्यांत येणें; टप्प्यांत; कक्षेत, अवसानांत येणें. 'जर तो आपल्या हकेटकेंत असला तर पुढें जाऊन बुडवावा.' -पेद १३.३०.

**हक्कपूर्ति**—स्त्री. हक्काची भरपाई. 'विमेदारास मृत्यु आल्यास विम्याची हक्कपूर्ति नेहमीप्रमाणें करण्यांत येईल.' -के १७.३.१९४२.

**हंग**—उद्गा. हो; अरे. 'हंग अस्सं, आलं लक्ष्यांत.' -खदे

**हगवणी**—स्त्री. (ल.) त्रेधा; तिरपिट; हालअपेष्टा; हबेलंडी. 'लस्करचा मामला तरी जैसे विशालगडी पातशहाची हगवणी जाली तैसा विचार होईल.' -पुद १.१०५.

**हजमाई**—स्त्री. पचनशक्ति; पाचकशक्ति. [ हजम ]

**हजूम**—पु. समूह; गर्दी. -मुधो. [ अर. ]

**हजूमा**—पु. संकट; घाला; गर्दी. 'इतक्यावर मसलत कसी जाईल पहावें. हा मोठा हजुमा आहे.' -रा ७. खलप १.३०. [ अर. हजूम=हल्ला, गाला; गर्दी ]

**हज्रत**—पु. महाराज. -मुधो. [ अर. ]

**हझार**—वि. हजार पहा.

**हडप**—वि. गडप; नाहीसें; गट्ट. 'कांहीं खादी चोरीला गेल्याचे किंवा हडप झाल्याचे रिपोर्ट आले होते.' -विविध २७.६ ३७.

**हडीज्वर, हडीजार**—पु. अंगांत मुरलेला ताप; जीर्ण ज्वर. हाडीज्वर पहा.

**हंडीवोरखडा**—पु. (कों.) सागरगोट्यांचा एक खेळ.

**हतशेष**—वि. मृतांहून जे बचावलेले; युद्धांत जे न मरतां वांचले ते. 'हें वर्तमान हतशेषांचे सांगण्यावरूनहि व अली-अदिलशाहानी लिहिल्यावरूनहि अवरंगजेबास कळून.' -तंजाशिला ४१.

**हताहत**—वि पराभूत. 'वृषपर्वा दैत्यनाथ। युद्धीं नाला हताहत।' -भारा. बाल. १.८७.

**हतास्थ**—वि. आस्था नसलेला; निरुत्साही; निष्काळजी. 'हतास्थ निर्दय आणि दुराग्रही दुष्टचित्त नव्हत असे परीक्षून ठेवावे.' -बावडे दप्तर १.९७.

**हत्ता**- शअ. पर्यंत. -मुधो. [ अर. ]

**हत्ती-हत्तीच्या तोंडीं लांकूड देणें**—हत्ती हा जरी पाला वगैरे खातो तरी त्याच्या तोंडांत लांकूड दिल्यास त्यास तें खतां येणार नाहीं; म्हणून बहुधा तो तें देणाऱ्याच्याच डोक्यांत घातल्याशिवाय राहणार नाहीं यावरून आपण होऊन जबरदस्ताच्या कचाट्यांत सांपडून आपलें नुकसान करून घेणें. 'धाकटे बाईनें खेकटे आरंभिलें आहे. हातीचे तोंडीं लांकूड देऊन काम बिघडले.' -पेद ३९.१०५.

**हत्तीपगी**—न. पोलादाचा प्रकार. -प्रश २४.

**हत्तीहत्ती**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.२५८.

**हत्यारमारते**—वि. पु अने. लढाऊ; योद्धे; सैनिक; सैन्यांतील लोक. 'हत्यारमारते लोक कस्टी करणे हे उचित नव्हे.' -रा २०.१८०. [ हत्यार+मारणें ]

**हनुमंतासन**—न. ( मल्लखांब. , डाव्या पायाच्या लवणींत मल्लखांबाचें बोंड धरून उजवा पाय खालीं दाबून धरावा व शरीर बाजूस दूर घेऊन हात जोडून उभे रहावें.' -व्याज्ञा ३.२४६.

**हनुमंती**—स्त्री (कुस्ती.) कुस्तीचा एक प्रकार. यांत अंगास अंग भिडवून प्रतिस्पर्ध्यास चीत करण्याचा प्रयत्न करतात. हीस भीमसेनी किंवा लढंत असेंहि म्हणतात.

**हनुमानध्वज**—पु. (मल्लखांब ) मल्लखांबाच्या बोंडाच्या खांचेमागें उजवा चवडा लावून डावा पाय खालीं लांब करून मल्लखांबास लावून शरीर लांब करून तोल धरावा व आदब करावी.' -व्याज्ञा ३.२४६.

**हनुमानपकड**—स्त्री. (मल्लखांब ) मल्लखांबाच्या बोंडाची खांच उजव्या पायाच्या लवणींत धरून डाव्या पायाचा पंजा लांब करून मल्लखांबास टेकून धरावा. नंतर शरीराचा तोल दूर धरून आदब करावी. -व्याज्ञा ३ २४६.

**हनुमानवंशी**—पु. मारवाड प्रांतांतील डोंब. -मसाप ६४.३५४.

**हफ्तहजारी**—पु. सात हजारी. -मुधो. [अर.]

**हफ्दहुम**—वि सतरावा. -मुधो. [अर.]

**हबक**—पु. जस्ताचें भस्म किंवा लाही; एक पांढरा रंग. -ज्ञाको ( स ) ९१.३१०.

**हंबवणें**—सक्रि. चालू करणें; ढकलणें; ढकलण्याची सूचना करणें ( विशेषतः गलबत लोटतांना किंवा ओढताना ).

**हम**—शअ. सुद्धां. -मुधो. [अर.]

**हमगी**—वि. सर्व मुधो. [अर.]

**हमदम**—पु. सोबती. -मुधो. [अर.]

**हमवार**—वि. शांत; रहित; थंड. 'येणें करून मातुश्रीचा मनसबा हमवार जालासा दिसतो.' -पेद ६.१२७. 'मी मध्यस्थांसी बोलोन यांची मर्जी हमवार केली.' -रा ७.२२७. 'परंतु काही गडकरियास हमवार केले पाहिजेत.' -पेद ६.१४१. [फा. हम+वार]

**हमदस्त**—वि भिडलेले; हातोहात मिळालेले. 'तो पहिलवान निरुपाय होऊन मैदानांत आला आणि युसफ यांशीं हमदस्त झाला.' -भारतवर्ष विबाइ ९. [हम+दस्त=हात]

**हमदर**—क्रिवि. सतत; हरदम. 'सांप्रत आपणाकडूनहि मामासी हे गोष्ट परिस्फुट जाहाली तेहि हमदर या कामावर आहेत.' -पेद ५.२९.

**हमरारिकाब**—क्रिवि. रिकाबीबरोबर; संगतीनें; अगदीं जवळ; सन्निध. 'अलीजाबहादूर यांनीं कुच केलें तर त्यांचे हमरारिकाब असावें; त्यांज वेगळें एकट्यानेंच कोठें जाऊं नये.' -रा ५.११२

**हमेपणें**—क्रिवि. जिम्मेदारीनें; खात्रीनें. 'याची पुढील ही दुरुस्ती आपले हातें हमेपणें व्हावी. यांत तीन सरकारासही उपयोग व चांगलें.' -रा ७.८१.

**हमसाय**—विक्रिवि. शेजारी. 'दौलताबादेमध्यें मोमीन पुराचे हमसाये दरगाबार आमचा होता.'

**हम्राह**—पु सोबती; बरोबर. -मुधो. [अर.]

**हम्राही**—क्रिवि. नेहमीं. -मुधो. [ अर ]

**हम्वारह**—क्रिवि नेहमीं. -मधो. [अर. ]

**हयटाक**—न. गाडीचें जूं व दांडी यांची बांधणी.

**हयास**—जिकीरीस; टेकीस. 'इंग्रजासी गांठ, हजार पंधराशे बरकंदाज, दोन हजार राऊत याप्रमाणें असल्याविना गनीम हयास येता दिसत नाही.' -पेद ३५.२१. 'गंगाजी नाईक लागामागाचे लोकांस देणें कबूल होते ते देताना हयास आला.' -साब २९. [अर. हया=विनय ]

**हय्यझ**—स्त्री. मर्यादा. -मुधो. [ अर. ]

**हरकसा-हरकैसे**—क्रिवि कसेंहिकरून; हरतऱ्हेनें; कोणत्याहि प्रकारें करून. 'हरकैसे उणे करावे.' -पेद १०.७२. (२). 'हरकसा आपला उलगडा करून यावयाच्या धावतांत आहे.' -पेद २५.७५. [ हर+कसा ]

**हरकूल**—वि. साग्र; समग्र; तपशीलवार; संपूर्ण. 'तेथील हकीकत हरकूल हिरोजी चौधरी सेवेमी निवेदन करतील त्यावरून कळेल.' -पेद ३०.१६५. [ हर+कुल=सर्व ]

**हरडभरड**—स्त्री. ( महानु. ) खटपट; उठाठेव. 'हे हरडभरड दीस चारी :' -उच १०.

**हरणटप्पा**—पु. हरणाची उडी; हरणाची उडया मारीत जाण्याची तऱ्हा. 'सुशिक्षितांची बेकारी येतांना नकळत मुंगीच्या पावलांनीं येत असली तरी ती हरणटप्प्यांनीं पळून जाईल असे वाटत नाहीं.' -प्राविण्य जून १९२६.

**हरणफांस**—पु. ( कुस्ती ) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या डाव्या पटांत आपला उजवा पट घालून त्याची अढी बांधावी व लगेच त्याच्या मानेवर डावा पट टाकून उजवीकडे झोला घ्यावा.

**हरतुल-हरतूळ**—न. (गो.) पुण्यतिथि; स्मृतिदिन; नाथसंप्रदायांतील श्राद्ध; जिवसूद. -ब्राह्मण मासिक १.५७.

**हरनळ**—न. हरणाळें पहा. हरणाचें कातडें.

**हरपल-फळ**—वि. अचपळ; चपळ. 'गाई निघाल्या मोठणीं। चाले गाय की मागोनी। तानी हरफळ माही। धरा पळाली मैदानी॥' -वलो ८०. 'बाईचें मूल मोठें हरपळ आहे.'

**हरभात**—वि. हरहुन्नरी; चौरस; पडेल तें काम करणारा. 'मोर्चेबंदीचे कामास हरभात पाहिजे. लाकडे वहावी, माती खणावी, बोझी वहावी तेव्हां मोर्चा होतो.' -पेद १६.८१. [ हर+भात ]

**हरम**—वि. राख; राखेच्या पोटची; अनौरस. 'सैफन-मुल्क यांची दुसरी कन्या हरम म्हणजे राखीचे पोटची ते असदअलीखानाचे पुत्रास नेम धरून' -रा ७.१४९. [ अर. हरम=पवित्र, निषिद्ध -स्त्री. रखेली ]

**हरशामृष**—पु. हर्षामर्ष पहा. 'त्या अवघ्यास मिळवोन घेऊन मागती एकदां हरशामृष करतील.' -पेद १.८६. [ सं. हर्षामर्ष ]

**हराठी जमीन**—स्त्री. हाडकी याचा अपभ्रंश. -के १८. ८.१९३६.

**हराडेरा**—पु. विवाहानंतर वरात घरीं आल्यावर लक्ष्मीपूजन प्रसंगीं करावयाचा एक विधि. एका डेऱ्यांत एक हार ठेवलेला असतो तो वधूच्या गळयांत घालतात. 'हऱ्या-डेऱ्या वेळचें दूध या वेळीं वर थोडें दूध पिऊन उरलेले वधूस देतो.' -पक्रोघे २१.

**हरावली**—स्त्री. हरवल; हरोळ; आघाडी; बिनी. 'अबुल-कासीम हरावलीच्या नात्याने तळापासून पुढे आला असतां शत्रूची एक टोळी प्रकट झाली व त्यावर घसरली.' -ऐपो २.७. [ क. हरावुल ]

**हरिः ओम्**—उद्गा. (कोणत्य हि विधीच्या, उपासनेच्या किंवा पोथीच्या आरंभीं हें नमन असतें याकरून) आरंभ; सुरुवात. 'आफ्रिकेंतील किंवा मध्य पूर्वेतील नव्या मोठया युद्धाचें 'हरिःओम्' म्हणण्याचा मान जर्मन गटच घेईल असें वाटूं लागतें आहे' -के १८.११.१९४१. 'पुनश्च हरिः ओम्.'

**हरिकारी**—स्त्री. हाराकिरी; आत्महत्या. 'एकमेकांना हरिकारी करावी असे आव्हान देण्यांत आलें.' -के २६.१. १९३७. [ जपानी ]

**हरिंदा**—पु. तगादा; नेट; लकडा; सपाटा. 'वरचेवर पत्राचा हरिंदा लागला आहे जे सत्वर येणें.' -पेद ७.१६९. [ सं. ह-हार ]

**हरिभक्त**—पु. (सांकेतिक) मराठा; हिंदु. 'लूट, हत्ती तीस, घोडीं, उंटे, तोफा सर्व हरिभक्तांहीं घेतलीं.' -रा ३.३८४. 'वजीर फरुकाबादेस आले. बरोबरी हरिभक्त आहेत. पठाणहि आहेत. रोहिलेहि आहेत.' -रा ३.०७१. [ सं. हरि+भक्त ]

**हरीरा**—पु. औषधीयुक्त गोड सांजा; गाय, म्हैस वगैरेस व्यायल्यानंतर द्यावयाचा खुराक.

**हर्ताळ पडणें**—बाजार बंद होणें. 'हर्ताळ पडली आज आहे. भाजी मात्र मिळते.' -ख ७६२३. [ हर+ताळ ]

**हर्षध्वनि**—पु. आनंदाचा जयजयकार; आनंदप्रदर्शक घोष. 'लोकांनीं सरकारचा हुकम वाचून किती ठिकाणीं आनंदप्रदर्शक चिन्हें उभारली व हर्षध्वनि केला.' -राणी. पु. [ सं. ]

**हलपति**—पु. सुरत जिल्ह्यांतील एक गरीब शेतकरी जात. यांस दुबळे म्हणतात. [ सं. हल=नांगर+पति ]

**हलबंदी**—स्त्री. गायकवाडींतील नांगरावरील कर.

**हलबी**—स्त्री. एक तलवारीचा प्रकार. -प्रश ४३. [ हलब=अलेपो शहर ]

**हलवा**—पु सरंग्यासारखा पण जरा मोठा व काळसर रंगाचा मासा.

**हलसर**—वि. हलका; ढिला. 'तुम्हांस आमचा अमल हलसर वाटतो.' -पेद ३१.११६.

**हलहला**—पु. गोंगाट; हलकल्लोळ; आवाज. 'होय सभेंत हलहला स्तन कृष्णेसी प्रशंसती राजे.' -द्रौवह.

**हलामल**—स्त्री. टंगळमंगळ. 'हलामला दिवस भला। धनी मेला तर बोडा गेला।'

**हलासनें**—न. जमिनीवर उताणे निजून हात पसरून ठेवावे व पाय वर करून डोक्याच्या पाठीमागें नेऊन जमि-नीस लावावे.' -व्याज्ञा ४ ५०४. [ हल=नांगर+आसन ]

**हला फोड**—स्त्री. एक लाठीचा खेळ. एक इसमावर अनेक इसम हल्ला करतात व तो त्यांचा मार चुकवून निघून जातो.

**हल्लीसक नृत्य**—न. रासक्रीडेचा एक प्रकार. यांत समान स्त्रीपुरुषांची मालिका असते; किंवा एक पुरुष व अनेक स्त्रिया असतात. 'गोपकन्याबरोबर हल्लीसक नृत्य करण्याकरितां इतर गोपांसह श्रीकृष्ण गेले.' -बाळ चरित ५.

**हलेचकर**—स्त्री. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.३५५.

**हव**—स्त्री. माहिती; शोध; तपास. 'धोंडोपंत तेथें जो गेला तो जव्हारकरांच्या त्रिंबकजी प्रभु गंजाडकर यानें हव

आणली म्हणूनच गेला होता.' -वसमो. 'बाल्होजी करला व गोविंद ब्राह्मण हे पाठऊन मार्ग हव खाडीची वाट सर्व पाहाविली.' -पेद १६.४.

**हवपाळत**—स्त्री. माग; थांग; चौकशी; मागमूस; पत्ता; शोध. 'सुलतानजी जाधव याची हवपालत राखून स्वारी पाठवून सुलतानजी जाधव यासी दस्त करून आणला.' -पेद २६.१२८. [ हव+पाळत ]

**हवशी प्रेक्षक**—पु. क्षणभर करमणूक व्हावी या उद्देशानें आलेले प्रेक्षक.' -के १९.३.१९३७. [ हौस ]

**हवसा**—पु. धाक; भीति; भय. 'तमाम मुलकाने हवसा खादला आहे.' -पेद १७.१०९.

**हवाखोरी**—स्त्री. हवा खाणें; सहल करणें. 'हवाखोरी, करमणूक व सहल होईल तितकी अधिक असा विलायतेंतील लोकांचा कार्यक्रम असतो.' -गतगो ६८२.

**हवाबाज**—पु. वैमानिक.

**हवामानशास्त्र**—न. हवामानविषयक फेरफार व परिणाम यांची कारणमीमांसा दाखविणारें शास्त्र. -यश जाने ३७. [ फा. हवा+सं. मान+शास्त्र ]

**हवार**—वि. सपाट. 'जागा हवार करणें.' -पेम.

**हवारी**—स्त्री. सपाटी.

**हवी**—स्त्री. माहिती; बातमी. 'आपणापासींहि हे स्थलचे हवी ज्यांनी पाहिले असेल ते विदीत करीतच असतील.' -पेद ३.१८३. 'येथून गांवची व हबशाची हवी न्यावयास्तव तुम्हास येथें ठेवलें आहे.' -पेद ३३.४६७. [ फा. ]

**हवी लागे-हवे लागे**—पु. अव. माहिती व मार्ग मान्याच्या जागा, वगैरे. 'त्या उपरी आज्ञाप्रमाण पुण्यामध्यें येऊन मास आठ लोकासहवर्तमान हवे लागे सरदार सर्व घेऊन राहिलो.' -पेद १६.४. 'स्वामीहि ज्या ज्या निशा हवी लागेच्या मार्गाच्या करविल्या' -पेद १८.४. 'रविवारी दोन प्रहरा वाघाची हवी आली.' -पेद ८.३०.

**हवेदार**—वि. माहीतगार. 'ते मावळे लोक सनचे हवेदार, त्यांजला पुढें करून.' -शिदि १६५.

**हव्या**—स्त्री. अव. आश्रयाच्या जागा. 'रानांत व डोंगरांत हव्या आहेत.'

**हव्ये लागे**—पु. हवे लागे पहा. हव पहा. 'तुमचे हव्ये लागे असतील ते हातीं धरून वसईचा व ठाण्याचे उताराचा लाग ठीक करणें ?' -साब आज्ञापत्रें.

**हश्तन्द**—क्रि. आहेत. -मुधो. [ अर. ]



**हश्ताद**—वि. ऐंशी. -मुधो. [ अर. ]

**हश्तुम**—वि. आठवा. -मुधो. [ अर. ]

**हंसउडी**—स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाकडे पाठ टेकून उभे राहून उंच उडी मारून बोंडाजवळ गोफण बांधून पाय उंच नेऊन पलटी घेऊन मारावयाची उडी. -व्याज्ञा ३.८०२.

**हंसबुद्धि**—स्त्री. चांगलेंवाईट निवडण्याची शक्ति; तारतम्य; सदसद्विवेक. 'वासुदेवाची हंसबुद्धि आहे.' -ज्ञाप्र १७.८.१९३८.

**हसन**—पु. एक वृक्ष; उपीतसारक. -मसाप ४५.२.

**हंसासन**—न. (मल्लखांब.) बगली करून बोंडावर जाऊन दोन्ही हातांचीं कोंपरें बेंबीं खालीं लावून केलेलें आसन. -व्याज्ञा ३.२३०.

**हसित**—न. मुख, नेत्र व गाल हे ज्यांत किंचित् विकसित होऊन कांहींसे दांत दिसतात तें हांसणें. -मरं २३२. [ सं. ] **अतिहसित**-न. मोठमोठयानें मिठया मारून टाळी देऊन हांसणें. -मरं २३२. **अपहसित**-न. शब्द स्पष्ट येणें, मान हलणें व डोळ्यांत अश्रु येणें -मरं २३२. **उपहसित**-न. नाक फुगणें, कुटिल दृष्टि, स्पष्ट शब्द व मान हलणें यांहीं युक्त तें. -मरं २३२. **विहसित**-न. मधुर शब्द, डोळे झांकणें व हसितापेक्षां अधिक स्पष्ट हास्य. -मरं २३२.

**हस्तजान्वासन**—न. (मल्लखांब.) बोंडावर मांडी घालून गुडघ्यावर हात ठेवून बसणें. -व्याज्ञा ३.२३४.

**हस्तनाल**—स्त्री. हत्तीच्या पाठीवरील तोफ.

**हस्तव्यापार**—पु. मारामारी; झोंबाझोंबी. 'येकमेकांचे अंगावर चालोन जाऊन हस्तव्यापार जाला.' -पेद ६.९८. [ सं. ]

**हस्तक्षेप**—पु. लुडबुड; ढवळाढवळ. 'पोलीस चौकशींत बराच हस्तक्षेप केला जात आहे.' [ सं. हस्त+क्षेप ]

**हस्तावलेप**—पु. ज्यांत चातुर्य नाहीं असे लेखणीचे फटकारे. [ सं. हस्त+अवलेप ]

**हस्तिप**—पु. महात. 'दे आळवूनि जरि हस्तिप बाप भाई.' -वामन स्फुट श्लोक. [ सं. ]

**हस्बउजजमन**—क्रिवि. तपशीलाप्रमाणें. -मुधो. [ अर. ]

**हळद कुटणें**—न. विवाहसमारंभास लागणारें साहित्य तयार करण्यास शुभमुहूर्तावर हळद कुटण्यापासून आरंभ करणें. -लविसो १२.

**हळद लागणें**—पहा. १ (ल.) नवरदेवाप्रमाणें अवर्दी घाईत गडबडीत असणें; फुरसत नसणें. २ (गो.) माघा होणें; आग लागणें. 'तुझ्या कामाला हळद लागो.' -सह्यापा ३१३.

**हळसाणे**—पु.अव. (गो.) हळसांदे पहा अळसुंदे; मोठया आकाराची चवळीची जात. अळसंदा पहा.

**हळाकळा**—स्त्री.(व.)शाप; तळतळाट; शिव्या. 'गरीब प्रजेच्या हळाकळा राजानें केव्हांहि घेऊं नये.'

**हळी देणें**—अक्रि. हरळी देणें; हांक मारणें; ओरडणें. 'एक घोडें मोकळें पाहून तें त्यानें उडविलें इतक्यांत मालकानें पाहून एकदम हळी दिली.' -भूप्र३६. [आरोळी, हाळी]

**हाक होणें**—हक होणें पहा. मरणें. 'मरीचे आजारानें हाक जाहले.' -गोराघ १५.

**हागरा**—पु. नक्षा; जोम; उद्दामपणा; दर्प; गर्व. 'फारसे गर्वे करून आले होते. आपले पुण्य प्रतापें त्यांचा हागरा मोडला.' -पेद १२.४५.

**हाचवांगेपणा**—पु. बढाई; उच्छृंखलपणा. 'आमचे विसी आपल्यापासी दर्शऊन सदरे घातली आहेत की उग्याच हाचवांगेपणाच्या गोस्टी, लटकिया, येकहि राजकारण खरें नाहीं ऐसे बोलतात.' -पेद २.२५. [उच्च+अंग]

**हाजत**—स्त्री. जरूरी; गरज. -मुधो. [अर.]

**हाजत अल यौम**—हा दिवस.

**हाटकेवयाचा**—वि. (महानु.) बाजारांतून आणलेला. 'वामनभटी हाटकेवयाचा वाटुगा मस्तकी घेतला.' [हाट=बाजार+केवा=सामान]

**हाटली**—स्त्री. सक्त मजूरीच्या कैद्यांना ठेवण्याची जागा.

**हाटाऊ**—वि.बाजारी; भाडोत्री. 'हाटाऊ गुरु भ(झ)टाऊ चेला। ऐशांचा बहुत पर्वकाळ आला।' -योसं १८.१८४. [हाट=बाजार]

**हाटाडी**—वि. कठिण. 'कैसी साहानसुद्ध पौळि चोखडी। वोप पातां दृष्टि खेळे निसरबोडी। मन उचलौनि पडे आगडी। हाटाडी तें दुर्ग कवणां टाकें॥' -नरुस्व ८६६.

**हाटी**—स्त्री. हट्टी पहा. भिल्ल रामोशी वगैरेंची गांवाबाहेर असलेली वस्ती, झोंपड्या, घरें वगैरे. 'गुजरदरी व कालदरी येथे दाहाबारा हाव्या भिलाच्या नेहमी राहून सरकारी महालाचे गावास व मोगलाईतील गावास मनस्वी उपद्रव करून गुराच्या वोळत्या केल्या.' -पेद ४२.४४. [हट्टी]

**हाठोट पठोट**—क्रिवि. कसाबसा; कसातरी. 'सरदेशमुखीचा आमल तीस वरशे चालला. दहावीस वरशें बराच चालला. दहा वर्षे हाठोट पठोट चाले.' -बोधले बखर. -मसाप ३.३५९.

**हाडगी**—स्त्री. तिफणांची पाभर. -चित्रकृषि २.७.

**हाडभाऊ**—पु. जवळचा नातेवाईक; भाऊबंद. 'अवधियानी साक्ष दिल्ही की कानभटास वृत्तीसी समध नाही अगर हा बायको मजकुराचा हाडभाऊ नव्हे.' -पेद ३१.३६. [म. हाड+भाऊ]

**हाडमांदें**—न. (ठाकरी.) हाडांतील मांदें; मज्जा; हाडांतील मांसरस.

**हाड्याउत्राण**—वि. (खा. अहि.) आळशी; कामचुकार; उपद्व्यापी. [हाडया=कुत्रा; उत्राण—उत्तरायण=संक्रांत]

**हात**—स्त्री. संवय; खोड. 'तरुणपणाची ऐट आणण्याची त्यांना विलक्षण हात होती.' -मशा. नोव्हें. १९३५.

**हात**—पु. दांडा. 'रंगीबेरंगी टांकाचे हात व कागद अशी खरेदी केली.' -गुजगो ११९.

**हात ओढ**—पु एक स्काउट मुलांचा खेळ. -व्याज्ञा १.९०४. [हात+ओढणें]

**हात ओला करणें**—लांच देणें.

**हातकट्टी**—स्त्री. पालथ्या हाताच्या पंजावर केलेला वार. -मवि ९.११.

**हात करणें-मारणें**—अक्रि. लाठी खेळांत उजव्या पवित्र्यावर केलेला मार.

**हातकलम**—पु. १ शत्रूच्या सशस्त्र हातावर केलेला मार. २ उजव्या डाव्या दंडावर केलेला वार. -मवि ९.११. [हात+अरकलम]

**हातखोडा**—पु. (मल्लखांब) हातांनीं मल्लखांबास खोडा बांधून घ्यावयाची उडी. -व्याज्ञा ३.५२.

**हातजौळ**—पु. समूह. 'काई पूर्ण चंद्रमंडळ। पाहुनि सोळाके मुक्ताफळ। कीं अमृताचें हातजौळ। कुपी चरणोदकाची॥' -नरुस्व ३३. [सं. हस्त+जाल]

**हातझुलाई** स्त्री. (माळवी) एक गाडीघोडयावरील कर. 'त्यानें या वाटेनें ज्या गाडया, घोडीं जात त्यांपासून कर घ्यावा या कराचें नांव 'हातझुलाई.' -देवी श्रीअहल्याबाई २९६.

**हातपराजी**—स्त्री. हातघाई; सैन्याची अंग भिडून लढाई; चकमक. '३१ मार्च रोजीं मोठी चकमक झाली. हातपराजी झाली' -के १३.१२.१९३८.

**हातमुंडा**—वि. (व.) भरतकाम केलेली. 'सकाळच्या पाहरीं। सख्यानं का केली घाई। हातमुंडा शाल नवी। भर जरी लेयि डोई।' -वलो २३. (हातमुंडा म्हणजे पाऊण हाताची असाहि अर्थ होईल.) [सं. हस्त+मंडन]

**हातमुलगा**—पु. एक मुलांचा खेळ. -व्याज्ञा १ ३२४.

**हातरिती**—वि. (महानु.) बांगडया विरहित हातांची; विधवा. 'सावित्री हातरिती झाली.' -ऋच. [हात+रिक्त-रिता]

**हातरी**—स्त्री. हत्तीण. 'हाथी पांच व हातऱ्या पांच पाहिल्या.' -रा ७.२१७.

**हातलोंबी**—स्त्री. हात धरून खेळण्याचा एक खेळ. 'नवरत्नांचें विरढलें बीं। तैसीं नानाविधें कमळें लांबीं। वरि खेळत हातलोंबी। मधुकर मधुकरिसीं॥' -नरुस्व ८२९. [ सं. हात+लोंबणें ]

**हातवसी**—स्त्री. साहाय्य; मदत; हात देणें. 'अनुसहनि असती परि हातवसी.' -गूढप्र.

**हातवसी**—स्त्री. १ हातघाई; हात टाकणें. हातवशी पहा. 'राजा मोकली शस्त्रांसी तीं लागों न शकती त्यासी। मग हातवसी निर्वाण।' -भारा. बाल १६.१२५. २ वि. हस्तगत; हातांतील; हातीं असलेलें. 'पूर्वी मर्दिलें चामुंडांसी। तें चामुंडास्त्र हातवसी।' -भारा. बाल. १७.४३.

**हाता**—पु. दंड काढण्याच्या वेळीं हात ठेवण्याचा दगड. हत्ता पहा [ हात ]

**हातातोडा**—स्त्री. लाजाळू; खदिरा; गंडकारी; नमस्कारी; एक वनस्पति. -मसाप ४५४.

**हाती**—क्रि. आहेत 'फ्रिंगी यांच्या देशीं हाती पुराणें.' -खिपु १.१.१४०. [ असती याचें जुनें अपभ्रष्ट स्वरूप; आहे ती ]

**हातोळा**—पु. ( खा. ) पाणिग्रहण; विवाहांत लग्नघटिका भरल्यानंतर भट टाळी देतो त्यावेळीं वधूचे हात वरानें धरावयाचा विधि. वधूपित्यानें कन्यादान केल्यावर हा हातोळा सुटतो. -संशोधन. -ऐलेच २४९. [ हात ]

**हानोज**—क्रिवि. अद्यापि; अजून. 'हानोज आं शाहामतपन्हाकडील अमलदार पा। मजकुरांत दखल देत नाही.' -रा १०.२३८. [ फा. हनोज=अद्यापि ]

**हामसर**—त्रि. हमसर पहा. ग्रामस्थ; स्थलचा; कायमचा. 'परंतु सैद हासनखान खानदान हामसरचा जमीदारहि आहे त्यास महमदशहाने वाढऊं लागला.' -पेद १०.३. [ फा. ]

**हायेश**—स्त्री. काळजी; फिकीर; चौकशी. 'परंतु कोणी नालीस आमची करावयास अंतर करणार नाही याची हायेश करणार खाविंद धणी समर्थ आहेत.' -पेद २४.१८५.

**हार**—स्त्री. अखेर; शेवट. 'पेलवानीस व युक्तीस एकंदर न चुकतां हारीस नेटबाजी बोलीचालीची करून नडो न देणें.' -रा ६ ८८.

**हारडा**—पु. साखरेची गांठी; साखरेच्या पदकाची माळ. [ सं. हार ]

**हालकरी**—पु. हालकारा, हरकारा पहा. जासूद; निरोप्या. मुद्दाम हालकरी याजबरोबर पाठविले.' -शामब भारतवर्ष ५८. [ फा. हर्कारा ]

**हालखुद**—पु. ताबा. -क्रिवि. जागच्या जागीं; ठीक; स्थानावर.

**हालठिका**—वि खराखोटा; सत्य-असत्य. 'हलूरास त्यास घेऊन तुम्ही या तेथें येतो आणि, हालठिका म्हणोन सांगतो.' -पेद ४०.१०८.

**हालमाल**—पु. वस्तुस्थिति; परिस्थिति. 'राहिले परगणे येथील जमीदार बोलावून हालमाल पाहून चुकोत्या केला.' -पेद २७.३. [ फा. हाल+माल ]

**हालीवाली**—स्त्री. थाप; वृथावचन; आज उद्या करणें. 'नबाबाची परवानगी तुम्ही राजाजी ब ोन ठरवावे ऐशी आली असतां हालीवाल्या देतात याचे कारण काय?' -रा ५. २२३.

**हालोहाल**—क्रिवि. तात्काल; ताबडतोब; आतांच्या आतां; क्षणांत. 'हालोहाल फसवतें। तुम्हाला माझ्या पायां पडायला लावतें' -चित्रवंचना ९८. [ फा. हाल=वर्तमान ]

**हांव घालणें**—धापा टाकणें. 'हांव घालीत उभा राहिला.' -मसाप ५.१२०.

**हावसा**—पु. हाय; भीति; धाक. 'रयतेनें हावसा खादला. तमाम कमाविसदार उठोन लाविले.' -पेद १७. १०९.

**हावळें**—न. हळवें पहा. लवकर पिकणारी भाताची जात; गरवें नसलेलें धान्य. -चित्रकृषि २.७.

**हाशिन्नणें**—अक्रि. हंसणें. 'ऐकूनि उद्धवाचा प्रश्न। हाशिन्नला मधुसूदन।' -एभा. [ सं. हास्य ]

**हासभास**—पु. सराव; अभ्यास. 'या घोड्याचा हासभास मला नाहीं. आपलेच घोडीवर बसोन येतो.' -भदह २.२६. 'आतां या घोड्याचा हासभास नाहीं मी बसत नाहीं.' -पेद ४१.१८९.

**हासिल**—वि. मिळणारा. -मुधो. [ अर. ]

**हासील करणें**—साध्य करणें; सिद्ध करणें; घडवून आणणें. 'या उपर आम्ही ते भेटून आपली काबू लवकरच हासील करू.' -पेद ५.३५. [ अर. ]

**हाळिसपट्टी**—स्त्री. हाळिज-स पहा. इसाड. -चित्रकृषि २.५.

**हिंकळणें**—अक्रि. डचमळणें; हालणें. 'झुंबराचे लोलक हिंकळून वाजले.' -नगो.

**हिंगणबेट**—न. एक मुलींचा खेळ. -व्याज्ञा १.३८६

**हिजडणें**—अक्रि. ( व. ) हिडिसफिडिस करणें; रागावणें. 'एवढा हिजडतोस का माझ्यावर'

**हिजरत, हिजरात**—स्त्री. पलायन; अनिष्ट परिस्थितींतून व स्थलाहून अनुकूल परिस्थितीकडे जाणें; देशत्याग. -के २०.५.१९३९. [ अर. ]

**हिज्री**—स्त्री. हिजरी. एक कालगणना. महंमद मक्केहून मदीनेस पळून गेला त्या वर्षापासून सुरुवात. -मुधो. [ अर. ]

**हितभुक**—पु. शरीरास हितकर असें सात्त्विक अन्न खाणारा. [ सं. ]

**हितमित**—( व. ) स्नेहसंबंध; पथ्यकर गोष्ट; हितकारक स्थिति. 'हितमित दोन्ही राहून हुजूर सवाईचा बोल उपर होता.' -पेद १४.३१. [ सं हित+मित ]

**हिंदको**—स्त्री. पश्चिम पंजाबी भाषा. [ हिंद ]

**हिंदवी**—स्त्री. प्राकृतभाषा. [ हिंद ]

**हिंदवीण**—स्त्री. हिंदु स्त्री; हिंदुधर्मीय स्त्री. 'आतां तरी माझा मूल, मी यवन होत्साता हिंदवीण जालें.' -शामब भारतवर्ष १२.

**हिदाहिदा**—वि. खिळखिळा; डळमळित; विस्कळित. 'पहिले रचले होते (गडग) मोहडियाने ते आम्हीहि गोल्यानें हिदहिदे केले आहे.' -पेद ३३.१७६. 'यापुढे किला हिदहिदा होऊन किलियांतील घरें व सदर देखील मोडिलीं.' -पेद ३३.१९०. [ध्व.]

**हिदायद**—स्त्री बक्षिसी; सूचना. -मुधो. [ अर. ]

**हिंदुकी**—स्त्री. हिंदुत्व; हिंदु संस्कृति. 'वस्तुतः विचारमतें ही पाहतां हिंदुकीची गोष्ट खरीच; या कारणें सदरहूप्रमाणें चालविणें उचित आहे.' -सनदा १६३. [ हिंदु ]

**हिबुक**—न. ( फज्यो ) चतुर्थस्थान; मातृस्थान. [ हिब्रू; खाल्डी ]

**हिमथंडी**—स्त्री. पाणी गोठून बर्फ होण्याइतकी थंडी. [ सं. म. ]

**हिमटोरा**—वि. हिमटा; कंजूष. [ हिमटा ]

**हिमवंत**—पु. हिंवाळा. 'उन्हाळेनि न तापे। हिमवंतीं न कांपे।' -ज्ञा १३. [ सं. हिम ]

**हिमायती**—वि. वास्तविक आश्रित, वशिल्याचा. 'केळकर घराण्यांपैकीं कृष्णाजी सामराज नांवाचा गृहस्थ कान्होजी आंग्रे यांच्या नोकरींत होता व तो हिमायती म्हणजे कान्होजींचा ऋणानुबंधी व त्याजवर वजन असलेला असा होता.' -गुजगो ४४.

**हिमालयी चूक**—स्त्री. फार मोठी, हिमालयाएवढी चूक; घोडचूक; महाचूक. 'आपल्या हिमालयी चुकीची जाहीर कबुलायत द्यावी लागते.' -के २७.६.१९४९. ( इं. 'हिमालयीन एरर' या म. गांधींच्या शब्दप्रयोगाचा अर्थ ).

**हिरवी झेंडी दाखविणें**—आगगाडी चालू करावयाच्या वेळीं मार्ग खुला आहे हें दाखविण्याकरितां हिरवी झेंडी दाखवितात; यावरून मार्ग मोकळा करून देणें. 'अलीबहादुरखान यास १४४ कलमाखालीं हिरवी झेंडी दाखविली पाहिजे.' -विविध ३.१०.१९३७.

**हिरवोर-हरवोर**—स्त्री. टेहळणी; येरझारा; मागेपुढें खेपा. 'त्याचे आरमार हिरवोर करीत आहे.' -पेद ३५.६०. 'वसईचे बारेयापासून मुंबईचे बाऱ्यापर्यंत हरवोर करून राहवे म्हणोन निकडीनें पत्र लिहून पाठविलें आहे.' -पेद ३५.१८४. [ हेर पहा. ]

**हिराशु**—पु. नाश; निर्मूलन; ऱ्हास. 'दीप आपण जळे आणिकां प्रकाशु। तैसे सद्गुरु करिती उपदेशु। आपुलिया यातिकुळा हिराशु। ते करूनि निमाले॥' -योसं ६.४९.

**हिरतरास**—पु. हिऱ्यांस पैलू पाडण्याचें काम करणारा. 'चेना हिरंतरासेयाचा मजकूर लिहिला. तो कळला. त्यास तो अपराधी आहे. त्याचा उजवा हात तोडणें.' -पेद ४९. १३५. [ हिरा+तरास; संगतरासप्रमाणें. ]

**हिलसा**—स्त्री. वल्ली घोळयी; हिलमोचिका; एक वनस्पति. -मसाप ४५.५.

**हिलियह**—१ भूषणें. २ विभूषित. -मुधो. [ अर. ]

**हिंवजाळ**—न. हिंवताप; थंडी वाजून येणारा ताप. 'कइकासीं आलें हिवजाळ धास्तिनें' -ऐपो २.७६.

**हिसाळ**—पु. हिरीरी; चेव. 'माझ्या मित्रांना माझा हा समारंभ थाटानें करण्याचा एक प्रकारचा हिसाळाच आला म्हणाना.' -गतगो ९७७.

**हिंसुदा**—वि. ( व. ) हिंपुटी; श्रमित; थकलेला. 'कुद्या मारून मारून हिंसुदा झाला न मग निजला.'

**हीन**—पु. मध्य वेळ; मधला वेळ. -मुधो. [ अर. ]

**हीनोक्ति**—स्त्री. लघुकरण; हलकी करणें; वास्तविकापेक्षां कमी सांगणें. 'जबाबदार अधिकाऱ्यांनीं तरी ही हीनोक्ति सारवासारव करावयास नको होती.' -के ७.७.१९३७. [ हीन+उक्ति ]

**हीरक महोत्सव**—पु. एखाद्या व्यक्तीस किंवा संस्थेस साठ वर्षे पूर्ण झालीं म्हणजे करावयाचा उत्सव. ( इं. डायमंड ज्युबिलीचा पर्याय. )

**हुक**—स्त्री. शरीरांत भरलेली करक; उसण.

**हुकूक**—पु. हक्क -मुधो. [ अर. हक अने. ]

**हुकूमत**—स्त्री. हुकमत पहा. आज्ञादातृत्व. -मुधो. [अर.]

**हुक्का**—पु. नळा. 'हुक्के करून व आंतील तीन तोफा व बाहेरील दोन तोफा लांब पल्ल्याच्या सिद्ध होत्या.' -वमो.

**हुका**—पु. हुकूम पहा.

**हुग**—पु. हूल पहा. आवई; धास्ती. 'सेजार खोटा म्हणून मोठा हुगानें कालजी धरिले आहे.' –पेद २७.१०६. [फा. ?]

**हुगी**—स्त्री. समाराधना; जेवणावळ. 'गांवें हुगी घालून आगंतुक देवतांचें स्थापन केलें.' तूर्त नलगुंदासारखे गांवांत देवस्थान देवळेंच नाहीतसें झालें आहे. ऐसीयास हुगी घालते समयीं श्रीदेवस्वामीची स्थापना करावी.' 'कुलबाब, कुलकानु वेठबिगार हुगी हचवली, बलुते...' –सनदा १६४.

**हुंगेबाजी**—स्त्री. नखरेबाजी; चटोरपणा. 'समाजांत बोकाळत चाललेल्या स्त्रैण हुंगेबाजीचें विडंबन चित्र काढण्यासाठीं मोरांचा नाच हें नाटक लिहिलें आहे.' –विविध १४.५. १९३९.

**हुच्च्यावर घालणें**—भर देणें; चढवून देणें; भरीस घालणें; बीर देणें. 'परंतु बऱ्याच मंडळींनीं त्याला चिथवून तडजोड होऊं दिली नाहीं आणि हुच्च्यावर घालून तक्रार करण्यासाठीं त्याला हेडमास्तराकडे पाठवून दिला.' प्रतिआत्म ३९०. 'अशा संधीस ही वेळ आलेली पाहून सर्वांनीं उचल खाऊन जेकब यास अर्थातच हुच्च्यावर घातलें.' –प्रतिआत्म २१.१४२.

**हुजत**—स्त्री. पत्र; पावती 'हुजती मियाराजे व वस्तापेरोजखान व मुकासाई कारकीर्दी दरकारकीर्दी तशरुफाती चालत आहे.' –पेद ३१.५.

**हुजरा**—पु. १ मशीद. 'हिंदूच्या इतर कोणत्याहि मिरवणुकी हुजऱ्यावरून जाण्याला आमची मनाई नाहीं.' –के ६.१० १९३९. २ कबरेवरील मदार; मुसलमानाच्या थडग्यावर बांधलेली छोटी इमारत. 'काम तर चांगले आहे परंतु कबरेवरील हुजरा आहे. बंगला नाहीं.' –पेद ३९.१०७. ३ मुसुलमानांची ताबूत ठेवण्याची जागा. [अर.]

**हुझ्ब्र**—पु. सिंह. -मुधो. [अर.]

**हुटहुटणें**—अक्रि. हुटाटणें पहा. उत्कंठित होणें; उतावीळ होणें. 'त्यातें जिंकाया तूं बहु हुटहुटलासि योग्य अनय न हा।' –मोद्रो १७.५४.

**हुडका**—पु. धुडका; तुकडा; कटका; चिंधडी 'ग्रीनलंडपाशीं हूडचे हुडके उडवून देणाऱ्या बिस्मार्क या युद्धनौकेचा ब्रिटिशांनीं पाठलाग केला.' –के ३.५.१९४१.

**हुडका**—पु. शोध; तपास; पाहणी. 'खोलींत कोठें दारूची बाटली वगैरे आहे का हें पाहाण्यासाठीं गोजा अक्का खोलींतील कपाटें, खिडक्यांत हुडकाहि घेऊन आल्या.' –प्रतिआत्मच १२८. [हुडकणें]

**हुंडिका**—स्त्री. हुंडी. 'जेथील राजांनीं कान्यकुब्ज वगैरे देशाच्या प्रबळ राजांना पादाक्रांत केलें होतें तेथीलच हे राजे पोटासाठीं तत्र्यावर हुंडिका हल्लींच्या हुंड्या देऊं लागले.' –राजतरंगिणी ५.१३१. [सं. हुंड=जमा करणें]

**हुनुक**—स्त्री. हौस; प्रवृत्ति; योग्यता. 'कुस्तीची निसर्गदत्त प्रेरणा व हुनुक हे गुणहि अवश्य असतात.' –के २९. ११.१९३८.

**हुंब**—न. एक फळ हें खातात.

**हुंबरडो**—पु. उंबरठा; दाराच्या चौकटीचा खालचा उंबरा.

**हुंबरीतुंबरी**—स्त्री. हमरीतुमरी; बोलाचाली. 'यांसी त्यांसी बहुतसी हुंबरीतुंबरी जाली.' –पेद ६.५९. [ध्व]

**हुमला**—पु. तांबडा मुंगळा; ओंबील; उंबील.

**हुमायून**—वि शुभ -मुधो. [अर.]

**हुरपणें**—अक्रि. होरपळणें. 'तो फुटा पांगुरविला सुंदरी। तो हुरपेला वरिऱ्यावरी। जैसें तापलेया तलावरी। पान फुटोनि जाय॥' –नरुरव ५८३.

**हुरूट**—वि. उनाड. 'हुरूट मुलाच्या नादीं लागलों.'

**हुर्मत**—स्त्री. अब्रू; हुर्मत. –मुधो. [अर.]

**हुऱ्या भरणें**—हुरळून जाणें; चढून जाणें; शेफारणें. 'फौज फार जमा जाहाली म्हणून हुऱ्या भरून सर्वांस अव्हेरयुक्त बोलाल तर न बोलणें. कालदेशवर्तमान पाहून शाहाणपणें वर्तणूक करणें.' –पुद १.१७०.

**हुलका**—स्त्री. (व.) वीट; ओकारी; तिटकारा. 'पहिल्यानं गरवार। येनी अन्नाच्या हुलका। गेला भरतार बाई, दूर पानांच्या मुलुखा॥' –वलो १००.

**हुल देणें**—हूल पहा. हुलकावणी देणें पहा

**हुलीवर घालणें**—प्रोत्साहन देणें. चढविणें; प्रवृत्त करणें; भर देणें. –उपेअंत १४५.

**हुसगटणें**—सक्रि. उस्कटणें; मोडून काढणें; विस्कळीत करणें; अस्ताव्यस्त करणें. 'आंगरे याची स्वारी आली आहे. ते हुसगटून सावल्याचा घाट चढोन जाणें.' –पेद ३०. २६५. [हसकटणें पहा.]

**हुसेनी**—स्त्री. एक तरवारींचा प्रकार. –प्रश ४३. [फा.]

**हुळूक**—स्त्री. शिसारी; ओकारी. 'अन्नाची हुळूक.'

**हृदयपालट**—पु. मनाच्या वृत्तींत बदल; मनाचा पालट. 'शारीरिक काँग्रेसीकरण झाले म्हणून आंतरिक वैचारिक क्रांति उर्फ हृदयपालट थोडाच होणार आहे.' –के १८. ८.१९३९.

**हूण**—स्त्री. धांव; फेक; वार. 'तितक्यांत पुन्हा त्या स्वारांनें राणीसाहेबांना छातींत किराचीची हूण मारिली.' –राणी लक्ष्मीबाई चरित्र ३४० [हूल ?]

**हुप ! हुप !**—स्त्री. वानराचा शब्द. ( त्याला वेडावून दाखवितांना वापरतात. )

**हुलवार**—पु. हृदयास्थीच्या खालीं भोसकून केलेला वार. -मवि ९११.

**हेगतेग**—क्रिवि. टाळाटाळीचें; अर्धवट; काहींतरी; अनिश्चितपणाचें. 'तीन वेळा त्याचे येथें आम्ही व बाबूराव जाऊन साहित्याविसी बोलिलो त्यासी हेगतेग यैसे बोलतात.' -पेद १६.१३९. [ ध्व. ]

**हेटधोर**—वि. हेटधारा अनेकवचन. खालचे. 'हेटधोरे लोकांस इंग्रज काय करतो.' -रा १०.१५६. [ हेट+धोरे= लहान; खालचे. दोन्ही शब्दांचा अर्थ खालचा, लहान असाच होतो. ]

**हेंटाली**—स्त्री. हेटाळणी; हेटाली; तिरस्कार. 'सर्वांचे चित्तांत धनाजी जाधवाची गोष्टी हेंटालीची दिसोन येते कीं त्यांस सरंजाम दिल्हा तो याजवल फौज कैची ? आणि याच्यानें होणें काय ?' -पेद ११.१६. [ सं. हेडन ]

**हेडावणें**—अक्रि. दटावणें; धाक दाखविणें. 'मातेनें बाळकास हेडाविलें। ते अंगसंगेचि लिगटलें।' -योसं २.१५. 'जेवितां मांजर हेडाविलें। तें ठायां भोंवतेंच भोंवों लागलें.' -योसं २६६. [ सं हेडन ]

**हेंडेहोळ**—वि. रिकामपणीं फिरणारा; भटक्या.

**हेडीमेडी**—वि. कुरूप. 'त्या हेडयामेडया बायकोचें तोंड पहावयास नको म्हणून.'

**हेड्या**—पु. दलाल; प्रतिनिधि; एजंट. 'या गंगाविष्णूचा हेडया यजमान साहेबांस भेटला. मग त्यास आम्ही यात्रेस निघालों ही बातमी कशी समजली कोणास ठाऊक.' -प्रति-आत्म ३५६. [ हेड ]

**हेण्या-ण्यां**—क्रिवि. (चि.) इकडून; येथून; एथून.

**हेरबोर**—हिरबोर पहा.

**हेराफेरा**—पु. चुरस; चढाओढ. 'मग आम्ही डोंगर हेऱ्याफेऱ्यानें उतरूं लागलों, तट्टें चांगलीं हुशारीनें संभाळून चालत होतीं.' -राणीचें पुस्तक ४५. [ हेरफेर ]

**हेरी**—स्त्री. १ हालहवाल. २ दृष्टि. 'चोऱ्यांशीं लक्ष मायबापें अघोरी। ते अवेगनातीं आळविती परोपरी। माझ्या दुःखसुखाची हेरी। ते नेणतीच कांहीं।' -योसं ३.४५. 'तंव सांगो आरंभिली सगुणाची हेरी। ऐका श्रोते सावध ॥' -योसं ५.७७.

**हेरे**—स्त्री. परीक्षा; पारख; हेरणी. 'सारांश गजाची हेरे गजास.' -पेद २४.२७. [ हेरणें ]

**हेलावा**—पु. लाट; समुद्राची लहरि. 'पूर्ण सिंधु हेलावे। फुटती जै।' -ज्ञा १३.

**हैदाना**—पु. दंगा.

**हैसा**—पु. तंग आवळण्याची वादी.

**होगलणें**—अक्रि. उपेक्षा करणें. 'ज्ञालासि त्राताचि न होऊनि अधीन होगलिता।' -मोद्रौवह १०३.

**होगा**—पु. दहाबारा हात व्यासाचें मासे पकडण्याचें जाळें. -किर्लो मे ३९.९३३.

**होडलें**—वि. (गो.) व्हडलें पहा. मोठें; वडील.

**होमागार**—न. होमशाळा; होम करण्याची जागा. 'तैसे तिघे होमागारीं जरासंधें देखिले।' [ सं. होम+आगार ]

**होय न होय**—स्त्री. होय किंवा नाहीं याचें निश्चितीकरण; अस्तिनास्तिपक्षनिर्णय. 'बटिक माणकोजीनें कसी विकली याचा होय न होय करील...येका महिन्यांत गौली यानी येऊन होय न होय न केली तरी गौलियास बोलावयास समध नाहीं.' -अप्रसिद्ध कागदपत्रें.

**होरी बेरी**—स्त्री. हिरबोर पहा. यरझारा; मागेंपुढें जाणें. 'आकस्मात ढालणी घेऊन फिरोन जंजिरे मजकूरचे बारियावर होरीबेरी घेत राहिली.'

**होश्यमाण, होष्यमाण**—वि. पुढें होणारी; भविष्यकालीन; भावी. -पेद ३४.८०. 'होश्यमाणानुरूप होणें तें धण्याचें पुण्यप्रतापें होईल.' -पेद ३३.२९. [ होणें. सं. भू. ]

**हौजह**—बाजू; भाग.

---

# क्ष

**क्षाम**—पु. काळ; दुष्काळ. 'त्या दिवसांत तंजाउर देशाचे किल्ल्यांत ही केवळ क्षाम पडून दाणा मिळेना.' -तंजाशिला १०७.

**क्षार** ( करणें )—क्रिवि. दूर. 'फिरंग्यांनीं हिंदू लोक बाटवून क्षार केले.' -पुरु डिसें. १९३८. -वसमो.

**क्षिती**—स्त्री. कमाल; मर्यादा; अखेर; अंत; शेवट. 'फिरंगी ते ठिकाणाहून मारीत मारीत बाग सराई सोमेश्वराचे खिंडीत क्षिती केली.' -ऐपो २.५२. [ सं. क्षति ]

**क्षीराब्धी**—स्त्री. खिरापत; प्रसाद. 'आषाढी व कार्तिकी क्षीराब्धीस डाळ चणियाची, गूळ.' -सनदा १७०. [ खिरापत पहा ]

**क्षेत्र**—न. (फज्यो.) राशि. [ सं. ]

**क्षेपक**—न. मध्येंच घातलेला; घुसडलेला ( श्लोक, मजकूर वगैरे ). [ सं. क्षिप् ]

**समाप्त**

विश्वांतील यच्चयावत् ज्ञानाचें सुलभ संकलन म्हणजेच

# सुलभ विश्वकोश

## [ विभाग १ ते ६ ]

१५००० लेख, १००० चित्रें आणि नकाशे.

शब्दकोश आकाराचीं ३००० पृष्ठें

: संपादक :

**यशवंत रामकृष्ण दाते**

**चिंतामण गणेश कर्वे**

[ संपादक : ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदाय कोश, शास्त्रीय परिभाषाकोश ]

उत्कृष्ट छपाई व संपूर्ण कापडी बांधणी

'सुलभ विश्वकोशा'चें संपादनाचें सर्व काम झालें आहे.

तीन विभाग बाहेर पडले व उरलेले तीन १९५० अखेर छापून होतील.

किंमत
- आजच एकदम रक्कम ११० रुपये
- अ.गाऊ ग्राहकांस सवलतीनें हप्त्यानें फक्त १३० रुपये
- प्रसिद्धीनंतरची किंमत १५० रुपये

**कोश कार्यालय, ३ बुधवार, पुणें २.**

